आजकालच्या गोष्टी—गोष्ट ३ री.

# जग हें असें आहे!



हरि नारायण आपटे



आवृत्ति २ री.

पुणें.

किंमत २ रुपये.

हें पुस्तक पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत नटेश अप्पाजी द्रवीड यांनीं छापिलें

व

हरि नारायण आपटे यांनीं प्रसिद्ध केलें.

माझे परम मित्र

कै० रामकृष्ण भिकाजी ऊर्फ दामुअण्णा कुळकर्णी

यांच्या स्मृतीस्तव

हें पुस्तक अर्पण केलें आहे.

# अनुक्रमणिका.

# जग हें असें आहे!

## प्रकरण १ लें.

### उपोद्घात–गोष्टीच्या पूर्वी कांहीं वर्षें.

दामोदरपंतानें पैसा कसा मिळविला याच्याबद्दल लोकमत ऐकूं जातां, जितक्या लोकांचें बोलणें ऐकावें, तितकीं अगदीं निरनिराळीं मतें कानीं पडतीं. एकाचें मत कांहीं दुसऱ्या कोणाच्या मताशीं कधीं जुळलें नाहीं; पण एका बाबतींत मात्र सगळ्या लोकांचें अगदीं एकमत होतें. कोणाचेंही ह्मणणें ऐका, त्याचा इत्यर्थ असाच असावयाचा कीं, पैसा कांहीं तरी वाईट मार्गानें मिळविला. अमुक एका सरळ मार्गानें दामोदरपंतानें पैसा मिळविला असें स्वप्नांतसुद्धां कधीं कोणी ह्मटलें नसेल. त्याच्या पैशाविषयीं गोष्ट निघाली ( आणि ती त्याच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या व आप्तेष्टांच्या तोंडीं दिवसांतून पांचचार वेळ तरी निघावयाचीच ) कीं, कांहीं गंभीर चेहरे करून एक सर्वसाधारण सिद्धांतच ठोकून देत. " अहो, ' ब्राह्मणाला कुदान आणखी गृहस्थाला अवदान ' सांपडल्याखेरीज का कधीं गबरपणा यायचा आहे ? " कोणी ह्मणत, "हं ? हं ? अवदान पण अवदान असं मारलं आहे कीं वा ! ढेकर दिली तेव्हां हातापायांत शृंखळाच पडायची वेळ आली होती; पण मग त्यांतला भाग गोऱ्या तोंडांतच् जेव्हां घातला तेव्हां तें चट् सारं जिरलं. " कोणी ह्मणत, " चाकरीवर असतांना खूप लांचलुचपत खाल्ली. " कोणी ह्मणत, " किती बायाबापड्यांना फसवून रडत बसवून आपला तळीराम गार केला ! " सारांश, कोणी कांहीं, कोणी कांहीं म्हणून पण त्या पैशाच्या उगमाची मीमांसा एकंदरींत दामोदरपंताला अनुकूल अशी कधींच होत नसे. पैसा कसाही मिळविलेला असो; पण पुढें पुढें दामोदरपंत त्याचा व्यय लोकदृष्टीनें बरा करीत. द्वादशीला बारा ब्राह्मणांस भोजन घातल्याचें पुण्य त्यानें कधीं सोडिलें नाहीं. रोजची कोणत्याना कोणत्या तरी देवळांत एकादृष्णी करविल्याखेरीज तो राहिला नाहीं. वर्षाच्या कांठीं एखादा लघुरुद्र आणि चार दोन सालांनीं एखादा महारुद्र झाल्याखेरीज कधीं त्याचें चालत नसे. कधीं मंत्रजागर, कधीं हरिकीर्तन, वसंतारंभीं वसंतपूजन,

व्रतवैकल्यांच्या समाप्तीच्या वेळीं ब्राह्मण-भोजन आणि पर्वकाळीं वायनदान हीं आपल्या स्वतःच्या, बायकोच्या किंवा मुलाच्या हातून व्हावयाचींच.यामुळें दामोदरपंताची कीर्ति ( निदान भिक्षुकांच्या मतें ) अगदीं अजरामर होत चालली होती. " पैसा का येईना, पण त्याचा व्यय फारच उत्तम होतो आहे हो ! " " दामोदरपंताची बुद्धि फार धार्मिक बा ! " " आजचा बेत काय पण फक्कड होता ! अगदीं इच्छाभोजन होतें, " असे उद्गार रामभट लेला, वामनभट पेणसा, कृष्णंभट आपटा आणि बाबदेवभट वैसास यांच्या तोंडून हटकून निघत आणि कोणी दादंभट धुसपुशा यावर, " काय झालं केलान् व्यय म्हणून ? आधीं अनन्वित पातकं करून पैसा मिळविला आहेन्, आतां देवांचीं संतर्पण करून तीं धुऊन टाकायला पहातो आहे बेटा ! " असें ह्मणा-लाच, तर त्याच्याबरोबर बाकीचेही " तें खरं रे, पण ही तरी बुद्धि आहे कुठें ? ही तरी हवीना ? तेव्हांच ब्राह्मण-संतर्पणं होतात नी देवसंतर्पणं होतात म्हटलं; उगीच नाहीं होत ! " असेंही म्हणून आपली अप्रत्यक्ष अनुमति देत. असो, या भिक्षुकांच्या म्हणण्याप्रमाणेंच आपणही ह्मणूं कीं, पैसा कसाही का मिळ-विलेला असेना. मात्र त्याचा फायदा भिक्षुकाना मिळत असे. तसा आपल्यास मिळण्याचा संभव नाहीं, याला नाइलाज आहे.

दामोदरपंतांनीं आपल्या त्या पैशाचा उपभोगही बरेच दिवस घेतला व तो वाढ-विलाही. त्यांची एक बायको मेली, दुसरी मेली, तरी त्यांनीं तिसरी केली. पहिली बायको त्यांच्या श्रीमंतीच्या दिवसांतली नव्हती. साधारण दारिद्र्य होतें तेव्हांच तिची संगति त्यांना सुटली. मात्र तिनें आपला एक तंतु मागें ठेविला होता. हा मुलगा दोन वर्षांचा होता. दामोदरपंतांनीं लागलींच दुसरा विवाह केला. तेव्हां त्यांचें वय अठ्ठावीस वर्षांचें होतें. अर्थातच विवाह करण्याबद्दल त्यांना कोणीं नांवें ठेविलीं नाहींत. दुसरी बायको चांगली मोठी पाहून केली. ती बारा वर्षांनीं एक मूल होऊन बाळंतपणांतच मेली. हें मूल जगलें. मात्र, 'तें जगलें कशाला ?' याबद्दल बापाला क्षणोक्षणीं पश्चात्ताप होत असे; कारण तें मूल अगदीं अजागळ, अगदीं वेडें होतें. दुसरी बायको वारल्या-नंतर दोन तीन वर्षें लग्न करावें न करावें या विचारांतच गेलीं. पहिल्या बायकोचा मुलगा आतां चांगला मोठा चवदा वर्षांचा झाला आहे; दुसरें लग्न केलें तर त्याची ही अशी संतति झाली आहे; तेव्हां आतां तिसऱ्याचे काय प्रकार होतात, आणि काय नाहीं ! लग्न करूं नये तें चांगलें असें त्याला वाटे. आतां " मुलाचें लग्न लवकर करून सून घरांत आणावी आणि त्याचा संसार थाटावा, आपला झाला !" असें तो तोंडानें म्हणे आणि त्याप्रमाणें मुलासाठीं मुली पहाण्यालाही लागला. पुष्कळ मुली पाहिल्या पण दोन तीन वर्षें मुली पसंतच पडेनात. इतक्या या वेळांत त्यास स्वतःचें लग्न करण्याच्या विचाराचा विसर पडत चालला होतासें दिसलें; परंतु एके दिवशीं मुली पहातां पहातां स्वारीच्या नजरेस एक चौदा वर्षांची धिप्पाड मुलगी आली. त्या मुलीच्या बापानें ती दाख-विली होती चिंतूसाठीं. परंतु चिंतूस मोठी आणि आपल्यास बेताची अशी वाटल्या-वरून व घरच्या उपाध्यायांनीं " आप-ल्याला सुद्धां देण्याला मुलीच्या बापाची हरकत नाहीं होणार " असें आश्वासन

दिल्यामुळें, स्वारीच्या मनांत तावडतोब लग्न करण्याचें आलें व उपाध्येबोवांच्या करामतीची शाबास म्हणावयाची, बापानेंही ती त्यांना देण्याचें कबूल केलें. झालें! लागलीच पहिल्याच सुमुहूर्तावर 'शुभमंगल सावधान' झालें आणि चिंतू सपत्नीक व्हावयाचा होता तो समातृक झाला. तो लहान नसल्यामुळें त्याला सर्व प्रकार समजून तो दामोदरपंताचा व त्या नव्या आईचा मनापासून तिटकारा करूं लागला. "मुलाला पाहिलेली बायको म्हाताऱ्यानें आपल्यालाच करून घेतली" अशाबद्दल साऱ्या गांवभर टीका झाली आणि शाळेंत मुलें सुद्धां त्याला "याची बायको याची आई झाली" असें म्हणून चिडवूं लागलीं. काय करतो बिचारा? त्याचा द्वेष, त्याचा राग, त्याचा तिटकारा सगळा जेथल्या तेथेंच दाबून ठेवावा लागला. पुढें त्या सावत्र आईचीं थेरें दामोदरपंताकडून होऊं लागून जेव्हां दृष्टीस पडूं लागलीं, तेव्हां तर त्याच्या तळपायाची आग मस्तकास जाऊन भिनली. त्याची नवी आई खरोखर चांगली असे; पण त्याच्या संतापांध दृष्टीला तिचा चांगुलपणा कधीं दिसला नाहीं. त्यांत पुढें त्याचें लग्न झाल्यानंतर एक दोन वर्षांतच त्या आईला एक मुलगा झाला आणि पुढें दोन वर्षांनीं एक मुलगी झाली. मग तर काय विचारूंच नका. आपल्याला आणि आपली बायको सरस्वती इला कोणी विचारीना असें चिंतूस वाटे. सरस्वती आणि तिसरी बायको राधाबाई यांच्या वयांत दोनच वर्षांचें अंतर, परंतु एक सून आणि एक सासू, यामुळें सासूच्या माहेरच्या माणसांनीं तिला सासूपणा गाजविण्यास लावण्याचा यत्न केला. पण चमत्कार हा कीं, सासू स्वतः कधींही सुनेस दुरुत्तर बोलली नाहीं, इतकेंच नव्हे तर आपलीं माहेरचीं माणसें आपल्या नांवावर वाटेल तशीं थेरें करतात आणि आपल्यावर वाईटपणा आणतात याबद्दल तिला फार वाईट वाटे. ती फार चांगली होती, पण तिचा चांगुलपणा दाखविण्याला तिला कधीं सवडच सांपडत नसे. तिची आई घरांत येऊन राहिली होती, ती सर्व कारभार करून सगळ्यांस एकीकडे बसवी. मुलें झालीं आणि तीं दिसण्यांत संवरण्यांत गोरीं गोमटीं चांगलीं झालीं. यामुळें तर तिचे जे जयजयकार होऊं लागले तें अगदीं विचारूंच नका. राधाबाईला त्याबद्दल फार फार वाईट वाटे. आपला सावत्र मुलगा आपला विनाकारण द्वेष करितो, आणि त्याची बायको आपल्याला अगदीं पाण्यांत पहाते, हें तिला समजत असे आणि वाईटही वाटे. पण तिच्या आईपुढें तिचें कधीं कांहीं चालेना आणि आपण अधिकारानें हट्टानें आपलें चालवावें, तर तितका धीटपणा तिच्या अंगीं नव्हता. तिची मुलगी वारी आणि मुलगा सीताराम हीं दोघें मोठीं होता चाललीं, तसतसे त्यांचे लाड अधिक अधिक होत चालले हें उघडच आहे. (आणि तीं मुलें लाड करण्याजोगीं होतींही.) पण त्यांना पाहिलें कीं, चिंतू आणि त्याची बायको यांच्या अंगाचा नुसता संताप होऊन जाई. त्यांतून चिंतूचा इतका नाहीं. त्याला त्या गोजिरवाण्या भावंडाचें पुष्कळ वेळां कौतुकही वाटे, पण एखादी महामाया सवतीच्या पोराचा सुद्धां द्वेष करावयाची नाहीं, इतका त्या पोरांचा द्वेष त्याची बायको करीत असे. घरांत तिचें कांहीं चालत नसे हें तर उघडच आहे. परंतु तिची जीभ इतकी विषारी असे, कीं तिनें तो विषार नवऱ्याच्या

कानांत ओतून ओतून नवऱ्याला जवळ जवळ आपल्यासारखा वाईट करून ठेवला. त्याचें अंतःकरण मूळचें वाईट होतेंच. बापाविषयींचा तिरस्कार जागृत होताच. त्यांत जिला तो अगदीं सद्गुणांची खाण मानी, अशा बायकोनें घरांतल्या खोट्यानाट्या चुगल्या सांगावयाच्या. मग काय ? मुलाच्या मनांत सावत्र आईविषयीं, भावंडांविषयीं आणखी बापाविषयीं पक्का तिरस्कार उत्पन्न झाला. मुलगा दहा वर्षांचा झाला आणि मुलगी आठ वर्षांची झाली. पुढें आणखी तीन मुलें झालीं. दोन मुलगे आणि एक मुलगी. जों जों या तिसऱ्या राधाबाईच्या संसाराचा विस्तार होऊं लागला, तों तों चिंतू आणि सरस्वती यांच्या जिवाचा निरवधि संताप होऊं लागला. आपल्या इस्टेटीला इतके हे वांटेकरी, आणि मधल्या आईचा तो एक वेडा रूगकरी असें सरस्वतीच्या मनांत येऊन ती जळफळ जळफळ करी व नवऱ्यास शिव्या देई. पण त्या जळफळीचा आणि शिव्यांचा उपयोग काय ? बाप जिवंत होता, आईची आई घरांत मुखत्यार झाली होती. तेव्हां त्यांचें चालणार काय ? त्यांत आणखी त्याच्या परीक्षा वगैरे उतरेनात यामुळें बाप बोले. सावत्र आईची आईही बोले. सावत्र आई कधीं बोलत नसे. उलट त्यांचा कैवार घेई. पण त्याला व त्याच्या बायकोला तें कधींच दिसत नसे. उलट तिचें करणें व बोलणें सगळं मानभावाचें असें वाटून तिच्याविषयीं सरस्वतीच्या मनांतला आणि सरस्वतीमुळें चिंतूच्या मनांतला तिटकारा दसपट वाढला. याच सुमारास ह्मणजे राधाबाईला मुलगी झाली त्याच सुमारास सरस्वतीलाही एक मुलगा झाला आणि कर्मधर्मसंयोगानें तो मुलगा झाला तेव्हांपासून दामोदरपंत आजारी पडले. तें पाहतांच राधाबाईच्या आईनें नातवाचा पायगुण वाईट, नातु मुळावर दिसतो आहे असें बोलणें चालविलें आणि दामोदरपंतांच्या क्षीण मनाला तें खरें वाटलें, यामुळें तर फारच वाईट झालें.त्या मुलाची अनास्था झाली आणि चिंतू व सरस्वती यांचा बापाबद्दलचा, सावत्र आईबद्दलचा आणि सावत्र भावंडांबद्दलचा द्वेष परमावधीला गेला. बायको बाळंतपणांतून उठतांच आपण घर सोडून जावयाचें असा विचार चिंतूच्या मनांत आला; पण सरस्वतीनें तो लागलीच मोडून काढून ह्मटलें, ' असं कशाला पाहिजे ? घर सोडून जातें आहे मी ? माझं नाहीं का घर ? मी यायची नाहीं.कांहीं दिवस सासवेचे आणि कांहीं सुनेचे आतां येतील बघा ! ' नवरा प्रेमानें आंधळाच झालेला, यामुळें त्याला तिच्या बोलण्याचा झोंक समजला नाहीं. परंतु तो फार बाईट होता. " सासरा कांहीं आतां जगत नाहीं, मग पहातें काय आहे तें ! " असं ह्मणण्याचा तिचा एकंदर रोख, आणि काय दैवाची गति विचित्र ! तिनें वरील उद्गार काढले त्याच्या दुसरेच दिवशीं सासऱ्याची प्रकृति अधिक झाली. आतां आपण मरणार असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें आणि आपल्या मागें लहान लहान पोरांची व्यवस्था करणारा कोणी नाहीं, आपण आपल्या थोरल्या मुलाला नीट वागविलें नाहीं हें बरें केलें नाहीं असें वाटून एकदम बुइल ( मृत्युपत्र ) करावें असें मनांत आलें. त्याप्रमाणें त्यानें बुइल करून नीट व्यवस्थेशीर ठेविलें आणि थोरल्या मुलास आपल्याजवळ बोलावून व सगळ्या लहान मुलांनाही बोलावून तीं सर्व मुलें त्याच्या स्वाधीन केलीं. थोरल्या मुलीला आतां

नववें वर्ष लागलें होतें. तिचें लग्न आपल्या देखत करून टाकलें असतें तर फार चांगलें झालें असतें; पण नाहीं माझ्या नशिबीं. आतां या सगळ्या मुलांना माझ्या ठिकाणीं तूं आहेस. तीं मोठीं झालीं ह्मणजे वुइलाप्रमाणें सर्व व्यवस्था कर, असें डोळ्यांत आसवें आणून सांगितलें. चिंतू त्या वेळीं गहिंवरून ह्मणा, किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें ह्मणा अगदीं स्तब्ध होता. एक अक्षरही बोलला नाहीं. याच्या मनांत आजपर्यंतचा राग असेल असें समजून आपल्या क्षणोक्षणीं निस्तेज होत चाललेल्या डोळ्यांनीं त्याजकडे पाहून बाप ह्मणतो, 'चिंतू, मी आतां मरणाच्या दारीं पडलों आहें. आजपर्यंत झाल्या गोष्टी विसर. हीं मुलं, तो वेडा, आणखी ही बायको आतां तुझ्या स्वाधीन करतों. तुला खरं सुद्धां वाटणार नाहीं, पण मी तुला सांगतों, हिनं आजपर्यंत एकदांसुद्धां तुझ्या विरुद्ध असा ब्र काढला नाहीं. जेव्हां केव्हां मी तुझ्याविषयीं वाईट बोलें, तेव्हां ही तुझा अगदीं पुरा कैवार घेई. कधीं सुद्धां हिनं तुझं वाईट चिंतलं नाहीं. आपल्या पोराप्रमाणं तिचा तुझ्यावर लोभ आहे. पुनः एकदां तुला सांगतों. आपल्या या इस्टेटीच्या वांटण्या व्हाव्या, भांडणतंटे व्हावे हें मला अगदीं नको; ह्मणून माझी इच्छा अशी आहे कीं, तुह्मीं सगळ्यांनीं एके ठिकाणीं रहावं. सगळ्यांनीं एके ठिकाणीं एकचित्तानं असावं. तीं मुलं अज्ञान, त्यांना कोणी तरी ओढीस लावणारा पाहिजे. तुझ्याखेरीज कोणी नाहीं. तूं जर नीट वागलास, तर ही तुला सोडून जाणार नाहीं. माझी खात्री आहे. काय ? बोलत नाहींस हा ? ' आपल्या सावत्र आईच्या तर्फेनें आपला बाप बोलत असतां क्रुद्ध व मत्सरयुक्त नेत्रांनीं त्यानें तिच्याकडे पाहिलें व बाप काय बोलत होता, तिकडे स्वस्थपणें दुर्लक्ष्य करून तो उभा होता. त्याचें चित्त दुसरीकडेच होतें हें उघड दिसत होतें. आपण इतकें बोललों, आपल्या अंगीं त्राण नसतांना आपण इतकें त्याला सांगितलें, परंतु अद्यापि हा बोलेना यामुळें बापाला फार वाईट वाटलें. शेवटीं त्यानें पुनः " काय ? मी बोलतों आहें याचा नाहीं का कांहीं उपयोग होत ? तूं असाच आपला राग कायम ठेवणार कीं काय ? इतका तूं निष्ठुर आहेस असं मला ठाऊक असतं तर......... " परंतु पुढें कांहीं त्याला बोलवेना. त्याचे शब्द गळ्यांतल्या गळ्यांत अडखळूं लागले. मात्र त्यानें इतक्या विलक्षण दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें, कीं एकदम चिंतूला कसेंसेंच वाटून तो " नाहीं. नाहीं. अण्णा, तुह्मी अगदीं काळजी करूं नका. मी यांना बिलकुल अंतर देणार नाहीं, " असें ह्मणाला. त्याबरोबर ह्मातान्याला अगदीं पुनः जीव आल्याप्रमाणें झालें आणि तो पुनः खडबडून जागा झाल्याप्रमाणें डोळे उघडून आपल्या मुलाचा हात धरून त्यास म्हणतो, " खरंना हें ? अगदीं खरं ? " मुलानें 'होय ' असें सद्गदित कंठानें उत्तर दिलें. त्याबरोबर ह्मातारा आणखी म्हणतो, ' वहा तर मग शपथ. वहा शपथ. त्याच्याखेरीज माझा जीव कधीं जायचा नाहीं. इथल्याइथें इथल्याइथें घोंटाळेल. आणखी ......वहा शपथ, वहा ! ' चिंतूचें अंतःकरण आतां अगदीं अत्यंत मृदु झालें होतें. त्यानें लागलीच, " अगदीं तुमचीच शपथ, कीं मी यांना मुळीं सुद्धां अंतर देणार नाहीं, " असें उत्तर दिलें. पुनः ह्मातान्यानें लागलेंच म्हटलें, 'आणखी

आणखी शपथ वहा, कीं मी या वुइलांत सांगितल्याप्रमाणें अक्षरशः वागेन. त्याच्या बाहेर काडीइतकासुद्धां जाणार नाहीं. आणखी यांच्या पैशाला शिवणार नाहीं. ' चिंतूच्या मनाची स्थिति आतां इतकी विलक्षण मृदु झाली होती कीं, त्यानें ही दुसरीही शपथ वहाण्यास एक क्षणाचासुद्धां विलंब केला नाहीं. त्याची बायको जर जवळ असती तर इतका मृदुपणा तिनें येऊंच दिला नसता. केवळ डोळ्यांच्या जरबेनें त्याला तिनें जागें केलें असतें. परंतु ती नव्हती आणि तो मवाळला. तीही शपथ वाहिली. तेव्हां झाताऱ्याचा जीव खालीं पडलासें दिसलें. त्याच्या आईलाही फार समाधान झालें. आपलें व आपल्या सावत्र मुलाचें वांकडें पडूं नये अशी तिची खरोखर इच्छा. श्रीमंत नवऱ्याच्या तिसऱ्या बायकोची, स्वतःला पांच मुलें असतांना आपल्या सावत्र मुलाविषयीं इतकी चांगली बुद्धि असणें हें मोठें विलक्षण. पण तें राधाबाईच्या अंगीं होतें.

वर सांगितल्याप्रमाणें शपथ वाहविणें झाल्यावर आपण आपल्या हातानें लिहून तयार करून पाकिटांत घालून बंद केलेलें वुइलपत्र दामोदरपंतानें मुलाच्या हातीं दिलें. आणि पुनः त्याचश शपथाआणांची आठवण त्याला करून देऊन त्या सगळ्या मुलांना घेऊन घटकाभर बाहेर जाण्यास सांगितलें. त्या मुलांत तो वेडाही होता. तो जातांना दृष्टीस पडला, तेव्हां पुनः एकदां त्यांनीं त्याला अंतर न देण्याबद्दल थोरल्या मुलाला बजाविलें आणि बायकोला जवळ बोलाविलें. या वेळीं आतां बायकोखेरीज कोणी जवळ नव्हतें. तिच्या डोक्यावर त्यांनीं हात ठेवला आणि अत्यंत सद्गदित कंठानें म्हणतात, " पांच धोंडे गळ्यांत बांधून एखाद्या गाईला विहिरींत सोडून वरून चट्कन दोर कापून टाकावा त्याप्रमाणेंच मी तुला करतों आहें. हा पोरगा हाडाचा इतका वाईट नाहीं; पण याच्या बायकोबद्दल तूं सावध अस. त्याला उगीच मीं मोठेपणा दिला आहे. तुझांला कांहीं भानगड पडूं नये म्हणून सगळं जें काय आहे तें तुझ्यान् तुझ्या मुलांच्या नांवाचंच केलेलं आहे. तुला काळजी नको. मात्र तूं आतां आपल्या सुनेपासुन जितकी दूर राहशील तितकं चांगलं. ती सगळ्या....आणखी तुझी आई—" पुढें त्याच्यानें बोलवेना यामुळें किंवा एकदम तेथें तिची आई आल्यामुळें झणा, पण तो थांबला. राधाबाईची आई आली ती अगदीं संतापानें लाल झालेलीच आली. आणि एकदम, " असा पोरीचा गळा कापायचा होता तर लग्न केलंत कशाला ? आणखी एक, दोन, तीन, चार, पांच कारटीं ठेविलीं आहेत तिच्या गळ्यांत ! मी तुझांला सुखानं मरूं नाहीं द्यायची माझ्या पोरीची काय व्यवस्था केली आहेत ती समजल्याशिवाय ! सांगा, सांगा, काय त्या वुइलांत का फुइलांत काय लिहिलं आहेत तें...... " तिच्या तोंडाचा आणखीही पट्टा - चालू राहता, परंतु तिच्या लेकीनें संतापानें उठून तिच्या तोंडावर हात मारला आणि " ठेवलं आहे लिहून मीं भिक्षा मागावी म्हणून. तुला काय करायचं आहे ? आई, तूं माझी आई नाहींस, मांगीण आहेस का काय ? आत्तां बाहेर जा. " असें म्हणून तिन तिला बाहेर लोटलें. नवरा मरणाच्या द्वारीं पडला असतां त्याच्या कपाळीं सोन्यानाण्याच्या आणि पैशाआडक्याच्या गोष्टी काढून त्यांना मरतांनाही दुःख व्हावें हें

तिला बिलकुल खपलें नाहीं. त्याच्या मरणानें होणारा शोक आणि त्यांत हा धांगडधिंगा तिला कसा खपेल ! पण राधाबाईची आई खरोखरच राधाबाईच्या म्हणण्याप्रमाणेंच होती. तिनें, " गप्प बस पोरी, तुला कांहीं तरी अक्कल आहे का व्यवहारांतली ? उद्यां भिक्षा मागायला लागेल तेव्हां कळेल. अहो आणा, आणा किल्ल्या कुठें आहेत त्या. आणखी द्या तें बुइल का काय केलं आहे तें " असें म्हणून झट्कन दामोदरपंताजवळ जाऊन त्याच्या खांद्याला धरून तिनें सडकून हलविलें. पण तेथें काय होतें ! दामोदरपंताचा प्राण तिच्या पहिल्या पट्ट्याच्या तडाख्याबरोबरच निघून गेला. दामोदरपंत मेला असें पाहतांच ती बाई, " गेला ! मेला पोरीचा गळा कापून गेला ! मेल्यानं खाटकाच्या हातीं माझीं गाय न् वासरं दिलींन्,आतां तो चराचरा कापून काढील." असा रूपकात्मक शोक करूं लागली. शोक तर खराच, पण त्यांत जांवयाला आणि त्या सावत्र नातवाला नानाप्रकारच्या शिव्याशाप देऊन तो चालविला होता. परंतु आईच्या या कृतीनें राधाबाईला असें झालें कीं, नवऱ्याबरोबर आपलाही प्राण गेला असता तर फार चांगलें झालें असतें. तिनें आपल्याकडून पुष्कळ प्रकारें आईला दाबलें परंतु छे ! " अग बाई, तुला भिक्षाच आतां मागावी लागेल. ग, अग, आतां हीं पोरं वार लावून जेवूं लागतील. कसंरे मेल्या असं करून गेलास ?" ह्या व अशा तऱ्हेच्या शब्दांनीं ओतप्रोत भरलेले हेल काढीत सगळ्या घरभर बाई हिंडत होती आणि जें कांहीं सांपडेल तें एका खोलींत आणून भरीत होती. जेथें कुलुपें होतीं, तेथें त्या कुलुपांच्या किल्ल्या आपल्या स्वाधीन करून घेण्याकरितां तिची नुसती धडपड चालली होती. तिची ही धडपड सुरू होतांच सरस्वतीनेंही आपला शोक आवरून तशीच धडपड सुरू केली. तिनें कांहीं रुप्याचें वगैरे भांडें उचललें कीं, हिनें तें हिसकावलेंच. ती कुलूप घालावयाला गेली कीं,हिनें हाताला हिसडा दिलाच. असा प्रकार सुरू झाला.

बाहेर दामोदरपंताचें प्रेत उचलून नेण्याला आलेल्या मित्रमंडळीची एकच गर्दी आणि आंत या दोघींची लठ्ठालठ्ठी. शेजारणींनीं येऊन कांहीं सांगावें, पण एवढें धैर्य कोणाला ? शेवटीं प्रेत नेलें तेव्हां तर नुसता धुडघूस सुरू झाला. बिचाऱ्या राधाबाईला असें झालें कीं, हीं मुलें जर आपल्या गळ्यांत नसतीं तर आपण खचित अफू तरी कुटून खाली असती, अगर विहिरींत उडी टाकून जीव दिला असता. नवरा मेल्यामुळें तिला अतोनात दुःख झालें. परंतु स्वस्थपणीं बसून आपल्या आपल्याशींच शोक करीत बसण्यालासुद्धां सांपडूं नये यासारखें दुर्दैव कोणतें ? त्या दिवशीं त्या सगळ्या गांवांत कोण छीः थुः ! बिचारीच्या आईनें इतका धिंगाणा केला, परंतु नांव झालें राधाबाईचें !

# प्रकरण २ रें.

## उपोद्घात पुढें चालू.

नवऱ्यापरी नवरा गेला, त्याबद्दल अतोनात दुःख झालें आणि स्वस्थपणें शोक करूं म्हटलें तर तोंही करण्याला मिळूं नये यापरतें दुर्दैव आणखी कोणतें ? परंतु असलें दुर्दैव राधाबाईच्या पाठीस हात धुवून लागलें होतें. सगळ्या गांवांत असा बोभाटा झाला कीं, राधाबाईनें आपल्या नवऱ्यास सुखानें मरूंसुद्धां दिलें नाहीं. सगळें कायतें आधीं माझ्या स्वाधीन करा ह्मणून त्याच्या पाठीस लागली आणि नाहीं नाहीं तें नानाप्रकारांनीं त्याला बोलली, त्यामुळें त्याला भयंकर धक्का बसून तो उद्यां मरावयाचा तो आजच मेला. जगाच्या दृष्टीनें राधाबाईचें तोंड काळें झालेलें, तेव्हां तिला कांहीं बाहेर जाऊन ' असें झालें नाहीं ' आणि ' तसें झालें ' असें ज्याला त्याला सांगणें शक्य नव्हतें. पण सरस्वतीची गोष्ट तशी नव्हती. तिला आतां चारी दिशा मोकळ्या झाल्या आणि तिनें मिळालेल्या स्वातंत्र्याचा अगदीं पूर्णपणें फायदा घेतला. शेजारच्या पाजारच्या तर काय, परंतु लांबच्या नात्यागोत्याच्या मंडळीला सुद्धां तिनें मुद्दाम जाऊन भेटून त्यांचेजवळ राधाबाईची अद्वातद्वा नालस्ती केल्याखेरीज ठेविली नाहीं. आणि ती नालस्ती-अशी तशी का ? छे ! जितक्या तऱ्हेनें म्हणून सासूच्या अंगीं वाईटपणा स्थापितां येईल तितक्या तऱ्हेनें तिनें प्रत्येकाच्यापाशीं नालस्ती करून स्थापला. जगाला काय ? वाईट गोष्ट असली कीं ती फैलावण्यांत नेहमींच मोठा आनंद होतो. राधाबाईनें द्रव्यलोभानें आपल्या नवऱ्याला कांहीं विषार चारून मारला येथपर्यंत जिकडे तिकडे बातम्या ! पण बिचाऱ्या राधाबाईला या लोकनिंदेच्या वार्तेचा गंधसुद्धां नाहीं. ती आपल्या दुःखांत आणि आईनें व सरस्वतीनें चालविलेल्या धांगडधिंग्यानें वाटणाऱ्या लाजेंत अगदीं चूर होऊन गेली होती. तिनें आपल्या आईला परोपरीनें सांगितलें; पण तिनें कांहीं ऐकिलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर राधाबाईला उलट शिव्या देऊन व आपल्या स्वतःच्या नवऱ्यालाही लाखोली वाहून आपलें दंडेलीचें काम चालविलें होतें. एके दिवशीं तर सरस्वती व राधाबाईची आई सगुणाबाई यांचा इतका बखेडा होण्याची वेळ आली कीं, रस्त्यावरलीं माणसें तमाशा ऐकण्यास उभीं राहूं लागलीं. एकमेकींच्या झिंज्या धरून ओढाओढीपर्यंत प्रसंग आला; पण राधाबाईनें फारच उग्र स्वरूप दाखविल्यामुळें त्यांची आई, आणि चिंतोपंतानें ( आतां त्या थोरल्या मुलास चिंतू न ह्मणतां चिंतोपंतच ह्मणणें रास्त व जरूर आहे ) मारावयाला उठण्यापर्यंत मजल आणली, तेव्हां त्यांची बायको थोडीशी दबली. परंतु सगुणाबाईनें राधाबाईला आणि सरस्वतीबाईनें

चिंतोपंताला भित्रेपणाबद्दल यथास्थित लाखोली वाहिल्याखेरीज ठेविलें नाहींच. अशा स्थितींत एकंदर सुतकाचे दहा दिवस त्या घरांतील प्रत्येक माणसास कसे गेले असतील याची कल्पना करणें आतां वाचकांवरच सोंपवितों. ते दहा दिवस नव्हेत तर अनंत संकटांनीं, दुःखांनीं, कष्टांनीं, यातनांनीं अतिमात्र दुःसह झालेलीं दहा हजार वर्षें काढल्याप्रमाणें राधाबाईस झालें. तिचा थोरला मुलगा व मुलगी हीं थोडीशीं जाणतीं ह्मणण्याजोगीं होतीं, आणि त्यांना आपल्यावर भयंकर प्रसंग येऊन कोसळला आहे हें थोडेंबहुत समजलेंही असेल; पण तो किती भयंकर आहे याची कल्पना कोठली ? सरस्वतीवहिनी दुरुत्तरें करून बोलली ह्मणजे अतिशय वाईट वाटे एवढेंच. दुसरीं तीन मुलें तर अगदींच अजाण. त्यांना कांहीं समजत नव्हतें. आपली आई आज किती दिवस एकसारखी रडते आहे, आपल्याशीं नीट बोलत नाहीं, आपल्याला नीट करीत नाहीं, याबद्दल एकाला काय वाईट वाटत असेल तें खरें. बाकीच्या दोघांना तर कांहींच ज्ञान नव्हतें. अशा पोरवड्याला आपल्या भोंवतीं घेऊन तिनें ते दिवस कसे काढले असतील तें तिचें तिलाच ठाऊक ! चालीरीतीप्रमाणें क्रियाकर्मांतरें व्हावयाचीं तीं झालीं. चिंतोपंतानें आपल्या बापाच्या नांवालौकिकास साजेल अशा तऱ्हेनें त्याचें सर्व उत्तरकार्य केलें. भिक्षुकांनीं अगदीं संतोष दर्शविला. कोणी ह्मणत दोन हजार, कोणी तीन, कोणी चार हजारांपर्यंत एकंदर खर्च झाला असें ह्मणत. कांहीं गौण ह्मणून पडलें नाहीं. फक्त एक टीका करण्यास कारण झालें तें हें कीं राधाबाई सोंवळी झाली नाहीं ! “ लेंकानें पैशाकडे न पाहतां दामोदरपंताला स्वर्गांत अढळपद मिळेल अशी क्रिया केली, पण बायकोनें त्याला नरकांत लोळविण्याजोगें वर्तन केलें, ” अशी ज्याच्या त्याच्या तोंडीं मुलाची स्तुति पण तिची निंदा होऊं लागली. ही निंदा बाहेर होऊं लागली इतकेंच नव्हे, तर राधाबाईच्या तोंडावर एकदोघां ज्ञातारड्यांनीं बोलून दाखविलें. परंतु राधाबाईनें आपलें मूल होतें त्याकडे पाहून गम खाल्ली आणि तिच्या आईचा हट्ट व आततायीपणा इतर बाबतींत जरी बाधक होत होता, तरी या बाबतींत फार साधक झाला. बापाला भटाभिक्षुकांनीं शिव्यागाळी करून अगदीं बेतांत आणला होता; परंतु सगुणाबाई कसली जहांबाज बायको ! तिच्यापुढें तिच्या नवऱ्याचें कधींच कांहीं चालत नसे. अर्थात् या वेळीं तर मुळींच कांहीं चालेना. तिनें भटांभिक्षुकांस, ज्ञातान्यांकोतान्यांस सगळ्यांना यथास्थित शिव्या देऊन त्यांची अगदीं खोडकी मोडून टाकली. तिच्या तोंडावर पुनः त्या बाबतींत बोलण्याची कांहीं कोणाची छाती झाली नाहीं. हें आईचें पाठबळ नसतें, तर राधाबाईला आपल्या अगदीं मनाविरुद्ध करावें लागलें असतें आणि ती इतकी लोकापवादभीरु होती कीं, तिनें त्या वेळीं केलेंही असतें. अशी स्थिति होती. असो !

घरांतील प्रत्येक पेटीला व फडताळाला डबल कुलुपें लागलीं होतीं, आणि भांड्याकुंड्यांची इतकी स्थिति झाली कीं, पाणी पिण्याला मिळण्याची सुद्धां मारामार. एका घरांत लागलीच आधीं दोन चुली झाल्या. राधाबाई बिचारी आपल्या खोलीच्या बाहेरसुद्धां आली नाहीं. पण तिच्या आईनें एक आपल्या नातवासाठीं व लेकीसाठीं चूल घातली. “ त्या मांगहृदयी केंदासणीच्या वाऱ्याला-

सुद्धां उभं राह्यला नको आतां. मग हातचं नाहीं तर पंक्तीला जेवण्याची गोष्ट कशाला ?" असें सगुणाबाईनें ह्मटलें आणि "त्या महारणीचा विटाळ नको. दर्शन-सुद्धां नको," असे सरस्वतीचे उद्गार निघाले. जें भांडें ज्याच्या हातीं सांपडेल तें त्यानें घ्यावें. उलथनें इकडे, तर झारा तिकडे. पळी इकडे, तर डावली तिकडे ! असा प्रकार झाला. रोज घरांत कचकच सुरू झाली. कोणालाही अन्न म्हणून गोड लागेना. पोरांची फार आबाळ झाली. त्यांतून त्या बिचाऱ्या वेड्याची तर इतकी दुरवस्था झाली कीं कांहीं कल्पना सुद्धां करवत नाहीं. सरस्वतीनें आपल्याकडे त्याला जेवण्याला घालूं नये, वाटेल तसें हिडिस फिडिस करून त्याला धुडकावून लावावें. आणि सगुणाबाईनेंही त्याच-प्रमाणें करून त्या पोरास शिव्या देऊन दूर करावें. एखादे वेळीं तर त्यास मुळींच जेवण मिळूं नये. राधाबाई आपल्या दुःखांत चूर, पण ती त्याचें रोज स्मरण करून आईशीं भांडून झगडून त्याला जेवूं घाली, आणि त्याला वाईट वाटूं नये असें करी. पहिल्यापासूनच ती त्याला फार ममतेनें वागवीत असे व तोही आपल्या वेड्या रीतीनें तिजवर फार प्रेम करीत असे. हें त्याचें प्रेम कसकसें व केव्हां केव्हां तिच्या उपयोगीं पडलें हें वाचकांस एकंदर गोष्टींत कळणारच आहे. तो वेडा राधाबाईवर फार प्रेम करी इतकेंच नव्हे, तर तिच्या मुलांवरही त्याचें फार प्रेम असून तो सरस्वतीचा आणि चिंतोपंताचा फार तिट्कारा करी, हें सहज पहाणाराला सुद्धां समजण्याजोगें होतें.

होतां होतां दोन महिने झाले. घरां-तील कचकच कांहीं बंद होईना. दिवसा-नुदिवस भांडाभांड्या आणि तंटेबखेडे वाढतच चालले. दोन चुलीच्या दोन चुली कायम. दामोदरपंत हयात असतां जें काय धान्यधुन्य होतें, तें संपत आलें. नवीन धान्य सरस्वती थोडें आणी आणि आपल्या कुलुपाच्या खोलींत आणून ठेवीं. हेतु हा कीं, सासूला व दीरनणंदांना आतां अडचण पडावी. खावयाला मिळूं नये. राधाबाई आपली खोली सोडून अगदीं जरूर तेव्हांच बाहेर पडत असे. घराच्या बाहेर तर मुळींच कधींही पडली नाहीं. आज नाहीं उद्यां हें भांडण मिटेल, असें तिला वाटत होतें. तिनें सरस्वतीला बोला-वून आणून एके दिवशीं पुष्कळ सामोप-चाराच्या गोष्टी सांगितल्या, परंतु त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. सरस्वती मुळीं सुद्धां बोल बोलूं देईना. आणि टण-टणा उड्या मारीत चालती झाली. बाहे-रच्या लोकांत तर तिनें राधाबाईविषयीं अशा कंड्या पिकवून दिल्या कीं, त्यांच्या निंद्यपणाला कांहीं प्रमाणच नाहीं. पण या साध्वीला त्याचा कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां गंध नव्हता. कोठून असणार ? निंदखोरानें केलेली निंदा आणि पसरलेला अपवाद हीं, ज्याची निंदा करावी, अगर ज्याच्याविरुद्ध अप-वाद पसरावा, त्याच्या कानीं होतां होईल तों येत नसतात आणि यदाकदाचित् आलीं तरी तीं इतक्या उशिरानें येतात कीं, त्यांचा प्रतिरोध करणें केवळ अश-क्यच होतें; परंतु राधाबाईच्या कानीं अजून तो प्रकार आला नव्हता आणि अर्थातच असें कांहीं बाहेर झालें असेल; अशी तिला कल्पनाही नव्हती. बिचा-रीला कोठून कल्पना असणार ? तिचा बाप किती वेळ तिजकडे आला. आई तर अहोरात्र घरीं होतीच. बापानें तिला पुष्कळ ह्मटलें कीं, "तूं आतां इथें राई

नकोस. इथें राहण्यांत कांहीं शोभा नाहीं. घरीं चल, नंतर कायती मागली पैशाची व्यवस्था पाहूं." परंतु तिची आई या गोष्टीला कबूल होईना. ती म्हणे, "एकदां घर सोडलं, कीं मग घरांत पाऊलसुद्धां तीं दोघें घालूं देणार नाहींत. आयतंच त्यांना मोकळं राज्य मिळालंसं होईल. आणखी एक कवडीवर दिखील सत्ता करायला येणार नाहीं." राधाबाईलाही घर सोडून जाऊं नये असेंच वाटे; परंतु त्याचें कारण ती लोकापवादाला भिई हें होय! ती ह्मणे, "घर सोडून गेलें तर लोक काय ह्मणतील? ते वारून दोन महिने झाले नाहींत तों लागलीं हीं माणसं भांडायला. घरांत वाटतील तितकीं भांडणं केलीं, तरी बाहेर तें कळूं देऊं नये." बिचारीचे विचार आणि कल्पना किती अजाणपणाच्या होत्या! बाहेर आपल्या शुद्ध नांवाला जाळणारा लोकापवादाचा केवढा थोरला वणवा पेटून राहिला आहे याची तिला कल्पना तरी? आज नाहीं उद्यां आपण आपल्या सुनेचें मन वळवून गुण्यागोविंदानें राहूं, असें तिला मनापासून वाटत असे. चिंतोपंत चांगल्या तऱ्हेनें वागेल याबद्दल तिला शंकाच कधीं वाटली नाहीं. पण आतां आपल्याला लागणारें धान्य सुद्धां मिळणार नाहीं अशी जेव्हां स्थिति आली आणि धान्याधुन्यालांकूडफांट्यावरून सुद्धां जेव्हां मारामारीला सुरुवात झाली, तेव्हां तिला हें कांहीं असें तसें प्रकरण नाहीं असें वाटूं लागलें, आणि एकदां आतां आपल्या मुलाला एकीकडे गांठून सर्व गोष्टींचा खुलासा करून घ्यावा असें तिनें मनांत आणलें. आजपर्यंत चिंतोपंत तिच्याकडे "कसें काय आहे? आतां शोक पुरे करा. माझ्याकडे पहा," असें म्हणून तिचें समाधान करण्यास एक वेळां सुद्धां आला नाहीं! दोघांचें दर्शनच नाहीं, मग संभाषण कोठलें? मुलें त्याच्या निष्ठुर बोलण्याबद्दल—एखादवेळ मारण्याबद्दलही तक्रार करीत, परंतु राधाबाईनें त्यांस "कांहीं तरी तुह्मींच केलं असेल, म्हणून तुह्मांला शिक्षा केली असेल," "तुमचाच अपराध असेल," "तुह्मीं दांडगाई केली असेल," "कांहीं फोडलं असेल," "विचारल्यावांचून कशाला हात लावला असेल," असें बोलून मोडून काढीत असे. तिला वाईट तर वाटेच, पण त्यांना मारण्याबोलण्यांत चिंतोपंताचा दुष्ट हेतु असेल असें कधीं तिनें मनांत येऊं दिलें नाहीं. एकंदरींत राधाबाईनें आपल्याकडून जितका म्हणून धीर धरणें शक्य तितका धरला. जितकी गम खाणें शक्य तितकी खाल्ली. आतां अगदीं यातना दुःसह झाल्या, तेव्हां नाइलाज म्हणून एके दिवशी थोरल्या मुलाबरोबर चिंतोपंतास निरोप पाठविला कीं, मला एकटेच एक वेळां येऊन भेटावें. निरोप सांगते वेळीं मुलास कांहीं तितका पोंच राहिला नाहीं. त्यानें आपल्या वहिनीच्या देखतच सांगितला. मग काय विचारतां! तिच्या तोंडावर अक्षताच टाकल्याप्रमाणें झालें. तिनें नवऱ्याला बोल बोलून घेतलें. "जर कांहीं बोलायचंच असलं, तर माझी चोरी कां? मी नाहीं तुह्मांला एकट्याला भेटूं बोलूं द्यायची. नाहीं भेटणार आणखी नाहीं बोलणार अशी शपथ वहा." अशी एकसारखी टकळी तिनें सुरू केली, आणि शेवटीं 'नाहीं भेटणार' असें जेव्हां त्याच्यापासून कबूल करून घेतलें, तेव्हां ती जरा स्वस्थ बसली. "सांगा त्यांना, कीं काय बोलायचं असेल, तें माझ्या देखत बोलावं. बोलायचं बोलायचं तें काय? त्या मोठ्या वेल्हाळगौरी आहेत हो!

आणखी इकडे पडला अगदीं भोळ्या सांबाचा अवतार. केव्हांच त्यांच्या मानभावीपणाला भुलून काय हवं तें कबूल करायचं होईल. तें कांहीं उपयोगी नाहीं.'' असें निक्षून सांगून त्याला तिनें राधाबाईला भेटूं दिलें नाहीं. एक दिवस झाला, दोन झाले, तीन झाले, चिंतोपंताच्या भेटीचें नांव नाहीं. शेवटीं आतां दुसरा इलाज नाहीं असें मनांत आणून रात्रीचें जेवण झाल्यावर चिंतोपंत एकटाच दिवाणखान्यांत बसला आहे असें कळल्यावरून आपल्या खोलींतून उठून त्यांच्याकडे गेली. आणखी अत्यंत नम्रतेनें उभीच राहून ह्मणाली, "चालला आहे असा प्रकार किती दिवस चालायचा ? तिकडे प्राण सोडते वेळीं शपथ वाहिलेली आठवण आहेना ? माझीं मुलं आतां माझीं नाहींत, तुमचीं आहेत. मीं जन्म मात्र त्यांना दिला. मी आज दोन अडीच महिने कांहीं बोललें नाहीं, पण आतां अगदीं नाइलाज झाला ह्मणून मुद्दाम उठून आलें. तेव्हां कांहीं तरी..........." परंतु पुढें तिच्यानें मुळींसुद्धां बोलवेना. शब्द कांपूं लागला, कंठ सद्गदित झाला, आणि डोळ्यांवाटे घळघळा पाणी येऊन त्याचे मोठमोठे बिंदू त्या निस्तेज गालांवरून खालीं पडूं लागले. ते दिव्याच्या उजेडांत चमकले आणि त्या एकंदर देखाव्याचा चिंतोपंताच्या मनावर थोडासा परिणाम झाला. त्यांत आणखी असें झालें कीं, ती येण्याच्यापूर्वी क्षणभर त्यानें कांहींएक कागद वाचण्यासाठीं हातांत घेतला होता. तो कागद गेल्या दोन महिन्यांत अनेक वेळां वाचला होता आणि तितक्या वेळां वाचून पुनः मोठ्या काळजीनें लपवून ठेवला होता. पहिल्या प्रथम तो जेव्हां वाचला, तेव्हां त्याच्या अंगाचा इतका संताप झाला, कीं तो कागद फाडून त्याच्या चिंधड्या चिंधड्या करून टाकाव्या असें त्याला वाटलें, परंतु तसें करण्याची त्याची छाती होईना. नंतर बहुतकरून रोज एक दोन वेळां तरी तो कागद एकांतांत वाची आणि तितक्यागणिक कांहीं तरी आपल्याशींच संतापानें पुटपुटे व अत्यंत अस्वस्थ होऊन खोलींत हिंडे. त्यानें आपल्या बायकोसही त्या कागदांत काय आहे आणि आपण इतक्या वेळां तो कां वाचतों, हें कळूं दिलें नव्हतें. तिला सुद्धां चोरून तो तो वाची, परंतु पांच चार वेळां तिनें त्याला तो वाचण्यांत गुंतला असतां पाहिलें व त्याची स्थिति कांहीं विलक्षण होते हेंही पाहिलें, आणि सहावे वेळीं जाऊन अचानक त्याच्या हातून तो कागद हिसकला. त्यानें नाना प्रकार केले, परंतु तो कागद सायंत आपल्याला वाचन दाखवावा, नाहीं तर आपण फाडून टाकूं अगर दुसऱ्याकडून वाचवून घेऊं असा धाक घातला, तेव्हां त्यानें काय होतें तें वाचून दाखविलें. त्याबरोबर तर ती ताडकन् उडाली आणि तिनें आपल्या सासऱ्याला 'न भूतो न भविष्यति' अशा शिव्या दिल्या. चिंतोपंतास त्या शिव्यांबद्दल मुळींसुद्धां वाईट वाटलें नाहीं म्हटलें तरी चालेल. कारण ती शिव्यांची वृष्टि चालली असतां तो कांहीं निषेधक बोलला नाहीं तर नाहींच, पण त्यास अंतःकरणापासून त्या आवडल्या असाव्या. उगीच तोंडानें वरवर मात्र तो "हें काय ? हें काय ? तुझ्या तोंडाला हाड आहे का नाहीं ? कोणाबद्दल काय बडबडते आहेस हें ?" असें बोलला. ते दिवसापासून केव्हां केव्हां तो कागद नवराबायको बसून वाचीत

आणि त्याबद्दल अद्वातद्वा टीका करून कांहीं फारच महत्वाचा विचार करीत असत. काय विचार करीत आणि काय मसलती चालत हें कोणासही माहीत नव्हतें. कित्येक वेळां तो कागद् फाडून टाकण्यापर्यंत मजल येई. एकदां दोनदां तर तो दिव्यावर धरलाही होता. त्याला थोडीशी आंच लागून तो किंचित् धुरकटलाही होता. अशा इतिहासाचा तो कागद् आज ही स्वारी वाचीत होती. तितक्यांत वर सांगितल्याप्रमाणें राधाबाई येऊन बोलली आणि वडिलांचे मरणाचे वेळीं आपण काय आणाशपथा वाहिल्या होत्या त्यांची आठवण तिनें त्याला करून दिली. शिवाय तिच्या त्या कारुण्यमूर्तीनेंही त्याच्या मनावर परिणाम केला. ती येण्याबरोबर कागद् लपवीत लपवीत अत्यंत तिरस्काराची मुद्रा करून त्यानें कपाळाला आंठ्या घातल्या होत्या, त्या आतां अगदीं नाहींशा होऊन तो स्नेह व दया यांचा किंचित् अंश उत्पन्न झालेल्या नेत्रांनीं तिच्याकडे पाहूं लागला. आपण जें काय करणार होतों, तें अगदीं गैरवाजवी असें त्याला वाटूं लागलें होतें आणि तशा स्थितींत तो एकदम तिला ह्मणाला, " नाहीं. नाहीं, मी शपथ विसरलों नाहीं. पण घरांत जो प्रकार होतो आहे, तो कांहीं एकाच पक्षाकडून होत नाहीं. तेव्हां मला त्यांत मन घालतां येत नाहीं, आपणही...."

" खरं आहे. खरं आहे. पण आई ऐकत् नाहीं त्याला माझा काय इलाज ! मी आपल्याकडून तिला थोडी दाबतें असं नाहीं. आणखी भांडणं होतात ! त्यांच्याबद्दल सुद्धां माझं कांहीं ह्मणणं नाहीं. पण जिन्नससुद्धां मिळूं नये ह्मणजे..."

राधाबाई इतकं बोलते तोंच " तर तर जिन्नससुद्धां मिळूं नये ! या बायकांच्या भानगडी पुरुषांच्या कानावर आणायला कांहीं मनाला वाटतं आहे तरी ! काय बाई चमत्कार ! अहो, अजून कोंपऱ्यांत तोंड घालण्याचा प्रसंग आल्याला दोन महिनेसुद्धां झाले नाहींत, तो आला का माझीं गाऱ्हाणीं सांगायला ? काय झालं काय, अम्मळ मूठभर धान्य कमी असलं म्हणून ? मेली इतकी सुद्धां जिवाची हेळसांड होतां कामा नयेना ? आतां कोणाच्या पुढें मिरवायचं आहे चांगलंचुंगलं खाऊन लठ्ठ होऊन ? जा. कोंपऱ्यांत जाऊन बसा. आतां कोणी मंडळी येतील इकडे बोलाय् बसायला त्यांच्या देखत नको तमाशा ! "

राधाबाईला हा सुनेच्या बोलण्याचा प्रकार अगदीं नवीनच होता. प्रत्यक्ष तोंडातोंडीं आजपर्यंत कधीं झाला नव्हता. तेव्हां ती तर नुसती थक्क झाली. मनुष्य अगदीं स्वस्थ चित्तानें जात असतां एकदम आकाशांत कडकडाट होऊन वीज चमकून आपल्या अंगावर पडलीसें वाटून दचकावा त्याप्रमाणें राधाबाईची स्थिति झाली. तिनें एक वार सरस्वतीकडे पाहिलें तों ती केवळ एखाद्या संतापानें लाल झालेल्या वाघिणीप्रमाणें दिसत होती. तरी पण राधाबाई तिला ह्मणाली: ' सरस्वती सरस्वती, काय हें बोलतेस काय ? कांहीं तरी जीभ चाव, विचार कर, अगदींच.. अगदींच ताळ सोडूं नको. इतकी तूं ताळ सोडशील असं नव्हतं वाटलं. "

" तर—तर—मींच ताळ सोडला. पैशाच्या लोभानें नवऱ्यांना मारून मुलांशीं भांडत बसणारांनीं केवढा ताळ ठेवला आहे ! " हे शब्द नव्हेत तर तापलेल्या सळ्या कानांत शिरत आहेत असें राधाबाईला वाटलें आणि तिला चक्कर आल्या-

प्रमाणें होऊन ती पडण्याच्या बेतांत आली व भिंतीचा आधार धरूं लागली. "उगीच सोंग करण्यांत काय अर्थ आहे ? सगळ्या जगाला तुमच्या कृति कळल्या आहेत. आपली आतां घराण्याची अब्रू राखायची म्हणून छपवाछपवी करायची झालं !" हा दुसरा वार लागलींच होतांच ती बिचारी खरोखरीच धाडकन् पडली. चिंतोपंत चटकन् पुढें होऊन त्यानें तिला सांवरली. परंतु सरस्वतीनें पाय मुळींच पुढं ठेवला नाहीं. आपल्या बोलण्याचा काय पण छान् परिणाम झाला असें मनांत येऊन ती मोठ्या संतुष्ट मनानें त्या पडलेल्या दीन गाईकडे पाहत उभी राहिली. मुलगा तितका कठोर नव्हता. त्यानें तिच्या डोळ्यांला पाणी वगैरे लावून तिला शुद्धीवर आणलें, इतक्यांत सगुणाबाईही आल्या आणि त्यांनीं त्या दोघांना शिव्या देत राधाबाईस तिच्या खोलींत नेलें. दुसरे दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर राधाबाईनें घर सोडून जाण्याचा आग्रह धरिला. आईनें अनेक प्रकारांनीं तिला सांगितलें कीं, घर सोडून जाणें फार विघातक होईल. पण नाहीं. आदले दिवशीं रात्रीं सुनेनें जे शब्दांचे घाय केले, ते तिला इतके दुःसह झाले, कीं अशा घायानंतर त्या घरांत पाणी पिण्यालासुद्धां राहाणें तिला बरें वाटलें नाहीं. तिचा तर निश्चय झाला. तिच्या एकंदर शीलांतच बदल झाला. तो फाजील नम्रपणा पार अस्ताला गेला. राधाबाईसारख्या भीरु हरिणींचा स्वभावच हा, कीं त्या शेवटपर्यंत अतोनात भिऊन भिऊन वागावयाच्या. कोणाच्या वाटेस जावयाच्या नाहींत. कोणाला दुखवायाच्या नाहींत. पण एकदां निराश होऊन फिरल्या ह्मणजे मग प्राण गेला तरी आपला नेट कमी करावयाच्या नाहींत. या वेळीं त्यांनीं जो निश्चयीपणा दाखविला तो त्यांच्या आईलासुद्धां आश्चर्यचकित करून सोडणारा होता. आजपर्यंत, अगदीं जन्मापासून आजपर्यंत आपण दबवली असतां आपली मुलगी दबली नाहीं, उलट गेली, असा सगुणाबाईस अनुभव नव्हता. परंतु आज अगदीं त्याच्या उलट. आज राधाबाईनें गड्यास दरडावून सांगितलें, कीं एक शिग्राम घेऊन ये. त्यानें लवकर आणला नाहीं, तेव्हां आपल्या थोरल्या मुलाला तिनें पाठवून शिग्राम आणविला आणि तो येतांच आपलें एक अधिक लुगडें, आपण आणि आपलीं पांच मुलें आधीं जाऊन गाडींत बसून नंतर तिनें आईला येतेस का, ह्मणून विचारलें. इतका निश्चय पाहिल्यावर त्या आईचा तरी काय दरकार आपण एकटीनेंच घरांत राहण्याचा ? ती लागलीच मुलीला उद्देशून 'मूर्ख, वेडी, अजागळ, स्वतःचं नुकसान समजत नाहीं.' असें पुटपुटत जाऊन गाडींत बसली. हा सर्व प्रकार चालला असतां वरून चिंतोपंत पहात होता; त्याच्या चेहऱ्यावरून सहजच असें दिसलें, कीं होतो आहे हा प्रकार होणें बरें नाहीं असें तर त्यास वाटत आहेच; पण तो होऊं नये याबद्दल आपण जाऊन प्रयत्न करावा अशी उत्सुकताही त्याचे मनांत नाहीं. त्याचप्रमाणें खालीं सरस्वतीबाईही आडून सर्व प्रकार पहात होत्या आणि त्यांचे चेहऱ्यावर आनंदाची व कृतकृत्यतेची इतकी छाया दिसत होती, कीं कांहीं वर्णन करणें शक्यच नाहीं. आपण इतके दिवस रचीत असलेल्या कारस्थानाचा शेवटीं जयजयकार होत आहे हें पाहण्याबरोबर मग आणखी काय पाहिजे ? आजपर्यंत एकंदर छळ केला त्याची सार्थकता झाली असें तिला

वाटलें, इतक्यांत त्या महामायेची नजर कोंपऱ्यांत गेली. तेथें तो वेडा पडला होता. त्यास पाहतांच त्याला " उठा, उठा, डोम्लुभावजी उठा, तुम्ही तरी कशाला राहतां ? तुमच्या त्या चालल्या आहेत ना ? उठा, उठा, नाहीं तर जातील, " असें ह्मणून खसकन् त्याला ओढून उभें करून दारासमोर आणिलें. त्याही वेडयानें राधाबाई गाडींत बसून जाताहेत असें पाहातांच " दोंदू येएल दोंदू येएल त्याला तातू तता ओ " असें ह्मणून गाडीचें दार धरलें आणि त्याला पाहतांच राधाबाईनें आपल्या आईचा निषेध मुळींसुद्धां न ऐकतां " माझ्या पांचांना मी अंतर देईन एक वेळ. पण याला नाहीं द्यायची. " असें म्हणून त्याला आंत आपल्याजवळ बसवून घेतलें आणि मोठ्या मुलाला उतरवून ' तूं पायी ये आजोळीं ' असें ह्मणून ती निघून गेली. त्या रात्रीं चिंतोपंत व सरस्वती यांस मोठी सुखाची झोंप आली असेल काय ?

# प्रकरण ३ रें.

## वुईल वाचलें.

होय. सरस्वतीला झोंप लागली, पण चिंतोपंतास लागली नाहीं. कारण, त्याला काळीज होतें. आणि तिला त्याचा गंधसुद्धां नव्हता. तिला असें वाटलें, कीं आपण आतां अगदीं कृत्यकृत्य झालों. आपल्या शरीराला बोंचून उपद्रव करतील असे सर्व कांटे पार नाहींसे झाले. सासरा गेला. सासू गेली. तिची आई गेली. सासूचीं पांचीं कारटीं गेलीं. ती दीरानणदांस कधीं " भावजी, वन्सें " किंबहुना " दीरनणदा " असें सुद्धां ह्मणत नसे. तसें म्हणणें तिला इतकें कमीपणाचें वाटे, कीं कांहीं पुसूं नये. सगळ्यांत मोठा कमीपणा तो. दीरनणंदा ह्मणजे " सासूचीं कारटीं, " अगर केव्हां केव्हां " तिचीं कारटीं, " कारण सासूला सासू म्हणणें तरी महाकर्म कठिण, आणि त्या वेडप्याचें जाणें तर तिला इतकें आनंदकारक झालें कीं वा ! ' ती ' आपलीं कारटीं घेऊन गेली तरी पण हें वेडें एक आपल्या गळ्यांत राहीलच असें आपलें तिला वाटत होतें. पण थोड्याच युक्तीनें तेंही नाहींसें झालें. मग काय विचारतां ? तिनें त्या रात्रीं सासूच्या जाण्यामुळें झालेल्या आनंदाप्रीत्यर्थ उत्सवच केला म्हटलें तरी चालेल. पण चिंतोपंताचें तसें नव्हतें. त्याला क्षणोक्षणीं आपण आपल्या बापाजवळ वाहिलेल्या शप-

थेची आठवण होई. तो बापाच्या मृत्युकाळचा देखावा, ते बापाचे विलक्षण डोळे आणि विलक्षण कळवळा आणणारे शब्द त्याच्या कानीं घुमूं लागले आणि तो वेड्याप्रमाणें बरीच रात्रपर्यंत आपल्या खोलींत इकडून तिकडे तिकडून इकडे हिंडत होता. त्यावरूनच त्याची काय तळमळ चालली होती ती दिसे. झाला हा प्रकार अतोनात वाईट झाला. ती जाऊं लागली त्या वेळीं आपण जाऊन नमस्कार करून क्षमा मागून तिला ठेवून घेणें जरूर होतें. तें आपण केलें नाहीं हें अगदीं वावगें झालें. आतां सकाळ होतांच तें सुधारून घेऊं असा त्यानें बेत केला आणि तो बेत केल्यावर त्याला समाधान वाटलें. त्याच्या चित्ताला शांति आली. जें आपलें कर्तव्य तें करण्याबद्दल निश्चय केला म्हणजे मनाला थोडी थोडकी शांति मिळते असें नाहीं. चिंतोपंताला ती शांति लाभली आणि जरा बरें वाटून तो एकदम अंथरुणावर जाऊन पडला. आपल्या बायकोला उठवून तिला आपला बेत सांगावा असा विचार मनांत आला, परंतु न जाणों, ती हरकत आणावयाची असा प्रतिविचार लागलीच मनांत येऊन त्यानें तितकेंच ठेविलें. सकाळपर्यंत कसा तरी वेळ कंठला परंतु सकाळीं चहाच्या वेळीं त्याच्यानें मुळींच राहावेना. सरस्वतीबाई मोठ्या आनंदांत ठुमकत मुरडत दोन पेले चहा घेऊन येऊन एक आपल्या नवऱ्यापुढें आणि एक आपल्या स्वतःपुढें घेऊन बसल्या, व " आज इतका वेळ कां मेली ती झोंप ? आज तोंड असं कां तें ? असं उदासवाणी तोंड पाहिलं कीं नाहीं म्हणजे मला कसंसंच होतं. मुळीं ह्मटल्या मुळीं कसं तें चैन पडत नाहीं. काय झालं मला सांगावं. " असें माना वेळवेळून म्हणाल्याबरोबर स्वारींचा तिला कांहीं एक न सांगण्याचा निश्चय डळमळला. आणि " जें काय करायचं, तें हिच्यापासून लपवा कशाला ? स्पष्टपणें सांगून काय करायचं तें करणार म्हणून सांगावें " असा बेत करून स्वारी एकदम ह्मणाली:– " काल तुझ्या त्या बोलण्यानें जो घोंटाळा केला, तो आपल्याला कांहीं बोआ अगदीं पसंत पडला नाहीं. इतकं बोलण्याचं मुळींच कारण नव्हतें. आणखी इतकं विकोपाला गेल्यावर तरी तूं कांहीं बोलून त्यांना ठेवून घेशील असं वाटलं होतं; पण तें कांहीं दिसलं नाहीं. आपल्याला अगदीं कालपासून चैन नाहीं. आपण आतां तिकडे जाऊन त्यांना परत घेऊन येणार. "

" हो. हो. येणार तर काय झालं ? अगदीं जरूर आलंच पाहिजे. मी मेली अगदीं वेडीच असेन. बरं आहे. आपण तिकडे जावं कीं मी बाहेर पडतें. नको कोणीं ह्मटलें आहे ? ही मी जातें. मीच ना येऊन जाऊन घोंटाळा करणारीण ? मग टाका माझा कांटा काढून. कोण नको ह्मणत आहे ? आपण त्यांनाच घेऊन संसार करा बरं ? जा. मी आणखी माझा चेंड्या खुशाल तुमच्या नांवावर भिक्षा मागून खाऊं, अगदीं तुह्मांस तोशीस लागूं देणार नाहीं. आणखी तुम्हीं त्यांना घरांत आणा. त्या कारट्यांना आणा. आणखी त्यांच्या गुमास्त्यासारखें वागून घालतील तो भाकरतुकडा खा. याच्या पलीकडे आहे काय तुमच्या हातीं ? मोठा कागद मरतांना आपल्या हातीं दिला त्यांत हेंच तर लिहिल आहे. मग इतके दिवस कशाला थांबलांत ? जा. जा. लवकर उठा कसे. मेला तो चहासुद्धां

पिण्याची फुरसत नको. ” असें म्हणून एकदम पायानें तो चहाचा भरलेला पेला तिनें लवंडून टाकला आणि एकदम गंगा-यमुनांचे प्रवाह डोळ्यांवाटे निघूं लागण्याची तजवीज केली; शिवाय हुंदक्यांचा तर तितक्यांत असा जोर झाला, कीं कांहीं विचारूंच नये. “ मेला माझा जन्मगुणच मीं पाहून ठेविला आहे. कांहीं कोणाच्या हिताची म्हणून गोष्ट करायला जा तीं आपली गळ्यांतच यायची. हं जा. मग आतां ती विडी ओढण्याइतकी तरी फुरसत कशाला ? आपल्या डोक्यावर पगडी बसली, कीं मीं पदर घेतलाच, हातांत काठी घेतली, कीं चेंड्याला उचललंच, आणखी आपलं पाऊल बाहेर पडलं, कीं माझंय् पण पडलंच. मात्र इतकंच, कीं आपण आपल्या आवडत्या संसाराला घेऊन घरांत याल, मी मेली आपल्या संसाराला मुकेन. कांहीं हरकत नाहीं. पण आपल्या मनाप्रमाणें तरी एकदां होऊं द्या. मग तर झालं ? ” हे एकंदर शब्द तर त्या हुंदक्याच्या सपाट्यांत इतके तुकडे होऊन बाहेर पडले, कीं ते जुळवून त्यांचा अर्थ समजावून घेतां घेतां बिचाऱ्या चिंतोपंताची बुद्धि अगदीं कुंठित होऊन गेली. पूर्वीं बापाच्या कारकीर्दींत शास्त्र्याकडून पंचमहाकाव्यांपैकीं माघाच्या शिशुपालवधांतला एखादा विचित्र बंध सुद्धां सोडविण्यास त्याला इतके सायास पडले नसतील. पण त्यानें तितकें करून ते शब्द आणि त्यांचा अर्थ समजावून घेतलाच. व त्यावर “ अग, तूं अगदीं अगदीं वेडी बोआ. इतकी तूं वेडी असशील हें माझ्या स्वप्नांत सुद्धां आलं नाहीं. ती घरांत असल्याचं तुला इतकं वैषम्य कां वाटावं ? ती आतां काय करणार तुला ? ”

“ कांहीं करो न करो, त्यांना जर तुमच्या मनांतून आणायच्या असल्या तर मला आपली जाऊं द्या. एका म्यानांत दोन सुऱ्या नकोत. ज्या घरांत मी मालकीण ह्मणून वागायचं त्या घरांत इतःपर मी बटकीसारखी कांहीं वागायची नाहीं. एकदां आपलं माझं अगदीं खडखडीत निक्षून सांगणं आहे. बोलून चालून त्यांचे गुमास्ते तुह्मांला नेमून ठेवलें आहे हें धडधडीत दिसतं आहे. तुह्मी कांहीं त्यांच्या लग्नाच्या बायकोचे नव्हतां वाटतं तुह्मांला असं करायला ? मेलं सगळं सगळं त्यांच्या नांवानं ? अन् आपल्याला हक्क कांहींच नाहीं ? तें असं कां म्हणून ? इतक्या थोरल्या इस्टेटीची मालकीण ती आणखी तिचीं कारटीं होणार, आणखी तुह्मी तीन हजार रुपड्या न् हें घरकुल घेऊन राहून त्यांची गुमास्तेगिरी करावी का ? मी कधीं नाहीं ऐकायची. अन् माझं ह्मणणं तरी आहे काय ? आपल्याला गुमास्तेगिरी करायची तर करा, पण परस्पर करा. घरांत त्यांचा संपर्क नको. मग गुमास्तेगिरी करा, कीं लोकं ह्मणतात तसं आणखी कांहीं...... ” परंतु सरस्वतीबाईनें आपली जीभ चावली, आणखी कांहीं अधिक न बोलतां ती पुनः रडूं लागली.

‘लोकं म्हणतात तसं आणखी कांहीं...’ या शब्दांचा अर्थ कांहींच लक्ष्यांत न आल्यामुळें चिंतोपंत एकदम कावराबावरा होऊन तिला “ काय ? काय ? लोकं काय म्हणतात ? ” असें विचारूं लागला. अर्थातच सरस्वतीनें त्याला कांहीं-सुद्धां सांगितलें नाहीं. तिचे आपले हुंदके मात्र जोरावले. नवऱ्यानें पुसून पुसून अगदीं बेजार केलें तेव्हां आणखी एक ठिणगी तिनें सोडली. “ लोकं कांहीं का ह्मणेनात ! तुम्ही आपली तिला इथें

आणान् मला जाऊंया. हा उगीच रोज रोज मला त्रास नको. पण मला असं नवल वाटतं, कीं आपल्याला जर तिची एवढी काळजी वाटते, आणखी शपथ वाहिल्याप्रमाणें अगदीं त्या बुइलांत लिहिल्यासारखं करायचं असलं, तर ती घरांतच कशाला पाहिजे माझ्या उरावर ! बाहेर राहुंद्या माहेरीं आणखी काय वाटेल तें करा. तेवढी तरी जनाची......पण मी कशाला बोलतें आहे. माझी मेली ही जीभ कनी कशी ती अगदीं ताब्यांत राहत नाहीं." या ठिणगीमुळें चिंतोपंताच्या जिज्ञासाग्नीनें अर्थात् अधिकच पेट घेतला. आणि त्यानें लोक काय म्हणतात याबद्दल अधिकच चौकशी चालविली. त्यावर "कांहीं नाहीं. लोकांच्या तोंडाला कांहीं हाड आहे का ? तिकडे आपण लक्ष देऊं नये. शेवटचीं तीन मुलं म्हणे...... अग बाई चेंड्या उठला वाढतं जाऊं दे आतां." असें म्हणून पटकन् ती तेथून निघून गेली. आणि मग चांगली तीन चार तास चेंड्याच्या तैनातींतच तिचा वेळ गेल्यामुळें चिंतोपंताचें तिनें मुळींच नांव घेतलें नाहीं. चिंतोपंतानें आपला बेत रद्द केला आणि आतां एवढाच बेत केला, कीं आपण वडिलांच्या बुइलाप्रमाणें सर्व तजवीज करून टाकून मोकळें होऊं ह्मणजे झालें. परंतु त्या व्यवस्थेप्रमाणें करून टाकणें सोपें नव्हतें. इतका थोरला पैसा एकदम "आपला नव्हे" असें जगांत सांगून तो आपल्या सावत्र आईच्या व मुलांच्या स्वाधीन करावयाचा हें कांहीं लहानसान काम नव्हे. एकंदर इस्टेटीचा भाग चिंतोपंतास किती मिळावयाचा होता, हें वर त्या नवराबायकोच्या बोलण्यांत आलेंच आहे. तेव्हां आपल्याला सगळे तीन हजार आणखी घर इतकेंच घेऊन त्यांना पाऊण लाखाची अधिकच इस्टेट द्यावी हें त्यांच्या लोभी अंतःकरणास बरें कसें वाटणार ? आणि तो काळजाचा माणूस असल्यामुळें त्याला एखादे वेळ वाटलें तरी त्यां महामायेला कसें वाटणार ? यामुळें बुइलांत काय आहे तें जाहीर करण्याचें काम दिवसानुदिवस पलीकडे पलीकडे ढकलण्याचें त्यानें चालविलें होतें. परंतु असें किती दिवस चालणार ?

राधाबाईच्या माहेरची गरिबी आणि पांच मुलें घेऊन ती तेथें गेलेली, तेव्हां त्यांची एवढी थोरली इस्टेट असतांना त्यांना दारिद्र्यांत दिवस काढावे लागावे हें कोणाला बरें वाटणार आहे ? त्यांत राधाबाई आपल्या घरांतच होती तोंपर्यंत कांहीं तरी वाट पाहण्याला कारण होतें, परंतु आतां तिला घरांतून चिंतोपंतानें घालवून दिल्यानें तर तिच्या माहेरच्या माणसांनीं अगदींच धीर सोडला. राधाबाई बिचारी माहेरीं आल्यापासून अगदीं पहिले दहा दिवसांप्रमाणेंच दुःखी कष्टी होती. ती त्या इस्टेटीच्या बाबतींत एक अक्षर सुद्धां काढीत नव्हती. उलट तिच्याजवळ कोणीं गोष्ट काढली, तर तिला फार राग येई आणि ती ह्मणे, "माझ्या दुःखानें मी मरतें आहे. आणखी तुम्हीं ह्या पैशाच्या गोष्टी कां माझ्या कानीं कपाळीं काढतां ? असला पोरांच्या नाशिबीं पैसा, तर मिळेल नाहीं तर नाहीं मिळणार. पण मला हा त्रास नको." पण सगुणाबाई काय ऐकते ? तिनें चिंतोपंताकडे जाऊन व आपल्या नवऱ्यालाही पाठवून काय तो एकदांचा निकाल करा असा त्याच्या पाठीमागें लगडा लाविला. दररोज त्यानें कांहींना कांहीं तरी सबबी लावाव्या आणि 'आज उद्यां' 'उद्यां परवां' 'सकाळीं दुपारीं'

' दुपारीं संध्याकाळीं ' असें करून चाळवा-चाळव चालविली. कांहीं केल्या त्याचा सरळ जबाब येईना. बुईल त्याच्या ताब्यांत असल्यामुळें फार तंटा–भांडण काढतां येईना. न जाणों बुईलच नाहींसें करून टाकावयाचा. इकडे चिंतोपंत तर रोज रात्रीं तें एकदां दोनदां वाची आणि त्याबद्दल मनांत नानाप्रकारचे विचार करी. त्याचप्रमाणें केव्हां केव्हां त्याची बायकोही त्याबद्दलच कांहीं तरी बोले. असा प्रकार चालला होता. रोज रात्रीं नवराबायकोचीं खलबतें चालावयाचीं, बायकोनें सासूला, सासऱ्याला, दिरानणदांना आणि सगुणाबाईला लाखोली वहावयाची व मधून मधून नवऱ्यालाही त्याच्या भित्रेपणाबद्दल आणि चेंडचाची काळजी न करण्याबद्दल अद्वातद्वा बोलावयाचें' 'तुह्मांला चेंडचापेक्षां त्या पोरांची काळजी फार वाटते याचं मला नवल वाटतं. आणखी आतां म्हणावं काय ? हातची गोष्ट तीसुद्धां तुम्हांला करतां येऊं नये ? तिच्याबद्दल इतका तुम्हांला धाक वाटावा. मी जर पुरुष असतें, तर एव्हांना अगदीं सगळा निकाल लावून गार होऊन बसलें असतें. बसूं द्या त्या दोघी अवदसांना आणखी त्या कारट्यांना बोंबलत. " तिच्या तोंडाला मुळींच हाड नव्हतें. आणि ती ज्या वेळीं असें बोलावयाची त्या वेळीं तिचें ह्मणणें एकंदरींत खरें असें वाटून तो अगदीं तिच्या बोलण्याप्रमाणें करण्याला तयार होई. असा प्रकार चालला असतां, एके दिवशीं सकाळीं सगुणाबाई येऊन त्याला इतक्या वाईट तऱ्हेनें बोलल्या, कीं त्याला अतोनात संताप आला. " तुझ्या मनांत सगळी इस्टेट खायची आहे. माझ्या नातवंडांना भिक्षा मागायला लावायची आहे. माझ्या लेंकीच्या हातांत पोळपाटलाटणं द्यायचं आहे. पण तूं काय समजला आहेस ? मी अशी तशी गप्प बसणारी बायको नाहीं. तिकडचा स्वभाव आपला गरीब ह्मणून त्यावर जाऊं नकोस, मी आहेना ? तूं आह्मांला बुडवायला पहातो आहेस, पण मी तशी बुडायची नाहीं. तुझा नायनाट करून त्या अवदसेला पोळपाटलाटणं हातीं देऊन दारोदार हिंडवून पोळ्या भाजायला लावीन आणखी तुझ्या कारट्याच्या हातांत झोळी देईन झोळी ! " इतके शब्द तिच्या तोंडून निघताहेत न निघताहेत तों सरस्वती एखाद्या वाघिणीप्रमाणें चवताळून बाहेर आली आणि मग दोघींची कचाकची सुरू झाली. सगुणाबाई दुसऱ्याच्या घरांत असल्यामुळें तिला हार खाऊन जावें लागलें आणि सरस्वतीबाईनें नवऱ्यावर अपशब्दांचा आणि संतापाचा असा वर्षाव केला, कीं त्याचा सपाटा त्यालाच ठाऊक. ' मनांत आणल्याप्रमाणें सगळं करून निकाल नाहीं लावला, तर मी अन्नपाणी नाहीं घ्यायची ' असा निश्चय करून तिनें एका कोंपऱ्यांत बैठका मारून चेंडचास आपल्या पुढें हापटलें. झालें. इतकें महाकाळीचें रूप पाहिल्यावर मग काय विचारतां ? भगत चिंतोपंत भद्रला आणि त्यांत त्याला सगुणाबाईच्या बोलण्यानें अतिशय वाईट वाटलें व संतापही आला. लागलीच तीन दिवसांच्या आंत निकाल करून टाकतों असें अभिवचन देऊन महाकालीच्या संतापाची शांति केली. राधाबाईच्या बापास ' परवांचे दिवशीं सकाळीं या ' म्हणून निरोप पाठवून तो आपल्या उद्योगांत अगदीं मग्न झाला. त्या दोन दिवसांत तो बाहेर पडला नाहीं. आपण स्वतः आणि एक विश्वासू कारकून दोघेजण अहोरात्र एका

ठिकाणीं बसून कांहीं उद्योग करीत होते. दुसरे दिवशीं रात्रीं तो गुंडोपत कारकून आपल्या यजमानास विचारून कोणीकडे गेला. तिसरे दिवशीं ठरल्याप्रमाणें सकाळच्या प्रहरीं चिंतोपंतांनीं राधाबाईच्या वडिलांस आदरून चिठ्ठी लिहून बोलावणें पाठविलें आणि आपल्या बरोबर तुमचे कोणी आणखी चार स्नेहीसोबती बोलवावयाचे असले तर बोलवा असेंही लिहिलें. परंतु त्याबरोबरच एवढं आणखी वाक्य लिहिलें, कीं " स्नेहीसोबती बोलावण्यापूर्वीं मला आपण एकवार एकटेच येऊन भेटा. म्हणजे कांहीं आगाऊ सांगायचं आहे तें सांगून टाकीन. मग आपल्याला वाटेल तसें करा. आजपर्यंत आपण मला शिव्याशाप दिले,परंतु आजपर्यंत मी कां चाळवण्या दाखवीत आलों व सबबी सांगुन हें महत्त्वाचं काम दिरंगाईवर नेत आलों याचा आपल्याला चांगला उलगडा होईल. " यापेक्षां अधिक कांहींच लिहिलेलें नव्हतें. राधाबाईच्या बापाच्या हातीं तें पत्र पडतांच त्यांतील मजकूर वाचून अतोनात आश्चर्य वाटलें. किंबहुना त्यांतला गर्भितार्थ कांहीं लक्षांत येईना यामुळें तो फार चकित झाला. त्यानें आपल्या बायकोस व लेंकीसही तें वाचून दाखविलें. राधाबाई कांहींच बोलली नाहीं; परंतु सगुणाबाई एकदम " मेला तो फार लबाड आहे हो. भोळेपणानं त्याच्यावर विश्वास ठेवूं नये. कांहीं तरी करून आणखी बोलून फसवायचा त्याचा बेत दिसतो आहे. अगदीं त्याचा विश्वास धरूं नये. इकडचा अगदीं भोळा कारभार आहे. मला तरी न्यायची होती बरोबर म्हणजे मीं सांगितलं असतं त्याला कसं काय आहे तें. मेल्यानं कांहीं तरी वाईट मनांत आणलं आहेन्, अगदीं सुद्धां संशय नको. आपण एकट्यांनीं मुळीं जायचंच नाहीं. दोघंजण कोणीं तरी जावं. तो टाळूवरून हात फिरविल्याखेरीज ठेवायचा नाहीं. अगदीं मी एक पक्कं सांगून ठेवतें. सरकारदरबारच जर करायला निघालं तर सांगवत नाहीं. " याप्रमाणें सगुणाबाईचें पढवणें झाल्यावर तो बिचारा तेथून निघून सरळ चिंतोपंताकडे गेला. तेथें चिंतोपंत त्याची वाटच पाहात होता. 'या बसा ' वगैरे आगतस्वागत आणि उकाडा होण्याबद्दल कांहीं तरी भाषण झाल्यानंतर चिंतोपंत हळकेंच त्या गृहस्थाच्या जवळ जाऊन त्याला म्हणतो: " हें पहा, आपण एकटे आलांत एवढं बरं झालं. हें पहा, काम फारच नाजूक आहे. होतां होईल तों तुमच्या आणखी माझ्या बाहेर जाऊं नये. अशा गोष्टीचा बभ्रा जितका न होईल तेवढा चांगला,तेव्हां तुम्हीं आणखी मी दोघेच बसून हें वुईल वाचावं तें चांगलं. मला मोठा धाक पडला होता, कीं तुह्मी आणखी कोणाला घेऊन येतां कीं काय, पण नाहीं आलांत एवढ्यानं बरं झालं हो ! "

" कां बरं काय झालं ? आणखी नाजूक नाजूक तें त्यांत काय आहे ? अशा गोष्टी चारचौघांसमक्ष होतील त्याच बऱ्या नव्हेत का ? " राधाबाईच्या बापानें त्यांस विचारिलें.

" आपण वुईल वाचलं म्हणजे मग बऱ्या कीं वाईट तें आपलं आपल्याला दिसून येईल. आणखी तुह्मींन् मी एकदम वाचतों आहोंत तर मंडळीच्या देखत वाचून दाखवलंच पाहिजे असं जरी आपल्याला पुढें मागें वाटलं तरी हरकत नाहीं. त्यांना बोलावतां येईल. मी तुम्हांला आतां स्पष्टच सांगतों, कीं हें

वाचून तुम्हांला अशी कांही बुद्धि व्हावयाची नाहीं कीं याचा बभ्रा करावा. "

जों जों चिंतोपंत असें कांहीं बोले, तों तों त्या गृहस्थास अतिशय चमत्कारिक वाटे. शेवटीं त्यानें आपल्या मनाचा निश्चय केला, आणि दोघांतच वाचूं असा विचार कायम ठरविला. मग काय? चिंतोपंतानें उसासे टाकून " असा प्रकार आमच्या वडिलांनीं करावा, आणखी मला त्याची एकंदर व्यवस्था करायला ठेवावें हें तरी एक केवढं दुर्भाग्य ! पण माझ्यादेखत दोन वेळां बोलले यामुळें मला तसा संशय आहे. मरणाच्या आधीं आठ दिवसांत त्यांनीं चार वेळां माझ्याजवळ तसे उद्गार काढले. मला तर भय पडलं होतं कीं आतां मरतांना आणखी बाईच्या देखत कांहीं बोलताहेत कीं काय? आणखी माझ्याकडून शपथ वाहून घेतली होती कीं, मृत्युपत्राच्या बाहेर काडीमात्र जाणार नाहीं. यामुळं मृत्युपत्रांत काय असेल आणखी काय नाहीं याचा नेम सांगवत नाहीं. शेवटीं हें मृत्युपत्र करण्याच्या आधीं पंधरा दिवस त्यांना भ्रम झाल्यासारखा झाला होता. हीं मुलं जवळ असलीं म्हणजे त्यांच्याशीं लडिवाळपणानं वागायचं पण तीं दृष्टीसमोर येऊं नयेत असं वाटतं असे कितीकदां तरी उद्गार काढले आहेत. काय करायचं? हें पहा, हें त्यांच्याच हातचं पाकीट. हें सील त्यांचं, ही इथें सही त्यांची. तुमच्या ओळखीची आहेच, नीट पाहून घ्या. नाहीं तर ह्मणाल कीं, सीलच बरोबर नव्हतं आणखी तें पाकीट फोडलंच होतं जसं त्यांनीं मला दिलं तसंच्यातसंच मीं या सेफ (तिजोरीची पेटी) मध्यें घालून ठेवलं होतं. आंत काय असेल याबद्दल संशय व भीति वाटून मी केवळ तें उघडून वाचण्याबद्दल चाळवाचाळवी चालविली होती. अहो, त्यांचा माझ्यावर राग होता, हें तुह्मांला ठाऊकच होतं; तेव्हां मला कितपत त्यांनीं काय ठेवलं असेल याबद्दल शंकाच आहे, पण अलीकडे अलीकडे त्यांचा राग बाईवरही होता, आणखी मुलांवरही होता, असं त्यांच्या बोलण्यावरूनही वाटूं लागलं होतं. पहा, अजून आपण असं करूं. तें मृत्युपत्र मुळीं न उघडतांच जाळून टाकूं. आणखी ते तिथे आणखी मी चवथा यांच्या वांटण्या करून टाकूं झालं. चार सारख्या वांटण्या होतील आणखी मृत्युपत्रांत तुह्मां आह्मांला कांहीं अनिष्ट असलं, तर त्याच्याबद्दल कोणालाच वाईट वाटायला नको. कां? मी ह्मणतों हें आहे कबूल? मला तर असं वाटतं आहे कीं त्यांत आह्मांला दोन दोन चार चार हजार रुपये ठेऊन बाकी सगळं दानधर्म करून टाकावं म्हणून लिहिलं असेल तेव्हां असं सगळं द्रव्य जाण्यापेक्षां आपलं मृत्युपत्र न उघडतां त्याचा नायनाट करावा तें चांगलं. आहे का आपली संमति? त्यांत कांहीं मी वागवं सुचवीत नाहीं, कांहीं नाहीं. पहा विचार करून पाहिजे तर उद्यांपर्यंत.

राधाबाईंचे वडील लागलीच ह्मणतात: " छे. छे. छे. उद्यांवर आतां ढकलूं नका. वाईट तें काय असायचं आहे? अगदीं कमी पैसे असतीलना? असतील तर असतील. जे असतील तेच आपले ह्मणायचे. दुसरं काय? आतां त्याचा विचार नको. एवढी लबाडी करून मृत्युपत्र नाहींसं करून येऊन जाऊन पैसे अधिकउणे कमती हेंच करीत बसायचं कीं नाहीं? त्यांत कांहीं अर्थ नाहीं. जें असेल तें सरळपणानं पाहून करून टाकावं.'

" तुमच्या मर्जीची गोष्ट आहे. पण अजून तुम्ही विचार करा. मग पश्चात्तापाला कारण नको दुसरं काय ? म्हणून बजावून बजावून सांगतों. "

" कांहीं नाहीं. खऱ्या भावानं वागलं तर त्याबद्दल पश्चात्ताप मुळींच कधीं होत नाहीं. खऱ्या मार्गानें गेल्याबद्दल जर पश्चात्ताप, तर मग खोटयाबद्दल किती व्हावा ? "

" ठीक आहे. ठीक आहे. मर्जी तुमची. धरा तर मग हा लखोटा आणखी फोडा. सील, शिक्का, सही नीट बघा, मग ह्मणायला नको कीं मीं पाहिलं नव्हतं. "

त्या गृहस्थानें तें पाहिलें तर खरें, परंतु त्यांत कांहीं गौण नाहीं असें पाहून तो लागलींच ह्मणतोः " कांहीं नाहीं, कांहीं नाहीं. त्यांत काय बघायचं आहे ? कांहीं तुम्ही खोटं बोलतां ? "

चिंतोपंत तें ऐकून खुष झाल्याप्रमाणें दिसला; नंतर किंचित् स्मित करून ह्मणतो, " इतका विश्वास असता तर हो काय ? बरं तर मग, फोडा."

त्या गृहस्थानें तो फोडला आणि आपल्याशींच तो प्रारंभींचा मजकूर वाचूं लागला. वाचतां वाचतां एकदम थबकला-त्याचें तोंड गोरेंमोरें झालें; नंतर अगदीं उतरलें, आणि एकदम तो बाबरल्या आवाजानें म्हणतोः " काय ? मरते वेळीं जो कागद दामोदरपंतांनीं तुमच्या स्वाधीन केला, तो हाच ? खचीत हाच ? अगदीं खोटं. हा कागद नव्हे. अगदीं नव्हे. त्यांनीं माझ्या पोरीबद्दल आपल्या पोरांबद्दल असलं कांहीं लिहिणं मुळींसुद्धां शक्य नाहीं. बोला, त्यांनीं दिलेला खरा कागद कुठें आहे ? बोला. मला अगदीं सुद्धां शंका नाहीं या कागदाच्या बनावटपणाबद्दल. काढा, काढा कुठें आहे तो कागद तो. मी अगदीं..." त्या बिचाऱ्याच्या तोंडून काय शब्द निघत होते, आणखी काय नाहीं याचें त्याचें त्यालाच भान होतें कीं नाहीं कोण जाणें ! एकामागून एक शब्द पडत होते इतकेंच. चिंतोपंत अगदीं थंड बसला होता. किती वेळपर्यंत एक अक्षर-सुद्धां बोलला नाहीं. नंतर हलकेंच धिमे-पणानें ह्मणतोः " पण त्यांत आहे काय हें मला वाचूं तरी द्याल ? तुह्मी एकटयानं वाचून मला त्याचा उलगडा कसा व्हावा ?

" लबाड. लबाड. तुह्मी अगदीं लबाड, या कागदांतला सगळा मजकूर तुह्मीं बन-वलेला असून तुह्मांला माहिती नाहीं काय ? "

" हं हं. आतां मात्र जीभ आटपून बोला ह्मणून सांगण्याची पाळी आली अं ? इतका वेळ दुरून दुरून चाललं होतं तें ठीक होतं. आतां अगदीं माझ्या तोंडावरच लुच्चा लबाड म्हणूं लागलां. असो. किती झालं, सावत्र आईकडून झालां, तरि तुह्मी माझे आजे. तेव्हां मी अधिक कांहीं बोलत नाहीं, पण..."

" पण नाहींन् बीण नाहीं. काय वाटेल तें ह्मणा. माझी अगदीं खात्री आहे कीं तुह्मांला यांतला मजकूर माहिती आहे. "

" एक तर मला माहिती नाहीं, आ-णखी यदाकदाचित् असला असं धरलं तुमच्या म्हणण्याप्रमाणें, तरी म्हणजे लबाड ह्मणण्याला कांहीं कारण तुह्मांला सांपडलं असं होत नाहीं. आतां असं करा तो कागद मजकडे द्या. मी एकदां वा-चतों आणखी मग आपण काय तें करूं. ' तुम्ही सही शिक्का नीट पहा, नीट पहा, असं तीन तीनदां बजावून बजावून सांगि-

तलं तें एवढ्याचकरितां, कीं तुम्हाला, तुमच्या लेंकीला आणखी तुमच्या नातवंडांना प्रतिकूल असं कांहीं असलं तर उगीच माझ्यावर त्याचं खापर फुटूं नये." इतकें अगदीं शांतपणें म्हणून त्यानें तो कागद अगदीं मननपूर्वक वाचला. वाचतांना आपणही मधून मधून फार चाकित झाल्याप्रमाणें उद्गार काढीत असे आणि वाचन संपतांच कागद दूर फेंकून देऊन आणि लांब उसासा टाकून म्हणतो. " छे. छे. ही सही जर नसती खालीं, तर मींसुद्धां हा अगदीं बनावट म्हटलं असतं, पण ही सही आणखी यांतले कांहीं शब्द वाचले, म्हणजे तशी शंका राहत नाहीं. त्यांनीं माझ्या देखत असे उद्गारही काढले आहेत ! "

" काय म्हणतोस ? माझ्या कारटीवर असला नीच दोषारोप त्यांनीं स्वतः केला म्हणतोस ? हीं पोरं आपलीं नाहींत अशी त्यांना शंका होती आणखी म्हणून त्यांना मी कांहीं सुद्धां ठेवीत नाहीं हें त्यांचं लिहिणं ?

" तुम्हीच पहा आतां कोणाचं तें ?"

त्या गृहस्थाच्या अंगाचा संताप झाला.

त्या गृहस्थाच्या अंगाचा जितका संताप झाला, तितका चिंतोपंत अगदीं शांत होता. अण्णासाहेब जों जों संतापून जाऊन कांहीं बोलें, अगर त्याला शिव्या देई, तों तों चिंतोपंत असा धिम्मेपणाचा आविर्भाव आणून बोलत कीं वा !

" अगदीं अगदीं शंका नाहीं.हें बुईल तूं बनावट केलं आहेस. मला काडीभर, तिळभरसुद्धां त्याबद्दल शंका नाहीं, आणखी तर काय ? बोल, खरं बुईल कुठं आहे ? त्यांत तुला कांहीं ठेवलं नसेल, तुझी निर्भत्सना केली असेल, माझ्या पोरीला आणि नातवंडांना सगळं कांहीं ठेवलं असेल, म्हणूनच तूं हा सर्व बनावट खेळ केला असशील यांत अगदीं अगदीं कसा तो मला संशय नाहीं. बोल. बोल. विनाकारण त्रास नको. बोल. "

" होऊं द्या, तुमचा संताप, तुमच्या शिव्या, तुमचे शाप, सगळं कांहीं होऊं द्या. मग मी एकदांच काय तें बोलेन. वारंवार वारंवार तेंच तेंच, तेंच तेंच काय बोलूं ? तुमचं मस्तक नाहीं ठिकाणावर, तें येईपर्यंत तुह्मी काय बोलाल तें मला अगदीं निमूटपणें ऐकून घेणं भाग आहे. मला अगदीं ठाऊक आहे, पक्कं ठाऊक आहे, कीं तुम्ही नीट ध्यानावर आलां ह्मणजे कांहीं मला इतक्या वाईट तऱ्हेनं बोलणार नाहीं. आतां सध्या बोलतां आहां, तर चालूं द्या. कांहीं हरकत नाहीं. आमचे वडील नसत का बोलत ? त्यांच्या जागीं आज तुह्मी मला आहांत. घटकाभर रागावाल, पण घटकाभऱ्यानें तर पुनः नीट बोलूं लागाल. अहो, असलीं नीच कामं करण्याचं माझं ब्रीदच नाहीं. तुह्मी समजतां तरी काय ?

" मी कांहीं समजत नाहीं. तूं अगदीं कपटी, घातकी, लुच्चा आहेस एवढंच समजतों. "

" मर्जी तुमची ! तुह्मांला काय वाटेल तें समजा. माझा मी आपला जसा साधा भोळा पहिल्यापासून आहे तसा आहे. वडिलांचा माझ्यावर रोष असायला कारण तुह्मीच मंडळी झालां होतां, पण माझ्या नशिबानं माझा चांगुलपणा आणखी तुम...आणखी ह्मटलं अखेरीअखेरीस तरी त्यांच्या नजरेला आला, हें मोठंच माझं नशीब. त्यांनीं जर माझ्या ठिकाणीं लुच्चेगिरी, कपटीपणा मुळींच पाहिला नाहीं, तर ते तरी अगदीं शेवटींसुद्धां माझ्या-

वर निष्ठुरपणा करतील कसा ? मला हें असं कांहीं तरी होणार असं पक्कं वाटलंच होतं, आणखी म्हणूनच मी तुम्हांला पहिल्यानं म्हणत होतों, कीं बुईल न वाचतांच जाळून टाकूं आणखी काय असेल नसेल तें सगळ्याजणांमिळून वांटून घेऊं. पण छे; तुह्मांला केवढा झपाटा आला ! आतां घ्या. अजूनसुद्धां माझी हरकत नाहीं. जर जुळत असलं तर अजून सुद्धां...पण तुह्मी कसले सत्यनिष्ठ, तुह्मी अशा लबाडींत येऊन मिळणार ? ''

चिंतोपंत जों जों शांतपणा धरून बोले, तों तों अण्णासाहेबांचा संताप इतका वाढे कीं, कांहीं विचारूंच नये, आणि शेवटल्या बोलण्यानें तर अगदीं इतका चढला कीं, त्यांचें सर्व शरीर थरथर कांपूं लागलें व तोंडांतून शब्द निघेनात. चिंतोपंत अगदीं शांतपणें त्यांचेकडे पाहात होता. अण्णासाहेब लागलीच त्यास ह्मणतात: '' मी असा तसा लिचापिचा माणूस नाहीं. समजलास ? तूं समजतों आहेस तरी काय ? असला हा खोटा कागद केल्याबद्दल तुला तुरुंगच दाखवीन, त्याखेरीज नाहीं तूं शुद्धीवर यायचा. अरे, इतका इतका नीचपणा ? ''

'' दाखवा, दाखवा तुरुंग. आजानं नातवाला तुरुंगांत तरी कधीं घालावं ? माझी तुरुंगांत जाण्याला मुळींच हरकत नाहीं. पण हें असलं बुईल कोर्टांत येऊन त्याची भवतिनभवति व्हावी हें मात्र मला बिलकुल नको आहे. त्याच्यापेक्षां बेहत्तर आहे सगळी इस्टेट तुह्मीं घ्या. मी आणखी माझी बायको अंगावर आहेत त्या वस्त्रांनिशीं बाहेर पडतों. किती केलं तरी त्या माझ्या आई, आणखी त्यांची विटंबना कोर्टांत व्हावी याला मी तर कांहीं मदत करणार नाहीं. येऊन जाऊन सगळं भांडण पैशासाठींच भांडायचंना ! वडील वारले, त्यांचं कांहींच नाहीं. ठीक आहे चालूं द्या. तें बुईल ठेवायचं आहे तुमच्याजवळ ठीक आहे, ठेवा. पण मला तुमच्या सहीची एक नक्कल मात्र करून द्या. उगीच आपली असावी. इतकं तें बुईल वाईट आहे, तरी तुह्मी तें नाहींसं करून टाकाल किंवा त्याच्या जागीं दुसरंच एखादं बनावट आणून द्याल, असं मला मुळींच वाटत नाहीं. माझा तुमच्यावर अगदीं पूर्ण भरंवसा आहे. तुमचा माझ्यावर नाहीं, त्याला कांहीं इलाज नाहीं. पण मी तुह्मांला सांगतों, कीं तें बुईल वाचून तुम्हांला जितकं वाईट वाटतं आहे, त्याच्या शतपट मला वाईट वाटतं आहे. बुइलांत कांहीं तरी आपल्या सगळ्यांनाच अनिष्ट प्रकार असेल असं मला पक्कं वाटत होतं हें मीं तुह्मांला केव्हांच सांगितलं, पण तो प्रकार इतका चमत्कारिक असेल असं माझ्या स्वप्नस्वप्नांतरीसुद्धां आलं नाहीं. अहो येणार कसं ? ' असल्या पोरांना मी एक कवडीसुद्धां ठेवणार नाहीं. त्यांना भिक्षा मागायला लावीन. ' असे उद्गार त्यांनीं अनेक वेळां काढलेले माझ्या कानीं पडले, पण त्या उद्गारांचा अर्थ इतका विलक्षण असेल हें स्वप्नांतसुद्धां नाहीं. असणार कसा ? मी ह्मणें असलीं पोरं म्हणजे आपली दांडगाई करतात, ऐकत नाहींत, शिकत नाहींत असा असेल पण तोही अर्थ संभवत नसे. कारण हीं मुलं, किती सुनीत ! काय त्यांना वाटत असेल किंवा त्यांच्या नजरेला आलं असेल कोणाला ठाऊक ? मी तर समजतों, कीं त्यांना भ्रमच झाला होता. दुसरं कांहीं नाहीं. त्याखेरीज नाहीं हें

असलं लिहिणं व्हायचं. कांहीं असो. तें लिहिलं आहे खरं. लिहिणं त्यांचं आहे. सही त्यांची आहे. या मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें अक्षरश: वागेन म्हणून त्यांनीं माझ्याकडून शपथ वाहून घेतली आहे. तथापि आपल्या सल्ल्याच्या बाहेर मी नाहीं, आणखी शपथ तर ही अशी आहे, कीं मोडली तर पितृघात होतो बरं. नाहीं मोडली, तर मातृघात होतो, आतां करणार काय ? पण मी आपली शपथ मोडीन. मोडण्यांतच आतां कमी पाप आहे. जसं आपण सांगाल तसं करीन. ''

हें सर्व लांबलचक बोलणें चिंतोपंतानें फारच शांतपणानें व थंडपणानें चालविलें होतें आणि चेहऱ्यावर काळजी, उदासीनता व अतुरता या तीनही विकारांच्या छायांनीं बनलेली एक छाया दिसत होती; कपाळाला पडलेल्या आंठ्या जणूं काय " काय हें लचांड माझ्या या नशिबीं आलं आहे ! '' असें वाक्य त्याच्या मनांत वारंवार घोळत आहे असेंच दाखवीत होत्या; आणि एकंदर चर्या अशी दिसत होती, कीं जणूं काय त्याचें मन तें मृत्युपत्र वाचून अगदीं विटून गेलें असून आतां यांत कांहीं अर्थ नाहीं असा त्याला एकंदर जगाचा तिटकारा आला असावा !

अण्णासाहेबांची चर्या मात्र फार विलक्षण झाली होती. त्याला कांहीं सुचेना. तो जागचा उठून इकडून तिकडे तिकडून इकडे अशा फेऱ्या घालूं लागला. घराच्या बाहेर चालतें व्हावें, आतां या ठिकाणीं राहण्यांत कांहींसुद्धां तात्पर्य नाहीं, असें एकवार त्याच्या मनांत आलें. एकवार वाटलें, कीं तें मृत्युपत्र आपल्याबरोबर घेऊन जावें. एकवार वाटलें, कीं घेऊन जाण्यांत काय तात्पर्य आहे. आपण तसेंच जावें. शेवटीं कोणा तरी वकिलाला विचारावें आणि पुढें काय करावयाचें तें करावें असें त्यानें मनांत आणलें. त्या मृत्युपत्रावर चार साक्षीदारांच्या सह्या होत्या, त्या त्यानें टिपून घेतल्या. मनांतला विचार हा, कीं त्यांच्यापैकीं कोणाला मृत्युपत्रांत काय आहे तें ठाऊक असलें तर पाहावें. परंतु त्या साक्षी घालणारांपैकीं दोघे मयत होते. एक त्याचा विश्वासू कारकून गुंडोपंत, तो गांवास गेलेला, आणि चवथा गृहस्थ मात्र गांवांत असून अण्णासाहेबांच्या चांगला परिचयांतला व स्वत: वकील असा होता. त्याला मृत्युपत्रांतील मजकूर ठाऊक असण्याचा संभव होता. त्याच्याकडे जाऊन चौकशी करण्याखेरीज दुसरा मार्ग मुळींच नव्हता. त्याच्याकडे जावें असा विचार करून ते उठले आणि मृत्युपत्र आपल्या खिशांत घालूं लागले, त्याबरोबर चिंतोपंत मोठ्या गोड तऱ्हेनें हंसून त्यांस ह्मणतो: " अण्णासाहेब, मृत्युपत्र तुह्मी न्या, पण मला नक्कल करून घेऊं द्याल कीं नाहीं ? तुह्मी ह्मणजे अफरातफर कराल असं थोडंच मला वाटतं आहे, पण आपलं सगळं रीतवार असावं तें बरं नाहीं का ? नको असं तुमचं ह्मणणं असलं, तर माझा कांहीं आग्रह नाहीं. तुह्मी सत्यनिष्ठ, तुह्मी कांहीं माझं वाईट करणार नाहीं खास. पण आपली असूं द्या एक नक्कल तुमच्यानं माझ्या सहीची माझ्याजवळ. आणखी अस्सल खुशाल तुह्मी घेऊन जा. '' असें ह्मणून भर्कन् त्यानें अण्णासाहेबांपासून तो कागद घेतला, लागलीच जवळच्या टेबलाजवळ जाऊन त्या कागदाची नक्कल केली. ' अस्सलबरहुकूम नक्कल ' असा शेरा त्यावर मारला, आपली सही केली

आणखी पुनः गोडपणें हंसून म्हणतो, " नक्कल बरोबर झाली आहे कीं नाहीं पहा, ही नक्कल मीं केली आहे, ती आपण घ्या, आणखी मी ही अस्सल वाचतों, त्याबरहूकूम आहे कीं नाहीं पहा मींच लिहिलें तें मीं वाचलें, तर चूक सांपडण्याला कठिण पडेल. " अण्णासाहेबांच्या मनांत तें दुष्ट मृत्युपत्र पुनः वाचावें असें नव्हतें व त्याप्रमाणें त्यांनीं लागलीच " नका नका आतां तें पुनः वाचूं" पुनः वाचून करायचं काय? एकदां वाचलं तेवढं पुरे झालं. आणा तें इकडे," असें ह्मटलेंही. पण तो कुठला ऐकायला? त्यानें आग्रहानें सगळें मोठ्यानें वाचलें. त्यांच्या मनांत नसतांही अण्णासाहेबांचे डोळे त्या नकलेवरून फिरले. वाचून होतांच पुनः त्यांनीं दीर्घ असे दोन उसासे टाकले, आणि पुनः कांहीं बोलणार तों चिंतोपंत ह्मणतात: " मग आतां अस्सल माझ्याचजवळ राहीना ? ती नक्कल अस्सलबरहुकूम आहे. असा शेरा मारून मीं सही दिलीच आहे. तीतशी आहे याबद्दल तुह्मी आपली सही कर. म्हणजे झालं. तुमच्या हातीं अस्सल देऊं नये असं कांहीं माझं ह्मणणं नाहीं, माझा आग्रहही नाहीं. पण सगळं कांहीं माझ्याच हातून व्हायचं आहे, तेव्हां अस्सल नेहमीं माझ्याचजवळ राहिली पाहिजे, असं मला वाटतं. तुम्हाला काय येऊन जाऊन खरं का खोटं हेंच ठरवण्यासाठीं पाहिजेना ? जेव्हां तुम्हाला लागेल तेव्हां इथेंच घेऊन या कोणाला दाखवायचं असलं तर, ह्मणजे झालं. वाटेल तेव्हां मी तें आपल्या सेवेला हजर करीन. सध्या आतां कुलुपांत ठेवितों पुनः उगीच त्याचा बभ्रा नको, कां मी ह्मणतों असंच कीं नाहीं ? " असें म्हणत ह्मणत त्यानें चटकन् उठून खरोखरीच तें कुलपांत नेऊन ठेविलेंही आणि पुनः गोड हंसून अण्णासाहेबांच्यापुढें येऊन " करा करा. आपली सही करा. नक्कल बरोबर आहे अशाबद्दल. ही घ्या दऊललेखणी " असें ह्मणाला. तें ऐकून अण्णासाहेबांच्या चित्ताचें काय झालें असेल, तें त्यांचें त्यांनाच ठाऊक. त्यांनीं पुनः त्याची आणखी नानाप्रकारांनीं निर्भर्त्सना केली. " आतां इतक्यांत तूं मला तें अस्सल मृत्युपत्र देतों म्हणालास आणखी आतां बदललास. तुला तुझ्या शब्दांची कांहीं तरी किंमत आहे का ? तूं किती पाजी, लुच्चा, हरामखोर ! तें लाबाडीचं आहे ह्मणूनच तूं अशी लुच्चेगिरी केलीस. तें मला जर साक्षीदारांच्या सह्या खऱ्या आहेत कीं नाहींत हें ओळखवून आणायचं असलं तर या नकलेचा उपयोग काय ? अस्सल पाहिजे. ती जर तुझी खरी आहे तर तुला एवढी भीति कां ? " असें पुष्कळ प्रकारांनीं ह्मटलें, परंतु त्याच्या शांततेंत अणुमात्र कांहीं फरक नाहीं. तो पुनः हंसून म्हणतो, " किती तरी तुम्ही रागाच्या भरांत अविचाराचीं बोलणीं बोलतां ? मनाच्या चांगल्या स्थितींत तुमचं तुम्हालाच वाईट वाटेल. नाहीं बरं ? अहो, असलीं हीं पत्रं कुठें वाटेल तिथें नेऊन वाटेल त्याला का दाखवायचीं असतात ? हजारजणांनीं जर तें पाहिलं तर त्यांत बेअब्रू कोणाची आणखी किती होणार याची कांहींच का कल्पना नाहीं येत तुम्हांला ? तसेंच जे कोणी असतील त्यांना इथें आणा, आपण इथें दाखवूं, सह्या ओळखून घेऊं त्याबद्दल एवढा थोरला गर्गशा कशाला ! तुम्ही संतापाच्या वेडांत ज्याला त्याला दाखवीत सुटाल या भयान तर मी तें तुमच्या हातीं

देत नाहीं. ती नक्कलय् या इथेंच ठेवून. नुसतीं साक्षीदारांचीं नांवं द्यून घ्या. त्यांच्या सह्या, आमच्या वडिलांची सही, हीं ज्यांना ओळखत असतील असं तुम्हांला ठाऊक असेल त्यांच्यापुढें तें अस्सल मृत्युपत्र देऊं. मजकूर न दाखवितां सह्या बरोबर आहेत का एवढंच काढून घेऊं म्हणजे झालें. ज्याला त्याला हा मजकूर दाखविलात, म्हणजे खराखोटा लांबच राहिला, पण विनाकारण गांवभर बोभाटा होणार त्याचं खापर कोणाच्या माथ्यावर फुटायचं ? संतापाच्या भरांत अगदींच वेडावून जाऊं नका, कांहीं विचार करा. आहे काय ? आणा ती नक्कल इकडे."

येथपर्यंत मजल आली. तेव्हां आतां याच्याशीं बोलण्यांत कांहींसुद्धां अर्थ नाहीं. काय विचार करावयाचा तो पोक्तच केला पाहिजे त्याखेरीज हा डाळ शिजूं देणार नाहीं, असें पक्कें जाणून चडफडत चडफडत त्यांनीं तें घर सोडलें.

# प्रकरण ४ थें.

## पन्नास रुपये दरमहा.

मागील प्रकरणीं सांगितलेला प्रकार घडून अण्णासाहेब आपल्या घरीं आले, त्या वेळीं त्यांच्या मनाची स्थिति काय बरें झाली असेल ! घरीं आल्याबरोबर त्यांच्या बायकोनें त्यांस अनेक प्रश्न विचारले, परंतु त्यांचीं उत्तरें त्यांनीं काय दिलीं असतील ? कांहीं दिलींच पाहिजेत, नाहीं तर बायको कांहीं स्वस्थ बसूं द्यावयाची नाहीं म्हणून त्यांनीं उत्तरें दिलीं इतकेंच. परंतु तीं उत्तरें दिल्यावर सुमारें पंधरावीस मिनिटांनीं त्यांजला कोणी जर आपण काय बोललां ? म्हणून विचारलें असतें, तर त्यांना तेंच पुनः सांगतां आलें नसतें. तो मनुष्य अत्यंत सरळ आणि जो प्रकार घडला, त्यामुळें त्याच्या मनाला असला कांहीं धक्का बसला कीं, त्याला वेड्याप्रमाणें झालें. बिजवराला मुलगी देतांनाच त्याला अतोनात वाईट वाटलें होतें, परंतु कांहीं नडीमुळें त्याला ती दामोदरपंतास द्यावी लागली. पुढें मुलीचा संसार बरा चालून ती सुखानें नांदत आहे, तिला कोणत्या गोष्टीची ददात नाहीं, मुलेंबाळें होऊन संसार अगदीं रंगांत आला आहे, असें पाहून त्याला अर्थातच फार समाधान झालें आणि बिजवराला दिल्याबद्दलचा सर्व कांहीं खेद मावळला होता. त्यांनीं पैशाला लुब्ध होऊन हा सर्व प्रकार केला असा त्यांच्यावर लोका-

पवादानें शिंतोडा टाकलाच आणि त्यांच्या पत्नीच्या फाजील कडकपणामुळें व सरस्वतीच्या कुटाळपणामुळें तो शिंतोडा बाह्यतः त्याला अगदीं पुरता चिकटलाही, परंतु अंतर्यामीं तो म्हातारा अगदीं स्वच्छ होता. सच्छील असावें याबद्दल तर त्याचा मोठा कटाक्ष होता, परंतु आज या बुइलांत लिहिलेला भयंकर प्रकार पाहतांच त्याच्या काळजाचें नुसतें पाणी झालें. तो तळमळ करीत एकसारखा इकडून तिकडे तिकडून इकडे करीत राहिला. हा प्रकार आहे तरी काय, याचा त्याला मुळींच कांहीं उलगडा होईना. त्यानें आपल्या हातची ती नक्कल पंचवीस वेळां वाचली असेल, आणि पुनः घडी करून ठविली असेल. चिंतोपंताच्या घरांतून तो निघाला तेव्हां त्यानें कोणा एका ओळखीच्या वकिलाकडे जावें असा विचार केला होता; परंतु त्याला जाऊन सांगायचें काय ? आणि दाखवायचें काय ? ही बुइलाची नक्कल ? आपल्याच हातानें आपलीच मांडी उघडून दाखवायची ? हा प्रसंग तरी काय हा ? आपल्या पोरीबद्दल तिच्याच नवऱ्यानें लिहिलेला मजकूर म्हणून तो चांडाळ देतो, आणि तो खोटा म्हणून ठरवण्यासाठीं आपण ज्याच्या त्याच्याकडे जाऊन भलताच मजकूर त्याच्या कानावर घालायचा याचा अर्थ काय ? हें व्हावें कसें ? बुईल खोटें याबद्दल तर अणुमात्र त्याला शंका नव्हती. पण तें खोटें असें ठरवायचें कसें ? आणि हें खोटें, तर खरें काढायचें कोठून ? जरी खरें सांपडलें नाहीं, तरी पण हें खोटें ठरवलें पाहिजे. हें खोटें ठरवलें पाहिजे, तर हें कोर्टापुढें येणार, आणि त्याच्या खरेपणाची शाबिती तो चांडाळ करणार. ती शाबिती झाली तर वाईटच; न झाली, तरी कोर्टांत असल्या बुइलचा पाढा वाचला जावा हें तरी कितपत इष्ट ? आपल्या पोरीबद्दल लिहिलेला असला मजकूर कोर्टांत वाचला जावा हा नुसता विचार त्या म्हाताऱ्याच्या चित्ताला किती तरी खेद देऊं लागला. बायकोनें तर त्याला त्या बाबतींत प्रश्न विचारून विचारून अगदीं उच्छाद आणला; परंतु ही बाबच अशी होती, कीं कितीही त्रास दिला, तरी काय आहे तें सांगणें कांहीं शक्य नव्हतें आणि त्यानें सांगितलें नाहींच. पोरीकडे पाहून त्यानें अश्रु गाळावे आणि तळमळत राहावें असें चाललें होतें. तीन, चार, पांच, रात्री गेल्या, म्हाताऱ्याच्या डोळ्याला लेशमात्र झोंप नाहीं, आतां कांहीं हे आजारी पडल्याखेरीज राहत नाहींत असें त्यांच्या बायकोस पक्कें वाटलें, आणि कांहीं तरी करून आतां खरा प्रकार काय आहे तो काढून घेतल्याखेरीज दुसरा उपाय नाहीं, असें मनांत आणून काय करावें याच्या विवंचनेला तीही लागली. म्हाताऱ्यानें अन्नपाणी सोडलें, झोंप तर अगदीं उडाली, आणि सारा दिवस भ्रमण सुरू झालें. कांहींना कांहीं तरी हातवारे करावे. मध्येंच जणूं काय कांहीं महत्वाचा बेत ठरला असें वाटून टाळी वाजवावी आणि हंसावें अगर कोणाला तरी बोलावून कांहीं तरी सांगावें. त्याला कोणत्याही प्रकारची आतां शुद्ध राहिली नाहीं. फक्त एक तो कागद ! ती बुइलाची चिंतोपंतांनें करून दिलेली नक्कल मात्र दिसे. तो तिला कधीं विसंबला नाहीं. जेथें जाई तेथें बरोबर घेऊन जायचा. त्यांत कांहीं तरी विलक्षण प्रकार आहे, असें म्हातारीनें तेव्हांच ताडलें होतें; आणि तिनें जपणीस बसून

तो कागद तर एकदां स्वारीच्या हातांतून लांबविला, पण तो तिच्या हातांत गेला असें पाहतांच जसें एखादें वाघिणीचें पोर उचलून नेलें असें तिच्या दृष्टीस पडतांच ती उडी मारते त्याप्रमाणें म्हाताऱ्यानें ताडकन् उडी मारली व तो कागद हिसकावून घेऊन त्यानें आपल्या गादीखालीं घालून ठेविला. त्या वेडाच्या भरांत तो तितका जोर त्याला आला. परंतु एकीकडून ताण बसला कीं दुसरीकडून उलट ताण बसायचाच. या न्यायानें लागलींच त्याला शक्तिपात झाल्याप्रमाणें होऊन ते खालीं पडले. पाणिबिणी घालून त्यांनीं त्याला सावध केलें, परंतु त्याच्या सावध होण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हांपासून ह्मातारा खंगतच जाऊन शेवटीं सात आठ दिवसांनीं त्याचा अंत होऊन बिचाऱ्या राधाबाईस जो एक बापाचा आधार होता, तोही नाहींसा झाला. आतां आपलीं पांच मुलें आणि आई.

अण्णासाहेब वारला हें कळतांच चिंतोपंताला समाधान झालें असावें असें दिसलें. कारण ती बातमी कानीं येतांच स्वारी घरांत गेली आणि ह्मणते, 'कळलं का? एक कांटा मोठा आपल्याला वाटत होता, तो आजं निघाला म्हणे, आतां गेलं पाहिजे तिकडे. आजोबा आटपले. तिकडे जाऊन जरा डोळे भिजविले पाहिजेत. तोंड लांब केलं पाहिजे. नको का ?"

सरस्वतीबाईनीं प्रथम कांहींच उत्तर दिलें नाहीं. मला वाटतें शोकातिरेकानें तसें असेल कदाचित् ! परंतु पतिराज जायलाच निघाले, तेव्हां हलकेच म्हणतात, "इतकं मेलं कसं समजत नाहीं ? आतां जाऊन काय करायचं आहे ? उद्यांबिद्यां जावं. मला कळलंच नाहीं ह्मणावं सोडून द्यावं. ज्या त्या गोष्टींत सांगितल्या शिकवल्याखेरीज कांहीं होत नाहींना ? अत्तांच गेलं ह्मणजे स्मशानांत जावं लागेल. जेवायला उशीर होईल. प्रकृति पडली पित्तकर, आणखी त्यांत-असं उन्हांत जाऊन उभं राह्यचं जेवणखाण कांहीं न करतां ! आतां आपलं लवकर जेऊन घ्यावं आधीं. एकूण ह्मातारा मेला अं ? तो खरोखरीच चांगला होता हो ! त्याच्याबद्दल मलासुद्धां खरं वाईट वाटतं." शब्दांचा अर्थ काय कोणाला कळेल तो कळो. पण ते शेवटेल "मलासुद्धां खरोखर वाईट वाटतं" हे शब्द उच्चारतांना गालांतल्या गालांत आलेलें हंसूं जर कोणाच्या नजरेस पडतें तर त्याला कांहीं त्या शब्दांचा अर्थ तोच असावा असें वाटलें नसतें. आधींच उल्हास आणि त्यांत फाल्गुन मास. मग काय विचारतां ? चिंतोपंतानें तावडतोब आपला बेत बदलला; आणि आजोबांना नदीवर पोंचविण्याचा समारंभ, या सगळ्यांत मोठ्या नातवाच्या असण्यानें सुशोभित झाला नाहीं. दुसरे तिसरे दिवशीं जाण्याचा विचार चवथे पांचवे दिवसावर गेला. आणि तेथून तो बराच ढकलत जाऊन शेवटीं नाहींसाच झाला. असा एकंदर प्रकार झाला. वुइलाच्या बाबतींत आतां अर्थातच आपण होऊन पुढें होऊन चौकशी करण्यास कोणी उरलें नाहीं असें चिंतोपंतास वाटून त्यानें पुढें आतां काय करावें याविषयींचा विचार चालविला. मागें अनेकवार सांगितलेंच आहे, कीं त्याला काळीज होतें. यामुळें त्याला राहून राहून मधून मधून असें वाटे, कीं आपण आपल्या आईला आणखी आपल्या भावंडांना अगदींच धाब्यावर बसवतों हें चांगलें नाहीं. कांहींना कांहीं त्यांची सोय केलीच पाहिजे, परंतु ह्य

विचार मनांत घेऊन काय उपयोग ? तो आपल्या पट्टराणीजवळ काढण्याचें धाडस त्यास कुठें होत होतें ? तिच्याजवळ तो उच्चारून दाखविण्याचें धाडस होऊन, तिची संमति मिळून मग काय तें व्हायचें ! तेव्हां रोज पंचवीसदां त्याच्या मनांत विचार येई आणि सरस्वतीबाई जवळ नसतांना, ती आतां आली, कीं तिच्याजवळ गोष्ट काढून तिचें मन आपल्याकडे वळवून घेऊं असें त्याला वाटे, परंतु जगदंबाबाईचें दर्शन झालें, कीं त्या रूपाच्या दर्शनांत व दिव्य वाणीच्या श्रवणांत भक्तशिरोमणि तल्लीन होऊन जाऊन त्याचें अगदीं भान हरपून जात असे. शेवटीं एके दिवशीं मोठा पराकाष्ठेचा धीर करून विज्ञापना केली. त्या वेळीं जें संभाषण झालें तें खालीं देतों:–

" हें पहा, माझ्या मनांत एक फार दिवस विचार विचारायचा आहे. हो, ह्मणत असलां तर विचारतों. विचार इतकाच– "

" इतकं मेलं लांबलचक तें काय विचारयचं त्यांत ? मीं आपल्याला विचार विचारायचा, का आपण विचारायचा ? काय मला सांगायचं असेल तें सांगावं म्हणजे झालं. मी का आपल्या बाहेर आहे बरं ? असं कांहीं बोलूं नये. मी किती झालं तरी आपली बायको. तेव्हां माझ्या योग्यतेनंच माझ्याशीं बोलावं न् वागावं. मेलीं लोकं मग थट्टा करतात ! म्हणतात, हिनं कांहीं तरी जादूटोणा केला आहेन् खचित म्हणून इतकं अगदीं मुठींत असायचं ! आपण का माझ्या मुठींत का आहां ? जरा अम्मळ दोघांचं चांगल असलं तर लोकांना मेल्यांना पाहावत नाहीं. लागलींच कांहींना कांहीं तरी त्यावर टीका करून लोकं टवाळी करायला लागतात. बरं पण काय विचारायचं होतं तें ? "

" तूं बोलायला लागलीस कीं नाहीं ह्मणजे सगळं कांहीं विसरूनच जातों मी ! आतां मी अगदीं विसरून गेलों होतों. तूं दुसरं कांहीं काढलं असतंस, तर मला कांहीं स्मरण झालं नसतं न् मी अगदीं विसरलों असतों. लोकं म्हणतात तसं मलाय् वाटतं, कीं कांहीं तरी जादूटोण्याचा प्रकार माझ्यावर झाला असावा आपल्याकडून. यांत कांहीं शंका नाहीं. बरं मग काय ? बोलूं का मी काय तें ? विचारूं ? " ·

" हें काय हें ? बरं, केला जादूटोणा तर केला, आपल्यालाच केला ना ? दुसऱ्याला तर कुणाला नाहींना केला ? झालं तर मग.मला असे जादूटोणे करण्याचा नाद असता तर आजला कां अशी स्थिति झाली असती ?बरं पण विचारायचं विचारायचं तें काय तें विचारावं कीं एकदां ?"

" विचारूं ? पहाहो ! मग ह्मणशील असंच झालंन तसंच झालं. विचारायचं दुसरं कांहीं नाहीं. इतकंच, कीं आतां सगळं तुझ्या मनाजोगं झाल्यासारखंच आहे. आतां तूं नेहमीं ह्मणतेस तसं निष्कंटक झालं ह्मटलं तरी चालेल. तेव्हां आतां त्या माणसांच्या स्थितीबद्दल कांहीं विचार करणं जरूर नाहीं का आपल्याला. नीट विचार कर. अशी एकदम डोक्यांत राख घालूं नकोस. आपण तसा कांहीं विचार केला नाहीं, तर......कां बोलत नाहींस ती ? अशी मुग्ध कां ? मी ह्मणतों हें खरं आहे कीं नाहीं ? केला पाहिजेन् विचार आपल्याला ? बोल, बोल. बोल ग ! "

" काय बोलायचं आहे ? माझ्याकडे बोलायचं आहे काय ? अन् मी कोण ?

मी मघांपासून आपलीं बोलणीं ऐकून घेतें आहें. म्हणे काय ? ‘ तुझ्या मनाजोगं झालं ! ’ माझ्या मनाजोगं झालं आणखी तुमच्या कांहीं नाहीं. आणखी मी डोक्यांत राख घालणारीणं, हो. हो. त्या माणसांचा विचार जर आपण नाहीं करायचा तर करायचा कोणीं ? आपण वडील मुलगे, वडील बंधु; आपण इतके दिवस थांबलां याचंच मला मोठं नवल वाटतं. चांगला विचार करावा. मी मुळींसुद्धां आड यायची नाहीं. मग पण मला विचारायचं तरी काय होतं त्यांत ? या बाबतींत मला कांहीं अगदीं सुद्धां विचारूं नये. आपला बेलाशक विचार करावा. कसा काय झाला आहे विचार ? त्यांना इथें आणावं आणखी.........”

“ तूं असं वेड्यासारखं करूं नको. तूं मोठी शहाणी, धूर्त म्हणून मी तुला विचारतों, तर असं वेड्यासारखं बोलतेस?”

“अहो मी वेडी. मी किनई अगदीं वेडी. मला इस्पितळांत या पाठवून आणखी दुसरी एखादी चांगली, शहाणीसुरती करा. सासूबाई मोठ्या शहाण्या, त्यांना तुह्मी आणून ठेवणारच. तेव्हां त्यांच्या हाताखालीं ती नवी शहाणी अश्शी तयार होईल तुम्हाला सल्लामसलत द्यायला कीं वा ! हं, होऊं द्या, आले आहेत मुहूर्त जवळच. ”

“ पुनः तेंच. पण माझं बोलणं तरी ऐकून घेशील का आपलं हें असंच चालायचं ! मी म्हणतों काय, नाहीं काय, कांहीं धीर धर, त्यांना इथें आणून ठेवायचं कोणी नांव तरी काढलं बरं ? ”

“ मी सांगतेंना आणून ठेवावं म्हणून ? सगळ्या विचारांतला विचार मला तेवढा कळतो आहे. दुसरे विचार अगदीं कुचकामाचे. ”

“ ऐक, ऐक जरा. मी एवढंच म्हणतों, कीं कुटुंब लहान नाहीं. पांच मुलं आणि त्या दोन बाया; त्यांत त्या थोरल्या पोरांचं शिक्षण व्हायचं, सगळं कांहीं व्हायचं; तेव्हां कांहींना कांहीं तरी मदत आपण करणं हें अगदीं जरूर आहे. जनांची नाहीं पण मनाची तरी कांहीं...”

“ पुनः आपलंच. मला किनई तीन तीनदां तेंच तेंच बोलतां येत नाहीं. कोणी नको म्हटलं आहे हो तुम्हांला ? मी तर म्हणतें कीं त्यांना घरांत आणून ठेवा म्हणून; मी आपल्या पोराला घेतें आणखी दुसरीकडे राहातें. म्हणजे बोलाचाली व्हायला नको. कांहींच त्रास नको. ”

“ माझं ऐक, माझं ऐक मी काय म्हणतों तें. मी इतकंच म्हणतों कीं, पन्नास रुपये दरमहा उचलून आपण त्यांना पाठवून देत जाऊं. म्हणजे आपल्यावर दोषही कोणाचा यायचा नाहीं; आपल्याही मनाला कांहीं वावगं वाटायला नको, आणखी सगळं कांहीं यथास्थित होईल. मी म्हणतों हें खरं ना ? ”

“ अगदीं, अगदीं, अगदीं, अगदीं, अगदीं, आऽगदीं खरं. मुळींसुद्धां त्यांत कांहीं खोटं नाहीं, पण पन्नास रुपड्यांनीं त्यांचं होणार काय ? माझ्या मतं त्यांच्यासारख्यांना निदान दोनशें रुपये सहज पाहिजेत. अहो तीं कांहीं माणसं आमच्यासारखीं भिकारडीं का आहेत ? आपल्याला पन्नास रुपये वर्षालासुद्धां पुरून उरतील. पण त्यांना काय कात होणार ? खरं जर म्हणाल, तर घरावर ठेवा तुळशीपत्र. आन् करा सगळं त्यांच्या स्वाधीन. आन् आपण आपली

त्यांच्याच घरांत माधुकरी मागून आणून कालवण पाण्यावर राहूं. म्हणजे पण लोक काय स्तुति करतील, कीं भाऊ असावा तर असा असावा. खरा विचार जर करायचा; तर असा करावा. नाहीं तर पन्नास रुपड्यान् पंचवीस रुपड्या देण्यांत काय अर्थ आहे ? काय ह्मणे पन्नास रुपये दरमहा देऊं ! पन्नास रुपये अगदीं वाटेवर रोज सांपडत असतील नव्हे का ? पन्नास रुपये ह्मणजे झालं काय ! कांहीं विचार ? पण मी अशी वेडी, तुह्मी पन्नास नाहीं पांचशें द्या. माझ्या बापाचं कांहीं जातं आहे का ? ''

" छे. छे. तुझ्यापुढें अगदीं शिकस्त आहे बोआ. तूं तर अगदीं बोलच बोलूं देत नाहींस. पन्नास नाहीं तुझ्या मनास येत, तर तू सांग किती द्यावेत ते ! मग तर झालं ? कांहीं तरी सोईचं बोलावं कीं नाहीं ? का सदासर्वदा तेढंच ? ''

त्यावर पुनः सरस्वतीबाईचें कांहीं तरी व्याख्यान झालेंच. तरी पण पुनः चिंतोपंत तिला म्हणतो, " बरं, पन्नास नाहीं तर नाहीं, पण तूं सांग अमुक एक रक्कम द्यावी म्हणून. मग तर झालं ? जी रक्कम तू सांगशील तीं देऊं. माझी अगदीं तक्रार नाहीं. ''

" पहा पहा. नीटपणीं बोलणंच नाहीं. आपली माझी मीच आहें म्हणून कसे तरी दिवस काढतें आहें, नाहीं तर तुमच्या संगतीला दुसरी एखादी बायको असती म्हणजे !——काय चमत्कार आहे पहा ! म्हणे माझी कांहीं तक्रार नाहीं. आपली नाहीं तर माझी तरी काय आहे तक्रार ? पहिल्यापासून सांगतें आहें मी कीं माझी कांहीं हरकत नाहीं, तक्रार नाहीं. पन्नास द्या, शंभर द्या, पांचशें द्या, कीं नेसत्या धोतरावर बाहेर पडून माधुकरी मागायला लागा ; हो, द्यायचंच मग काय ? ''

" हें बघ, मी बोललों त्या बाबतींत हीच चूक केली. आतां झालं ? तिसाला तर हरकत नाहींना ? तीस रुपये इतक्या माणसांना पाहिजेत असं वाटतं.त्यांतून आतां अण्णा नाहींत तेव्हां कांहीं बाहेरून मिळकत नाहीं, कांहीं नाहीं. ''

" अहाहाहा ! अण्णा होते तेव्हां काय पण : बाहेरून मिळकत होती ! आपल्या घरापासून तिथपावतों धोत चालला होता पैशाचा ! तीच मिळकत ! काय पैसा नेला आहे आजपर्यंत याची कांहीं तरी इकडे माहिती आहे का ! अण्णांनीं यावं, मामंजींना कांहीं तरी सबब सांगून दांत विचकून शें सव्वाशें रुपये न्यावे. त्या थेरड्या अवदसेनं तर चोरायचा असा बाई एकसारखा सपाटा लावला होतान् कीं काय सांगूं ! आपल्याला त्यांतली कांहीं तरी माहिती आहे का ? आपला तुकडा खाऊन वणवण करीत हिंडायचं, नाहीं तर बुकांत डोसकं घालून घोकंपट्टी करायची. अहो, कांहीं नाहीं तरी दहा पंधरा हज्जारांची माया केली असेल त्यांनीं बरं ! कसली कींव करतांन् काय करतां ? पण मेली माझी ही जीभ इतकी चुरचुरते कशाला ? मला टवळीला करायचंय् काय इतकं बोलून ? हं, पन्नास म्हटलं, पांचशें; पंचवीस म्हटलं, हजार; असंच कां नाहीं म्हटलं ? भलत्या गोष्टींत बायकांना मुळींसुद्धां विचारूं नये म्हणतात तें एवढ्याकरितां.''

" काय ह्मणतेस ! इतका कुणगा केला असेल त्यांनीं ? ''

" छे. छे. बाई. '' सरस्वतीबाई हंसून व मोठ्या लडिवाळपणानं पतिराजांकडे पाहून ह्मणते, " अगदीं, अग-

दींच भोळा कारभार बरं का! इतका कुणगा केला असेल का नाहीं याबद्दल खरंचका आपल्याला संशय आहे? अहो तें एवढं थोरलं घर पडलं होतं तें सोडवलं कोणीं? मामंजीनींचना? पण बाई मला खरी आठवण झाली. मला वाटतं, तें घर मामंजीनीं आपल्या नांवानं करून घेतलं होतं. आपण ते सगळे कागदपत्र नीट पाहिले का? मामंजीनीं रुपये दिले आहेत हो त्याचे! तें घर कांहीं अण्णांच्या नांवावर नाहीं. मला अगदीं पक्कं लहानपणीं कानावरून गेलेलं आठवतं आहे कीं, घर मामंजीनीं आपल्या नांवावर करून घेऊन मग गहाण सोडवलं आहे. त्याचा नीट शोध करावा. आपला सगळा पोकळ कारभार. सोडूं नये दुसरं काय माझं ह्मणणं? ती मंडळी तिथें राह्यली आहे, तेव्हां आपल्याला जास्त कांहीं करायचं नाहीं. पण आपलं काय असेल तें चोख त्यांना ठाऊक व्हावं, आपल्यालाही ठाऊक असावं."

झालं. आपल्या भावंडांना पन्नास रुपये दरमहा द्यावे कीं पंचवीस द्यावे याचा विचार तेथेंच थांबून घर कोणाच्या नांवानें आहे याच्या विचाराकडे पतिपत्नीचें चित्त वेधलें, आणि हजार, पांचशें, पन्नास, पंचवीस रुपयांचीं बोलणीं पार जिरलीं. बिचाऱ्यांस कांहीं मिळण्याचें लांबच राहिलें!

# प्रकरण ५ वें.

## चिंतोपंताचें नाटक.

अण्णासाहेब वारले ते दिवशीं राधाबाईवर सर्व आकाश एकदम कोसळल्याप्रमाणें झालें. नवरा मरून थोडे दिवस झाले नाहींत तोंच आपल्या आईवर व आपल्यावर हा दुसरा असा प्रसंग येऊन गुदरल्याबरोबर त्या बिचारीची काय दुर्दशा झाली असेल! आपल्या सावत्र मुलाकडून आपल्याला फारशी मदत होणार नाहीं हें ती जाणून होतीच, नव्हती असें नाहीं. तो आपल्या बायकोच्या नादानें वागेल, आणि आपल्या मुलांकडे व आपल्याकडे तादृश लक्ष देणार नाहीं, असें तिला वाटून चुकलें होतेंच. परंतु त्याच्या दुर्लक्ष्याची किंबहुना नीचतेची सीमा किती लांबवर होती, याची तिला मुळींच कल्पना नव्हती. अण्णासाहेब वारतांच त्याला निरोप पाठविण्याचें तिच्या मनांत आलें. परंतु आईनें तिला तो पाठवूं दिला नाहीं. तिच्या आईला त्याचा पुरतेपणीं तिटकारा आला होता

आणि त्या मेल्याचें पाऊल माझ्या घरांत नको असें तिनें स्पष्टपणें बोलून दाखविलें. आईच्या मर्जीविरुद्ध कांहींही करण्याची ती वेळ नव्हती, सबब राधाबाईनें निरोप पाठविण्याचें काम तितकेंच राहूं दिलें व पांचचार बिऱ्हाडें होतीं त्यांतील गृहस्थांपैकीं एकानें आपण होऊनच चिंतोपंताकडे निरोप पाठविला आणि त्यामुळेंच त्याला बातमी कळली. त्या बातमीचा काय उपयोग झाला हें मागील प्रकरणीं कळलेंच आहे. बराच वेळ मंडळींनीं चिंतोपंताच्या येण्याची वाट पाहिली, परंतु जड माती घरांत किती वेळ कोण राहूं देणार ? चिंतोपंत किती केलें तरी त्यांचा कांहीं खरा नातू नव्हे, तो कसचा येतो ? असें म्हणून मंडळींनीं त्या प्रेताची व्यवस्था तर लावली. जगांत कोणी ना कोणी तरी उभा राहतोच. या वेळीं अण्णासाहेबांच्या वाड्यांत फार वर्षें राहत असलेल्या बिऱ्हाडांतील एक अगदीं तरुण गृहस्थ उपयोगीं पडला. परंतु त्या गृहस्थाचें वर्णन व नांव वगैरे आतांच देत नाहीं. तें लवकरच वाचकांस सायंत कळणार आहे; कारण या आमच्या कथानकांत त्याचा भाग थोडासा महत्त्वाचा आहे.

अण्णासाहेबांची पहिले दिवसाची व्यवस्था यथास्थित झाली, दुसरा दिवस उजाडला तरी चिंतोपंताचा ठिकाण नाहीं. राधाबाईला असें वाटत होतें कीं, आज नाहीं तर तो उद्यां येईल आणि आपला समाचार घेईल. अगदीं निष्ठुरपणा करणार नाहीं. परंतु त्या तिच्या आशेला कधींच फलद्रुपता आली नाहीं. तेरा दिवस झाले तरी चिंतोपंताचें तोंड त्या घरांत दिसलें नाहीं. सरस्वतीबाईनें पहिले दिवशीं न जाण्याविषयीं उपदेश केला, तोच रोज रोज गिरवून आपल्या नवऱ्याला तिकडे जाऊं दिलें नाहीं. मात्र इतके दिवसांत त्या घराच्या संबंधाचे कागद शोधून काढून तें घर आपलें आहे, त्यांचें नाहीं; अशाबद्दल आपली खात्री करून घेऊन नवऱ्याच्या पाठीमागें असा लकडा लाविला, कीं " तुह्मी त्यांना घरांत राहूं द्या. घरांतून घालवून द्या असं माझं ह्मणणं नाहीं, पण तें घर आपलंच आहे असा ताबा करतील तर करूं देऊं नका. " नवऱ्यास तें तिचें ह्मणणें केवळ नापसंतच पडलें असें नाहीं; पण बायको ह्मणते त्याप्रमाणें आजच करणें प्रशस्त आहे कीं कांहीं दिवस थांबावें आणि करायचें तर कोणच्या तऱ्हेनें करावें याचा विचार त्याच्या मनांत चालला होता इतकेंच. तो जात्या अत्यंत दुष्ट नव्हे आणि अगदीं अब्रु नाहीं असाही नव्हे, पण पैसा हातांतून न सुटण्याची आणि हातांत नवा येण्याची बाब असली म्हणजे मग त्याचें मन त्याच्या ताब्यांत नसे. दुसऱ्याच्या ताब्यांत जाई. तेरा दिवसांत त्याच्या मनाची इतकी तयारी झाली, कीं घर आपलें आहे असें त्यांस नीट समजूं देऊन त्या घरांतील भाडेकऱ्यांच्या चिठ्या आपले नांवानें तर करून घ्यावा आणि पन्नास रुपये अगर पंचवीस रुपये उचलून देण्याचा विचार होता, तो आतां बदलून त्यानें असा विचार केला, कीं घर आपलें आहे असें बोलल्याबरोबर कांहीं तरी समाधानाचीही गोष्ट काढली पाहिजे. तर आधीं असें म्हणावें, कीं " तुह्मी इथेंच रहा, आणखी भाडेकऱ्यांकडून भाडें येईल तें आपल्या खर्चासाठीं घेत जा. मात्र मुलें लहान आहेत, एवढ्याकरितां त्या भाडेकऱ्यांकडून भाडेचिठ्या घ्यायच्या, त्या मी आपल्या नांवच्या करून घेईन." हा विचार

त्याच्या मनांत आल्याबरोबर त्याला आपल्या मुत्सद्दीपणाबद्दल मोठा अभिमान वाटूं लागला. त्याला असें वाटूं लागलें, कीं आपण असें बोलल्यानें त्यांस वाईट न वाटतां आपला तर कार्यभाग होईल आणि अगदींच कांहीं आपण त्यांना पोहोंचवीत नाहीं असा लोकापवादही टळेल ! झालें, ठरलें. आपण तेथें जाऊन काय करणार व काय बोलणार, याबद्दल बायकोलासुद्धां कळूं देऊं नये, नाहीं तर ती आपल्या ‘ उदार ’ विचारांत मोडता घालील. घराचें जें भाडें येतें, तें आपण घेणें अगदीं सुद्धां वाजवी होणार नाहीं. पण ती त्यांचा हेवा इतका करते, कीं तिला तेवढेंसुद्धां खपणार नाहीं. ती तरी काय करील ! तिला आईसाहेबांनीं आणखी आजीसाहेबांनीं छळलीच तशी ! तिच्याकडे बोल नाहीं. असा एकंदर सर्व विचार करून स्वारी चवदावे दिवशीं आईला भेटण्याकरितां आली तर खरी. ते घराच्या दाराशीं येतांच राधाबाईच्या थोरल्या मुलाखेरीज सर्व मुलें ‘ दादा आले दादा आले ’ करीत आईकडे धांवत गेलीं. थोरला मुलगा मात्र कांहीं एक बोलला नाहीं. चिंतोपंतदादा कमी नाटकी नव्हता. दारांत पाऊल घालतांच जरा रागावल्यासारखें करून त्या मुलाकडे वळून ह्मणतो, “ अरे, अण्णा वारल्याचं मला कळवायचीसुद्धां तुला आठवण राहिली नाहीं. मी विचार करतों, कीं ते दोन चार दिवसांनीं कांहीं कामाला येणार होते, ते कां आले नाहींत ! बाबा वारल्यामुळें सगळं देवघेवीचं काम मला पहावं लागतं, त्यामुळें मलाही फुरसत झाली नाहीं येऊन चौकशी करायला. शेवटीं काल मुद्दाम गड्याला इकडे पाठवला, तेव्हां कळलं, कीं असं असं झालं म्हणून ! अरे मी का तुमचा वैरी का समजतां तुह्मी ? छे छे. मला नाहीं वाटलं तूं एवढासा असून इतका मिस्कील असशीलसा ! ”

हें सर्व नाटकी बोलणें त्यानें अशा थोरल्या आवाजानें आणि आविर्भावानें उच्चारलें, कीं एखाद्या तिऱ्हाईत ऐकणाराला तें अक्षरशः खरें आहे असेंच वाटलें असतें. शेवटीं स्वारींनीं आपल्या भाषणाला जरा मवाळपणाची झांक दिली आणि त्या पोराच्या पाठीवरून हात फिरवून ह्मटलें, “ असं करूं नये बरं बाबा, मी तुमचा मोठा भाऊ आहें. जें काय होईल तें मला येऊन सांगत जावं. तुझ्याकडे काय आहे त्याचं ह्मणा ! आईनं हें बघायचं. ते आजारी पडले तेव्हां मला निरोप पाठवायचा. पण त्यांना असं वाटतं, कीं मी ह्मणजे अगदीं तुमचा शत्रु ? कां त्यांना असं वाटावं, आणखी मला सोडून त्यांनीं कां दूर रहावं ? मला तर कांहीं समजत नाहीं. बरं जा. आईला सांग जा मी आलों आहें म्हणून. ” शेवटल्या वाक्याखेरीज बाकीचें सर्व भाषण ओटीवर उभ्या असलेल्या एका गृहस्थाला उद्देशून होतें असें म्हटलें तरी चालेल. निदान त्यानें तें ऐकावें व घरांत जितकीं मोठीं माणसें असतील तितक्यांनीं ऐकावें म्हणून होतें. शेवटलें वाक्य मात्र त्या मुलाला उद्देशून होतें. त्या मुलानें तें ऐकलें, परंतु त्याच्या मनावर यत्किंचितही परिणाम झालासा दिसला नाहीं. त्याच्या कपाळाला आंठ्या होत्या तशाच होत्या. मात्र तो त्यावर कांहींएक न बोलतां घरांत निघून गेला. इतर मुलांनीं दादासाहेब आल्याची सु (?) वार्ता आपल्या आई व आजीपर्यंत पोहोंचवलीच होती, त्यामुळें त्याला बोलण्याची जरूरी राहिली नाहीं आणि तितक्यांत दादासाहेब ओटी ओलांडून

माजघरांत गेलेही. राधाबाई आंतल्या बाजूला उंबऱ्याच्या जवळच सोप्यांत आड अशा उभ्या होत्या आणि आजी-बाई डाव्या बाजूस खोली होती तेथें दार लावून बसल्या होत्या. राधाबाई नजरेस पडतांच दादासाहेबांनीं पुनः एकदां पहिलें नाटकी भाषण मोठ्यानें सुरू केलें. " तुह्मी मला ' आपला कोणी नाहीं ' असं कां समजतां ? तुह्मीच असं समजूं लागलां, तर मग ह्मणायचं तरी काय ? असा आम्ही अपराध तरी काय केला ? एक तर तुह्मीच आतां मला व-डील, तुह्मीं घरांत राहून सगळा संसार हांकायचा, तें सोडून देऊन इथें आलांत. बरं बोआ आलांत तर आलांत, इथें कायन् तिथें काय, दोन्ही घरं तुमचींच आहेत. जिथें रहाल तिथें तुह्मी मुखत्यार. पण अण्णांची इतकी प्रकृति बिघडली असतांना, मला नुसतं कळवूं सुद्धां नये ? बरं प्रकृति अगदीं एकाएकीं बिघडली असेल मी म्हणतों, पण काळ झाला तरी सुद्धां मला कळवूं नये ? मी का अगदीं नाहींच का कोणी त्यांचा ? मला तिऱ्हा-इतांनीं विचारावं आणखी मग मी बाहेरून बाहेरून शोध काढून यावं ? तुम्ही वडी-लच आहां ! तुम्हांला काय आम्ही ह्मणायचं आहे ? मी तर ज्याला त्याला असं सांगतों, कीं बोआ ' आमची आई सावत्र खरी, पण इतर सावत्र आयांसारखी नाहीं, आणखी मी तर तिला मुळींच सावत्र समजत नाहीं. ' असं असून तुह्मी मला असं लेखतां ? बरं बोआ. पण मी कांहीं तुमच्याशीं परक्यासारखं वागणार नाहीं. मी अगदीं तुमच्या सख्या मुला-प्रमाणें वागणार. तुह्मी कसं पाहिजे तसं वागायला मुखत्यार आहां. बाबांच्याजवळ माझं अगदीं वचन गुंतलं आहे, कीं मी कोणाचीही प्रतारणा करणार नाहीं. त्या वचनाला कांहीं मी माघार घेणार नाहीं. पण अण्णांना झालं तरी काय ? आज चवदा्न् चार अठरा दिवस झाले, आ-णखी मला...बरं पण आतां जें झालं गेलं त्याबद्दल वृथा बोलण्यांत काय तात्पर्य आहे पण बोलल्यावांचून रहावेना. अण्णा ह्मणजे माझे सख्ये आजोबा नाहींत असं मीं कांहीं त्यांना लेखलं नाहीं, आणखी त्यांनींही पण मला तसं लेखलं नाहीं. ते ते दिवशीं चांगले माझ्या-कडे आले, आपण घर सोडून गेलां हें चांगलं झालं नाहीं, असं मीं त्यांना ह्मटलं, त्यांनीं तें कबूल केलं. बाबांनीं कांहीं कागद लिहून ठेवलेला त्यांना मीं वाचायला दिला, त्यांनीं वाचला. नक्कल करून दे ह्मणाले, मीं म्हटलं, मूळ काग-दच कां न्याना ? नको म्हणाले. मूळ कागद तुझ्याचजवळ ठेव. नक्कल असली ह्मणजे मला पुरे. त्या कागदाचा विचार करण्याकरितां दोन दिवसांनीं पुनः येतों ह्मणाले. आणखी दोन दिवस झाले, चार दिवस झाले आले नाहींत. मी म्हटलं नसतील आले दुसऱ्या कांहीं कामांत गुंतले असतील. कांहीं गांवावर देवदेवीचीं प्रकरणं निघालीं होतीं; झालं, तो आपल्या बाबांचा स्नेही साहेब नाहीं का—तिकडे बाबा **झणझणपूर**च्या नबाबाच्यीं पदरीं होते तिकडला तो **बुली—स्नीक**साहेब नाहीं का,—तो विलायतेहून परत आला तेव्हां मुंबईस त्याला भेटायलाही गेलों होतों. ह्मटलं आतां उगीच बसण्यांत काय अर्थ आहे ? त्याला भेटून कांहीं चाकरीचं जुळलं तर पहावं. त्यामुळें कांहीं इकडे येणं झालं नाहीं, शोध घ्यायला झालं नाहीं दुसरं काय ? पण तुमच्या-कडून कांहीं निरोप आला नाहीं, तेव्हां

काय म्हणावं ? बरं आतां झालं तें झालं. आतां अण्णा गेले. छे छे; म्हातारा असता, तर मला किती तरी उपयोग झाला असता. **बुली-स्नीक**साहेबानें मला वचन दिलं आहेन् कीं तुला चांगली जागा देतों एखाद्या आपल्या ताब्यांतल्या संस्थानांत. त्यानं तसं वचन दिल्याबरोबर मीं आपल्या मनांत असा विचार केला होता कीं, इकडलं हें देववेवीचन् घरादारांचं सगळं खटलं अण्णांच्या गळ्यांत घालून द्यावं. इकडल्या उत्पन्नांत तुमचं सगळ्यांचं उत्तम तऱ्हेनें भागलं असतं. आणखी आपण तिकडें **झणझणपुरा**ला, किंवा **खूपखाबादे**ला जाऊन कांहीं तरी मोठ्या दर्जाची नोकरी बघावी. **स्नीक**-साहेब ह्मणजे आजकाल तिकडे राजा आहे. त्याचा लोभ बाबांवर किती तरी होता, आणखी तो मलाही पण विसरला नाहीं. नांव सांगतांच ओळखून हात हालवून सगळ्या मंडळीची चवकशी करून, तें कांहीं विचारूं नका.........”

राधाबाईला वाटलें, कीं आतां याचें चऱ्हाट कांहीं संपत नाहीं. ती बिचारी डोळ्यांतून अश्रु गाळीत, तो बोलत होता तें ऐकत होती. मग त्याची त्यालाच लाज वाटून तोच थांबला, आणखीः—“ पण आतां काय त्यांचं ? आतां कांहीं मला तिकडे जातां येत नाहीं. आतां इथेंच राह्यलं पाहिजे. या पोरांच्या शिकण्याकडे पाह्यलं पाहिजे. पोरींचीं लग्नं केलीं पाहिजेत. अण्णा असते, तर गोष्ट निराळी होती. आतां तुह्मी जरी मला दूर लोटलं तरी मला दूर सरतां येत नाहीं. लोकापवादाची चाड एक बाळगली पाहिजे, आणखी मनांतलं प्रेम कुठें जातं आहे कीं काय किती केलं तरी ? कां मी ह्मणतों हें खरं का नाहीं ? तुह्मी तिच्या बोलण्यावर जाऊं नका हो ! तिचा स्वभावच तसला. तुह्मी घरांतून निघून आल्यापासून मीं घरांत भाषणच सोडलं आहे. रोज उठून भांडणंन् तंटे कुठें करीत बसावं ? छे. छे. तुह्मी घरांतून निघून आलांत त्याच्याबद्दल मला अजून वाईट वाटतं आहे. पण करूं काय ? तुह्मी अजून परत याल तर पहा. माझ्याकडून चूक झाली असली, पदर पसरतों, माफ करा. आतां तिच्याबद्दल ह्मणाल, तर तिला आपली वेडी म्हणून सोडून देऊं. तिला काय वाटेल तें बोलूं द्यावंन् करूं द्यावं; तिकडे लक्ष्यच देऊं नये झालं. काय ? येतां का ? मला पोराबाळांत नेहमीं रहाण्याची संवय झालेली, तें आतांशा कसंसंच चुकल्याचुकल्यासारखं होतं. तरी आतांशा कागदपत्रांचं एक काम आहे म्हणून बरं. काय ? तुह्मी अगदींच बोलत नाहीं ? ”

इतकें बोलून तो थांबला. जणूं काय थोडा वेळ त्यानें त्यांच्याकडून उत्तर येतें कीं काय याची वाटच पाहिली, आणखी लागलीच पुढें गाडी चालवून म्हणतो, “ तें कांहीं नाहीं. मी कांहीं आतां ऐकायचा नाहीं. तुम्ही आतां परत घरीं चला. हें घर देऊं भाड्यानं लावून. काय करायचं आहे ठेवून ? भाडेचिठ्ठ्या कोणाच्या अण्णांच्याच नांवच्या असतील वाटतं. पण घर गहाण आहे वाटतं आपल्याकडे. परवां कागद चाळीत होतों त्यांत सहज गहाणखत पाहिलं या घराचं म्हणून म्हणतों. काय गहाण आहे का खरेदी आहे मीं पाहिलंय् नाहीं पुरतं. म्हटलं काय पहायचं आहे आपल्या आपल्यांतच, मग चलतांना ? तुम्ही, आजी सगळी मंडळी चला. आजींना सुद्धां कांहीं संकोच नको वाटायला. त्या आहेत कुठें ? ”

आजी नातवाचें हें सर्व भाषण आपल्या खोलींतून ऐकतच होत्या आणि त्यांच्या तळपायाची आग मस्तकाला गेली होती. पण ती अशा स्थितींत होती, कीं त्या स्थितींत नातवापुढें सुद्धां जाऊं नये असें तिला वाटून तिनें आपला सर्व संताप गिळून टाकला. हजारों, लाखों शिव्या त्याला द्याव्या असें तिला वाटलें. तिच्या अगदीं जिभेवर शिव्या आल्या, पण तिनें तशा त्या दाबून ठेवल्या. बोलली नाहीं. त्याचा मानभावी कावा तिच्या पूर्णपणें लक्ष्यांत आला. शेवटीं वराच्या संबंधानें त्यानें हळूच सोडलेली फुसकुली किती अर्थपूर्ण आणि किती दूरवर लक्ष्य देऊन त्यानें सोडली हेंही ती जाणून होती. परंतु कांहीं बोलली नाहीं. बोलण्याची ती वेळ नव्हती असें तिला वाटलें. राधाबाई तर कांहींच बोलली नाहीं. त्याचा एकंदर कांहीं कावा असावा इतकाच तिचा समज. तो कावा इतका अगदीं खोल असेल असें तिला वाटलें नाहीं. आणि सगळेंच त्यांचें बोलणें केवळ मानभावीपणाचें असेल असेंही तिला वाटलें नाहीं. तिला नेहमीं असें वाटे कीं, तो आपल्या बायकोच्या तडाक्यांत नसला म्हणजे अगदीं सरळ असतो. सर्व काय बिघडतें तें बायकोमुळें. तिचा समज अंशतः खरा होता. परंतु ती त्यास जितका सरळ समजे तितका तो सरळ मात्र नसे. बायको ही त्याची पूरणिका होती.

थोडा वेळ थांबून पुनः त्यानें राधाबाईस म्हटलें: “ मग काय ? येतांना ? तुम्ही बोलत कां नाहीं ? असं नका करूं बोआ. आल्या वेळापासून मी एकटा बोलतों आहें. चला. चला परत. माझं ऐका. नका मला सोडूं. मी सगळी तुमची सख्ख्या मुलाप्रमाणें व्यवस्था ठेवीन, सगळं कांहीं करीन. मला कांहींच का अब्रूची चाड नाहीं ? माझ्याशीं बोलायला कांहीं हरकत नाहीं. बरं नसलां आज बोलत तर माझा आग्रह नाहीं. तुम्ही विचार करा. उद्यां मी येईन. ”

इतकें म्हणून त्यानें आणखी कांहीं दुसऱ्या गोष्टी काढल्या, आणि थोड्या वेळानें आजच्यापुरतें नाटक चांगलें झालें असें समजूनच काय, ‘ स्वारी उद्यां येतों ’ म्हणून निघून गेली.

# प्रकरण ६ वें.

## राधाबाईची दुर्दशा.

ते दिवशीं चिंतोपंताच्या नाटकाचा कायतो एकच अंक झाला. त्यावर दोन तीन दिवस गेले. मध्यंतरीं चिंतोपंताच्या वागणुकीबद्दल मायलेकींचा थोडाबहुत वाद झाला. राधाबाईच्या आईचें ह्मणणें, कीं चिंतोपंत अतोनात दुष्ट मनुष्य आहे; आणि राधाबाईचें म्हणणें, कीं तो तितका कांहीं दुष्ट नाहीं. परंतु त्या दोन तीन दिवसांत जे कांहीं प्रकार झाले त्यामुळें राधाबाईचें मत थोडें डळमळूं लागलें. चिंतोपंतानें अण्णासाहेबांच्या घरांतील प्रत्येक भाडेकऱ्याला हळूहळू बोलावून घेऊन भाडेचिठ्ठ्या आपल्या नांवानें करून देण्याविषयीं सांगितलें. प्रत्येकाच्या जवळ अण्णासाहेबांच्या मृत्यूबद्दल हळहळ दाखविली, मुलांबद्दल कळकळ दाखविली आणि त्या घराचें सर्व भाडें त्यांच्याच उपयोगी पडावयाचें, त्यांना कोणत्याही प्रकारानें त्रास पोंचूं नये म्हणून मी हें सर्व करीत आहें असा बहाणा केला. अण्णा होते तोंपर्यंतची गोष्ट फार निराळी. आतां सर्व कारभार नीट केला पाहिजे असें म्हणून त्यानें भाडेचिठ्ठ्या ताबडतोब आपले नांवानें करून मागितल्या. अण्णासाहेबांनीं आजपर्यंत कधीं भाडेचिठ्ठ्या घेतल्या नसून आतां हे भाडेचिठ्ठ्या मागतात, याबद्दल त्या भाडेकरी मंडळीस फार आश्चर्य वाटलें; पण करणार काय ? चिंतोपंतानें " घर वस्तुतः आपल्या ताब्यांत आहे. अण्णासाहेबांनीं भाडेचिठ्ठ्या घेतल्या नाहींत हें त्यांचें त्यांना बरें दिसलें असेल. आम्हांला तसें करतां येत नाहीं. तुम्हीं भाडें कोणालाहीं द्या, पण भाडेचिठ्ठी माझे नांवची झाली पाहिजे. " असें निक्षून सांगितल्यावर ते तरी बिचारे काय करतात ? एकट्या विश्वनाथपंताखेरीज ( राधाबाईच्या उपयोगी पडलेला गृहस्थ ) दुसऱ्या सगळ्यांनीं भाडेचिठ्ठ्या देण्याचें कबूल केलें आणि एक दोघांनीं दिल्याही. विश्वनाथपंतानें मात्र त्याची थोडीबहुत फजिती केली, परंतु चिंतोपंत अस्सल मिस्कील. तो याला जुमानतो ! हा गृहस्थ आपल्याला जाचेल हें थोडक्यांतच पण पक्कें जाणून त्यानें त्यास पंधरा दिवसांच्या आंत त्याचेकडे असलेली जागा खालीं करून जाण्याविषयीं नोटिस दिली. मधल्या तीन दिवसांतच हा प्रकार झाला व भाडेकऱ्यांकडून त्याबद्दल बातम्याही राधाबाई व तिची आई यांचेकडे आल्या. मग काय विचारतां ? राधाबाईला अतोनात वाईट वाटलें व तिच्या आईच्या अंगाचा तर संताप झाला. तिनें विश्वनाथपंताला बोलावून आणून ( त्याच्या नजरेस पडण्याच्या अगर बोलण्याच्या

स्थितींत ती सध्यां नव्हती तरी ) याचा कांहीं प्रतिबंध होणार नाहीं काय, म्हणून विचारलें व तुमची मालकी शाबीत नाहीं तर कायद्याच्या दृष्टीनें कांहीं होणार नाहीं असें सांगितल्यावर तिनें कायद्यालाही चिंतोपंताबरोबर यथास्थित शिव्या दिल्या. राधाबाई बिचारी कांहीं एक बोलली नाहीं. चवथे दिवशीं चिंतोपंत-दादांची स्वारी पुनः आली आणि त्यांनीं पुनः आपल्या नाटकाच्या दुसऱ्या अंकास सुरुवात केली.

"कसं काय ? ठरलंना घरीं यायचं ? मला कांहीं बोआ तुह्मी सगळ्या मुलांना घेऊन परत घरीं आल्याखेरीज बरं वाटायचं नाहीं. अगदीं आजींनासुद्धां घेऊन चला. बाबा असतांना जसं घर भरलेलं असे, तसं भरलेलं दिसलं पाहिजे. हें घर सबंदच्या सबंद भाड्यानं देऊं, म्हणजे चांगले वीस बावीस रुपये येतील, ते कां बुडवावे ? हो, तुह्मी इकडे, मी तिकडे. आणखी माझं घरांत तर क्षणभर जुळेनासं झालं आहे. आपल्या तुम्ही आलां, म्हणजे तें ठीक जुळेल. तिच्या कोणी नादींच लागायला नको. चला मीं एक या घराला चांगला श्रीमंत भाडेकरी पाहून सुद्धां ठेवला आहे. तुह्मी तिकडे आलांत, कीं त्यांना इकडे यायला सांगतों. ते आज तीस रुपये सुद्धां भाडं देतील. बोला. आतां उगीच विचार नका करीत बसूं. या घरांत तुह्मी आतां राहणं ह्मणजे विनाकारण माझ्या—आपल्या—भाड्याचं नुकसान करणं आहे. तर तसं करूं नका. चला. एका ठिकाणीं आपण असण्यांतच मौज आहे. जें काय मागं झालं असेल तें विसरा. चलतांना ? ":

राधाबाईला काय बोलावं हें मुळींच समजेना. तथापि ती ह्मणते: " नको. आतां आह्मी इथें आहोंत सध्यां, तीं बरीं आहोंत. आईला कांहीं इतक्यांत घर सोडून येतां यायचं नाहीं. आणखी मलाही पण...सध्यां इथें आहे तें ठीक आहे झालं. "

तें ऐकून तो आपल्याशींच डोळे मिचकावून ह्मणतो: " अं: ! यांत काय अर्थ आहे ! तुम्ही नाहीं का घर सोडून आलां ! तशा त्या येतील. त्यांत कांहीं मला मोठंसं नवल वाटत नाहीं, मी रात्रीं गाडी पाठवून देतों. रात्रीं निघून यावं ह्मणजे झालं. काय ? मी ह्मणतों हें खरं का खोटं ? माझ्या तंत्रानें आतां आपण वागलां, तर कांहीं वावगं होणार नाहीं. येऊन जाऊन तिचा तुह्मांला धाक वाटतोना ? मला चार दोन महिन्यांत **खूपरखाबादेला बुलीस्नीक**—साहेबांच्या मार्फत कांहीं तरी चांगल्या हुद्याची असामी मिळणार. तेव्हां इथें कोण राहणार आहे ? मी न ती दोघंही जाऊं. मग घरांत तुह्मीच. पण थोडक्याकरितां घरांत फूट दाखवूं नका. बाबांनीं अगदीं वेड्यासारखं मृत्युपत्र केलेलं असून मी इतका झटून पडतों आहें तेव्हां खरोखर माझं अंतःकरण किती कळवळत असेल याची कल्पना करा. मला स्वप्नांत सुद्धां वाटलं नाहीं, कीं बाबा ह्मणजे असं वेड्यासारखं कांहीं लिहितील. मला वाटतं, त्यांना शेवटीं शेवटीं कांहीं तरी भ्रांति झाली असावी. तुमच्यादेखत मुलांबाळांना, तुम्हांला कसं पण गोड गोड बोलत, पण तुम्ही नसलां, कीं मग झालं. मग अशा कांहीं शिव्या—तेंच तें. भ्रांतिच कांहीं तरी झालेली. दुसरं कांहीं नाहीं. मी तें त्यांचं मृत्युपत्र फाडूनच टाकणार आहें. असला कागद अस्तित्वांत सुद्धां असूं नये. खरं, माझ्यापासून अण्णांनीं

नक्कल करून घेतली होती. मी त्यांना म्हणत होतों कीं तुम्ही मूळच घेऊन जाळून टाका. पण ते म्हणाले, मला त्या कागदाचं दर्शनसुद्धां नको. पण ती नक्कल कुठें आहे ? ती इकडे तिकडे जाऊं देतां उपयोगी नाहीं. फार महत्वाची आहे हो ! आपलीच बेअब्रू आपणच केल्याचं नशिबीं यायचं, दुसरं काय ? पण मला राहून राहून आश्चर्य वाटतं, कीं मरतेवेळीं तुह्मांला काय सांगितलं, मला काय सांगितलं; माझ्याकडून शपथा काय वाहून घेतल्या ! कागद काय माझ्याजवळ दिला, आणखी शेवटीं आंत पाहावं तों भयंकरच. तें मी म्हणतों तेंच खरं. त्यांना भ्रांति झालेली. दुसरं कांहीं नाहीं. भ्रांतींत जें ज्या वेळीं कांहीं आलं तें झालं म्हणायचं. ''

राधाबाईला अद्यापि त्या मृत्युपत्रांतील मजकुराचें कांहींच समजलेलें नव्हतें हे वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. त्यामुळें या स्वारीचें तें सर्व बोलणें तिला मोठ्या गूढ अशा कूटाप्रमाणेंच झालें. ती तें सर्व ऐकत अगदीं स्तब्ध बसली होती. मृत्युपत्रांत असें भ्रांतिवटासारखें लिहिलें आहे तरी काय ! तें मृत्युपत्र कोणाच्या नजरेस पडलें, तर आपलीच अब्रू जायची असें हा म्हणतो याचा अर्थ काय ? इतकी अब्रू जाण्यासारखें विलक्षण त्यांत काय आहे ? तिलासुद्धां तर्क होईना आणि मन अस्वस्थ मात्र फार झालें. पण काय करणार ? असें त्या मृत्युपत्रांत आहे तरी काय ? हें विचारण्याचा कांहीं तिला धीर होईना. एकदां तिला असें वाटे, कीं सगळें कांहीं आपल्या व आपल्या मुलांच्या नांवानें करून याच्या नांवानें फारच थोडें ठेवलें असेल, म्हणून हा असें बोलत असेल, परंतु ती कल्पना तिला बरोबर वाटेना. कारण तसें काहीं असतें, तर कधीं झटल्या कधींही हा इतक्या गोडीगुलाबीनें आपल्याशीं वागताना. पुनः तिच्या मनांत आलें, कीं मृत्युपत्रांत तसेंच कांहीं असेल, म्हणून हा अशा तऱ्हेनें वागून बोलून आपली मनधरणी करीत आहे. याच्या मनांत आपल्याला फसवून कांहीं तरी लबाडी करावयाची आहे.

राधाबाईच्या मनांत हे विचार चालले असतां चिंतोपंतदादांनीं आपल्या धाकट्या भावाला ' बाळ, अण्णांचे कागदपत्र कुठें आहेत तो रुमाल आण बरं. त्यांत ती नक्कल ठेवली आहे का पाहूं.' असें सांगितलें. परंतु ' बाळ ' आलाही नाहीं आणि त्यानें ' ओ ' ही दिली नाहीं. राधाबाईला त्यानें पुनः बजावलें, कीं तो कागद दुसऱ्याच्या नजरेस पाडण्याजोगा नाहीं. करितां तो शोधून मजजवळ द्या अण्णांनीं आपल्या दप्तरांतच कुठें तरी पेटीबिटींत ठेवला असेल. ते इकडे तिकडे टाकणार नाहींत. त्यांना त्यांतली सगळी माहिती होती. आतांच्या आतां शोधून आणलात, तर फारच चांगलं. मी लागलीच फाडून टाकतों. राधाबाईलाही त्या कागदाबद्दल आतां अतोनात जिज्ञासा झाली. तेव्हां ती ताबडतोब शोधून आणून कसचा देते ! " मी मग पाहून ठेवीन आणखी तुझ्याजवळ देईन " असें तिनें उत्तर दिलें.

मृत्युपत्राबद्दल मग तितकेंच राहून चिंतोपंतानें पुनः घरीं चलण्याविषयीं आग्रह चालविला. तेव्हां " पाहूं आतां " असें तिनें उत्तर दिलं. त्याबरोबर चिंतोपंतांच्या मनांत एकदम असें आलें, कीं हा आपला आग्रह फार झाला कीं काय कोण जाणें. कदाचित् झाला

असला, आणि त्याचा परिणाम यांच्या मनांत त्याप्रमाणें करावें असें आलें, तर भलतेंच होईल. तेव्हां त्यावर थोडेंबहुत विरजण पाडून ठेवल्याखेरीज जाऊं नये. असें मनांत येऊन तो लागलीच म्हणतो, " तुमच्या मर्जीविरुद्ध तुह्मीं करावं— केवळ मी ह्मणतों म्हणून, असं माझं मुळींच ह्मणणं नाहीं हो ! तुमची मर्जी नसली तर तुह्मी बिलकुल येऊं नका. इथें काय अन् तिथें काय मला सारखंच. मी दिवसांतून चारदांसुद्धां येईन इथें तुमच्या समाचाराला. आपल्या आळांत तिकडे तर बरं होईल. इतकंच माझं ह्मणणं. दुसरं कांहीं नाहीं. बरं इथें जरी राहण्याचा विचार झाला, तरी आतां इतकी कांहीं जागा तुमच्याकडे नको. माडीबिडी सोडा. अण्णांच्या वेळची गोष्ट निराळी होती. आतां माड्यांत बसणार कोण ? तुह्मी दोघी कोंपऱ्यांत, मुलं तीं तुमच्याच जवळ, वरच्या दोन्ही माड्या आणखी खालचं हें माजघर सोपान् स्वयंपाकघर इतकी जागान् हा चौक इतकी जागा दिली, तर सहज आठ दहा रुपये भाडं येईल. अन् आयता एक गृहस्थ मला विचारतोच आहे जागेसाठीं. अगदीं घायकुतीला आला आहे तो. परवांच्या दिवसाला त्याला सांगितलं आहे मी देतों ह्मणून. उद्यां—नाहीं तर आतां घरीं गेल्याबरोबर त्यांना कांहीं काम नसलं, तर आतां—दोघंतिघंय् गडी लावून देतों. त्यांच्याकडून सगळी जागा करा रिकामी आणखी मागल्या ज्या गोमुखीसारख्या दोनन् शेजारची एक अशा खोल्या आहेत त्या तुह्मांला आठ माणसांना अगदीं रगड झाल्या. हे आठ आणखी आजपर्यंत येताहेत ते पंधरा, मिळून तेवीस रुपये भाडं कांहीं कमी नाहीं. अगदीं सुखानं राहाल. खरंच, कराहो जागा रिकामी. त्या आमच्या स्नेह्याचं अगदीं जागेवांचून नडलं आहे, आणखी तुह्मांला जागा नको आहे. पोरंबाळं उगीच जागेची घाण बरीक करतील झालं, दुसरं काय ? गडी देतों अं पाठवून. मी एक दोन दिवसांनीं पुनः येईनच तुमचा तिकडे येण्याचा काय विचार होतो तो पाहायला. "

असें ह्मणून स्वारी तावडतोब निघून चालती झाली. आज बरीच शिताफी करून आपण आपला डाव साधला असें आपल्या मनाशींच समाधान मानीत गालांतल्या गालांत हंसत घरीं गेली. चिंतोपंताला समाधान मानण्याला आणखी एक कारण हें होतें, कीं जागा रिकामी करण्याची शेवटली व्यवस्था त्याच्या बायकोनें सुचविली होती व आज जाल तेव्हां हें केल्याखेरीज येऊं नका असें बजावलें होतें. नाहीं तर चिंतोपंताला अण्णांच्या घराची इतकी अगदीं अंतर्बाह्य माहिती कुठली ? सरस्वतीबाईनें अगदीं नेमक्या सर्व खोल्या आणि सर्व कांहीं व्यवस्था सांगून दिली व या याप्रमाणें कराच म्हणून तिनें आग्रहपूर्वक बजाविलें. चिंतोपंताला असें वाटत होतें, कीं हें सर्व बोलणें आपल्यास केवळ अशक्य होय; परंतु तें अशक्यही आज आपण मोठ्या शिताफीनें साधलें. आतां काय ? असें वाटून त्याला समाधान झालें. त्यानें घरीं आल्यावर आपल्या कावेबाजपणाच्या बोलण्याची फुशारकी अशी सांगितली कीं वा ! " गडी असले तर पाठवून देतों इथपर्यंत बोलून आलों आहें. पण आतांच लागलीच गडी पाठवूं नको हो ! " असें मात्र त्यानें सांगितलें. मग काय विचारतां ? " आत्तां पाठव-

णार. मी ऐकतें आहें ! करायच्या आहेत काय माडच्या ! माड्यांत खुर्च्यांवर बसून रस्त्यांतल्या लोकांकडे टकमका पहायचेन् नटायमुरडायचे दिवस गेले म्हणावं आतां ? काय, काय, काय जें केलं आहे ! हातावर पाणी पडलं, कीं वर येऊन माडीवर बसायचं मामंजीपाशीं खुर्चीला खुर्ची लावून; मेली दिवसाढवळ्या लाजय् वाटत नसे. आणखी आम्हीं खालीं यांच्या बटकीसारखं राबावं ! आतां द्या म्हणावं माडच्या. तें कांहीं नाहीं. मी आत्तां गडी पाठवून देणार. त्यांना कळलं पाहिजे, कीं सांगितलं तें कांहीं उगीच नाहीं. अहो त्यांचं काय जातं आहे माड्यान्‌बिड्या रिकाम्या ठेवायला. खुशाल ठेवतील. डोक्यावर छप्पर नाहीं का ठेवलं, मग माड्यांत, अगदीं खिडकींत खुर्च्या टाकून पहिल्यासारख्या बसायला कमी करतील का काय म्हणतां ? छे छे. नांवसुद्धां नका काढूं. कोण आहेरे तिकडे ? गणू, भाग्या, यारे इकडे. अण्णांच्या वरीं जा आणखी कोणत्या म्हणावं माडच्या रिकाम्या करायला सांगितलं आहे त्या दाखवा. त्या नाहीं होय म्हणतील, तर ऐकूं नका. जाऊन वरच्या पुढच्या माडींतलं, आणखी त्यालाच लागून आडवी आहे तिच्यांतलंही सगळं सामान काढून खालीं मागल्या चौकांत गोमुखीसारख्या खोल्या नाहींत का ? त्यांत भरा. आणखी मग सकाळीं सैंपाकघर, माजघर आणखी सोपा रिकामा करा. उद्यां सकाळीं म्हणावं बिऱ्हाड येणार. जा. जा. चालते व्हा. माझं तोंड पाहात उभे राहूं नका जा. आणखी मला येऊन सांगा काय केलं आहांत तें. चला. '' असा हुकूम सुटला.

सुटला. कुंपिणी महाराणीसरकारचा हुकूम सुटला. मग काय विचारतां ? लागलीच गण्या, भाग्या निघाले. यजमानीण कोण्या प्रकारची अवदसा आहे, हे त्यांना पक्कं ठाऊक. तेव्हां काय करतात बिचारे !

एकंदर झाल्या प्रकारावर व विशेषतः मृत्युपत्राच्या संबंधांत चिंतोपंतांचें जें बोलणें झालें, त्यावर बिचारी राधाबाई विचारच करीत होती आणि शेवटल्या बोलण्यांतील अररावीपणामुळें झालेल्या आश्चर्यांतून अद्यापि पुरती बाहेर निघाली नसल्यामुळें जागच्या जागीं स्तब्धावली होती. जागची उठली सुद्धां नव्हती, तोंच गडी येऊन त्यांनीं सरस्वतीबाईची आज्ञा निवेदन केली. राधाबाई खरोखरीच नुसती थक्क झाली. त्या घरांतून आपल्याला घालवलें तर घालवलें, परंतु याही घरावर ती अवदसा ताबा चालवूं लागली हें पाहातांच तिला किती दुःख झालें असेल याची कल्पना सुद्धां कोणास होणें शक्य नाहीं. ती त्या गड्याकडे नुसती पाहात बसली. हेच गडी पूर्वी तिच्यापुढें हात जोडून उभे असत आणि आज त्यांनाच तिच्या मर्जीविरुद्ध काम करण्याची पाळी आली. यामुळें ते वरमले व " बाईसाहेब आह्मी हुकुमाचे नोकर. त्यांनीं लावून दिलं, आलों, तुह्मी नको म्हणत असलां, परत जातों. '' असें भाग्या ह्मणाला.

राधाबाई कांहीं एक बोलली नाहीं. तिच्या डोळ्यांतून वळवळा पाणी वाहूं लागलें आणि तें पाहून दोघे गडीसुद्धां कळवळले.

मध्येंच राधाबाईनें ' कोणरे इतका निकडीचा भाडेकरी पाहिला आहे ?' असें विचारलें. त्याबरोबर एक गडी म्हणतो:

" अब त्येंचाच मावसभाऊ हये वाटतं. त्यो न्हाईका खुद कराचीकड का खुद व्हता ! त्यो आज दोन रोज पाव्हनाच आला हये बायकापोरास्नीं घ्येऊन. त्याच्या पायीं जागा रिकामी कराया सांगितलिया. "

" करा बाबांनो,–जा करा " इतकेंच राधाबाई सद्गदित कंठानें ह्मणाल्या.

राधाबाई काय म्हणते याची जणूं काय तिची आई वाटच पाहात होती. पण तिच्या तोंडून ते अगदीं निराशेचे " करा बाबांनो–जा करा " असे उद्गार निघ-तांच ती जी चवताळून बाहेर आली आहे ह्मणतां !

" उद्यां तुला भीक माग ह्मणून त्यांनीं सांगितलं तरी सुद्धां तूं ' मागतें बाबा ' म्हणून म्हणशील. करा बाबांनो–जा करा पाहातें कोण जातो आहे माझ्या माडीवर. तंगडीच टाकीन मोडून मेल्याची. ये म्हणावं मेल्या आतां पुनः माझ्या घरांत असलं कांहीं बोलायला ह्मणजे पहातें तुझं काय आहे तें. त्याला वाटलं, हे वारले, मी आतां कोंपऱ्यांत बसून राह्यलें. भांडा-यलान् तोंडाला तोंड द्यायला आहे कोण ? पण मला म्हातारीला कांहींच हरकत नाहीं. तूं आतां ये म्हणजे सांगतें. चालते व्हा मेल्यांनो. कोणाच्यारे माड्या रिकाम्या करतां ? व्हा चालते, होता का नाहीं ? का घालूं कांहीं तरी थोड-क्यांत तुमच्या ! "

गडी बिचारे काय करणार ? लाग-लींच तेथून चालते झाले. त्यांत गण्या म्हणून जो होता, तो पहिल्यापासूनच थोडासा सरस्वतीबाईच्या बाजूचा होता. त्यानें घरीं जातांच राधाबाईला व तिच्या आईला बरींच नांवें ठेवून एकंदर प्रकार असा तिखटमीठ लावून निवेदन केला, कीं सरस्वतीबाईच्या अंगाचा नुसता तिळपापड उडाला आणि ती ताब-डतोब उठली. " आत्तां. आत्तां. आज रात्रीं जाऊन जर त्या माड्यान् सैंपाक-घरन् माजघर रिकामं करीना, तर नांवाची सरस्वतीच नाहीं. इतक्या ? इतक्या उतल्या आहेत त्या ? तरी नवरे मरून उरावर हात आले आहेत. पण जातीच्याच तसल्या. चाललें. आत्ता जाणार. आत्तां म्हणावं दाखवतें तुझं घर का माझं घर. आत्तां नाहीं, मी ऐका-यची नाहीं. "

असें म्हणून ती उठलीच. नवऱ्याला तें तिचें जाणें बरोबर वाटलें नाहीं; पण त्याचें चालणार कुठलें ? आणि गण्यानें सांगितलेले कांहीं शब्द त्यालाही फार वाईट वाटले, तेव्हां होईल हा प्रकारही एका अर्थीं इष्टच आहे असें त्याला वाटून तो काय मौज होते त्या मौजेच्या आड येण्यास फारसा उत्सुक नव्हता. सरस्वती-बाई लागलींच गाडी जोडवून ( त्या संतापाच्या भरांतही ती कांहीं आपला दर्जा व थाट विसरली नाहीं. ) निघाली. ती तडक गड्यांना घेऊन माडी चढली आणि सामानाची उच-लासाचल तिनें चालविली. सामान नाजुक-साजुक, फुटेल–तुटेल, याचा विचार तिला मुळींच राहिला नाहीं. घर उचल, कीं गड्याच्या स्वाधीन कर, नाहीं तर जिन्यांतून खालीं फेंकून दे, हा कारभार तिनें चालवला. तिची मुख्य इच्छा ही, कीं आपल्या सासूनें व तिच्या आईनें आपल्याशीं भांडायला यावें आणि आपण आपल्या तोंडाचा पराक्रम एकदां त्यांना दाखवावा.

# प्रकरण ७ वें.

## अखेर निकाल.

आणि त्या तिच्या इच्छेप्रमाणें आलेच. तिची आजेसासू भांडण्याला आलीच. दोघींची कचाकची झालीच. वाड्यांतील तर काय पण शेजारपाजारची मंडळीही हा तमाशा काय चालला आहे हें पाहण्यास धांवत आली. राधाबाई बिचारी आपल्याकडून एकसारखी आपल्या आईला दाबीत होती आणि सुनेलाही पण दोन गोष्टी सौम्यपणें सांगत होती. पण द्रव्यमदानें उन्मत्त झालेली ती सून काय ऐकते ? तिनें " पुरे पुरे तुमचा मानभावीपणा. आजपर्यंत छळ छळ छळलंत, वर लूट लूट लुटून माहेर भरलंत आणखी आतां मोठ्या दिमाखाच्या गोष्टी सांगायला पुढें झाल्या आहेत. व्हा चालत्या व्हा. या घरांतून सुद्धां चालत्या व्हाल, तेव्हां माझ्या मनाला समाधान होईल. तुम्ही समजलां आहां काय ? हें घर मी तुम्हांला पचूं देईन का म्हणतां ? मी आहें नांवाची, मी आहें म्हटलं ! तुम्ही आपल्या अधिकाराच्या जोरांत जितकीं थेरं केलींत तितके आतां धिंडवडे काढीन. मलं मामंजींनीं स्वतः काय लिहून ठेवलं आहे याची तरी कांहीं लाज वाटून एव्हांना कुठें तरी विहिर पाहायची होती जीव द्यायला ! पण लाज असेल तर ना ! काढारे काढा सामान. सगळं काढून फेंकून द्या त्या गोमुखी खोल्या आहेत त्यांत. आणखी सगळी खालची वरची जागा रिकामी करा. तोंडाकडे काय पाहातां ? यांना ! यांना भितां ? अरे यांना भ्यायचे दिवस आतां गेले. आतां जन्मभर मलाच भ्यालं पाहिजे तुम्हांला ! समजलांत ? "

सरस्वतीच्या तोंडून वरील शब्द बाहेर पडत असतां राधाबाईच्या जिवाची काय स्थिति झाली असेल याची कल्पना करावी. तिला एकदम आपले पाय मोडल्याप्रमाणें झालें. आपल्या नवऱ्यानें असें लिहिलें आहे तरी काय ? आपण असें केलें आहे तरी काय ? याची तिला कांहीं कल्पना येईना. ती त्या वेळीं मुकाट्यानें खालीं जाऊन त्या गोमुखी खोल्यांपैकीं एकींत जाऊन बसली आणि आपल्याशींच रडूं लागली. तिचीं सर्व मुलें— ( थोरला मुलगा खेरीजकरून ) तिच्या सभोंवतीं जमलीं. त्यांस ' हा सर्व प्रकार आहे तरी काय ? ' असेंच होऊन गेलें असावें. थोरला मुलगा मात्र रागानें लाल होऊन विश्वनाथपंतांच्या खोलींत त्यांच्या समोर इकडून तिकडे फेऱ्या घालीत होता व विश्वनाथपंत त्याला आवरून आवरून धरीत होते.

इकडे सरस्वतीबाईनें आपण तेथें उभें राहून सर्व माड्या रिकाम्या करविल्या, तें सामान त्या गोमुखी खोल्यांतून कसें तरी अस्ताव्यस्त टाकविलें. " कसं थोडीचं

नाक ठेंचलं ! नवरा मेला आहे, अजून पुरते पंधरा दिवस सुद्धां झाले नाहींत तों पहा कशी बाहेर पडून तडफडते आहे. मायलेकी सारख्याच. " इतकें सगळें दुःखावर डागण्या दिल्याप्रमाणें बोलून स्वारी पुनः आपल्या गाडींत बसून चालती झाली. तिला आपण आज केवढें शतकृत्य केलें ! असें झालें. घरीं गेल्याबरोबर अगदीं आनंदानें हंसत हंसत जाऊन तिनें आपल्या भावाच्या देखत नवऱ्यास एकंदर कसें वर्णन करून सांगितलें कीं वा ! आणि चिंतोपंतही तें सर्व ऐकून खुद्द आपल्या मेहुण्याकडे डोळे मिचकावून " छे. छे. छे बोआ. तुमच्यापुढें शर्थ झाली. अशी बायको कांहीं कुठें पाहिली नाहीं. तिला धीर तो कसा नाहींच. हिला आतां जाऊन इतकं सगळं करण्याचं कांहीं तरी कारण ? धीर धरला असता तर ? "

" हो. हो. धीर धरला असता तऽऽर" सरूबाई नवऱ्यास वेडावून दाखवून ह्मणतात, " सगळं आजपर्यंत नासलं तें आपल्या धीरानंच तर नासलं. तें कांहीं नाहीं. आतां तें घराचे भाडं दिखील आपल्या इकडेच घ्यावं. अहो आहे काय ? काय कोचंन् खुर्च्यान् हंड्यान् झुंबरंन् ! कुठून हो हें इतकं सामान ? काय सामान! सगळं सगळं इथून वाहून नेलेलं सामान ! नाहीं तर कुठून आणलं हो यांनीं हें सामान ! होतं का कांहीं पहिलं ! या अण्णांचा बाप भिक्षुकी तर करीत होता. आई नेहमीं सांगते. आणखी यांनीं पुढें काय ध्वज लावले ते दिसतातच आहेत. सगळं आपलं घर लुटून जरी नेलं तरी आपला भोळ्या सांबाचा कारभार ! म्हणे धीर धरला असता तर ! गळ्याशीं आलं तरी धीर ! मेला धीर इतका आला तरी कोठून तो ? तें भाडं नाहीं हो त्यांना पचूं द्यायचं ! किती किती तरी पैसा त्यांनीं लुटून नेला आहे ! आपण यायचं होतं आज सामान बघायला. नुसतं मातच्यिा मोलानं सामान विकलं तर चार पांच हजार रुपये येतील. तें कांहीं नाहीं. मी तुह्मांला सांगतें. त्या कांहीं सुध्या मनानं त्या गोमुखी खोल्यांत राहायच्या नाहींत. त्यांना माड्यांत खुर्च्या टाकून बसायची संवय झालेली. त्या माडीचं वर भाड्यानं घेतल्याखेरीज राहायच्या नाहींत. अन् पैसा कांहीं कमी नाहीं. अगदीं तुम्ही कांहीं म्हणा, पण दहा हजारांपर्यंत कांहीं मरण नाहीं. तुम्ही कांहीं उगीच त्यांची कींव करूं नका. अन् विनाकारण आपलं भाडं बुडवूं नका. अहो, तीं माणसं अशीं सुध्या मनानं गरिबीनं राहणारीं नाहींत. मामंजीनीं तें स्पष्टपणानं लिहिलं आहे, म्हणूनच बरं आहे.यांच्या फिर्यादीन् अर्यादी लाजेमुळं तरी बंद होतील नाहीं तर या?अहो या फिर्यादीन् अर्यादी करून आपल्याला घराबाहेर घालवून भिक्षा मागायला लावायला कमी नाहीं करायच्या समजलांत ? झालं आहे तें अगदीं ठीक झालं आहे. "

सरूबाई बोलूं लागल्या आणि त्यांत हा विषय असला ह्मणजे मग कांहीं विचारूंच नये. त्यांच्या टकळीला थकवा कसा तो माहीतच नसावयाचा. आधण आलेल्या पाण्याप्रमाणें कडावर कड यावयाचे आणि तिकडे जों जों तसे कड यावयाचे तों तों चिंतोपंतास अशा गुदगुल्या व्हावयाच्या कीं वा ! आतांचें हें लांबलचक भाषण वर सांगितल्या ठिकाणीं थांबतांच चिंतोपंत पुनः आपल्या मेहुण्याकडे डोळे मिचकावून म्हणतात, " पाहिलंत नरसोपंत, आम्हांला रोज रोज असलीं हीं लेक्चरं मिळतात. व्यवहारज्ञानाची जर एखादी

परीक्षा असती तर ही त्यांत अगदीं फर्स्ट क्लासांत पास होऊन प्रोफेसरसुद्धां झाली असती ! बारिस्टरीच्या परीक्षेचा अभ्यास कर म्हणून मी म्हणतों आहें हिला. होईल कीं नाहीं उत्तम बारिस्टर ? ''

नरसोपंतानें तत्काळ होय म्हटलें आणि नवऱ्याच्या या विनोदानें अत्यंत खुष झालेली सरस्वतीबाईही मोठ्यानें पोटभर हंसून " खरंच, मी खरोखरीच जर पुरुष असतें तर अगदीं इकडचं जग तिकडे केलं असतं पण आतां काय त्याचं ? ..."

पतिपत्नी आणि मेहुणे यांचा वर सांगितल्याप्रमाणें संभाषणसमारंभ चालला असतां मध्येंच चेंड्यानें रडण्याचा कल्होळ केल्यामुळें त्यांत थोडासा विरस झाला. कारण सरूबाईस तान्हुल्याकडे धांव मारावी लागली.

इकडे राधाबाईच्या घरांत मात्र निराळाच प्रकार चालला होता. राधाबाई आपल्याशींच एकसारखी रडत होती. तिचीं लहान मुलें तिच्याभोंवतीं घिरट्या घालीत होतीं. एक पुढें बसे. एक मानेकडून विळखा घाली, एक गुडघ्याला धरून मांडीवर बसण्यासाठीं मांडी खालीं करी, असा प्रकार चालला होता आणि तिच्या मनांत• अनेक प्रकारचे अत्यंत खेदाचे विचार येत होते. डोळ्यांतून एकसारखे घळघळां अश्रू चालले होते. हा प्रकार इतका दुःखकारक होता कीं, तो पाहून कोणालाही अत्यंत दुःख झालें असतें. परंतु तिची आई, सरस्वतीनें घरांत येऊन केलेल्या धिंगाण्यानें संतापून इतकी बेफाम झाली होती, कीं तिला त्या वेळीं कशाचेंही भान राहिलें नाहीं. तीही आपल्या लेंकीला " अक्कल नाहीं. मी नको ह्मणत असतां त्या घरांतून निघून इथें आली. भिक्षाच मागायची तुझ्या नशिबीं आहे. दुसरं काय ? भिक्षाच माग. देवानं त्यांचे डोळे झांकलेन् तसे माझे कां नाहीं झांकायचे त्याच्या मनांत येत ? कारटीला सांगत होतें कीं नकोग, काय वाटेल तें जरी झालं तरी घर सोडूं नको. पण नाहीं. आली सोडून धांवत इथें. आणखी इथलय् वाटोळं करून टाकलंन् लवकर ! " असें रागाच्या भरांत बोलून गेली.

आपली आईही आपल्याला अशा तऱ्हेनें बोलते याबद्दल आणखी या शेवटल्या वाक्याबद्दल तर राधाबाईच्या जिवाला अतोनात खेद झाला. त्या घरांतून आपण निघालों याबद्दल तिला मुळींसुद्धां कधीं खेद झाला नाहीं, इतकेंच नव्हे तर याही घरांत आपल्याला राहणें आतां शक्य नाहीं. आपण दुसऱ्याच ठिकाणीं कोठें तरी बिऱ्हाड पाहिलें पाहिजे, हेंही ती जाणून होती. परंतु आपण या घरीं आल्यानें " याही घराचें वाटोळें केलें " हे शब्द आतां तिच्या आईनें उच्चारले, त्यांनीं तिला अगदीं मर्मस्थानीं घाय झाल्याप्रमाणें झालें. तिला इतकें वाईट वाटलें, कीं त्याक्षणीं आपण घराच्या बाहेर पडावें आणि दुसरीकडे जाऊन राहावें असें तिच्या मनांत आलें. परंतु तें किती ? एक क्षणभरच. ती जात्या अत्यंत शांत, धीराची, विचारी आणि सहनशील स्त्री. आपण एवढ्या तेवढ्यावरून रागावून संतापून गेलों, तर आपल्या आईला आणखी कोणी नाहीं. ती जें कांहीं बोलते तें केवळ आपल्याबद्दलच्या काळजीनें—अतिशय प्रेमानें—बोलते हें ती जाणत होती, आणि त्यामुळें तिनें आपला दुःखावेग आवरून धरिला. आईचें बोलणें एकसारखें चालूच होतें.

अशा तऱ्हेनें इकडे प्रकार चालला असतां तिकडे विश्वनाथपंताच्या घरांत

राधाबाईचा थोरला मुलगा फेऱ्या यालीत होता त्याचें वय फार नव्हतें परंतु इतक्या बेताचें होतें कीं, सध्या चाललेला प्रकार हा काय आहे, आणि याचें पुढें काय होणार ? हा विचार त्याच्या मनांत यावा. त्याचें आपल्या आईवर अतोनात प्रेम आणि त्या आईवर असा प्रसंग यावा यासारखें तर त्याच्या मनास कांहींच वाईट वाटलें नाहीं. तो अतिशय हुशार होता आणि अतिशय सरळ होता. आजपर्यंत त्याला कधीं तेढा शब्द, खोटें बोलणें किंवा वेडेंवाकडें बोलणें ठाऊक सुद्धां नाहीं. परंतु गेल्या महिन्या दोन महिन्यांत झालेला एकंदर प्रकार पाहून त्याच्या चिमुकल्या मनाला सर्व कांहीं असह्य झालें. नानाप्रकारचे अगदीं नवे असे विचार त्याच्या डोक्यांत वागूं लागले. त्यानें आजपर्यंत आपलें मन कोणाला सांगितलें नाहीं. कोणाजवळ आपले विचार बोलून दाखविले नाहींत. परंतु आज झालेल्या प्रकारानें त्याचें डोकें अगदीं फिरून गेलें. लहान वय होतें परंतु म्हातारें डोकें म्हणतात तें आज त्याचें झालें. ज्या ठिकाणीं या आपल्या भावाचा आणि भावजयीचा संबंध सुद्धां येणार नाहीं अशा ठिकाणीं जावें, असें त्याला वाटलें आणि आईला याचप्रमाणें सांगण्याचा त्यानें विचार केला. गेल्या थोड्या दिवसांत विश्वनाथपंताचें आणि त्याचें फार चांगलें जमलें होतें. विश्वनाथपंताचें त्याच्यावर फार प्रेम जडलें होतें आणि त्याच्याही मनांत विश्वनाथपंताबद्दल आदरयुक्त प्रेम उत्पन्न झालें होतें. तशांत त्या वेड्यानें अण्णासाहेबांचे अंथरुणाजवळून केव्हांच त्या मृत्युपत्राची नक्कल काढून घेतलेली त्याच्याजवळ आणून दिली होती, आणि ती आपण न वाचतां त्यानें विश्वनाथपंताजवळ नेऊन दिली. विश्वनाथपंतानें ती अद्यापि वाचली नव्हती तथापि कांहीं मार्गानें त्याच्या कानीं तींतील मजकूर आलेला होता.

त्या रात्रीं राधाबाईला यत्किंचितही झोंप लागली नाहीं. ती एकसारखा विचार करीत होती. विचार करतां करतां तिनें कांहीं एक निश्चय कायम केला. सकाळीं उठण्याबरोबर अण्णांनीं अंथरुणाखालीं घालून ठेवलेली मृत्युपत्राची नक्कल सांपडण्याविषयीं तिनें खटपट केली. ती विश्वनाथपंताजवळ गेली आहे हें तिला कळतांच खरें वाटलें. लागलीच तिनें त्याची गांठ घेतली, आणि सुमारें तास दीडतास बोलणें झालें. या बोलण्याचा विषय काय होता हें कोणासच कांहीं समजलें नाहीं. परंतु बोलणें संपून राधाबाई बाहेर आली तेव्हां तिचे डोळे रडून रडून तांबडे लाल झालेले होते, तिच्या हातांत तो कागद घट्ट धरलेला होता, आणि कांहीं तरी दृढनिश्चय झालेला असला व तो आपला निश्चय कोणाचें कांहींही न ऐकतां शेवटाला न्यायचाच असें पक्कें मन झालेलें असलें म्हणजे जशी चर्या होते. ओंठाशीं ओंठ मिटलेले असतात, कपाळ चढलेलें असतें, त्याप्रमाणेंच तिची चर्या झाली होती. ती आपल्या गोमुखींत गेली आणि तिनें आपल्या थोरल्या मुलाला एकीकडे बोलावून घेऊन अगदीं एका बाजूला म्हटलें: "अप्पा तूं आतां लहान नाहींस. आपल्यावर कसला प्रसंग आला आहे हें अगदीं पुरतेपणीं जरी तुला समजलं नाहीं, तरी थोडंबहुत समजलं असेलच. आजपर्यंतची सगळी श्रीमंती आतां विसरली पाहिजे. आजपर्यंतचा डामडौल तुला विसरला पाहिजे. आतां आपल्याला

अठराविश्वे दारिद्र्य आलं आहे. आपल्याला याही घरांत आतां राहायचं नाहीं, विश्वनाथपंत आपल्या स्वत:साठीं जागा पाहाणार आहेत तिथेंच आपल्यासाठींही दोन खोल्या पाहायला मीं सांगितलं आहे. मी हा निश्चय करितें आहें हा तुझ्या आजीला सुद्धां आवडायचा नाहीं, परंतु त्याला इलाज नाहीं. तिला नाहीं आवडला, तरी तो पार पाडणं अतिशय जरूर आहे. आतां लाज सोडून तसंच डोकं खुपसून या घरांत राहणं, अन् भांडाभांड्या करणं माझ्यानं होणार नाहीं. मागल्या जन्मीं कोणाचा ना कोणाचा तरी असाच घात केला असेल, म्हणून परमेश्वरानं माझा तरी घात करण्याचं मनांत आणलं असावं. हरकत नाहीं. पण जागा मिळतांच मी जाणार. आतां माझा आधार तूं....'' इतका वेळ अगदीं सांवरून सांवरून धरलेला धीर अगदीं खचून राधाबाई एकदम त्या पोराच्या गळ्यांत मिठी मारून रडूं लागली. ज्या पोरांना कधीं गरिबीचं वारंसुद्धां ठाऊक नाहीं, त्यांना एकदम एखाद्या भिकार खोलींत नेऊन संसार करूं लागण्याचा दुर्धर प्रसंग तिजवर ओढवला होता, त्याची कल्पना सुद्धां तिला दु:सह होऊं लागली. पण बिचारी करते काय !

तिचा धीर खचला तो क्षणमात्रच. कारण तिच्या मुलानें लागलीच ह्मटलें, ''आई, तूं या घरांतून निघण्याचा निश्चय केलास हें मला फार फार आवडलं. भिकार खोल्यांत तर काय, पण भिकार झोंपड्यांतून राहण्याची पाळी जरी आली, तरी दिखील पतकरली. पण आतां या घरांत एक क्षणभरसुद्धां नको. आई, दादा आणखी वहिनी यांचा जिथें संबंध सुद्धां यायचा नाहीं अशा ठिकाणीं आपण राहूं. मी आतां लहान नाहीं. मी लवकर चाकरी धरीन आणखी आपण संसार चालवूं, तूं अगदीं भिऊं नकोस. खरोखर तूं केलेला निश्चय ऐकून मला किती किती तरी आनंद झाला आहे. आई, आजीचं ऐकूं नको. ती आज नाहीं तर उद्यां आपल्याकडे येईल. पण आपण आतां इथें नको. तुझा वहिनीनं केलेला अपमान पाहून मला किती तरी वाईट वाटलं......छे. छे. आई ! ''

त्या वेळीं जर कोणी एक लाख रुपये राधाबाईच्या पुढें आणून ओतले असते, तरी सुद्धां तिला समाधान झालें नसतें इतकें समाधान या शब्दांनीं झालें. आणि तिनें आपल्या पोटाशीं त्याला धरून ह्मटलें, '' बाळा, कायरे हा प्रसंग आपल्यावर आला हा ! असं आपण कोणाचं काय केलं होतं ? या जन्मीं तर खास केलं नाहीं ! मागल्या जन्मींचं कांहीं असेल तर कोण जाणे !

सीताराम इतक्या लहान वयांत इतका शहाणपणानें वागेल असें तिला वाटलें नव्हतें. आपण सांगितलें ह्मणजे तो सारें कांहीं ऐकेल याबद्दल तिची खात्री होती. आणि त्या विश्वासावरच तिनें त्याला आपला घर सोडून जाण्याचा निश्चय सांगितला. पण जेव्हां त्याच्या तोंडून वरचे ते शब्द बाहेर पडले, तेव्हां तर त्या तशा दु:खाच्या स्थितींतही तिला अतिशय आनंद झाला ह्मटलें तरी शोभेल. ज्याला कांहीं सांगितलें असतां समजेल असा काय तो एकटा सीतारामच होता. सीतारामाहून दोन वर्षांहून लहान मुलगी वारी. तीही हुशार, परंतु अद्यापि तिला तितकें ज्ञान आहे असें आईला वाटूं लागलें नव्हतें. नंतरचे मुलगे सखाराम आणि सांवळ्याराम. हे दोन

दोन वर्षांच्या अंतराचे होते. पैकीं सखारामास आईचें ऐकावें एवढेंच कायतें कळत होतें आणि सांवळ्यारामास तेंही समजत नव्हतें. मनी तर अगदींच लहान. इतक्या मुलांना घेऊन आतां आपण ऐन-श्रीमंतींतून अगदीं भिकार स्थितींत जाऊन पडावयाचें आणि आईच्या शहाणपणामुळें हातीं राहिलेल्या चार पांच हजारांच्या दागिन्यांवर सगळा संसार करावयाचा. आपण, आपली आई, तो वेडा मुलगा, आपलीं पांच मुलें इतक्यांचा निर्वाह, मुलांचें शिकणें, मुलींचीं लग्नें आणि मध्यंतरीं येणारे अनेक अपरिहार्य खर्च, हे सर्व आतां त्या रकमेंत चालवून दिवस काढावयाचे, तें कसें होणार ? कसें होणार ? राधाबाईनें आपल्या मनास सांगितलें: " एवढेंही नसतें तर जसें झालें असतें, त्याच्यापेक्षां बरें होणार ! " पुढची एकंदर स्थिति मनांत आणून राधाबाईनें दुःख करण्यांत वेळ घालविला नाहीं. ज्या घरांत राहून आपल्याला कालच्या आजच्यासारखे अनेक प्रसंग येणार, त्या घराचा संपर्क नको, मग पुढें काय होणार असेल तें होवो असा निश्चय तिनें केला. हा निश्चय केला, त्या वेळीं तिला किती दुःख झालें असेल, तिच्या मनांत काय काय विचार आले असतील, आपण करतों हा निश्चय आपल्या हातून पार पडेल काय ? असा प्रश्न मनांत उभा राहून तिचें हृदय किती कचरलें असेल इत्यादि गोष्टी मनांत आणण्यांत कांहीं तात्पर्यच नाहीं. राधाबाई श्रीमंतींत वाढलेली, स्वतः गृहस्वामिणीप्रमाणें वागलेली, " अमुक खर्च कसा करूं ? " असा विचार सुद्धां तिच्या मनांत येण्याचा कधीं प्रसंग आलेला नाहीं. तेव्हां एकदम असा हा प्रसंग येतांच तिच्या मनांत ते सर्व प्रश्न उभे राहणें आणि त्यांमुळें अंतःकरण विव्हळ होणें अगदीं साहजिकच होतें, परंतु त्या दुःखद विचारांना तिनें जुमानलें नाहीं.

तिनें या वेळीं अतोनात दृढता धरली. चार दिवसांच्या आंत तिनें विश्वनाथपंताकडून दुसरी जागा पाहविली आणि आपलें बिऱ्हाड त्या जागीं नेवविलें. सरस्वतीबाईस हें कळण्याला फार उशीर लागला नाहीं, आणि तें कळण्याबरोबर तिला अत्यंत आनंद झाला. जन्माला येऊन आपलें आज सार्थक झालेसें तिला वाटलें. राधाबाईची आई मात्र कांहीं केल्या तेथून निघेना. लेंकीनें नानाप्रकारांनीं तिला सांगितलें, परंतु ती ऐकेना. सरस्वतीबाईला तेवढाच एक विषाचा कांटा राहिला. पण ती अशी वस्ताद कीं, तिनें तो उपटून टाकण्यासाठीं आकाशपाताळ एक करून शेवटीं तो उपटून टाकला. म्हातारीच्या जाण्यायेण्याच्या वाटा बंद केल्या. तिला पाणी मिळूं नये अशी तजवीज केली. तिला जितका म्हणून त्रास द्यावयाचा तितका दिला. तिचें सामान पंचवीस वेळां परसांत फेंकून दिलें. शेवटीं म्हातारी एक दिवस चुकून कोठें दाराच्या बाहेर गेली असतां दाराला कुलूप ठोकून तिचें सामान तिला मिळूं नयेसें केलें. इतका प्रकार झाल्यावर ती काय करणार ? लेंकीकडे निघून गेली. मात्र असा प्रसंग आपल्यावर येण्याचें खापर तिनें आपल्या लेंकीच्या माथीं फोडलें. लेंकीनें जर आचरटपणा केला नसता, लेंकीनें जर चिकाटी धरली असती, तर असा प्रसंग कधीं आला नसता. परंतु लेंकीलाच भीक मागण्याची हौस, असें तिनें आपल्या मनाला व लेंकीलाही अनेकवार सांगितलें; निदान रोज एकवार तरी ती सांगे.

आपली आई शेवटीं घर सोडून गेली असें चिंतोपंतास कळल्यावर त्याला काय वाटलें असेल हें सांगणें मोठें कठिण आहे. कारण तें त्याला कळलें तें त्याच्या चेंडयाच्या आईकडून. अर्थातच त्यास तें अशा आनंदानें व उल्हासानें कळविण्यांत आलें होतें, कीं आपली त्याबद्दल नापसंती ( खरोखर त्यास क्वचित् वाटली असली तरी ) शब्दांनीं उच्चारून दाखवून त्या उल्हासाचा विरस करून आपल्या डोक्यावर शब्दांचा भडिमार करून घेण्यास त्याची छाती होईना. आपण जें जें काय करूं इच्छिलें, त्याच्यापेक्षां किती तरी पट गोष्टी पुढेंच गेल्या असें त्यास वाटलें, आणि त्या केवळ इतक्या थरावर जाव्या अशी त्याची खरोखर इच्छा नसल्यामुळें त्यास अंतःकरणापासून बरें वाटलें नाहीं. परंतु धरण फोडण्याचें हातांत आहे तोंपर्यंत पुढच्या लोंढ्याला आळा घालून ठेवण्याची आधीं तजवीज केली तरच आपल्याला वाटेल तितक्याच पाण्याचा लोंढा फुटावयाचा. पुढचा विचार न करतां धरण फोडलें, कीं मग त्या पाण्याच्या वेगास थांबविणें केवळ अशक्यच. त्यांत आपणही सांपडून वाहून गेलों नाहीं तर तेवढेंच सुख मानून स्वस्थ बसावें. तद्वतच चिंतोपंताची स्थिति झाली होती. आपल्या आईचें व भावंडांचें नुकसान करण्यासाठीं जीं जीं कृत्यें त्यानें करण्याचा विचार केला, तीं तीं करतांना त्यानें दूरवर विचार केला असता तर खरोखर इतक्या थरावर गोष्टी गेल्या नसत्या; आणि एकंदर भावंडांचें नुकसान केलें, त्यांत ज्या ज्या गोष्टी घडल्या नसत्या तर त्याला बरें वाटलें असतें, त्या त्या खरोखर घडल्या नसत्या, किंबहुना त्या नुकसानकारक गोष्टींच्या भोंवऱ्यांत अजाणपणानें तोही सांपडला; तो सांपडला नव्हता. परंतु आपण सांपडलों असें त्यास अद्यापि जाणवलें नव्हतें आणि वाटलेंही नव्हतें. तें जाणवण्यास फार अवधि होता. झाल्या प्रकारानें त्यास खरोखर वाईट वाटलें. किती वाटलें आणि तें किती वेळ राहिलें हा प्रश्न निराळा. परंतु त्यानें तसें कांहींही आपल्या मुलाच्या आईस बोलून दाखविलें नाहीं. तें बोलून दाखविल्यानें होणारा भडिमार त्यास नको होता. पण त्याचें मन त्यास खाल्ल्यावांचून राहीना. सरूबाई ती आनंदाची वार्ता उल्हसित आवाजानें सांगून व सासूवर आणि आजेसासूवर अपशब्दांचा भडिमार करून चेंडयाच्या तैनातीस खालीं निघून जातांच तो आपल्या मनाशीं विचार करूं लागला. झाल्या गोष्टी अशाच राहूं द्याव्या, कीं आपण त्या सुधारून घेण्यास कांहीं प्रयत्न करावा ? इतक्या थरावर जाणें बिलकुल इष्ट नव्हतें. आतां त्या सुधारून घेण्यास मार्ग एकच. आपण जाऊन आपल्या आईशीं गोड बोलावें आणि नियमितपणें कांहीं तरी रक्कम पाठवून देऊन तुमचा समाचार घेत जाईन असें आश्वासन देऊन पुढें त्या आश्वासनाप्रमाणें निश्चयानें करावें. मात्र आपल्या बायकोस कळूं देऊं नये. असा विचार त्याच्या मनांत आला आणि त्यानें आज, आज, उद्यां, उद्यां, करून आठचार दिवस काढूनही त्याच्या मनाची तळमळ जाईना, तेव्हां एके दिवशीं मनाचा निश्चय करून राधाबाईच्या बिऱ्हाडाची वाट धरली. आपण कसें बोलावयाचें, काय बोलावयाचें, काय सांगावयाचें, याचा विचार त्याच्या मनांत चालला होता. आज त्याच्या मनांत केवळ नाटक करावयाचें नव्हतें.

त्यांत कांहीं सत्यपणा होता. तो राधाबाईच्या बिऱ्हाडीं गेला, आणि कर्मधर्मसंयोगानें त्या वेळीं राधाबाईची आई घरांत नव्हती. हाच प्रसंग चिंतोपंतास इष्ट होता. तो मिळाला असें त्याच्या मनास वाटून तो पुढें गेला. तेथें असणाऱ्या दोघां मुलांना कुरवाळून "कसं काय, बरं आहेना ?" असें विचारलें. हें त्याचें विचारणें राधाबाईच्या कानाला कसें लागलें असेल ? पण ती कांहीं सुद्धां बोलली नाहीं. मागील नाटकाच्या प्रसंगीं राधाबाईला त्याचा तिटकारा करण्यास आजच्या इतकीं कारणें माहीत नव्हतीं. आज किती तरी अधिक कारणें तिला समजून आलीं होतीं, परंतु तिनें त्या बाबतींत एक अक्षरसुद्धां उच्चारावयाचें नाहीं असा निश्चय केला.

मुलांशीं गोड गोड बोलत तो राधाबाईच्या पुढें बसला, आणि मग हलकेंच त्या मुलांना "तुह्मी बाहेर जा अं आतां घटकाभर. मला थोडंसं स्वस्थपणानं बाईशीं (तो आपल्या सावत्रआईला बाई ह्मणत असे) बोलायचं आहे. जा. मग मी जातांना तुह्मांला खाऊं देईन. जा." असें ह्मणाला. मुलांनीं आईकडे पाहिलें आणि तिनें तसेंच करण्यास सांगितल्यावरून तीं बाहेर गेलीं. अगदीं निर्मक्षिक असें पाहातांच तो राधाबाईस ह्मणतो, "बाई, एक एक दिवस तुमचं आमचं अधिकच फाटत चाललं आहे. त्याला जोड बसण्याचा मुळींच रंग दिसत नाहीं. असं कां ? तुह्मी घर सोडावंत असं माझ्या मनांत मुळींच नव्हतं. परंतु त्या वेडपीचीं दुरुत्तरं तुह्मांला न खपून तुह्मी निघून आलांत. मला तेंही बरं वाटलं नाहीं. पण घरांत राहून कदाचित् तुह्मांलाही सुख व्हायचं नाहीं, आणि ज्यापासून सुख व्हायचं नाहीं, तें कर ह्मणण्यांत तात्पर्य तरी काय ? असं ह्मणून मी पुनः तुह्मांला आग्रह करण्यास आलों नाहीं. पण तुह्मी अण्णांच्या घरांत होतां, तिथून सुद्धां निघून जावंत हें अगदीं अगदीं माझ्या मनाला बरं वाटलं नाहीं. तुह्मांला खोटं वाटेल. पण गोष्टी इतक्या थरावर येतील असं माझ्या स्वप्नींही नव्हतं. तिनं काय काय गोंधळ येऊन केला, तो माझ्या कानीं आला; पण त्याला माझी संमति होती असं मुळींसुद्धां तुम्ही मनांत आणूं नका. हा गोंधळ इतक्या थरावर जाईल असं जर मला वाटतं, तर खरोखर तिला मीं तिकडे येऊं दिली नसती. आणखी ती आली, ती माझ्या नकळत आली. गोष्टी झाल्या गेल्यावर त्या माझ्या कानीं आल्या. मी तरी काय करणार ? आतां त्या सुधारून घेण्याची जर कांहीं युक्ति असली, तर मला सांगा. मी ती करण्याला अगदीं तयार आहें. माझ्याशीं फटकून राहून आपलं चालणार कसं ? ........"

या शेवटच्या वाक्याचा उच्चार होईपर्यंत हें त्याचें सर्व बोलणें राधाबाई अगदीं स्वस्थ बसून ऐकत होती. परंतु शेवटले शब्द बाहेर पडतांच तिच्या मनाला डाग दिल्याप्रमाणें झालें. इतक्या वेळची तिची स्वस्थता पार गेली. आणि ती एकदम त्याला म्हणाली:—"चिंतू, आतां त्याची काळजी तुला नको. काळजी करणारा परमेश्वर समर्थ आहे. समजलास ? पुनः पुनः माझ्याकडे येऊन तूं माझ्या दुःखावर डागण्या कां देतोस ? झाला प्रकार एवढा तुला पुरे झाला नाहीं? आह्मी जगांतून नाहींशीं झालों, तरच का तुह्मांला समाधान होणार आहे ? जा. तुमच्याशीं फटकून चालतं कीं नाहीं हें

माझं मला पाहूं दे. जे दिवशीं तसं माझ्या अनुभवाला येईल, ते दिवशीं खुशाल मरेन, आणखी नाहीं जीव गेला तर तुझ्याकडे येईन. मग जें काय तुला बोलायचं असेल, जितकं छळायचं असेल तितकं बोल, तितकं छळ, पण मी आणखी माझीं पोरं तुझ्या दाराशीं आतां येईपर्यंत माझ्याकडे येऊं नकोस. तुझा माझा संबंध नाहीं असं समज. गांवांत माझ्यासारखीं दुःखीकष्टी माणसं थोडीं का आहेत ? त्यांच्याबद्दल जसं कांहीं तुला वाटत नाहीं तसंच मला लेख. आणखी पुनः ह्मणून माझ्याकडे येऊन कांहीं बोलूं नकोस.तुझ्या घरांतून निघालों, बापाच्या घरांतूनही तुमच्या पायीं निघालों, तुझ्याजवळ एक फुटक्या भांड्याचा हक्क सांगायला येत नाहीं, तुझ्याजवळ कांहीं मागत नाहीं, आतां कां आणखी छळ-तोस ? आह्माला स्वस्थ राहूं सुद्धां द्यायचं नाहीं, आमचा नायनाट करायचा, अशी का तुमची इच्छा ? "

" छे. छे. बाई " चिंतोपंत लागलीच ह्मणाला, " मीं तुला इतकं मनापासून खरं मला काय वाटलं तें सांगितलं आणखी शेवटीं हें असं बोलतेसना ? झाल्या गोष्टीबद्दल—त्या घडवून आणण्यांत माझं इतकं सुद्धां अंग नव्हतं तरी—मला फार वाईट वाटून मी खरोखर चांगल्या हेतूनं इथें आलों. आमच्याशीं फटकून तुमचं चालायचं नाहीं असं ह्मटलं, त्यांत तुला कांहींतरी टोंचून बोलावं असा मुळींच हेतु नव्हता. जें माझ्या मनांत आलं तें आपलं सहज बोललों, दुसरं कांहीं नाहीं. माझी बुद्धि खरोखर वावगी नाहीं. निदान आज मी वावगी बुद्धि धरून खचित आलों नव्हतों. झाल्या गोष्टीवर सारवण घालावं याच बुद्धीनं मी आलों आहें. जसं तूं सांगशील तसं करीन. बोल. जें सांगशील तें करतों. "

" म्हणतोस हें खरंच असेल, " राधाबाई चटकन ह्मणते, " तर पुनः माझ्याशीं या बाबतींत बोलायला यायचं नाहीं. आमचं नांव घ्यायचं नाहीं. असा निश्चय कर आणखी तो पाळ. आम्हांला अगदीं विसरून जा. ह्मणजे त्यांत सगळं कांहीं आलं. झाल्या गोष्टीवर उत्तम सारवण झालं. आणखी कांहीं म्हटल्या कांहीं आम्हाला नको. "

" पण बाई तुझ्या म्हणण्याप्रमाणें मीं केलं तर लोक मला काय म्हणतील ? माझं माझं मन मला किती खाईल ! "

" आमचं हितच जर करायचं, तर तेवढं आमच्यासाठीं सोस, पण आह्मांला छळूं नको. आमच्याकडे पाहूं नको. "

" अविचारानं बोलते आहेस बरं बाई, अगदीं अविचारानं बोलते आहेस. मला काय करायचं तें करीनच. पण तुझे हे शब्द मात्र राहतील. याचा विचार कर. तूं मार्ग नाहीं सुचवलास, तर माझा मला सुचेल, तो मी करणारच. मुलांची सगळी जबाबदारी माझ्यावर आहे. बारी आतां किती दिवस लग्नावांचून ठेवणार ? मीं जर तिच्या लग्नाचं मनावर घेतलं नाहीं तर काय तिला तूं माधुकऱ्याला देणार ? "

" तिच्या नशिबीं माधुकरी असला, तर मी ' नाहीं ' ह्मणून तरी काय होणार ? "

" माझी बहीण माधुकऱ्याला देऊं देईन मी ? पांच हजार रुपये खर्च करून तिला जहागीरदाराच्या इथें देईन. "

" चिंतू, तूं इथून जाशील तर खरोखर माझ्यावर उपकार होतील. तूं चांगल्या बुद्धीनं आला असशील, पण मला

तुझ्या या बोलण्यानं त्रास होतो आहे. तूं कांहीं तरी बोलून छळ करायला आला आहेस असं वाटतं. त्याला काय करूं ? तूं जा. खरोखर तुला सांगतें, आम्हीं सुखांत रहावं अशी तुझी खरी इच्छा असली, तर आमचं नांव सोड. ''

'' अरे बापरे ! मी दृष्टीसमोर सुद्धां नको इतकी का स्थिति झाली ? एकूण झाला प्रकार माझ्याच संमतीनंन् विचारानं झाला असं आपलं ह्मणणं ? मीं ' नाहीं ' म्हणून जीव तोडून सांगितलं, तरी कांहीं त्याचा उपयोग नाहीं; तरी हरकत नाहीं. पण आतां माझी एक तरी प्रार्थना ऐका. मीं दरमहा कांहीं रक्कम पाठविली तर तिचा अव्हेर करूं नका. ती माझ्याकडून येते असं समजूंच नका. तुमचीच तुम्हांला येते असं समजा. मी रुपये पन्नास खचित पाठविणार. एक महिनाभर पहा. जर पुरले तर ठीकच आहे, न पुरले तर मला कळविण्याची मात्र तसदी घ्या. बुइलांत काय वाटेल तें असलं, तरी त्याची मी परवा बाळगीत नाहीं. तें बुईल त्यांनीं कांहीं तरी भ्रांतींत लिहून ठेवलं. ''

बुइलाचें नांव काढतांच राधाबाईच्या कपाळास तिडीक जाऊन ती एकदम उठली आणि '' जा, जा, नको माझा छळ करूं. जा. नाहीं तर मींच जातें. '' असं म्हणून तेथून जाऊं लागली. तेव्हां चिंतोपंत अगदीं गयावया केल्याप्रमाणें पुढें होऊन म्हणतो:—'' अरे, आतां तर अगदीं शर्थच झाली ह्मणायची. इतक्या थरावर गोष्टी येतील असं मला तर कांहीं वाटलं नव्हतं बाई, तुझ्याबद्दल माझ्या मनांत किती प्रेम, किती आदरबुद्धि वागते आहे याची तुला कल्पना सुद्धां नाहीं. ज्या गोष्टी घडल्या, त्यावरून तूं परीक्षा करूं नकोस. त्यांत खरोखर माझा अपराध यत्किंचित् सुद्धां नाहीं. तुला वाटत असेल कीं, मी आंतून एक अन् बाहेरून एक असं वर्तन दाखवीत असेन, पण मुळीं सुद्धां तसं नाहीं. मी अगदीं निर्मळ आहें पण घरांत चौबा आपला कांहीं इलाज चालत नाहीं. करायचं काय ? खरं म्हटलं, तर तूं कांहीं तिला सासूच्या नात्यानं मुळीं सुद्धां वागवलं नाहींस. पण तुमच्यावर—आणखी आजींवर तर फार राग. असूं द्या, जाऊं द्या, मरूं द्या, काय पाहिजे तें करूं द्या. मीं अगदीं निश्चय केला आहे कीं, घरांत म्हणून ढुंकूनसुद्धां पाहायचं नाहीं. आपलं काय दोन वेळ गोळाभर अन्न मिळेल, तें खायचं, आणखी आपल्याला जें करायचं असेल तें करायचं. त्यांत कांहीं आतां तिला विचारायचं नाहीं. पाहिलं मीं काय तिचं होतं तें. आपले दीर आहेत, कीं आपली दुःखी कष्टी सासू आहे, नणंदा आहेत, त्यांना सगळ्यांना नीटनेटकं करूं, प्रेमानं वाढवूं हा विचार कसा तो तिच्या मनांत येत नाहीं. त्याला करणार काय ? स्वभावाला औषध नाहीं. जें करायचंच असेल, तें आपलं मुकाट्यानं करावं असा मीं बेत केला आहे. मला खरोखर त्या घरांतसुद्धां राहवत नाहीं, पण करायचं काय ? लोकांत आणखी आतां तमाशा तर दाखवायचा नाहीं ? ............... ''

चिंतोपंत तिला अगदीं आडवा आल्याप्रमाणेंच उभा राहून बोलत राहिल्यामुळें तिला तेथून हलतां येईना आणि हलतां आलें नाहीं म्हणून ती त्याची चर्पटपंजरी मुकाट्यानें ऐकून घ्यावी लागली. हें पहातांच तिला अतिशय संताप आला, आणि ती अगदीं तडफड करूं लागली. पण चिंतोपंत अगदीं थंड होता. त्याला तिच्या त्या संतापाची जणूं काय वार्ताही नव्हती. त्यानें पुनः

फत्कल् मारली आणि तो तिला म्हणतो: "मग काय? मीं म्हटलं असंच करायचंना? तुम्ही वाटेल तिथं रहा. मात्र मला कळवा. आणखी मी कशा पाहिजे त्या स्थितींत असलों, तरी रुपये पन्नास दर महिन्याच्या पहिल्या तारखेला पोस्टांतून पाठवून किंवा कशातरी मार्गानं पोंचवीन. त्याची तुह्मांला अगदीं काळजी नको. तुम्हीं रहाण्याची वगैरे काय व्यवस्था केली आहे, तें मला एकदां कळूं द्या. मुलांची शिकण्याची सोय चांगली पाहिली पाहिजे. अप्पावर तर आतां आमचा सगळा भर आहे. आमचं तर झालंच आतां शिकणं, आह्मी झालों, बनलों संसारी. पण त्याला गुलामाला जन्मभर शिकूं म्हणेल तर तितकं शिकूं द्यायचं. अगदीं युनिव्हर्सिटीच्या सगळ्या पदव्या घे म्हणावं. शेवटीं भ्रांति होऊन काय वेड्यासारखं लिहिलंन् केलं तें विलक्षणच, पण दाजीसाहेबांचं मन फार कीं अप्पा हुषार आहे, त्याला मोठा विद्वान् बनवायचा. विलायतेस पाठवून सिव्हिल सर्व्हंट करून आणायचा ती त्यांची इच्छा आपण पुरवायची......."

राधाबाईला आतां अगदीं असह्य झालें, ती तेथून उठली, आणि आतां याच्या मनाला काय वाटेल तें वाटो आपण येथून निघून जावें असा तिनें निश्चय करून ती त्याच्या अंगावरून तेथून चालती झाली. त्याच्या त्या लबाडपणाचा तिला फारच संताप आला. तो चायकोमुळें बिघडून असें वर्तन करतो, असें आजपर्यंतचें तिचें मत होतें, तें आजच्या त्याच्या वर्तनानें अजीबाद बदललें. हा जोडा अगदीं यथायोग्य आहे. किंबहुना हाच फार बिलंद असून सर्व गोष्टी याला अगदीं पसंत पडूनच झाल्या आहेत असें तिला वाटलें; आणि असें एकदां पक्कें वाटल्यानंतर एक क्षणभरसुद्धां तो आपल्या समोर नको, असें तिला झालें. परंतु त्याला तेथून घालविणें शक्य नव्हतें, यामुळें ती आपणच तेथून चालती झाली. चिंतोपंतास त्या तिच्या करण्यानें काय वाटलें असेल हें कांहींच सांगतां येत नाहीं. तो खजील झाल्याप्रमाणें मात्र दिसला नाहीं. उलट त्याच्या चेहऱ्यावर किंचित् स्मितच दिसत होतें असें पाहणारास वाटलें असतें. राधाबाई तेथून निघून गेल्या, तेव्हां त्याचा नाइलाज झाला आणि त्यास तेथून हलावें लागलें. नाहीं तर त्याच्या मनांतून आणखी पुष्कळ प्रकारांनीं लबाडपणा करावयाचा होता. निदान झाल्या गोष्टींत आपला कांहीं संबंध नसून सर्व कार्यभाग झाला तो केवळ आपल्या बायकोच्या मूर्खपणामुळें झाला असें दाखवावयाचें होतें. परंतु तें आतां कसें रुजणार? त्याला असें वाटलें कीं, आपण नानाप्रकारांनीं बोललों, मुलीच्या लग्नाबद्दल, तिला जहागीरदारांच्या घरीं देण्याबद्दल बोलला, पन्नास रुपये दरमहाबद्दल गोष्टी काढल्या, ह्मणजे राधाबाई खुलून आपल्याविषयीं तिचें मन तितकें कलुषित होणार नाहीं. राधाबाईचें मन कलुषित झालें किंवा न झालें म्हणून कांहीं त्याला मोठीशी पर्वा होती असें थोडेंच. परंतु नीचपणा करून आपला इष्ट कार्यभाग साधून पुनः आपला नीचपणा लोकांना दिसूं नये, भलेपणा दिसावा असा व्यवहार करणाऱ्या नीच कोटींतला तो होता. आपल्या मनावर आजपर्यंत त्याच्या भोळेपणाचा ग्रह झाला होता, तो याच आपल्या वर्तणुकीमुळें झाला असला पाहिजे असें आतां तिला पक्कें वाटून चुकलें. चिंतोपंताच्या आजच्या येण्यांत केवळ राधाबाईची मर्जी खुष

करून घेऊन आपला भलेपणा राखावा एवढाच हेतु नव्हता. प्रथमतः तो थोड्या सद्बुद्धीनें आला होता, परंतु पुढें त्याची बोलाचाली चालली असतां त्याला निराळेंच स्मरण झालें अण्णासाहेबांजवळ आपल्या सहीशिक्क्यानिशीं त्यानें एक कागद दिला होता, तो कागद मिळाल्यास काढून घ्यावा; नव्हे तो काढून घेतलाच पाहिजे असें त्याला वाटूं लागून तो काढून घेण्याच्या इरायानें तो आतां पुनः लवळपणा करूं लागला होता. परंतु त्याच्यासारख्या नीच माणसाच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्यानें तो हेतु होतां होईल तों मागें ठेविला. आशय हा कीं, जहागिरदार जांवयाच्या आणखी पन्नास रुपये दरमहाच्या, त्याचप्रमाणें अप्पाच्या भावी परीक्षांच्या व हुशारीच्या गोष्टी सांगितल्या कीं ती खुष होणार, आणि ती तशी खुष झाली, कीं हलकेंच त्या कागदाची गोष्ट काढून तो आहे कोठें, काय, याची चौकशी करून तो फाडवून टाकूं किंवा आपल्या ताब्यांत घेऊं. पण वर सांगितल्याप्रमाणें लवळपणाचा अतिरेक झाला म्हणून त्याचा बेत मुळींच साधला नाहीं तो इतका साधला नाहीं कीं बोलण्याची देखील सुराणी गेली आणि संधीही गेली. पण मग काय करणार ? सचिंत अशी चर्या करून त्यानें इकडे तिकडे पाहिलें, डोकें खाजवीत आणि अगदींच तसेंच कसें जावें ह्मणून सगळ्या भावंडांना एक एक वार बोलावून त्यांच्याशीं मोठ्या प्रेमानें बोलून, हंसून, मग हलकेंच त्यानें पाय काढला. मात्र मनांत त्यानें आपल्याशींच ह्मटलें: " बरं आहे. कांहीं हरकत नाहीं. मी दामोदरपंताचा मुलगा आहें. पाहून घेईन. तो कागद जिवंत असला तर कोणाच्या दृष्टीस पडत नाहीं ही माझी खात्री आहे. पण तो जितका कोणाच्या दृष्टीस पडणार नाहीं तितका बरा, म्हणून त्या कागदाचा एवढा शोध करून आपल्या ताब्यांत घ्यायचा. दुसरं काय ? नाहीं तर असं काय त्या कागदावांचून आपलं थोडंच अडलं आहे. ती केवळ नक्कल. अस्सल कोणीकडच्या कोणीकडेच आहे. आणखी तें मूळ—तें तर मीं स्वतः आपल्या देखत जाळलं, तेव्हां ती कांहीं भीति नको, आणि मी भीतही नाहीं. " असें तो आपल्या मनास नेहमीं सांगून समाधान करी. परंतु खाणारें मन अशा सांगण्यानें खरोखर कधीं तरी समाधानलें आहे ? राहून राहून पुनःपुनः त्याला वाटे, कीं त्यांचं भय वाटो न वाटो, ती नक्कलसुद्धां आपल्या हातीं लागलेली बरी. आणि ती घेण्याबद्दल काय खटपटी कराव्या तें त्याला न सुचून तो तीन तीनदां असा येई. आज इतक्या स्थितीला गोष्टी आल्यानंतर त्याला वस्तुतः त्या नकलेबद्दल बोलण्याची कांहीं सुराणी राहूं नये. परंतु त्याचें मन " अं: त्यांत काय आहे ? जें अस्सल भरकोर्टांत शाबीत म्हणून होणार, त्याचीच ती नक्कल. अगदीं मी आपल्या सहीशिक्क्यानिशीं दिलेली असली त्याच्याजवळ म्हणून काय झालं ? " अशा बोलण्यानें समाधान पावेना. तें अधिकच अस्वस्थ होऊन त्यानें त्यास तेथून पाय काढतां काढतां आणखी एकवार तो कागद स्पष्टपणें राधाबाईपासून मागून घ्यावा म्हणून सुचविलें. त्याप्रमाणें तो राधाबाई कोठें आहे म्हणून शोध करीत परत आंतपर्यंत गेला. राधाबाई त्या संतापाच्या भरांत

जी त्याच्या जवळून गेली, ती थेट जाऊन एका कोंपऱ्यांत रडत बसली. आतां त्याच्या त्रासापासून सुटण्यास कडी लावून बसेन म्हटलें तर तशी एखादी खोलीसुद्धां आपल्याला नाहीं. असें मनांत येऊन तिला किती तरी वाईट वाटलें. आणि तो तिच्या पाठोपाठ आंत येतांच तर फारच वाईट वाटून ती एकदम उठून उभी राहिली. आपण रडतों आहोंत, त्यानें आपल्यावर आणलेल्या प्रसंगामुळें आपण इतक्या दीन स्थितीला पोहोंचलों, त्यानें आपल्याला रडण्याला लावलें, असें त्याच्या दृष्टीस पडूं देणें म्हणजे केवढें हीनपणाचें कृत्य आहे. छे छे. आपले अश्रू इतके पवित्र आहेत कीं ते या नीचाच्या दृष्टीस सुद्धां पडणें म्हणजे आपल्याला फार कमीपणा आहे असें तिला वाटलें. ती मोठी गरीब परंतु मोठी मानी होती. केव्हांच तिनें आपले अश्रू पुसून पदर सांवरून ती त्याच्यापुढें उभी राहिली आणि म्हणते:—

" जें एकदां सांगितलं तेंच पंचवीसदां वदवण्यांत अर्थ काय ? आतां याउपर तूं आम्हांला छळूं नयेस हें बरं नव्हे का ? आम्ही तुझ्या दारीं येत नाहीं, अमुक दे, तमूक दे म्हणत नाहीं, इतकंच नाहीं, पण तूं दिलंस, तरी आतां मला नको म्हणून परत करीन, पण तूं आतां आम्हांला सुखानं राहूं दे. जा. इतका वेळ बोलणं झालं तें काय थोडं झालं ? इतका वेळ मीं सांगितलं तें कमी स्पष्ट झालं ? आतां आणखी काय सांगूं ? कसं सांगूं ? म्हणजे तूं जाशील ? "

" इतका जर तुम्हांला तिटकारा असला, तर खरोखरीच मी जातों, पण अण्णांच्याजवळ जो मीं कागद दिला होता तो माझा मला परत पाहिजे आहे. तो सांपडला असला, तर माझा मला परत मिळावा म्हणजे मी कांहीं कधीं पुनः येणार नाहीं. मला जी काय मुलांची काळजी घ्यायची, मदत करायची ती दुरून करीन. नकोच तुम्हांला, मग काय ?"

" तो कागद सांपडला आहे, पण परत मिळायचा नाहीं. "

" तो तुला ठेवून काय करायचा आहे ? कोणाच्या नजरेस पडला तर सगळ्या घराण्याची छीः थूः होईल एवढ्यासाठीं मी भितों आहें."

" माझी मला काळजी आहे. तूं आतां जा. मी प्राण गेल्यानं तो कागद तुला द्यायची नाहीं. "

राधाबाईची चर्या या वेळीं इतकी दृढनिश्चयी, त्रस्त व संतप्त दिसली, कीं ती आतां काय करते आणि काय नाहीं असें वाटून " जा, तर जा. " असें म्हणून चिंतोपंत तेथून पळाला.

या दिवसापासून दोनही शाखांचा संसार निरनिराळ्या मार्गांनीं कसा होत गेला हें सांगण्याचा प्रस्तुत गोष्टीचा हेतु आहे.

---

# प्रकरण ८ वें.

## शर्यत.

कित्येक दिवस झाले—किंबहुना महिने झाले. चिंतोपंतदादाकडून पुनः राधाबाईस आपल्या अस्तित्वाचें चिन्ह मुळींसुद्धां दाखविण्यांत आलें नाहीं. " राधाबाई काय वाटेल तें ह्मणो, त्यांच्या संसाराची, मुलांच्या शिक्षणाची, मुलींच्या लग्नांची काळजी घेणें आपलें कर्तव्य असून आपण तें करण्याला तयारही आहोंत, परंतु राधाबाई करूं देईना त्याला आपला तरी काय इलाज ? नकोच, आपलें वारें सुद्धां त्यांस नकोच, असें जर त्यांनीं आपल्याला स्पष्टपणें सांगितलें आहे, तर आपण तरी विनाकारण लचाळपणा करा कशाला ? दारिद्र्याचें काय दुःख आहे हें चांगलें जाणवलें म्हणजे आपोआप डोळे उघडून आपल्याकडे येतील आणखी आह्मांला हें नाहीं, आह्मांला तें नाहीं असें ह्मणतील. असें होईल तेव्हांच आपण तरी आपल्याला काय करायचें तें करूं. नाहीं असं नाहीं. उद्यांपासून त्या आपाच्या नांवचें एक ब्यांकबुक काढून त्यांत मुकाट्यानें पन्नास रुपये भरूं, ह्मणजे पुढें भीक मागायला आलें कीं, तें ब्यांकबुक दाखवून आपण किती काळजी करीत होतों आणि त्यांनीं आपला कसा अनादर करून आपल्याच पायावर धोंडा पाडून घेतला, हें नीट त्यांच्या निदर्शनाला आणून देऊं. तोंपर्यंत कांहीं बोलूं नये व चालूं नये." असे व अशाच पर्यवसनाचे आणखी कित्येक विचार राधाबाईच्या बिऱ्हाडापासून आपल्या घराकडे जातांना चिंतोपंतांच्या मनांत आले. परंतु त्यांच्या विचारांस तरी भरती—ओहोटीचा नियम लागू होताच. मात्र चंद्राच्या आकर्षणानें समुद्राला भरती येते तसें त्यांच्या घराच्या आकर्षणानें त्यांच्या विचारसागराचें नव्हतें. उलट होतें. जों जों गृहरूप चंद्राचें सान्निध्य त्यांस भासूं लागलें, तों तों त्यांच्या विचारसमुद्राला ओहोटी येऊं लागली. " ब्यांकेंत तरी टाकण्यांत अर्थ काय ? आपल्याजवळ असले काय, आणि ब्यांकेंत टाकले काय, वरींच जमाखर्च लिहिला ह्मणजे झालें. किंवा जमाखर्च तरी कशाला ? जे दिवशीं तीं येतील, ते दिवसपर्यंत दरमहा पन्नास रुपयेप्रमाणें हिशेब करून अंगावर रक्कम फेंकून दिली ह्मणजे झालें." इतका निकाल घराच्या दारांत पाऊल टाकतात तों होऊन चेंडच्याच्या आईचें दर्शन होतांच तोही विचार कोणीकडच्या कोणीकडे गेला. उलट आपल्याकडून त्यांची समजूत घालण्याकरितां व दरमहा अमुक रक्कम आपण देतों ह्मणून सांगितलें असतां, त्यांनीं आपल्यास धुडकावून लावलें असें त्यांनें आपल्या प्रिय पत्नीस सांगितल्याबरोबर " अस्संच तें. जावं

कशाला लुच्चेपणा करायला ? अहो अस्संच. आमच्यासारख्या या नट्या-पट्यान् बडबड्या ब-या बरं ! पण या झिप्र्यान् गायतोंड्या मोठ्या कठिण असतात. पुरुषांना त्यांतलं समजत आहे काय ? आह्मी काय बडबड करून भांडूंतंडूं तेवढ्याच. पण त्या, अहो त्या कसल्या मख्ख, कसल्या मिस्किल ! त्यांना या दागिन्यांची—चांगलं दहा हजा-रांचे असतील नाहीं का ?—मोठी ऊब आहे. काय करूं हो ! ते दागिने तिनं पहिलेच दिवशीं लांबवलेन् वाटतं, नाहीं तर त्या अवदसांच्या हातांत एक सुत-ळीचा तोडासुद्धां लागूं दिला नसता. आणखी तर काय ? अहो यांना हें अस्संच पाहिजे. आपण मला चोरून एवढं जायचं, त्याचं हें योग्य प्राच्चीत आपल्याला मिळालं. अगदीं अगदीं योग्य प्राचीत मिळालं. समजलं ? ते दागिने परत यायची कांहीं युक्ति असली तर काढा, ह्मणजे मग पाहूं काय तमाशा होतो तो."

असलें बोलणें झाल्यावर मग काय ? त्या देऊं केलेल्या, ब्यांक-बुकांत टाकूं ह्मटलेल्या किंवा जमाखर्चीं लिहूं असें मनांत आणलेल्या रकमांचें कसचें स्मरण राहतें ! तें केव्हांच कोणी-कडच्या कोणीकडे गेलें. सरूबाईनीं सांगि-तलेली युक्ति काढणें चिंतोपंतास शक्यच घाटलें नाहीं. शक्य वाटलेंच असतें, तर त्यानें ती काढली असती कीं नाहीं हा प्रश्नच निराळा.

दुसरे दिवशीं तर त्या गो-ष्टीचें एकही वेळ स्मरण झालें नाहीं. नुसता दोघांही नवराबायकोंस राधाबा-ईच्या उद्धटपणाचा चमत्कार वाटला. आणि तिसऱ्याही दिवशीं तो चमत्कार वाटण्याचें बंद राहिलें नाहीं. परंतु चवथे दिवशीं वडिलांनीं विकत घेतलेल्या इनाम गांवच्या वसुलातीचें कांहीं काम आल्या-मुळें चिंतोपंतास तिकडे जावें लागलें. तिकडून येतात, तों बुलिस्नीकसाहेबांस लिहिलेल्या पत्राचें उत्तर आलें होतें, त्यांत लिहिलेल्या कांहीं जिनसा पाठवि-ण्यांत, आणि पुनः एकदां त्यांस पत्र लिहिण्यांत सगळा वेळ गेला. पुनः त्यांचें पत्र आलें तेव्हां तर त्यांत फारच आनं-दाची वार्ता होती. त्यानें खुपखाबादेस अगर झणझणपुरास मी असेन तेथें येऊन मला भेट ह्मणून लिहिलें होतें. मग काय विचारतां ! चिंतोपंतदादांच्या जाण्याच्या तयारीची एकच गर्दी उडून गेली. सर-स्वतीबाईला तर असा आनंद झाला, कीं कांहीं विचारूंच नये. आपल्या नवऱ्याच्या या जाण्याचा फायदा कांहींना कांहीं तरी फार मोठा होणार आहे, हें ती पक्केपणीं जाणून होती. दिवाण अगर नायब दिवा-णसाहेबांच्या यजमानीणबाईच्या थाटाचीं कल्पनाचित्रें तिच्या डोळ्यांपुढें दिसूं लागून तीं उत्तर हिंदुस्थानांतल्या आ-पल्या भावि नोकरानें काम न केल्याबद्दल किती शिव्या देऊं लागली ! आपण पाठीस लागलों, ह्मणूनच नवऱ्यानें लिहिलें. नाहीं तर आळसावारी घालवून स्वारी माशा मारीत बसली असती. असें तिला वाटून, आपले हे तुमच्यावर उपकार आहेत. "तुमचं मोठं नशीब कीं, असली धोरणी बायको तुह्मांला मिळाली." असें तिनें स्पष्टपणें बोलूनही दाखविलें. सरस्वतीबाई फार महत्वाकांक्षी होती. सासऱ्याचा रगड पैसा आहे आणि त्याला दायाद आतां कोणी उरला नाहीं, एवढ्या विचारावरून समाधान मानून रहाणारी ती स्त्री नव्हे. तिला असें वाटे, ज्याप्र-

माणें सासऱ्यानें साहेबांच्या आश्रयानें अनेक अधिकार भोगून पैसा सांचवला, त्याप्रमाणेंच आपल्या नवऱ्यानेंही त्या बुलिस्नीकसाहेबांची हांजी हांजी करून आपली बढती करून घ्यावी. बुलिस्नीकसाहेब मुंबईस येणार ही बातमी तिच्या कानीं जातांच तिनें आपल्या नवऱ्याच्या पाठीमागें लागून त्याला भेटण्यासाठीं मुंबईस पाठविलें. पुढें कांहीं तरी नजराणे पाठविण्याचें काम तिनेंच त्याच्या मागें लावून करविलें, आणि आपली तिकडे कांहीं तरी सोय लावावी ह्मणून पत्र लिहविलें तेंही तिनेंच. त्या पत्राचें उत्तर तूं मला येऊन भेट ह्मणून आलें म्हणजे मग काय? आपल्यामुळें आतां आपल्या नवऱ्यास दिवाणगिरीची जागा मिळणार असें तिला पक्कें वाटून आणि असें आपल्याला पक्कें वाटतें हें तिनें नवऱ्याला कळवून ताबडतोब रवानगी केली.

*       *       *       *       *

राधाबाई आणि तिचीं मुलें सुखानें कालक्रमणा करीत होतीं. सुखानें हा शब्द वाचतांच वाचकांस मोठें आश्चर्य वाटेल. राधाबाई आणि सुख यांचा संयोग कधीं आतां शक्य असेल, निदान असला, तरी तो इतक्या लवकर असेल असा संभवच नाहीं, असें त्यांस वाटणें अगदीं साहजिक आहे आणि तें खरेंही आहे. पण सुख हें अनेक वेळीं सापेक्ष असतें. केवळ सुख फारच थोड्या वेळीं कोणाससही लाभतें. राधाबाईस तें लाभण्याची आतां—निदान सध्यां तरी—मुळींच आशा नव्हती. परंतु केवळ—सुखाच्या अभावीं बहुतेक माणसें केवळ दुःखाच्या अभावानेंच संतुष्ट असतात. त्या दुःखाच्या अभावासच तीं सुख असें मानतात. नवरा मारला, श्रीमंती गेली, याच्यायोगानें झालेल्या दुःखाचा जोर आतां कमी झाला आणि अशा आपल्या हीन स्थितींत आपणांस परमेश्वरानें मुलें चांगलीं दिलीं आहेत, तीं आपणांस मुळींसुद्धां दुःख देत नाहींत. आपला थोरला मुलगा आपल्याला सुख देण्यासाठीं, आपलें दुःख आपण विसरून जावें ह्मणून अंतानात झटत असतो व आपल्या धाकट्या भावंडांनीं आपल्या आईला अजाणपणानें सुद्धां त्रास देऊं नये ह्मणून त्यांना आपल्या जवळ जवळ घेऊन असतो. त्यांचें मन रिझवून आईपासून तीं जितकीं दूर राहतील तितकीं दूर ठेवतो. इतकेंच नव्हे, तर कित्येक बारीकसारीक गोष्टींत तो आपल्यास मदत करतो. मनांतला हेतु हा कीं, आपला त्रास जितका कमी करतां येईल तितका करावा. आई पाणी ओढण्यास गेली असल्यास आपण धांवत जाऊन ती नको नको ह्मणत असतां तिला पाणी ओढूं लागण्यास अगर तिनें तें ओढलें असल्यास चट्कन् घागर उचलून घरांत नेऊन ठेवण्यास यत्किंचितही मागें घेऊं नये. कित्येक कामें आईनें अगदीं करूं नको म्हणून आग्रह करून सांगितलें, तरी तीं करण्यास कमी करूं नये आणि वारीसही तसें करण्याची उत्सुकता उत्पन्न करावी. हें पाहून त्या माउलीस समाधान वाटल्यावांचून कसें राहणार? अर्थातच पहिल्या पहिल्यानें, या त्याच्या करण्यानें तिला मागल्या संपन्न काळाची आठवण होऊन फार वाईट वाटे. आपल्याला अशी दशा येईल, असें तिच्या स्वप्नस्वप्नांतरींही आलें नव्हतें, परंतु तीच दशा आज प्रत्यक्ष आली. जिला कधीं लहानसें फडकें धुवून पिळून आणण्याची संवय नव्हती, तिला आतां स्वतःचें लुगडें, मुलांचीं धोतरें,

आणि लहान मुलांचे कपडे धुण्याची पाळी आली. जिला कधीं तांब्याभर पाणी आणण्याची संवय नाहीं, तिला आतां विहिरीच्या घागरी ओढून आणणें भाग पडलें. अशा स्थितींत मागील गोष्टी आठवून व त्यांचा विरोध दिसून मनाला फार दुःख वाटेल यांत नवल काय ? परंतु त्या दुःखाचा पगडा तिनें आपल्या मनावर कधींही होऊं दिला नाहीं. प्रथम प्रथम तिच्या हाताला फोड आले,डोळ्यांचें पाणी खळलें नाहीं; पण काटकसर करणें हें आपलें मुख्य कर्तव्य, आणि तें करावयाचें तर अंगाखांद्याकडे मुळींसुद्धां न पाहातां सपाटून काम करणें आपल्याला अगदीं जरूर आहे, हें ती पक्केपणीं जाणून होती. जाणून एवढेंच नव्हे, तर त्याप्रमाणें करण्यास नेहमीं झटे आणि त्या झटण्यांत तिनें सिद्धिही पण मिळविली.

सप्टेंबर महिन्याचे दिवस. पावसाळा अद्यापि अगदीं बंद झाला नव्हता, पण त्याला उतरतीकळा लागली होती. साहेबलोकांचा अनेक खेळ खेळण्याचा व मौजा करण्याचा हंगाम संपत येऊन आतां राहिलेल्या शर्यती सुरू झाल्या होत्या. सीतारामाच्या शाळेस आज शर्यतीनिमित्त अर्धी सुट्टी मिळाली होती. त्यानें यापूर्वीं एकदां दोनदां शर्यती पाहिल्या होत्या आणि त्यामुळें म्हणा, किंवा त्याचे वर्गांतील सोबती त्यास आग्रह करीत होते म्हणून ह्मणा—कदाचित् दोन्ही कारणें खरीं असतील !—सीतारामास शर्यती पाहण्यास जाण्याची इच्छा झाली व तो हळूच आईजवळ येऊन 'माझ्या वर्गांतले पुष्कळ सोबती जाताहेत, मी जाऊं का' म्हणून विचारूं लागला.

" पायीं जाणार " आईच्या डोळ्यांत एकदम पाणी उभें राहून तिनें विचारलें. ' अप्पा, तुझे पाय नाहीं दुखणार इतक्या लांब जाऊन ? " " नाहीं, आई, मला आतां संवय झाली आहे. कांहीं नाहीं पाय दुखत. " सीतारामानें उत्तर दिलें.

राधाबाईनें क्षणमात्र विचार केला आणि " जा " असें उत्तर दिलें. खरोखर तिच्या मनांतून त्यानें पायीं जावें असें नव्हतें, परंतु एवढ्या तेवढ्यासाठीं पोराचा हिरमोड करूं नये असें तिला वाटून तिनें अनुमोदन दिलें. बारी आणि सखाराम तेथें जवळच होतीं. तींही आपण येतों अशाबद्दल त्याच्या पाठीस लागलीं. दोघांच्यानेंही इतक्या लांब चालवणार नाहीं हें राधाबाईस स्पष्ट दिसलें, बारीची तर तिनें तेव्हांच समजूत घातली. परंतु सखारामास अतोनात इच्छा झाल्यामुळें त्याची समजूत पटेना. तो ह्मणे, मी चालेन आणि त्याच्या डोळ्यांत उभें राहिलेलें पाणी पाहून सीतारामासही आपल्या भावाला आपल्या बरोबर नेण्याची जबाबदारी घ्यावी असें वाटलें. तितक्यांत त्याचे शाळेंतील दोघे तिघे सोबती बाहेर उभे होते, पाठवा, पाठवा त्याला; आह्मी सगळेजण मिळून त्याला संभाळून आणूं. नाहीं तर त्याला उचलून आणूं " असें उल्हासानें म्हटलें. तरी सुद्धां राधाबाईस बरोबर वाटलें नाहीं. परंतु होणाऱ्या गोष्टीपुढें इलाज नाहीं या न्यायानें म्हणा किंवा अन्य कारणानें म्हणा, सखारामास घेऊन जाण्याविषयींही राधाबाईनें अनुमोदन दिलें. बिचारीला पुढें काय होणार याचें अणुमात्र स्वप्न पडलें असतें, तर तिनें कोणाला तरी पाठविलें असतें काय ?

" जा " असे शब्द आईच्या तोंडून बाहेर पडतांच सखारामाचें तोंड आनंदाच्या हंसण्यानें प्रफुल्लित झालें व तें

पाहतांक्षणींच तिला समाधान झालें; आणि ती " जा.. जा. आतां मुकाट्यानं जा, नाहीं तर आतां तो सांवळ्यान् मनी येऊन रडत बसतील. " असें म्हणाली. त्याबरोबर तिकडून वारी " आई, सख्याला चालवेल अन् मला नाहीं का चालवायचं. मी मुळींसुद्धां दांडगाई करायची नाहीं. आणखी आह्मी दोन शर्यती पाहून होतांच अगदीं दिवसाउजेडी परत येऊं. मी जाऊं ? " असें म्हणाली.

त्या हिरमुसलेल्या तोंडांतून हे काकुळतवाणी शब्द बाहेर पडतांच राधाबाचित्तवृत्ति कशीशीच झाली. प्रेमानें तिचा विचार जरा बाजूस राहिला आणि तिनें तिलाही जाण्यास संमति दिली. मुलें उड्या मारीतच दाराबाहेर गेलीं. परंतु राधाबाईस आपण आज मुलांना जाऊं दिलें हें बरें केलें कीं नाहीं याबद्दल शंका मनांत उभी राहून रुखरुख वाटूं लागली. तिची आई बाहेर गेलीं होती, ती बाहेरून येतांच " मुलं कुठं दिसत नाहींत, कुठं गेलीं " असें विचारलें व " शर्यत पाहाण्यासाठीं ' जातों जातों ' म्हणून पाठीस लागलीं होतीं, तेव्हां जाऊं दिलीं " असें राधाबाईचें उत्तर ऐकतांच ह्मातारी " आतां मात्र तुला वेड लागलं·दुसरं तर कांहीं नाहीं. नऊ दहा वर्षांचीं दोन पोरं आपलीं खुशाल शर्यतीला इतक्या लांब जाऊं दिलींस, आतां तुला ह्मणावं तरी काय ? आप्पा तो त्यांना काय संभाळणार ? कुठं वाट चुकतील, का गाडीखालीं सांपडतील का काय होईलन् काय नाहीं, याचा कांही तरी विचार ? तुला नकोशीं झालीं आहेत वाटतं ! छे. छे. छे. बाई तुला आतांशा झालं आहे तरी काय ? " असें बोलून खूप रागावली. तेव्हां मात्र राधाबाईस फार वाईट वाटलें. ह्मातारीनें सुचविलेल्या शंका तिच्या मनांत आतां चांगल्या ठळकपणें उभ्या राहिल्या, आणि मनांत फार कष्टी होऊन ती एकसारखी काळजी करूं लागली. परमेश्वर आपला पाठीराखा असल्यावर आपलें कांहींसुद्धां वावगें करणार नाहीं, आणखी त्याच्याच मनांत आपलें कांहीं वाईट करायचें असलें, तर तो घरीं बसल्या बसल्यासुद्धां करील, असें ह्मणून तिनें आपल्या मनाचें समाधान केलें. पण अशानें कुठें समाधान होतें ? तिचें पश्चात्तापानें जळणारें चित्त आपल्या तीन मुलांकडे लागलें. तीं धडपणीं घरीं येऊन आपल्या दृष्टीस कशीं पडतील असें तिला झालें.

इकडे मुलें मारे उड्या मारीत चाललीं होतीं. सीताराम आणि वारी सखारामाची अतोनात काळजी वाहात. गाडी आली असें दुरून वाटलें, कीं लागलींच यांनीं त्याला रस्त्याच्या कडेला घातलेंच. आणि गाड्यांची कोण गर्दी ! माणसें किती तरी चालली होतीं. त्या दिवसाच्या शर्यती अगदीं शेवटच्या होत्या आणि त्यामुळेंच शाळांनाही सुट्या होत्या. अर्थातच मुलांची गर्दी कमी नव्हती. मुंग्यांची रांग लागावी तशी रांग लागली होती. आमचीं तीन मुलें तर आनंदांत हंसतखेळत चाललीं होतीं. जणूं काय त्यांचा आनंद गगनांत मावत नव्हता. शर्यतीची जागा इतकी लांब, परंतु सखारामानें जातांना थकल्याचें यत्किंचित् सुद्धां चिन्ह दाखविलें नाहीं. उलट तो आपल्या भावाला व बहिणीला शर्यती कशा असतात, काय असतात, कोण करतं ? कोणाचे घोडे असतात ? ते घोडे गाडीला जोडतात का ? अशा

नानाप्रकारच्या गोष्टी विचारीत होता. आणि कोणी ना कोणी तरी त्याला कांहीं तरी उत्तरें देत. कोणी थट्टेनें कांहीं तरीच सांगत आणि त्यानें भरंवसा ठेवून त्यावरूनच दुसरा प्रश्न विचारला, म्हणजे हंसत. अशा गमतीनें मुलें शर्यतीच्या जागीं जाऊन तर सुखरूप पोंचलीं. तेथें गेल्यावर ती गर्दी पाहून तर सर्वच मुलांस असा आनंद व उल्हास वाटला, कीं कांहीं पुसूं नये. अजून पहिली शर्यत सुटण्याला दोन मिनिटें अवकाश आहे हें कानीं आलें त्यानें तर आपण अगदीं वेळेवर येऊन पोंहोंचलों याबद्दल त्यांस फारच आनंद झाला. इकडून तिकडे व तिकडून इकडे करून त्यांनीं कोठें तरी जेथून चांगलें दिसेल, अशी जागा शोधून काढण्याची खटपट केली. तेथें उभे असलेल्या सोजरांचा डोळा चुकवून या बाजूकडून त्या बाजूकडे जाऊन त्यांनीं जागाही चांगली मिळविली. शर्यतीचे घोडे त्यांच्यापासून अगदीं जवळून जातील अशी जागा होती आणि प्रथम ते चित्रविचित्र पट्ट्यांच्या कोटाटोपीचे त्या घोड्यांवरले स्वार पाहून सर्वांस, त्यांतून सखारामास फारच मौज वाटली. तो आनंदानें टाळ्या वाजवूं लागला. एक शर्यत झाली, तींतील घोडे धांवत धांवत त्या बाजूला आले त्यावेळीं जी गर्दी उसळली, तीमुळें सखारामास फार त्रास झाला, परंतु सीतारामाचे सोबती आणि ही तीन मंडळी यांनीं एकमेकांस सोडलें नाहीं. दुसरी सुटली, तिसरी सुटली, आणखी तीन व्हावयाच्या होत्या. आतां आपण जास्ती वेळ वाट न पाहातां परत जाण्याला निघावें हें बरें. आईलाही लवकर येतों ह्मणून कबूल केलें आहे असें मनांत येऊन सीताराम उठला, त्यानें सखारामास व वारीस उठविलें आणि आतां गेलें पाहिजे, असें त्यांस ह्मटलें. त्यांच्या सोबत्यांनीं त्यांस संपेपर्यंत बसण्याविषयीं आग्रह केला. परंतु आपण आपल्या आईला, दिवसा उजेडीं येतों म्हणून सांगितलें आहे; आतां राहायचें नाहीं, असें त्यानें त्यांस निक्षून उत्तर दिलें, आणि तो आपल्या भावंडांस घेऊन निघालाच. सोबत्यांच्या "मोठे आले एकवचनी" इत्यादि उपरोधिक भाषणांकडे त्यानें यत्किंचितही लक्ष्य दिलें नाहीं.

तो गर्दींतून मागें निघण्याला आणि पलीकडे एका साहेबाची एकटीच डॉककार्ट उभी होती, तिच्यावरील दोघां साहेबांच्याही मनांत जावें असें येण्याला एकच गांठ पडली. सीतारामानें सखारामाचा हात धरला नव्हता. वारीनें धरला होता. वारी व तो पुढें होता. सीताराम त्यांच्या पाठीशींच होता. त्या डॉककार्टवरील हांकणाऱ्या साहेबानें चाबूक चमकावला, इतक्यांत सखाराम घाबरून वारीचा हात सोडून पलीकडे जाण्यासाठीं धांवला आणि चाबकानें चमकलेल्या त्या जंगी घोड्यांच्या पुढच्या टापांच्या तडाख्यांत सांपडून खालीं पडून त्याच्या अंगावरून चाक गेलें. हा सर्व प्रकार इतक्या थोड्या अवकाशांत झाला कीं, सीतारामास हें काय झालें याचें भानसुद्धां राहिलें नाहीं. गाडी पुढें निघून गेली. सखाराम बेशुद्ध पडला. सीताराम आणि वारी त्याच्याजवळ जाऊन रडूं लागलीं.

गाडी हांकणाऱ्या साहेबानें गाडी थांबविली, आणि तो "ओ ! हो ! हें काय झालें हें ! Poor child ! Poor child ! What a sad accident! I must get down" ( बिचारें पोर ! काय हा अनर्थ. मला खालीं उतरलेंच पाहिजे. ) असें

ह्मणत खालीं उतरला. परंतु दुसरा साहेब त्यास तितक्यांत म्हणतो: Fairbrain, don't you be a fool. या नेटि-वांच्या संबंधानें आपण इतकी काळजी वाहायला लागलों, तर त्याला कांहीं अंतच लागावयचा नाहीं. त्या पोलिसच्या शिपायाला बोलावून एक दहा रुपयांची नोट फेंकून दे. आणखी इस्पितळांत घे-ऊन जायला सांग. तूं बस गाडींत, मी करतों तें सारं."

पण तो पहिला साहेब ऐकेना. "छे. छे. मी स्वतः जाऊन त्याची सगळी व्यवस्था करणार." असें ह्मणून तो पुढें चालला.

दुसरा साहेब लागलीच त्याचा हात धरून त्यास ह्मणतो: "I tell you don't be a fool Fairbrain तुझी ही दया तुझ्या पश्चात्तापाला कारण होईल."

पहिल्या साहेबानें त्याचा हात झिड-कारला आणि लागलीच I'd rather be a fool than a brute, Wilde, I must go." असें तिरस्कारानें ह्मणून तो गर्दीतून पुढें शिरून त्या मुलाजवळ गेला.

९

# फअरब्रेनसाहेब.

फेअरब्रेनसाहेब मुलाजवळ गेला, त्या-वेळीं त्याच्या चेहऱ्यावर अत्यंत खिन्नता व झाल्या गोष्टीला इलाज करण्यावि-षयींची उत्कट आतुरता हीं पूर्णपणें दि-सत होतीं. फेअरब्रेन उंचा पुरा चांगला सहा फूट व धिप्पाड होता आणि त्याच्या चर्येत उदात्तपणा, शालीनता व सच्छील, हीं स्पष्टपणें दिसत होतीं. त्याचे मोठाले पाणीदार व अगदीं पिंगट रंगाचे डोळेच तो मोठा सरळ, दक्ष व सज्जन असावा असें सांगत असत; आणि त्यानें आपल्या सोबत्यास झिड्कारून टाकून तिरस्कारानें त्याच्याकडे एकवार पाहिलें. त्या पाहण्या-वरून तर त्याचें शील कोणत्या प्रकारचें आहे, हें उत्तमपणानेंच दृष्टीस पडलें. साहेब असून त्यानें आजूबाजूच्या लोकांस शिव्यागाळी करीत झपाट्यानें गाडी हांकून पार निघून न जातां गाडी थांबविली, इतकेंच नव्हे, तर आपल्या सोबत्यास झिड्कारून तो त्या मुलाच्याजवळ आला. हें पाहतांच सभोंवतालीं जमलेल्या सर्व लोकांस एक अपूर्व गोष्टच वाटली. नेहमींचा अनुभव ह्मणजे साहेबानें उलट सगळ्यांस शिव्या-गाळी करून पार निघून जावयाचें. फार झालें तर वाइल्डसाहेबांनीं सुचविल्या-प्रमाणें एखाद्या पोलिस शिपायास दरडावून हांक मारून त्या लागलेल्या इसमास इस्पि-

तळांत घेऊन चल ह्मणून सांगून दहा पांच रुपयांची नोट त्याचे अंगावर फेंकून द्यावयाची. आपल्या गाडीच्या पुढें येऊन गाडीखालीं चिरडून घेण्याचा पाजीपणा करणाऱ्या नेटिवांची आणखी ती काय काळजी घ्यावयाची आहे ?

फेअरब्रेनसाहेबांचे विचार असे नसावेत असें दिसलें. तो त्या बिचाऱ्या बेशुद्ध पडलेल्या मुलाभोंवतीं जमलेल्या लोकांस दूर सारून पुढें गेला व तोंडानें " अरेरे ! अरेरे ! " असे उद्गार काढीत त्यानें एका पोलिस शिपायास बोलावून एक शिग्राम आणावयास सांगितला, आणि सिताराम व वारी दोघेंही रडत होतीं त्यांस शांत करण्याचा प्रयत्न करून त्यानें आपल्या अस्तण्या वर सारून आपल्या दणगट अशा हातांवर त्या बिचाऱ्या मुलास अलद् उचलून पलीकडे एका झाडाखालीं नेलें. त्याचे सोबती वाइल्डसाहेब, एखाद्या आपल्या स्नेह्यास वेड लागलें ह्मणजे त्याच्या वेडगळ कृति पाहून त्याची कींव येऊन जसें त्याच्याकडे पाहावें, त्याप्रमाणें पाहात होते. फेअरब्रेन अगदीं वेडगळपणा करीत आहे, असें त्याच्या मनांत वाटत होतें हें स्पष्ट दिसलें, आणि त्याला त्या करण्यापासून परावृत्त करणें शक्य आहे असें जर त्यास वाटतें, तर त्यानें त्याप्रमाणें केलेंही असतें; परंतु फेअरब्रेन कोण्या तऱ्हेचा प्राणी आहे हें तो पक्केपणीं जाणून होता. त्याच्याशीं आतां आपण कांहीं जरी बोललों, तरी त्याचा उपयोग होणार नाहीं. फेअरब्रेन अगदीं मनांतून जें कांहीं करावयाचें असेल तितकें तो करणारच असें त्यास पक्कें ठाऊक. यामुळें नाइलाज होऊन तो तेथें नुसता आपल्या सोबत्याकडे पाहात उभा राहिला. पुष्कळसे हिंदु वगैरे लोक फेअरब्रेनच्याकडे पाहून आपापसांत कोणी निंदापर कोणी स्तुतिपर बोलत होते, त्या मुलाला पाहण्यासाठीं जवळ जवळ घिरट्या घालीत होते, परंतु उपयोगी एकही पडला कीं नाहीं याची शंकाच ! रिकामटेकड्या जमावांनीं त्रास व्हावयाचा तो मात्र फेअरब्रेनसाहेब तेथें असल्यामुळें झाला नाहीं. रिकामटेकडा विचक्षणपणा करणारे बारगीर साहेबाला वचकून बऱ्याच अंतरावर राहिले आणि साधारणतः विद्वान् साहेबांस शरीरविज्ञानादिकाची माहिती असते त्याप्रमाणें फेअरब्रेनसाहेबांसही ती असल्यामुळें तो कोठें काय दुखावलें, कोठें कोणचें हाड चुरडलें, वगैरे नीट तपासून पाहत व जेथून रक्त वाहत होतें तेथून तें बंद होण्यासाठीं पाण्याच्या पट्टयांचा उपयोग करीत होता. त्यानें आपला रुमाल भिजवून त्याच्या कपाळावर ठेवला व तोंडानें आपल्या मोडक्या तोडक्या हिंदुस्थानी भाषेनें त्या दोघां मुलांचें सांत्वन करीत होता. तो देखावा एकंदर मोठा अपूर्व होता. साहेब इतका मायाळू असेल असें कधीं कोणास स्वप्नांत सुद्धां वाटत नसतें— आणि तसें न वाटण्याला कारणें जे त्यांचे अनुभव तेही तसेच आहेत. पोलिस शिपायानें शिग्राम आणतांच त्यानें आपण आपल्या हातांनीं त्या पोराला शिग्रामांत ठेविलें आणि दुसऱ्या दोघां पोरांस आंत बसवून, त्यानें आपल्या सोबत्यास मोठ्यानें हांक मारून ह्मटलें, " वाइल्ड, तूं जा. मी या मुलास इस्पितळांत पोंचवून, त्याची औषधपाण्याची व खाण्यापिण्याची सगळी व्यवस्था नीट लागलेली पाहीन तेव्हां येईन. माझ्याकरितां तूं वाट पाहूं नकोस. तूं गाडी घेऊन जा."

फेअरब्रेनचे हे शब्द ऐकतांच वाइल्ड-साहेबांस इतकें आश्चर्य वाटलें कांहीं विचारूंच नये. त्याच्या चेहऱ्यावरील प्रत्येक गहूंभर जागींसुद्धां त्या आश्चर्याचा अंश दिसत होता. त्याशिवाय तिरस्कार आणि क्रोध यांचे अल्पअल्प अंशही त्या वेळीं त्याच्या चर्येवर व उच्चारलेल्या शब्दांत दिसत होते. " ह्मणजे ! तूं आतां त्या पोराबरोबर इस्पितळांत जाणार ? इस्पितळांत ? फेअरब्रेन, तुला वेड तरी नाहींना लागलं ? तुझ्या डोक्यांतलं कुठं तरी मळसूत्र बिघडलं आहे आज खास. चल ! केलंस एवढं पुरे, चल." पण छे ! फेअरब्रेन कुठला ऐकायला ! तो लागलीच त्याच शिग्रामांत सखारामाचें डोकें होतें त्या बाजूच्या गादीवर एका बाजूस बसला.

हें तर वाइल्डसाहेबांस अधिक खेद वाटण्यास व त्याचा रागही वाढण्यास चांगलेंच कारण झालें. फेअरब्रेनसारखा माणूस आणि एक भिकारडें नेटिव पोर सहजगत्या गाडीखालीं सांपडल्याबद्दल इतका त्याचा बाऊ करील—निदान त्यानें करावा, ही म्हणजे न भूतो न भविष्यति अशी आचरटपणाची कृति झाली. केवळ पाप झालें—आपण आणि नेटिवांच्या बरोबर एका भाड्याच्या गाडींत बसावें, इतकेंच नव्हे तर त्याला इस्पितळांत घेऊन जावें, यासारखें अब्रह्मण्य—नव्हे, अनांग्लोइंडिअण्य—दुसरें कोणचेंच नव्हे. वाइल्डसाहेबांची मर्जी अगदीं गेली. परंतु करणार काय ? त्यांत आणखी फेअरब्रेनचा व त्याचा संबंध असा पडला, कीं कांहीं अधिक बोलणें शक्यच नव्हतें. ( हा संबंध काय हें वाचकांस पुढें कळेलच. ) शेवटीं फेअरब्रेन ऐकत नाहीं असें पाहतांच वाइल्ड त्याच्याजवळ जाऊन त्यास म्हणतो, " तुला जायचं तर या गाडींत तरी चल माझ्याबरोबर. त्या गाडींत बसून जाण्यांत काय विशेष आहे ? मी येतों तुझ्याबरोबर, खरोखर तुला जाण्याची मुळींच जरूरी नाहीं, पण जायचंच असा हट्ट असला, तर..."

" वाइल्ड, जो क्षण जातो आहे, तो या गरीब पोराच्या जीविताला महत्वाचा आहे, उगीच वाद घालीत बसूं नकोस. तुझं माझं या कामांत पटायचं नाहीं. आतां याच्याबरोबर जाऊन याची व्यवस्था लावणं तर काय, परंतु हा बरा होऊन पुनः पहिल्याप्रमाणं वागडूं लागेपर्यंत त्याची काळजी वाहाणं माझं काम आहे असं मी समजतों, आणखी त्याप्रमाणं मी करणार. तूं विनाकारण आपल्या मनाला त्रास करून घेऊं नकोस. जा तूं आतां क्लबांत. बेसी तिथं येऊन तुझी वाट पाहात असेल."

" *Mind*, *mind*, George, I warn you, you will be a fool for your pains ! " वाइल्डसाहेबानें त्यास अत्यंत त्रासानें बजावलें, परंतु फेअरब्रेननें " O thank you ! " इतकेंच म्हणून गाडीवाल्यास हिंदुस्थानींत ' चल हांक, इस्पितळांत घे. ' असें सांगितलें. गाडीवाल्यानें लागलीच त्याप्रमाणें केलें; आणि वाइल्डही त्यास वेडा, नादिष्ट, मूर्ख अशा उत्तम उत्तम शिव्या देत त्या डाककार्टवर बसून तेथून चालता झाला.

फेअरब्रेन गाडींत बसून सीताराम व वारी या दोघांची समजूत घालीत होता, व सखारामास यत्किंचितही त्रास होऊं नये म्हणून आपल्याकडून त्याच्या अंगावरून हात फिरवून, त्याच्या डोक्यावर हात ठेवून शुद्धीवर आला कीं काय, हें पाहण्यासाठीं तीन तीनदां त्याला हांका

मारून पाहात असे. झाल्या अपघाताबद्दल त्यास खरोखर वाईट वाटत होतें. इतकेंच नव्हे तर हा पोरगा मेला बिला, तर त्याचें पाप आपल्या माथीं येणार असें मनांत येऊन त्याचें काळीज चर्र होई. गाडींतून जातांना त्यानें सीतारामाकडून त्याची व त्याच्या कुटुंबाची माहिती विचारली; आणि सीतारामानें आपल्या मोडक्या तोडक्या इंग्रजीनें साहेबांस ती हकीकत सांगितली; तेव्हां तर त्यास फारच वाईट वाटलें. आपण एका अनाथ विधवेच्या लहान मुलाला अशा स्थितीला आणलें, न जाणों तो जर कदाचित् जगला नाहीं, तर आपण तिला केवढ्या थोरल्या दुःखांत ढकलण्याला कारण झालों ? असें त्याच्या मनांत वारंवार येत होतें. इस्पितळांत राहणें ह्मणजे हिंदुलोकांना किती वाईट वाटतें हेंही त्याला ठाऊक नव्हतें असें नाहीं. परंतु सखारामाची स्थिति अशी होती कीं, त्याला इस्पितळांतच ठेवणें जरूर होतें. इतर ठिकाणीं त्याची शुश्रूषा राहणें शक्य नव्हतें. मुलाची इस्पितळांत व्यवस्था लावल्याबरोबर आपणच या दोघां मुलांबरोबर यांच्या घरीं जाऊन यांच्या आईला सगळी स्थिति समजावून सांगूं असा त्यानें बेत केला. एक सुविचार दुसऱ्या सुविचारास प्रसवतो. वाइल्डसाहेब जर त्याचा तो विचार समजण्यास तेथें असते, तर त्यांनीं किती वेळां तरी "What non-sense! Are you mad George?" असें म्हटलें असतें, आणि फेअरब्रेनला वेड्यांच्या इस्पितळांत पाठविण्याबद्दल खरोखरच विचार केला असता. परंतु कोणाला काय वाटेल, आणि कोण काय म्हणेल याबद्दल विचार करणें हें फेअरब्रेनच्या गांवींही नव्हतें. त्याच्या शुद्ध अंतःकरणास जी गोष्ट करणें आपलें कर्तव्य असें पक्कें वाटलें, तें तत्काळ कधीं कशालासुद्धां न भितां तो करावयाचाच. इस्पितळांत जाण्याबरोबर त्यानें तेथें असणाऱ्या हाऊससर्जनची भेट घेऊन त्याला सर्व सांगून विशेष काळजी घेण्याविषयीं बजावून आपल्या देखत ताबडतोब उपाय करावयाचे ते करवून चांगल्या एका खोलींत निजविण्याची तजवीज केली. सर्व व्यवस्था नीट झाल्यावर, त्या पोराची शुश्रूषा करण्याचें काम ज्या सिस्टरकडे आलें त्या सिस्टरलाही त्याची विशेष काळजी घेण्याविषयीं विनंति करून तो सीताराम व वारी यांस ह्मणाला, " चला, आतां मी तुमच्याबरोबर तुमच्या घरीं येतों. तुमची आई काळजी करीत असेल नव्हे ? " सीतारामाच्या मनांतून आपण तेथून हलूं नये असें होतें. सखारामाजवळ कोणी बसलें पाहिजे, त्याला एकटा टाकणें बरोबर नाहीं. आपण बसावें असें त्याला वाटून त्यानें त्याप्रमाणें फेअरब्रेनसाहेबांस सांगितलें. परंतु फेअरब्रेनसाहेब ऐकेना. तो म्हणूं लागला, " तूं घरीं चल. तुझ्याच्यानें काय शुश्रूषा होणार ? तुझी आई येईल तर उपयोग. चल, तिला ही दुःखद बातमी हळूच सांगून तिचें शांतवन केलें पाहिजे. तुझ्या घराशेजारीं कोणी इंग्रजी जाणणारा माझें बोलणें तुझ्या आईला समजून सांगेल असा आहे का ? " असें हिंदुस्थानींत विचारीत त्यानें त्याच्या पाठीवरून हात फिरविला, आणि वारीलाही " चांगले मुली, मी मोठा वाईट मनुष्य तुला वाटत असेन नाहीं ? तुझ्या आवडत्या लहान भावाला गाडीखालीं चिरडला तो ? अं ? " असें विचारीत तिला त्यानें कुरवाळलें.

परंतु त्या बिचारीला कांहींसुद्धां समजलें नाहीं. त्याच्या कुरवाळण्यावरून व हंसण्यावरून तो कांहीं तरी चांगलें बोलतो आहे एवढेंच वाटलें असेल. अर्थातच ती कांहींच बोलली नाहीं. ती सीतारामाकडे चोरदृष्टीनें पाहून हंसली मात्र. सीतारामास त्याचें बोलणें थोडेंबहुत समजलें, तेवढ्यावरून त्यानें त्यास " तसं कांहीं नाहीं. आपण काय त्यांत केलं ? गाडी हांकायला अन् तो मधेंच यायला एक गांठ पडली. त्याला आपण काय करणार ? " असें मोठ्या सरळपणानें पण अदबीनें ह्मटलें. सीतारामाच्या आतांपर्यंतच्या वर्तनावरून व बोलण्याचालण्यावरून हा पोरगा फार हुषार व समजूतदार आहे, अशी त्याची खात्री झाली आणि इस्पितळांत राहण्याविषयीं त्यानें आपली तयारी व बेत उच्चारून दाखविला तेव्हां तर त्याच्याविषयीं फारच चांगलें मत झालें.

इकडे संध्याकाळीं पांच साडेपांच झाले असतील नसतील तोंच राधाबाई आणि सगुणाबाई दोघीही मुलें अजून कां आलीं नाहींत याजबद्दल काळजी करूं लागल्या. राधाबाईनें आपल्या मनास किती जरी " परमेश्वर राखणारा आहे, आपण उगीच काळजी वाहावी मात्र " असें म्हणून समाधान मानून घेतलें, तरी आईचें हृदय तें, तें काय स्वस्थ बसतें ? जों जों एक क्षण अधिक अधिक जाऊन दिवसाचा प्रकाश कमी कमी होत चालला तों तों काळजीचा एक एक वेढा जास्त जास्त बसत जाऊन काळजास पीळ पडत चालला. ती घरांतल्या घरांत इकडून तिकडे येरझारा घालूं लागली. तिला मुळींच कांहीं काम सुचेनासें झालें. रस्त्यांतल्या दारांत जाऊन उभें राहावें असें चारदां तिच्या मनांत आलें. परंतु रस्त्याच्या दारांत अशा हीन स्थितींत उभें राहणें हें विनाकारण जगाच्या टीकेस कारण दिल्यासारखें होईल, असें बिचारीच्या मनास वाटून तिनें तो विचार तितकाच ठेविला. मात्र तिची काळजी अशी अतिरेकाला गेली कीं तिला मर्यादाच नाहीं. सगुणाबाईच्या मनाला लागलेली काळजी कमी होती असें नाहीं, पण ती काळजी करण्याच्या बरोबर तिला आणखीही एक उद्योग होता. तो हा कीं, मागला पुढला विचार न करितां मिन्याएवढ्या मुलांना स्वतंत्रपणानें, एकट्यांना, इतक्या लांब, शर्यती पाहण्याला पाठवलीं कशीं, याबद्दल राधाबाईस नानाप्रकारांनीं बोलावयाचें. एखादें मूल कोठें तरी पडलें, ह्मणजे त्याला तशा तऱ्हेनें पडण्याबद्दल एक रपाटा द्यावयाचाही जी एक आर्यांची रीत आहे तिला अनुसरूनच सगुणाबाईचें वर्तन होतें. राधाबाईला एक चूक झाल्या गोष्टीबद्दल दुःख वाटतच होतें, आणि त्यांत आईसाहेबांच्या शब्दांचा भडिमार. तथापि तिकडे राधाबाईचें लक्ष्य जाण्याजोगी मनाची स्थिति नव्हतीच. तिचें तनमनधन एकसारखें त्या मुलांकडे लागलें होतें. जरा कोठें लहान मुलांचा शब्द कानीं पडला, कीं " आलीं मुलें " असें वाटून तिनें पुढें जावें; परंतु लागलीच दुसऱ्या क्षणीं हिरमोड व्हावा असें चांगले सहा वाजून जाईपर्यंत चाललें होतें. सहा वाजले. तिन्हीसांजा झाल्या, घरांत दिवा लावल्याखेरीज दिसण्यास मारामार पडूं लागली, आणि इकडे सगुणाबाईचीं अनिष्ट भविष्यें‌ही त्यांत सुरू झालीं. " मला वाटलंच होतं असं हें होणारच. कुठं तरी वाट चुकलीं पोरं. नाहीं तर गाडीखालीं सांपडलीं. त्याच्याखेरीज दुसरं

कांहीं मला दिसत नाहीं. पण असं जर कांहीं झालं असलं, तर अप्पानं तरी मेल्यानं यावं कीं नाहीं धांवत काय झालं तें सांगायला ! पण तोच जर गाडीखालीं सांपडला असला, तर या पोरांना वाट तरी कुठून सांपडणार ? तेंच तें. दुसरं कांहीं मला दिसत नाहीं. ''

हें कल्पनाचित्र आईच्या तोंडून वठलेलें डोळ्यांसमोर उभें राहतांच राधाबाईचा धीर पार सुटला, ती इकडून तिकडे तिकडून इकडे खेपा घालीत होती तें साडून आतां अगदीं कोणच्याही तऱ्हेची शंका मतांत न धरतां दारांत जाऊन उभी राहिली. तिच्या डोळ्यांला पाणी आलें. कांहीं ना कांहीं तरी विलक्षण विघ्न आलें, कांहीं तरी दगा झाला, अपघात झाला ह्मणूनच मुलें अजून आलीं नाहींत असें तिच्या मनास पक्कें वाटलें. आणि काय करूं आणि काय न करूं असें होऊन गेलें. बिचारीच्या जिवाची तळमळ किती उडाली असेल याची कल्पना एक आयांनींच करावी. दारांत नुसतें उभें राहून तिचें समाधान होईना. तिचें घर बोळांत होतें, तेथून हमरस्ता सुमारें दोनशें पावलें होता. त्या बोळाच्या टोंकाशीं जाऊन उभें राहावें असें तिच्या मनांत आलें, आणि त्याहीप्रमाणें तिनें आतां कशाचीही दिक्कत न बाळगतां केलें. तिचें सर्व चित्त आतां आपल्या मुलांकडे लागलें होतें. त्यामुळें दुसरें कोणी काय ह्मणेल याचें भानही राहिलें नाहीं. बोळाच्या तोंडाशीं उभी राहून ती एकसारखी इकडे तिकडे पाहात होती. ही बाई कोणाची वाट पाहाते आहे कीं कांहीं ठरलेल्या संकेतानें उभी आहे अशाविषयीं कोणा टवाळानें आपल्या स्नेह्याजवळ टवाळकी केली, पण तिच्या तें गांवींही नाहीं. आतां अगदीं काळोख पडला. तेव्हां मात्र तिला एकसारखें रडूं येऊं लागलें. इतक्यांत रस्त्यानें जाणाऱ्या कोणाच्या तोंडून पुढील शब्द तिच्या कानीं आले:—'' तें पोर कांहीं जगेल असं आपल्याला वाटत नाहीं. पार चाक गेलं हो ! ''

'' पण तो साहेब चांगला अं ? त्यानं उतरून पुढं येऊन त्याला उचलून इस्पितळांत नेलं. फार चांगला असला पाहिजे. ''

'' कोणा तरी ब्राह्मणाचींच आहेत मला वाटतं तीं पोरं ! काय आईबाप तरी विलक्षण म्हणायचे. आपलीं एवढालीं पोरं खुशाल जाऊं दिलीं इतक्या लांब ! ''

राधाबाई तें संभाषण अगदीं कान देऊन ऐकत होती. प्रत्येक शब्द शोषीत होती म्हटलें तरी चालेल. शेवटल्या भाषणानें तर ती अगदीं वेडावलीच आणि एकदम पुढें जाऊन त्या गृहस्थांना म्हणते, '' कोणाचीं मुलं हो ? केवढालीं होतीं ? गाडीखालीं सांपडलीं ? ''

त्या तिच्या विचारण्याच्या पद्धतीनें व घाबरल्या आवाजानें ते गृहस्थ चट्कन थांबले. या बाईचा त्या मुलांशीं कांहीं तरी संबंध असावा—निदान हिचींही मुलें अशींच कोठें तरी गेलीं असावीं, असें त्यांना वाटलें; आणि त्यांनीं तिला त्रोटक त्रोटक हकीकत सांगितली. त्यांच्या एकंदर सांगण्यानें तिच्या मनाची अशी पक्की खात्री झाली कीं, आपलाच पोरगा गाडीखालीं सांपडून मेला आणि त्यास इस्पितळांत नेलें. साहेबांच्या चांगुलपणाची गोष्ट तो गृहस्थ सांगतां सांगतांच ती एकदम तडक तेथून निघाली आणि इस्पितळाच्या वाटेला जावें म्हणून धांवत

सुटली. ज्याप्रमाणें नीट असतां असतां एखाद्याला वेडाची पहिली लहर यावी, आणि त्यानें आपण अस्ताव्यस्त आहोंत किंवा काय, याचें भान न राहून पळत सुटावें, त्याचप्रमाणें हुबेहूब तिची अवस्था झाली. तिनें धूम ठोकली,असें ह्मटलें तरी-सुद्धां अतिशयोक्ति होणार नाहीं. तिचा पदर, तिचे केंस, यांचें तिला भान राहि-लेंच नाहीं. इस्पितळांतलें आणि आपलें अंतर कमी कसें होईल याच्या विचाराकडे तिचें एकचित्त लागून ती चालली होती. घरीं आईला सांगावें किंवा दुसऱ्या कोणास बरोबर घ्यावें. कोणीकडे आपण चुकूं. कांहीं म्हटल्या कांहींसुद्धां तिच्या मनांत विचार आला नाहीं. नवरा वारला, संपत्ति गेली, तरी आपलीं मुलें आहेत त्यांच्या जिवावर आपण वाटेल तसे दिवस काढूं, असें तिच्या मनाला नेहमीं वाटून ती समाधानांत असे. आणि आज त्या मुलांवर आकाशाची कुऱ्हाड पडली हें ऐक-ल्यावर मग काय ? तीं मुलेंच कायतीं आतां तिच्या जीवास सर्वथा आधार आणि तो आधार डळमळतो असें होतांच अत्यंत नाजूक अशा तिच्या प्रेमतंतूला केवढा थोरला आघात बसला असेल ! ती साधारणतः अत्यंत भिडस्त, परंतु प्रेम-संबंधांत अत्यंत दृढ होती. तिच्या प्रेमाचा उद्रेक तिला कधींही नियंत्रित करण्याचें सामर्थ्य नसे. त्या उद्रेकासरशी ती पुढेंच चालली, परंतु इतक्यांत एका समोरून येणाऱ्या गाडींतून " आई ? " असे शब्द तिच्या कानीं पडले.

# प्रकरण १० वें.

## एक विलक्षण पत्र.

मागील प्रकरणांत सांगितलेली हकी-कत घडली तेच दिवशीं, किंबहुना राधा-बाई इस्पितळाकडे धांवत होती त्याच वेळीं चिंतोपंतदादा आपल्या दिवाणखा-न्यांत सचिंत असे बसले होते, त्यांची प्रेमळ पत्नी आपल्या नातेवाइकांकडे कांहीं कामानिमित्त म्हणून गेली होती. चिंतो-पंतापुढें एक मोडी लिहिलेलें पत्र उघडेंच पडलें होतें. त्या पत्रांतील मजकूर वाचू-नच स्वारी इतकी चिंतातुर झाली असावी असें दिसलें. कारण तीनतीनदां कपाळाला आंठ्या घालून, डोकें व तोंड चोळून त्या पत्रांतील मजकूर स्वारी पुनः पुनः वाची व पत्र खालीं टाकून विचार करीत मागें तक्यावर पडे. नंतर एकदम उठून इकडून तिकडे हिंडे व खिडकींत जाऊन उभें राहून शून्यदृष्टीनें इकडे तिकडे पाही. त्या पत्रामुळेंच त्यास आतांची ही चिंतातुरता आली असावी, असें ह्मणण्यास आणखी एक कारण—

आणि तेंही चांगलें सबळ कारण आहे. चिंतोपंतास बुलिस्नीकसाहेबांची भेट घेऊन आल्याला आज जवळजवळ पंधरा वीस दिवस झाले, इतके दिवसांत त्यांच्या चर्येवर काळजीची कळा यत्किंचित् सुद्धां दिसली नाहीं; इतकेंच नाहीं तर सर्व पंधरवडा मोठ्या आनंदांत गेला. पहिले पांच सात दिवस बुलिस्नीकसाहेबांनीं काय अभिवचनें दिलीं, आणि किती आदरानें बोलाविलें याबद्दल गप्पा सांगण्यांतच गेले. साहेबांनीं नजराणे पाहण्याबरोबर काय खुबीचे उद्गार काढले ! नंतर आपण त्यांची मनधरणी कशी केली, मग त्यांनीं आपल्याला खूपखाबादेस कोणची जागा देण्याचें बोलून दाखविलें, परंतु आपण तें कसें नाकारलें आणि दुसरी जागा कोणची मागितली, इत्यादि गोष्टी वारंवार वारंवार त्याच त्या, त्याच त्या, आपल्या पत्नीस त्यांनीं कितीदां सांगितल्या असतील, आणि त्यांच्या पत्नीनें त्यांविषयीं कितीदां पुनः पुनः विचारपूस केली असेल, ती त्यांची त्यांसच ठाऊक. त्याचप्रमाणें "मी इतकी तुमच्या पाठीस लागलें, ह्मणूनच हा प्रसंग आला, नाहीं तर कधींसुद्धां आला नसता. तुम्ही असेच स्वस्थ माशा मारीत बसलां असतां." असे उद्गार सरस्वतीबाईच्या तोंडून कमींत कमी रोज दहा वेळां तरी निघाले असतील.

यप्रमाणें सुमारें पंधरा दिवस गेल्यानंतर पुढले सुमारें सात आठ दिवस आतां बुलिस्नीकसाहेबांनीं कबूल केलेल्या झणझणपूरच्या संस्थानांत सुभेदारीच्या जागीं जावयाचें, तेव्हां काय काय लवाजमा न्यावयाचा, आणि इकडली व्यवस्था काय करावयाची या विचारांत—अर्थात् भावी अत्यानंदाच्या विचारांत—चालले होते. तेथें आपणांस अमुक मिळेलच, तेव्हां तें घेण्याची जरूरी नाहीं, आणि अमुक अमुक जिन्नस मिळाले नाहींत, तरी आपल्याला मागून म्हणून आणण्यास कांहीं चिंता नाहीं, सबब तेंही घेण्याची अवश्यकता नाहीं, असाच विचार चालला होता. केवळ आपला बडेजाव नीट व्हावा, आपण कोणीकडले तरी कोंकणचे भिकार भटजी आलों नाहीं; मूळचे गर्भश्रीमंत, केवळ मानाची गोष्ट कांहीं तरी असावी, ह्मणूनच नोकरी करण्यासाठीं आलों असें जगास दिसावें, आणि त्याप्रमाणें सर्वतोमुखीं व्हावें, एवढ्याकरितां काय आवश्यक असतील ते पदार्थ घ्यावयाचे असा मनांतील हेतु होता. सरस्वतीबाईचा कांहीं एव्हांच जाण्याचा हेतु नव्हता. चिंतोपंताची इच्छा होती कीं, तिनें आपल्याबरोबर यावें, परंतु त्याच्या बिचाऱ्याच्या नुसत्या इच्छेला तादृश किंमत काय ? सरस्वतीबाईची इच्छा ही, कीं अगदीं कायमची जागा होऊन एकंदर सुभेदारीणबाईचा थाट जमणार असें नक्की झालें, ह्मणजे मग नवऱ्यानें दोन पट्टेवाले, एकदोन शागीर्द असे पाठवावे, आणि मग आपण एक कुळंबीण, एक ब्राह्मणाची बाई वगैरे मंडळी घेऊन थोरल्या क्लासांतून जावें. आतां नवऱ्याबरोबर जाऊन सगळी जुळवाजुळवी करण्यांतच आपला थाट कोणीकडच्या कोणीकडे जाईल. तेव्हां तसें न करतां, आपण मागून थाटानें जाऊन संसार थाटूं. तोंपर्यंत इथेंच राहून इकडली शेतजमीन घरेंदारें आहेत, त्यांची व्यवस्था नीट लावावी. इकडली एकंदर व्यवस्था कोणा तरी विश्वासू मनुष्याच्या स्वाधीन केल्याखेरीज आपण आपला पाय येथून काढला, आणि सासूनें कांहीं तरी घोंटाळा करून सगळें हस्तगत करून

घेतलें तर ! तिला अजून असें वाटे कीं, न जाणों, आपण येथून जर इतक्यांतच निघून गेलों तर तीं माणसें घरांत येऊन राहायचीं. त्यापेक्षां आपल्या देखत दोन्हीही घरांत चांगले भक्कम भाडेकरी आणून ठेवून आणि शेताभाताचीही व्यवस्था पाहण्यास एक पक्का आपला माणूस नेमून मग आपण येथून जावें. चिंतोपंताची इच्छा कीं, तिनें आपल्या-बरोबर ताबडतोबच चलावें. परंतु सरूबा-ईनीं नुकतेंच चार घटकांपूर्वी—बाहेर नाते-वाइकांकडे जाण्यापूर्वी साफ ह्मटलें: " तुह्मी उगीच मी सांगतें तसं ऐकाहो. तुह्मांला नाहीं मागला पुढला पोंच. आपलं मी सांगतें तसं मुकाट्यानं सगळं ऐकत जावं, तें टाकलंन् म्हणे आतां तूंय चल बरोबर माझ्या ! बरोबर येऊन काय करायचं आहे ? चार दिवस पुढं चला, ब्राह्मण शागीर्द आहेतच, जेवणाखाणाची सोय झाली असली म्हणजे झालं. आणखी काय पाहिजे. अगदीं आठ पंधरा दिवस निघत नाहींत वाटतं माझ्यावांचून ? "

इतकें जबर व्याख्यान झाल्यानंतर मग आणखी काय पाहिजे ? चिंतो-पंतांनीं तोंच—सध्या एकटें जाण्याचा—विचार कायम केला; करावाच लागला. आणि त्याप्रमाणें तयारी चालली होती. इकडे सरस्वतीबाई आपल्या मनांत आतां आपल्या शेतांची व घरादारांची काय व्यवस्था करावी, कोणाला त्यांची देखरेख करण्यास नेमावें याबद्दल अगदीं खूप खूप विचार करीत होती. होतां होतां अण्णांच्या घरांत आलेल्या तिच्या भावा-जवळ तिनें गोष्ट काढली. नरसोपंतानें सांगितलें, " आपल्याला तर कांहीं खेड्यापाड्यांकडे जाऊन शेतवाडीच्या मागें लागणं शक्य नाहीं, आणि राहत्या घराची व्यवस्था पाहाणं तरी नेहमींच कांहीं शक्य नाहीं, कारण आपण चाक-रीच्या निमित्तानं नेहमीं फिरणार. आज इथं, तर उद्यां दुसरीकडे. पण आपला धाकटा भाऊ रंगू आहे, त्याला ' चाकरी वगैरे करूं नये, शेतीधंद्यांत पडावं ' अशी फार इच्छा आहे. तो काम करणारा मोठा कट्टा आहे. तेव्हां त्याला बोलावून आणूं पाहिजे तर. " सरूबाईस पटलें. आप-ल्यापैकीं माणूस असला, म्हणजे तो सासूला बधावयाचा नाहीं, आणि आपलें पक्कें हित पाहील असें तिच्या मनानें घेतलें, आणि त्याप्रमाणें आपली चतुरस्र-पणाची निवड तिनें चिंतोपंतास कळवि-लीही. परंतु कांहीं एका अज्ञात कारणा-मुळें चिंतोपंतास ती निवड बिलकुल पसंत पडली नाहीं. त्यानें तिला सांगितलें कीं, " जोंपर्यंत आपला जुना कारकून गुंडोपंत काम करायला आहे, तोंपर्यंत दुसऱ्या कोणालासुद्धां ठेवण्याच कारण नाहीं. त्याला काढल्यानं राग येईलच, पण त्याला ठेवून दुसरा कोणी त्याच्यावर देखरेख करण्यास म्हणून ठेवला, तर फारच राग येईल. तेव्हां विनाकारण त्याला राग आणण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. रंग्या काय कालचा पोर, त्याला या एकंदर गोष्टींत काय समजणार ? गुंडो-पंत आज कांहीं नाहीं तरी आमच्या घरीं वीस बावीस वर्षं काम करतो आहे. "

झालें, सगळें बिनसलें. चिंतोपंतानें नाहीं म्हटलें एवढ्यानेंच बिनसलें. " आपण म्हणतां, तीच व्यवस्था करणं अगदीं अत्यंत आवश्यक, ती केली तरच आपलं तारण, गुंडोपंत लुच्चा, तो जुना जुना ह्मणून आपण त्याच्यावर विश्वासलों तर केव्हांच फसवून जाईल; त्याला त्या बायका केव्हांच फुसलावून सगळीं शेतं

आपल्या ताब्यांत घेतील, वाडे घेतील, कोणी तरी आपलं कळकळीचं पाहिजे आणखी तें कांहीं मला रंगूखेरीज कोणी दिसत नाहीं. " असें बोलणें तिनें चालविलें. जो लहान ह्मणून आजपर्यंत रंगू तिला स्वतःला आठवलासुद्धां नव्हता, तो केवळ चिंतोपंतानें नको ह्मटला ह्मणून तिला अगदीं जरूर हवासा झाला. " त्याच्यासारखी आपली कळकळ कोणी बाळगणार नाहीं. त्याच्यासारखा मन लावून काम करणारा मिळायचा नाहीं. गुंडोपंत लुच्चा आहे, गुंडोपंतानं आजपर्यंत आपलं घर कसं भरलं आहे त्याची कल्पनासुद्धां तुह्माला नाहीं. ज्याला बारान् चौदा रुपये पगार, त्याच्या बायकोच्या न् सुनेच्या हातांत कुठं गोठन् तोडे ऐकले आहेत का ? ह्मणे त्याची इनामी शेती आहे. इनामी शेती असलेला माणूस कुठें दुसऱ्याच्या घरीं दहान् बारा रुपड्यांवारी खरडे घासायला राहील का ? छे. छे. छे. मी जर नसतें, तर तुमचं काय झालं असतं अशा या प्रसंगीं, मला कांहीं समजत नाहीं. मला वाटतं चोरांपोरांनीं सगळं लुटून नेऊन भिक्षा मागण्याची पाळी आली असती. तें कांहीं नाहीं. गुंडोपंताला काढून टाकावं आपण इथून जाण्याच्या आधीं. आपल्याकडून नसलं होत, तर माझ्याकडे लागलं मी त्याला काढून टाकतें. असलं पोकळ कध्धींसुद्धां मी सोडायची नाहीं. त्याला काढून टाकून त्याच्या जागीं रंगूला आणून सुरळीत कामं चाललेलीं पाह्यल्याखेरीज मी कांहीं इथून हलायची नाहीं. रंगूचं मीं लहानपणापासूनच धोरण पाहून ठेवलं आहे. त्याच्या परीक्षाबिरीक्षा न उतरोत मेल्या पण तो या व्यवहाराच्या कामांत मोठा दक्ष आहे. तें कांहीं नाहीं. आजच्या आज गुंडोपंताला त्याहा, कीं आह्मी तिकडे जाणार, तेव्हां आमच्या मागें एकंदर व्यवस्था पाहण्याला अशी अशी तजवीज आह्मीं केली आहे. इतकं तुमच्या जिवावरच येत असेल त्याला काढून टाकायचं, तर ह्मणा, कीं आपण रंगोपंताच्या हाताखालीं वही लिहिण्याचं वगैरे काम करावं, आपल्याला पांच रुपये मिळतील. पुष्कळ झाले पांच रुपये. कांहीं काम न करतां पांच रुपये काय थोडे झाले का काय ? " असें तिनें जोरानें हातवारे करीत म्हटलें.

चिंतोपंताला तें तसें लिहिणें आवडलें नाहीं. गुंडोपंताला कोणत्याही रीतीनें विनाकारण राग आणण्यांत तात्पर्य नाहीं. असें त्याला वाटत होतें, आणि त्या आपल्या वाटण्याप्रमाणेंच करण्याचा त्याचा दृढनिश्चय होता. बायकोची मर्जी कितीही खप्पा झाली, तरी आपण या बाबतींत आपलाच हेका चालवावयाचा असा त्यानें आपल्या मनांत तर पक्का निश्चय केला; आणि ताबडतोब बायकोला थोडेंसें सणसणीत उत्तरही दिलें. पण जिनें केव्हांच त्याचें पाणी ओळखून सोडलें, ती बायको एखादे वेळच्या उसन्या सणसणीतपणाला जुमानणार ? तिनें असें अकांडतांडव केलें कीं वा ! पण चिंतोपंतासही या वेळीं—काय कारणानें असेल तें असो—नेहमींपेक्षां बरेंच अधिक निश्चयाचें बळ आलें असलें पाहिजे, त्यानें तिला साफ सांगितलें, कीं " तुला पाहिजे तर रंगूला आपल्याबरोबर घेऊन चल.—मी आपल्याबरोबर नेतों, तिकडे त्याची उत्तम सोय करून देतों; पण एवढ्या कामांत तूं आग्रह धरूं नको. मी कांहीं गुंडोपंताला कामावरून दूर कर-

णार नाहीं. किंवा तूं सांगतेस तसं त्याला पत्र लिहिणार नाही. ''

तें सर्व तिनें ऐकून घेतलें आणि ह्या बाबतींत नवऱ्याचा कांहीं विशेष आग्रह दिसतो आहे असें पाहतांच सरस्वतीबाईनें आपला पेंच बदलला, 'नकोच ह्मणतां, तर राहिलं. तुमचें न ऐकतां कांहीं करावं असा माझा मुळींच आग्रह नाहीं. आमचा दादा त्याला पुष्कळ चाकऱ्या लावून द्यायला समर्थ आहे. जाऊं द्या. '' असें अगदीं सौम्यपणानें बोलून, आंतून तिनें नरसोपंताकडून अद्वातद्वा मजकुराचें एक लांबलचक पत्र गुंडोपंतास पाठविलें, तें पत्र गुंडोपंताचे हातीं जाऊन त्याचें उत्तर येईपर्यंत चिंतोपंतास त्याची गंधवार्ता सुद्धां नाहीं, आणि तें उत्तर आलें तें मात्र चिंतोपंताच्या नांवानें आलें. त्या पत्रांत काय असेल तें आतांच वाचकांस कळविणें शक्य नाहीं; कारण चिंतोपंत तें अतिशय लपवून लपवून वाचीत आहे. त्या पत्रांत कांहीं तरी मजकूर असा असावा कीं त्याच्या योगानें चिंतोपंताचें मन फार अस्वस्थ होण्याला सबळ कारण झालें. या प्रकरणाच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें, चिंतोपंत तें वारंवार वाचून कपाळाला आंठ्या घालून पुनः पुनः खालीं ठेवी. मात्र ठेवी तें कशाच्या तरी खालीं लपवून ठेवी, आणि कोणी येतें कीं काय याचा कानोसा घेई. एकवार त्याला असा भास झाला कीं, कोणी तरी आलें; तेव्हां तो पट्कन तें पत्र ठेविलें होतें तेथें गेला आणि तेथून काढून त्यानें आपल्या बसून लिहिण्याच्या डेस्कांत घालून ठेविलें. परंतु खरोखरी कोणीच आलें नाहीं. तेव्हां कांहीं वेळानें तें त्यानें पुनः काढलें, पुनः वाचलें आणि डोकें चोळून पुनः तें बसण्याच्या गादीखालीं घालून ठेविलें. पत्र पाहूं गेलें तर फारसें मोठें होतें असें नाहीं. पाठपोट लिहिलेला एक चतकोर होता एवढाच. पण बरेंच दाट लिहिलेलें होतें. चिंतोपंताला बुलिस्नीकसाहेबांनीं आपलें वजन खर्च करून नेमून दिलेल्या जागीं जाण्यास आतां काय तो पांच सहा दिवसांचाच अवधि होता, आणि अशा स्थितींत असा हा कांहीं तरी चिंतेचा प्रकार व्हावा हें त्यास फार वाईट वाटलें असावें. त्या पत्रानें कांहीं तरी नवीन परंतु फारच त्रासदायक अशी काळजी त्यास उत्पन्न झाली असावी हें तर खास. शेवटीं एकदां त्यानें पुनः तें पत्र वाचलें आणि त्याच्या चिंधड्या करून टाकण्यासाठीं त्यानें त्याचे दोन तुकडे केले, परंतु तितक्यांत त्याच्या मनांत काय आलें तें त्यानें तसेच ते दोन तुकडे पुनः पाकिटांत घालून ठेविले, आणि तें पाकीट आपल्या एका कपाटांत पितळेची लहानशी पेटी होती, त्या पेटींत ठेवून त्या पेटीला कुलूप लावून त्याची किल्ली आपल्या जानव्याला लावून ठेविली. इतकें केल्यानंतर त्याच्या चेहऱ्यावरची सचिंतता अजीबाद गेल्याप्रमाणें दिसली. इतकेंच नव्हे, तर त्यावर किंचित् स्मितही दिसूं लागलें. तें स्मित वाढत वाढत तो इकडून तिकडे, तिकडून इकडे दोन खेपा करून आपल्याशींच म्हणतो: '' असंच तें, चांभाराच्या देवाला खेटराची पूजाच पाहिजे. तरच तो वठणीवर येईल. तिनं लिहिलं आहे, तेंच कायम धरून त्याच्याशीं आतां वर्तन केलं पाहिजे. त्यानं यांत जें लिहिलं आहे, तेंच गुलामाच्या गळ्याशीं आणायला उलटं आपल्याला उपयोगी पडेल. तो समजतो आहे आपणच काय ते वस्ताद. पण तुझ्यासारख्या छप्पन् वस्तादांचा वस्ताद मी होऊन बसलों आहें ह्मणावं, तूं काय समजतोस ?

त्याला आतां हांकून दिल्याखेरीज गत्यंतरच नाहीं. त्याला जर का आपण वरमल्यासारखं दाखवलं, तर तो अधिकाधिक उरावर बसणार. त्यापेक्षां एक घाव न् दोन तुकडे करून टाकून गुलामाला एकदां आपला इंगा दाखवावा त्यासारखं सुख नाहीं. अगदीं आतां त्याला साफ लिहिणार, कीं तिनं जें लिहिलं तें अक्षरश: माझ्या सांगण्यावरूनच लिहिलं. आजपर्यंत आपण शिरजोरपणा केला, तो आतां यापुढें चालणार नाहीं. आपल्याला पांच रुपये दरमहा तरी आह्मी देणार ते केवळ आपण फार दिवस आमचे घरीं राह्यलां आहां म्हणून देणार. वस्तुत: इतका मान आपल्याला देण्याइतकं कांहीं आपलं वर्तन चांगलं नाहीं, आणि आज आपल्याकडून आलेलं पत्र आपल्या नाशाला कारण होणं अगर न होणं हें सर्वथा आपल्या स्वत:वर अवलंबून आहे. जरा कोणत्याही तऱ्हेनं आह्मांस राग येण्याजोगं कांहीं घडलं, तर ताबडतोब त्या पत्राचा उपयोग केला जाईल. आपण घातलेल्या धाकाची मला काडीइतकी सुद्धां भीति वाटत नाहीं. " हे व असले विचार त्याच्या मनांत येऊन क्षणोक्षणीं त्यास आनंद वाटूं लागला, आणि जों जों अधिकाधिक विचार त्याच्या मनांत येऊं लागले, तों तों त्याची चिंताग्रस्तता अगदीं नाहींशी होऊन शेवटीं आपण विनाकारण केवढ्याशा कारणानें चिंतेंत पडून आपल्या जीवास त्रास करून घेतला ! असें वाटून, आतां आपली पत्नी आली ह्मणजे तिला त्या पत्राची ओळख देऊन थट्टा करूं आणि तिला तें पत्र न दाखवितां नुसते नानाप्रकारचे धाक घालून तिची मौज करूं, असें मनांत आणून तो तिची वाट पाहात बसला.

# प्रकरण ११ वें.

## ' जगाच्या मदती । आमुच्या विभूती ॥ "



थोड्या वेळानें सरस्वतीबाईची स्वारी आली. ती येतांच त्यांना चिंतोपंतांनीं खडी ताजीम देऊन म्हटलें: " वा ! वा ! एकून तुझी तरी शिकस्त आहे बोआ ! शेवटीं तूं गुंडोपंताला पत्र लिहिलंसच अं ? नको नको म्हटलं, मला ' नाहीं ' ह्मणालीस, आणखी शेवटीं लिहिलंसच ! काय आतां म्हणावं तरी काय तुला ? त्यानं पत्राचं उत्तर लिहिलं आहेन् तें वाचलं म्हणजे समजेल काय आहे तें. त्यानं काय लिहिलं आहेन् ठाऊक तरी आहे का ? तरी मीं तुला नको नको म्हणून सांगितलं होतं, पण तूं नाहीं ऐकलंस, आतां पहा काय भयंकर प्रकार झाला आहे तो !

काय काय गोष्टी त्यानं लिहिल्या आहेत! या सगळ्या लिहील असं मला पक्कं वाटत होतं. म्हणूनच मी तुला ' त्याला चिडवूं नये ' म्हणून म्हणत होतों, पण तूं ऐकलं नाहींस, आतां त्याचा परिणाम होईल तो बघायचा, दुसरं काय? अगदीं मला वाटलं त्याबरहुकूम सगळ्या गोष्टी त्यानं लिहिल्या आहेत. ल्याहायचाच तो!"

"पण असं त्यानं लिहिलं आहेन् तरी काय मेल्यानं? मला कांहीं कळून का चुकलं नव्हतं तो कांहीं तरी असं लिहील म्हणून? मग त्याचं तें एवढं भय कशाला पाहिजे?"

"कशाला पाहिजेन् काय पाहिजे! जसं कांहीं तुला अगदीं समजत नाहीं! वेडे, अशा गोष्टी कुठं आपापसांत तरी कोणी बोलत असतं? वाटेल तें त्यानं लिहिलं, पण वेडप्याच्या असं लक्ष्यांत आलं नाहीं, कीं आपण हें पत्र नाहीं लिहीत, आपल्याला जाळून घ्यायला चिताच रचतों आहोंत, कसा सांपडला आहे पण!"

चिंतोपंताच्या मनांत आपल्या पत्नीला अगदीं भेदरवून तिची मजा पाहावयाची असें होतें, पण तें तितकेंच जिरलें. त्याला त्या पत्रावरून आपल्या हातीं गुंडोपंताची शेंडी सांपडली असें वाटून जो आनंद झाला होता, तो आपल्या पत्नीशीं केव्हां वांटून घेऊं असें होऊन तो विनोद करण्याचा विचार जेथल्या तेथेंच राहिला आणि त्यानें त्या पत्रांतील सर्व मजकूर आपल्या अर्धांगीस सांगितला. मात्र तो सांगतांना त्यानें किती वेळ तरी साशंकपणें आपल्या सभोंवार पाहिलें! दुसरे दिवशीं दोघांच्या विचारानें गुंडोपंतास धुडकावणीचें पत्र जावयाचें तें लिहिलें गेलें.

गुंडोपंतास पत्र लिहिलें त्या वेळीं जरी चिंतोपंतास अगदीं समाधान झालें असलें, तरी तें समाधान फार वेळ टिकलें नाहीं. पत्र टपालांत टाकण्यासाठीं गड्याला दिल्यापासून त्याच्या डोक्यांत त्याबद्दल कांहींना कांहीं तरी विचार चाललेच होते, आणि असें डोकें विचार करूं लागलें ह्मणजे मग काय? त्यांत वाटतील ते विचार येत असतात. त्यांना कांहीं धरबंधच नसतो. त्याप्रमाणेंच झालें. आतांपर्यंत जो कांहीं एक विचार त्याला कधीं सुचला नव्हता; किंबहुना जो विचार सुचला असता, तर त्यानें पत्र लिहून टाकण्यापूर्वीं आणखी किती तरी विचार केला असता—तो आतां सुचला, आणि तो विचार अगदीं त्याला खचवून टाकण्याजोगाच दिसला. कारण तो अगदीं फिक्का पडला व ज्या गड्याला पत्र देऊन तें टाकण्यास सांगितलें होतें, तो गेला नसेल अशा आशेवर त्यानें त्याला मोठमोठ्यानें हांका मारल्या. परंतु काय उपयोग? दुसऱ्या एका नोकरानें येऊन तो पहिला गडी केव्हांच गेला, एव्हांना पत्र टपालांत टाकून परत सुद्धां आला असेल असें सांगितलें. त्यानें तें सांगितल्याबरोबर जी स्वारीची हिरमुष्टी चर्या झाली आहे ती विचारूंच नये. गड्याला मोठमोठ्यानें कां हांका मारल्या तें पाहण्यासाठीं महामायाबाई तेव्हांच पदर सांवरीत व "एवढं काय अगदीं काम आहे? नुकतंचना त्याला गुंडोपंताचं पत्र टाकायला पाठवलं? माणसांना कांहीं पंख का आहेत? तर गेला नाहीं तों तो परत येईल? एवढं काय इतक्यांत त्याच्यावांचून अडलं?" असें विचारीत वर आल्या.

" कांहीं नाहीं, तें पत्र टाकलं नसतं तर फार बरं झालं असतं असं वाटायला लागलं ह्मणून ह्मटलं त्याला परत बोलवावं. "

" तें कां ? परत कां बोलवायचं ? विचार बदलला वाटतं ? बाई, बाई, शर्थ शर्थ झाली आतां. परत बोलावून काय करायचं ? "

" मला एक आपला विचार आला तो जर खरा असला, तर विनाकारण स्वतःच खाजवून खरूज काढून त्या माणसाला चिडवलासं होईल. आणखी मग— "

" काय ! आणखी मग काय, आणखी मग ! कसला विचारन् कसलं काय करतां ? भलतंच एखादं अहो, मोठमोठाल्या कारभाऱ्यांच्यान् दिवाणगिरीच्या जागा करायच्या त्या अशाच वाटतं ? असं भिऊन ? असं भिऊन का कुठें होतं आहे कांहीं ? मामंजींनीं इतका कारभार केला, इतका पैसा मिळवला तो कांहीं असा भिऊन भिऊन का ? मारे त्याला तंबी द्यावी. मी बायको माणूस, त्या मला त्याचं भय मुळींसुद्धां वाटत नाहीं आणखी आपल्याला वाटावं ? " इतकें ह्मणून ती अतिशय चमत्कारिक हंसली. सरस्वतीबाईनें आपल्याकडून पुष्कळ यत्न करून त्याच्या मनांत धैर्य उपजविण्याची खटपट केली, परंतु चिंतोपंताच्या मनांत धैर्य उपजलेंसें त्याच्या चर्येवरून कांहीं दिसलें नाहीं. तो आपलें पहिलेंच बोलणें तीनतीनदां बोलत होता. मग त्याला तसें करण्यास, तसें भिण्यास—तसेंच कांहीं विशेष कारण असल्यास न कळे. " तुझ्या लक्षांत नाहीं येत माझी शंका काय आहे ती, त्याला काय करायचं ? मी भितों असा मुळींच प्रकार नाहीं. मी अशा गोष्टीला भितों आहें ! पण तुला ठाऊक नाहीं काय आहे त्यांत इंगित तें. गुंडोपंत फारा दिवसांचा कारकून. त्यानं कितीक गोष्टींत दाजीसाहेबांना सुद्धां दाद लागूं दिली नाहीं—तो आपल्याला वरमेल असं वाटत नाहीं. आणखी त्यांत जर का त्याला चिडवलं तर मग काय सगळंच कांहीं चमत्कारिक होईल. ह्मणून ह्मणतों, कीं आपलं— "

" कांहीं चमत्कारिक होत नाहींन् कांहीं नाहीं. " सरस्वतीबाई निक्षून ह्मणाली. नंतर कांहीं वेळ थांबली; आणि चिंतोपंताच्या अगदीं जवळ जाऊन हलकेच म्हणते, " अहो, त्याच्या जिवाची त्याला नाहींच का कांहीं भीति ? तें नका सांगूं मला. त्या उगीच निव्वळ गप्पा आहेत. मी सांगतें तुह्मांला कीं आपलं पत्र गेलं आहे, तर त्याचं उत्तर सुद्धां आतां तो धाडायचा नाहीं. अहो, जशास तसं काम आहे असं पक्कं वाटलं कीं मग कांहीं सुद्धां होत नाहीं अशा माणसांच्या हातून. "

याही धैर्य देणाऱ्या व शहाणपणा शिकविणाऱ्या बोलण्यापासून कितपत उपयोग झाला हें खात्रीनें सांगणें मोठें कठिण आहे. तथापि एवढें मात्र झालें कीं, चिंतोबापू त्या बाबतींत पुनः कांहीं बोलले नाहींत. कांहीं दिवस गेले, पुढें चिंतोपंतास आतां बुलिस्नीकसाहेबांनीं कबूल केलेल्या नोकरीचा चार्ज घेण्यास जाण्यास तीनच दिवस राहिले. तोंपर्यंत गुंडोपंताचें मुळींच पत्र आलें नाहीं. त्यास दुसरें एक पत्र लिहून बोलाविलें होतें, तरी सुद्धां तो आला नाहीं किंवा पत्राचें उत्तरही पाठविलें नाहीं. सरस्वतीबाईनीं तर्क बांधला, कीं तो वरमून जाऊन अगदीं आतां तोंड दाखविण्याची सुद्धां त्यास भीति वाटत असावी. आपले

पत्नीचा हा इष्ट तर्क चिंतोपंतासही फार पसंत पडला आणि त्यांनीं ठरविलें कीं, आतां गुंडोपंत अगदीं मऊ आला असून रंगूला एकंदर कारभारी नेमला असतां त्याच्या हाताखालीं राहण्याचें गुंडोपंतास पटलें. रंगूला तो होता तेथून आणण्याचा ठराव होऊन त्याप्रमाणें पत्र गेलें, आणि रंगोपंत एक दिवसांत येऊन आपल्या कामाचा चार्ज घेणार अशी जिकडे तिकडे द्वाही फिरली. सरस्वतीबाईचा जाण्याचा विचार नव्हताच. आपण जावयाचें नाहीं असें त्यांनीं कधींच कायम करून टाकलें होतें. चिंतोपंत गेल्यावर घरांत कोणी असणार नाहीं आणि आतां चिंतोपंत कांहीं लवकर येणारही नाहींत तेव्हां दोघां नवराबायकोंच्या विचारानें असें ठरलें कीं, गुंडोपंतापासून एकंदर कामाची माहिती करून घेऊन त्याची जरूरी नाहीं अशी स्थिति होईपर्यंत रंगूनें घरींच रहावें. नरसोपंताकडे राहून तेथून कामापुरतें मात्र येथें येणें अगदीं गैरशिस्त दिसेल. आणि शिवाय सरस्वतीबाईला तरी एवढ्या थोरल्या घरांत पुरुषमाणसाची सोबत पाहिजेच. त्याखेरीज कसें चालणार ? अर्थातच रंगोपंताचें बिऱ्हाड चिंतोपंताच्या घरींच पडण्याचें ठरून दुसरे दिवशीं त्यांची स्वारी आलीही.

रंगोपंत सुमारें पंचवीस वर्षांच्या वयाचा असावा. त्याचें शरीर अगदीं किचकट उंच असें होतें. डोळा एक तिरळा, म्हणजे अतिशयच तिरळा. इतका कीं, तो कोणत्या वेळीं कोणत्या दिशेस पहात आहे हें समजणें ह्मणजे मोठें कठिण काम --असें कठिण कीं कांहीं विचारूं नये. रंगोपंत लहानपणीं शाळेंत जाई तेव्हां त्याच्या सोबत्यांत त्याच्या पाहण्याची दिशा बरोबर ओळखण्याबद्दल पैजा लागत ! आणि पैज कोणीं जिंकलीच तर तें केवळ यदृच्छेवर असे. जिंकणाराच्या चातुर्यावर अवलंबून नसे. कित्येक सोबती त्यास त्याबद्दल चिडवीत. त्याबद्दल त्यास शिक्षा करण्याचें रंगोपंताच्या मनांत अनेकवार येई, परंतु मनांत येणें आणि तें हातून होणें यांत किती तरी योजनांचें केव्हां केव्हां अंतर असतें. सूड घेण्याच्या कामांत रंगोपंताचें मन जितकें सशक्त असे, तितकें जर त्याचें शरीर असतें, तर आणखी काय पाहिजे होतें ! त्यानें किती मुलांचे खून पाडले असते ! पण त्या मुलांचें नशीब फार बलवत्तर आणि परमेश्वराची कृपा त्यांजवर फार जबर ह्मणूनच रंगोपंताच्या शरीरांत शक्ति नव्हती. पण तेवढ्यानें रंगोपंत नामर्दासारखे स्वस्थ बसत ह्मणाल, तर ती कल्पना मात्र अगदीं चुकीची होणार आहे. त्या मुलांना आपल्या हातून प्रत्यक्षपणें शरीरदंड करणें होत नाहीं म्हणून रंगोपंत कधीं उगीच बसला नाहीं. त्याचें शरीर जितकें क्षीण होतें, तितकें त्याचें मन सशक्त होतें. हातानें एक ठोसा मारून फार झालें तर एखाद्या मुलाचा कान किंवा नाक दुखावलें असतें, फार तर हात मोडला असता, पाय मोडला असता, पण रंगोपंत आपल्या जिभेनें असे कांहीं ठोसे देई कीं, त्यामुळें मुलांची नुसती त्रेधा उडून जाई. ते ठोसे तरी प्रत्यक्ष तोंडावर दिले जात असत असा तुमचा समज असेल, तर अगदीं चूक होणार आहे. हे सर्व ठोसे खुद्द मास्तरच्या जवळ किंवा वर्गांतल्याच कोणा तरी दांडगेश्वर मुलाजवळ चुगलीच्या रूपानें मारले जात असत. ते असे कीं, शत्रूस मास्तरकडून--प्रत्यक्ष छड्या अगर दांडगेश्वर मुलांकडून

ठोंसे बसावेत. असा एकंदर प्रकार होत असे त्यामुळें त्याचा तिट्कारा नाहीं असा वर्गांत मुलगा नव्हता. चुगल्या किंवा चहाड्या करणें एवढाच एक गुण रंगोपंताचे अंगीं होता असें नाहीं. आणखीही हातचलाखीचे वगैरे पुष्कळ गुण असत. त्या सर्वांचें वर्णन करणें येथें शक्य नाहीं.

रंगोपंताचें शिक्षण चांगलें व्हावें ह्मणून वडिलांनीं व वडील भावानें पुष्कळ उपाय केले. शरीरदंड करावा, तर मुलाची प्रकृति इतकी सुदृढ कीं, दोन चापट्या चांगल्या जोरानें भडकावल्यास तिरीमिरी येऊन पडून पाणी पिण्याचा तरी अवकाश त्याला सांपडतो, कीं आधींच गुट्ट होऊन प्राण जातो, याची ज्याला त्याला शंका यायची. पण अशी तिरीमिरी येऊन धाड्कन् अंग टाकून पडण्याची व तोंडांतून फेंस काढण्याची पुढें रंगोपंतास युक्तिच साधली. एकदां कांहीं हस्तकौशल्यांत सांपडल्यावरून मास्तरांनीं वर्गांत त्यास दोन चार झणझणावल्या, त्याबरोबर यांनीं आपली ही शेलकी युक्ति योजून मास्तरची अशी त्रेधा करून दिली कीं वा ! मास्तरला वाटलें, कीं आपल्यावर हें भयंकर अपयश येऊन आपण अंदमान बघण्याला किंवा दोन विती तात गळ्याशीं लावून घेण्याला जाणार, कांहीं राहात नाहीं. मुलाच्या तोंडावर पाणी शिंपलें. आणखी थोडेंसें तोंडांत घातलें, तर तें पुरतें जाईना. एक दोघां मुलांनीं मास्तराला सांगितलें, कीं रंग्या मोठा लुच्चा आहे, त्याला कांहीं झालें नाहीं, तो असें कितीदां करतो. पण मास्तराची खात्री होईना. शेवटीं मुलगा घोर लागल्यासारखा ओरडूं लागला, तेव्हां तर मास्तर डॉक्टर आणण्याला धांवले; पण तितक्यांत रंगोपंताचा घोर बंद झाला आणि थोड्याच अवकाशांत रंगोपंत शुद्धीवर आले. ते दिवसापासून मास्तरांनीं रंगोपंतास बोलण्याचें सोडलें आणि इकडे आईबापांनीं हा मुलगा अशक्त आहे, काय शिकेल तेवढें शिकेल, त्याला तसदी करण्यांत कांहीं अर्थ नाहीं असा विचार केला. अशा स्थितींत लोटत लोटत—कसें तें त्याचें त्यांसच ठाऊक—रंगोपंत मॅट्रिक्युलेशन परीक्षेच्या धक्क्यापर्यंत पोहोंचले आणि मग मात्र त्यांनीं शिक्षणास धक्काच दिला. कांहीं होईना, तेव्हां त्यांस असें दिसून आलें कीं, त्या इंग्रजी शिक्षणांत आणि कॉलेजांत मुळींच तात्पर्य नाहीं. कॉलेजांत जाऊन भ्रष्टाकार मात्र होतो, त्यापेक्षां परीक्षा न दिलेलेंच रहाणें फार इष्ट. धर्मभ्रष्टता तरी होत नाहीं. मॅट्रिक् परीक्षा किंवा पुढचें शिक्षण, हीं केवळ अतिशय फाजील होण्याचीं कारणें आहेत आणि त्या साधनांच्या नादीं लागण्यांत मुळींच शहाणपणा नाहीं, असे पोक्त विचार रंगोपंताच्या मनांत वागूं लागले. हे त्यांचे पोक्त विचार अर्थातच त्यांच्या वडिलांस किंवा वडील बंधूंस प्रथम प्रथम मुळींच आवडले नाहींत. त्यांनीं त्यांना सामदामादि चार उपायांपैकीं पहिल्या दोन उपायांची योजना करून अनेकवार सुचविलें, कीं इतका पोक्त विचार इतक्या अल्पवयांत शोभत नाहीं, परंतु रंगोपंतांची तशी खात्री होईना; इतकेंच नव्हे, तर जों जों वडिलांनीं हा पोक्तपणा अपरिपक्व आहे अशी त्यांची खात्री करून देण्याचा प्रयत्न करावा, तों तों रंगोपंतांची उलट खात्री होत चालली आणि त्यांनीं कांहीं दिवस—नव्हे वर्षें—केवळ वडिलांच्या आग्रहामुळें मॅट्रिक्युलेशनच्या वर्गांत काढलीं व कांहीं परीक्षेला जातों जातों ह्मणून वडिलांना

नादीं लावून काढलीं. शेवटीं परीक्षा व कॉलेजें यांतील भ्रष्टाकारामुळें त्यांचा खरोखरीच आपल्या चिरंजिवांस तिट्कारा आहे असें मनास वाटून त्यांनीं ही त्यास आग्रह करण्याचें सोडून दिलें. शिवाय त्याच्या तोंडचीं दुरुत्तरेंही ऐकण्याचा त्यांस कंटाळा आला असावा. कारण हल्लीं रंगोपंतास कोणत्याही बाबतींत वडील माणसांनीं कांहीं बोलण्याचा अवकाश, कीं रंगोपंतांनीं थोडेंबहुत उसळल्याप्रमाणें करून दुरुत्तर करावें अगर वस्कन् अंगावर यावें असें चाललें होतें; आणि असा अपमान आपल्या सुनांच्या देखत लेंकाकडून करून घ्यावा, हें म्हातारा व म्हातारी यांस बरें वाटलें नाहीं. शाळा सुटल्यानंतर रंगोपंत स्वस्थ दोन तीन वेळां अगदीं हक्कानें जेवून गांवभर हिंडत. जितक्या कांहीं सभा होतील तितक्यांना जाऊन तेथें टाळ्या वाजविण्यांत, उद्धटपणा करण्यांत, चांगल्या लोकांची हुर्रेवडी करण्यांत अगर जेथें सुधारकांविरुद्ध कांहीं करणें असेल तेथें जाऊन तें पार पाडावें या उद्योगांत, सर्व वेळ घालवावा अशा क्रमाचा त्यांनीं स्वीकार केला. आणि ज्यास एकदम तुटक उत्तर देतां येत नाहीं असें त्यास वाटेल अशा कोणी कांहीं पुढें शिकण्याच्या वगैरेंच्या बाबतींत विचारलें तर मीं संस्थानांत वकिली करणार, तेव्हां वकिलीचा अभ्यास करतों आहें असें उत्तर देत. कोणत्या संस्थानांत आपल्यास सनद मिळण्याचा संभव आहे असें विचारल्यास दक्षिणमहाराष्ट्रांतल्या ज्या संस्थानचें नांव चटकन् तोंडाशीं येईल त्या संस्थानचें नांव ठोकून देत. अशी एक नाटक कंपनी राहिली नाहीं, कीं जी शहरांत आली असतां तिकिटें देण्याघेण्याची व्यवस्था करण्यांत रंगोपंतांची त्यांस मदत मिळाली नाहीं. इतकेंच नव्हे, तर वेळ पडल्यास फरास, मशालजी, पडदे ओढणारा, मुडदे ओढणारा, इत्यादि मोठमोठाल्या पार्टींची उणीव असल्यास ती भरून काढण्यांत रंगोपंतांनीं अणुमात्र कसूर केली नाहीं. आणि हें सर्व काम ते केवळ सन्मानार्थ—दमडीची सुद्धां—अपेक्षा न करतां करीत असत. त्यांना त्यांच्या चार मित्रमंडळीस दारावरून फुकट सोडतां यावें आणि अशा रीतीनें सोडलेल्या मंडळींकडून कृतज्ञतेचे उद्गार कानीं पडावे एवढ्यांतच त्यास समाधान असे. या कामीं रंगोपंत मोठे सहनशील असत. घरीं कांहीं कारणावरून वडिलांनीं अगर मातुश्रींनीं एखादे वेळीं रागाचे शब्द उच्चारले, तर ते त्यास खपत नसत. त्याबद्दल उलट उत्तरें देऊन वडिलांचा पाणउतारा केल्याखेरीज ते राहत नसत; परंतु एखाद्या नाटककंपनीच्या मॅनेजरांनीं यांची कांहीं बाबतीवरून तासडपट्टी काढली किंबहुना धक्के मारून घालवून देण्यापर्यंत मजल आणली तरीसुद्धां कधीं ब्र काढावयाचा नाहीं, इतकेंच नव्हे, तर हंसून आपल्या अंगच्या अपरिमित सहनशीलतेचें प्रदर्शन करीत. या असल्या गुणास मूर्ख लोक "लोंचटपणा" किंवा "निलाजरेपणा" अशीं नांवें देत—रंगोपंत यास सहनशीलता व मोठेपणाचें लक्षण आहे असें म्हणत. त्याचप्रमाणें गांवांत कोणाच्याही घरीं गाणें-बजावणें असलें तर तेथें यांची मदत नसावयाची असें नाहीं. तशी मदत घ्यावयाचीच नाहीं असा निश्चयच घरच्या यजमानाचा झाला असला आणि तो निश्चय कडेपर्यंत चालवावयाचा असा त्याचा पक्का निर्धारच असला, तर रंगोपंताचा बिचाऱ्याचा इलाज काय?

परंतु जेथें ह्मणून अशा समारंभांत व्यवस्थापकाची उणीव असेल तेथें तीं अगदीं पूर्णपणें भरून काढण्यास स्वारी आपण होऊन तयार. चार दोन अनुयायी लागले तरी सुद्धां तयारी. "जगाच्या मदती । आमुच्या विभूती ॥" असा तुकारामाच्या अभंगाचा थोडासा बदल करून ऐके वेळीं एका फाजलानें रंगोपंताची थट्टा केली होती, पण अभंग खरोखरीच आपल्या ठायीं योग्य आहे असें वाटून स्वारींनीं तो पाठ करून वारंवार ह्मणण्याचा पाठ ठेवला. ज्याला कोणाला मदत करायची असेल, तो विनोदांत व खुषींत आला ह्मणजे आपण होऊनच ते चरण म्हणून आपणच हंसावयाचें असा परिपाठ रंगोपंतांनीं ठेविला होता, आणि त्याप्रमाणें तेच चरण ह्मणत ह्मणत स्वारी सरस्वतीबाईच्या व त्यांच्या बंधूंच्या पाचारणावरून सरस्वतीबाईच्या इस्टेटीची व्यवस्था पाहण्यासाठीं सिद्ध होऊन आली होती. सरस्वतीबाईला ही स्वारी कशी आहे हें माहिती नव्हतें असें नाहीं, परंतु तिचें त्याच्यावर एका प्रकारचें प्रेम होतें आणि नरसोपंतांनीं तिच्या मनांत असें भरवून दिलें होतें कीं, तूं जर त्याला असा कांहीं ठराविक कामांत योजलास, तर त्याची बावचळलेली वृत्ति ताळ्यावर येण्याचा फार संभव आहे आणि सध्यां गुंडोपंताशीं टक्कर देण्यास जरा पक्क्या माणसाची जरूरी आहे, तेव्हां याचा फार उपयोग होईल. रंगोपंत आल्यानंतर त्यांनीही आपण किती शहाणे आहों आणि किती शहाणपणानें व्यवस्था करूं, याबद्दल लांबलचक भाषणें केलीं, तेव्हां सरस्वतीबाईस असें पक्कें वाटलें कीं, आपलें पुरतें काम झालें. तें कसें काय हें आतां वाचकांस पुढें कळेलच.

# प्रकरण १२ वें.

## गुंडोपंत आणि रंगोपंत.



एवंगुणविशिष्ट असे रंगोपंत होते, तथापि त्यांच्या अंगचे दोन मोठे गुण अद्यापि वाचकांस कळविले नाहींत. ते कळविले ह्मणजे त्यांचें एकंदर शील कसें काय होतें हें विशेष रीतीनें समजणार आहे. रंगोपंतांच्या अंगचा पहिला गुण हा होता, कीं त्यांच्या वाणींत रसाळता फार असे. मनुष्य कसाही संतापलेला असो, पण रंगोपंताशीं एक चार घटका त्यानें भाषण केलें, कीं रंगोपंतानें त्याजवर भुरळ घातलीच म्हणून समजावें. "रंगोपंत अगदीं वाईट मनुष्य, त्याच्याशीं व्यवहार केल्यानें आपली फसगत हटकून व्हायची" असें ज्या मनुष्यास अनुभवानें पक्कें वाटून

चुकलें असेल त्याला देखील कितीकदां त्याच्या मिठ्ठ्या भाषणानें भुरळ पडून पुनः तो रंगोपंतांच्या उपदेशाप्रमाणें वागण्याला कधीं कमी करावयाचा नाहीं. त्याप्रमाणें करतां करतां सुद्धां त्याला असें वाटावयाचें कीं हें बरें नव्हे, पण मनाची प्रवृत्ति आपली तें तसें करावें इकडे व्हावयाचीच. मोह तुटावयाचा नाहीं. रंगोपंताच्या अंगचा हा गुण नंबर एक आणि गुण नंबर दोन,—जरी नंबर दोन म्हणून मी येथें सांगत आहें, तरी त्याचा नंबर दोन कां लावावा याबद्दल माझ्या मनासच अजून कांहीं खात्रीलायक आधार मिळत नाहीं,—हा कीं आपल्याहून जे वरिष्ठ असतील, त्यांचे पाय आपल्या डोक्यावर धरायचे आणि आपले पाय आपल्या कनिष्ठांच्या डोक्यांवर हाणायचे. वरिष्ठांनीं कितीही लत्ताप्रहार केले, तरी हूं कीं चूं न करतां ते सोसून त्यांचें उट्टें आपल्या कनिष्ठांच्या डोक्यांवर काढायचें. वरिष्ठांचे वाक्प्रहार चालले असतां तो कधीं वर पाहावयाचा नाहीं, खालीं पाहावयाचा; परंतु खालीं पाहावयाचा तो इंगळासारख्या लाल डोळ्यांनीं आपल्या कनिष्ठांकडे पाहून त्यांचें भस्म करूं पहावयाचा ! ज्याप्रमाणें लोखंडाच्या दांड्यावर घणाचे घाव बसत चालले म्हणजे त्या आघातानें त्याची उष्णता वाढत जाते, त्याचप्रमाणें रंगोपंताच्या वरिष्ठाच्या जिभेचे आघात त्यांच्यावर बसले, कीं अर्थातच ते फार गरम होत, आणि तसे गरम झाले, म्हणजे तो गरमपणा हाताखालच्यांना अतोनात भोगण्यास लागावयाचा. उष्णतेच्या अंगीं हा धर्मच असतो, कीं ज्या पदार्थांत ती अधिक असेल, त्या पदार्थांतून निघून ती कमी असेल त्यांत शिरावयाची !

पुरे. आतां यापेक्षां रंगोपंताचें आणखी वर्णन देण्याची कांहीं जरूरी नाहीं. जितकें दिलें आहे तेवढ्यावरून वाचकांची बहुतकरून तृप्ति झालीच असेल, नसल्यास रंगोपंताचें बहुतेक चरित्रच त्यांस आतां वाचण्यास मिळणार आहे, तेव्हां पुढच्या आशेवर त्यांनीं थोडी कालक्रमणा करावी. केवळ " पुढच्या आशेवरतीं म्यां ती कालक्रमणा केली " असें म्हणून वाईट वाटण्यासच कारण होईल असें नाहीं.

रंगोपंत येऊन नरसोपंत, चिंतोपंत, सरस्वतीबाई, यांचें कान्फरन्स भरून रंगोपंतानें एकंदर काय काय करावयाचें याबद्दल बरीच चर्चा झाली. त्याचप्रमाणें कोण्या तऱ्हेनें वागलें पाहिजे याबद्दल त्यास प्रत्येकानें उपदेश केला. शिकण्याच्या कामीं जशी हयगय केलीस तशी या कामीं बिलकुल उपयोगी नाहीं. अशाबद्दल नरसोपंतांनीं, आणि जबाबदारीचें काम आहे, गुंडोपंतासारख्या लुच्चा माणसाच्या हाताखालीं वागायचें आहे, संभाळून राहा, असें चिंतोपंतांनीं सांगितलें. चिंतोपंतांच्या तोंडचीं पुरतीं अक्षरें बाहेर पडताहेत न पडताहेत तोंच सरस्वतीबाई ज्या उसळल्या ! " काय ? आमचा रंगू त्या मेल्याच्या हाताखालीं वागायला का आला आहे ? तेवढ्याकरितां का आपण त्याला बोलावला ! त्या मेल्याचं चांगलं नाक ठेंचलं जावं, त्याचीं सगळीं बिंगं बाहेर काढावीं, आमचं घर पोखरून आपलं भरतो आहे तें बंद करण्यासाठीं ह्मणून ना हा काळजीचा आणला ? का त्याच्या हाताखालीं आणला ? कांहीं कांहीं सुद्धां बोलायचं समजत नाहीं. भलतंच आपलं बोलून उठायचं ! काय आतां ह्मणावं ? ह्मणे त्याच्या हाताखालीं वागायचं आहे ! "

" अग तुझ्या लक्ष्यांत नाहीं आलं माझं बोलणं. सध्या गुंडोपंताला असंच वाटू द्यावं कीं, आपल्या हाताखालीं म्हणून हा दिला आहे आणखी मग.... "

" कांहीं नाहीं. त्याला साफ सांगावं कीं हा मुख्य, आणखी याच्या सांगण्याप्रमाणें त्यानं वागायचं--पण आतां तुझाला या बाबतींत बोलायचं कांहीं तरी कारण ? आतां आपलं तिकडे जाण्याच्या व्यवधानांत आपण असावं, त्या या पंचायती कशाला ? मी अगदीं खंबीर आहे गुंडोपंताचा समाचार घ्यायला आणखी त्याची खाल काढायला. एवढ्याकरितां तर मी येत नाहीं एव्हांशीं. त्यानं मेल्यानं जितकं आपल्याला लुबाडून घर भरलं आहेन् तितकं सगळं बाहेर काढीन--परत आणीन तरच मी खरी. तुह्मी जा. तुझाला कांहीं या बाबतींत कळत नाहीं. आतां मी आहे, रंगू आहेन् तो गुंड्या आहे. पाहून घेईन. कायरे रंगू ? असंच कीं नाहीं ? काय करायचं, काय नाहीं, त्याचं एकंदर बस्तान मी तुला मुळीं दोन दिवसांनीं हे गेल्यावरच सांगेन. यांच्या देखत सांगितलं कीं, हे कांहीं तरी तिसरंच त्यांत काढायचे; आणखी सगळा बेत फसायचा. तें कांहीं उपयोगी नाहीं. " असें म्हणून तिनें पुनः एकदां नवऱ्याला व्यवहारांतलें कांहीं समजत नाहीं, छक्केपंजे मुळींच नाहींत, असें म्हणून रंगोपंताचे पढवणें तितकेंच ठेविलें. चिंतोपंतास पढविण्याची अवश्यकता तिला अधिक वाटली.

वर सांगितल्या हकीकतीला सुमारें दोन तीन दिवस झाल्यानंतर चिंतोपंताचा तिकडे उत्तर हिंदुस्थानांत जाण्याचा दिवस मुक्रर झाला. सर्व तयारी जी काय व्हावयाची ती झाली, आणि आतां उद्यां दुपारीं स्वारी जाणार तर आदले दिवशीं रात्रीं सरस्वतीबाईनें चिंतोपंतास आपल्या वाक्सरस्वतीनें पुनीत केलें. एकंदर व्यवहार म्हणजे काय, आणि त्यांत मनुष्यानें किती जपून वागावें लागतें, ज्या त्या गोष्टींत आंत एक, बाहेर एक, असें किती करावें लागतें, वगैरे अनेक गोष्टी तिनें त्यास सांगितल्या. उत्तरहिंदुस्थान म्हणजे काय ह्याची तिला माहिती सासऱ्याच्या वेळीं काय एक दोन वेळां तिकडे गेली असेल तेवढ्यानेंच झालेली; परंतु कोठलेही काय, सगळे लोक लुच्चे, हा तिचा सिद्धांत कायम असल्यामुळें तोच हिंदुस्थानांतील लोकांसही पुरतेपणीं लावून त्यांच्याशीं वागतांना किती जपून, आपला हात व आपला मान राखून बोलावें वगैरे गोष्टींविषयीं तिनें उपदेश केलाच. चिंतोपंत आपल्याला कमी वस्ताद समजत असे, असें नाहीं, परंतु बायको असें वक्तृत्व करूं लागली कीं, त्याला खरोखर मोठी धन्यता वाटून आपली बायको आपल्या योग्य मिळाली असा मोठा अभिमान वाटे. रात्रीं बोलतां बोलतां सहजच त्याच्या भावंडांची गोष्ट निघाली आणि उद्यां आपण जाणार तेव्हां एकवार मातुःश्रींना आणि भावंडांना भेटून निरोप घेऊन यावें, असें त्याला वाटलें व त्याप्रमाणें त्यानें बोलून दाखविलें मात्र, मग काय विचारतां ? सरस्वतीबाईच्या जिभेचा पट्टा सुरू झाला, त्याच्या फट्काऱ्यांनीं तो बिचारा अगदीं जेरीस आला. काय करतो ? पण चोरून तरी एकदां भेटून यावें असें त्याला वाटलेंच. याचें कारण पाण्यापेक्षां रक्त घट्ट असतें, अशी जी एक इंग्रजींत म्हण आहे तें तर नसेलना ? किती झालें तरी आंतडें आपला हक्क सांगणारच त्याप्रमाणें तर नसेलना ? कदाचित् असेल. कदाचित् दुसरेंही कारण असेल.

कदाचित् त्याचा हेतु असाही असेल, कीं झाल्या गोष्टींत आपला हात बिलकुल नाहीं, आपण अगदीं शुद्ध व सरळच आहों असें जातां जातां दाखवून जावें. पण कसाही हेतु असला तरी तो साध्य झाला नाहीं. कारण आगगाडीवर जाई-पर्यंत सरस्वतीबाईची नजर त्याजवर होती आणि रंगू आल्यापासून तो एक त्याची छायाच बनून राहिला होता; न जाणो कदाचित् त्यास त्याच्या वहिणीनें ऊर्फ मालकिणीनें तसें करण्यास सांगितलें होतें, ह्मणून तो तसें करीत असेल. चिंतोपंतास स्वतंत्रता दाखवून जातां आलें नसतें असें थोडेंच आहे ? परंतु पाण्यापेक्षां रक्त घट्ट असलें, तरी तें त्याच्या संबंधांत तितकें घट्ट नव्हतें किंवा बायकोच्या भीतीचें बंधन अधिक घट्ट होतें.

चिंतोपंत गेल्यानंतर सरस्वतीबाई आणि रंगोपंत यांनीं गुंडोपंताची खोड जिरवि-ण्यासाठीं अनेक उपायांची चिंतना केली. प्रथम त्यास गांवावरून इकडे येण्याबद्दल लिहिलेंच होतें; परंतु त्या पत्रास मुळींच न जुमानतां तो आला नाहीं. जें एक चरचरीत पत्र त्यांनीं लिहिलें होतें, तें त्यानें प्रथम एकदां चोळामोळा करून दूर फेंकून दिलें; नंतर त्याचें त्यालाच कांहीं वाटून झट्कन् उचललें आणि पुनः साफ-सूफ करून व एकदां, दोनदां, तीनदां वाचून आपल्याशीं कांहीं पुटपुटत आपल्या एका अगदीं महत्वाच्या रुमालांत गुंडाळून ठेविलें. नंतर तो हंसला आणि " अरे लेंका तुझ्या बापालासुद्धां मी भीक घा-तली नाहीं, तर तुला मोजतों का ? कालचं पोर, त्या शेंबड्या पोरीच्या ना-दाला लागून मला धमकावायला पाहातो आहे ? मी अगदीं खरोखर तुझ्या बार-शाला जेवलों आहें. तूं समजतो आहेस तरी काय ? गुलामाचं काम होतं, तेव्हां कसा अगदीं भजनीं लागला होता, आण-खी आतां ? आतां अगदीं त्याला असं वाटलं आहे, कीं " झालं, " कसं काय झालं तें आतां पाहूं बरं, ही तरी एक..." येथपर्यंत त्याचा विचार चालला आहे तोंच त्याची त्या त्याच्या महत्वाच्या का-गदाच्या रुमालाकडे दृष्टि गेली, आणखी त्यांतले एक दोन तीन कागद भराभर त्यानें उचलून त्यांच्याकडे नीट पाहिलें आणि एकदम खदखदां तो हंसला. " ज-गांत जर सगळेच या मूर्खासारखे लोक असते तर मग आपणच राजे झालों नसतों काय ? हा मूर्ख आणखी ही मंडळी अतिशय सरळ. छे. छे. जगांत जर एवढे हे मूर्ख आणखी फाजील सरळ भोळे लोक नसते तर आमच्यासारख्यांची मोठी त्रेधा. परंतु परमेश्वराला सगळ्यांची काळजी. त्यांत आमच्यासारख्यांची तो कां नाहीं करणार ? ... हं एकूण आतां हे रंगोपंत ... ... काय शिंचं शेंबडं पोर. परवां लंगोटी नेसायला शिकत होतं आणखी तें आमच्यावर आतां सुप्रिटेंड होणार ? केवढं संस्थान चिंतोपंतमहाराज आणखी सरस्वतीमहाराणी सरकारचं ! कीं वा ! एवढ्या संस्थानाला एक सुप्रिटेंड, एक आमच्यासारखा पांच रुपये तनख्या-चा कारकून अवश्य पाहिजे ... " इतकें आपल्या मनाशींच बोलून गुंडोपंत आणखी एकवार हंसले आणि पुनः त्यांनीं तें चर-चरीत पत्र त्या दप्तराच्या बाहेर काढून वाचून पाहिलें. पुनः हंसले आणि तें पुनः दप्तरांत घालून ठेवून स्नानाला उठणार, तों त्यांचेकडे गांवचा एक कुणबी आला. त्याबरोबर त्यास गुंडोपंत म्हणतात " काय गुणाजी पाटील, कसं काय आहे ? आतां आजपासून तुमचे यजमान निराळे

झाले बरं का ? आम्हाला तिकडे बोलावलं आहे मावारीं नव्या यजमानांला सगळं काम समजावून द्यायला ! आतां अगदीं नवं तरतरीत राज्य. तुम्ही आम्ही ठरलों कुचकामाचे. आतां नवीन चांगले इंग्रजी शिकलेले, बाईसाहेबांचे ( आतां सरूबाईच्या मोठ्या थोरल्या बाईसाहेबं झाल्या बरं ! ) सख्खे बंधु काळजी वाहणारे असे कारभारी आले. पाहा, आतां संभाळा, नाहीं तर आपला जुना आमचा गबाळ्या कारभार समजाल, तर तसं नाहीं हो चालायचं. कारभारी पण असे करडे आले आहेत कीं बा ! त्यांचा चेहरा पाहिल्याबरोबरच तुम्ही घाबरून जाल. ठाऊक आहेत का कोण कारभारी ते ?''

गुणाजी पाटलाला बिचाऱ्याला काय ते कारभारी ठाऊक ? त्यास प्रथम गुंडोपंत आपली चेष्टाच करतो आहे असें वाटलें. परंतु नंतर अगदीं गंभीरपणानें जेव्हां गुंडोपंतानें काय नवीन प्रकार झाला होता तो सांगितला, तेव्हां त्यास तो समजला. तो समजून गुणाजी पाटलास बरें वाटलें, कीं वाईट वाटलें, कीं इसाबनीतींतील धोब्यानें आपल्या बैलास "बाबारे, माझा शत्रु येत आहे तो तुला माझ्यापासून हिसकावून नेईल, तर जरा जलद चल '' असें सांगितलें असतां त्या बैलाच्या मनांत विचार आला, तोच त्यांच्या मनांत आला, तें कांहींच सांगतां येत नाहीं. असो, गुणाजी पाटलास कळलेली बातमी सगळ्या गांवांत निदान जितकीं म्हणून चिंतोपंताचीं कुळें होतीं तितक्यांस कळण्यास मुळींच अवधि लागला नाहीं. सर्व कुळें एकामागून एक गुंडोपंताकडे येऊन त्यास बातमी विचारूं लागलीं. गुंडोपंतानें त्यांस अर्थातच इत्थंभूत वर्णन दिलें आणि रंगोपंताविषयीं त्यांचें मन जितकें बिघडवून ठेवतां येईल तितकें ठेविलें.

तिसरे दिवशीं गुंडोपंतास तावडतोब पत्रदर्शनींच निघून येण्याविषयीं खलिता आला. ह्या खलित्याचेंही गुंडोपंतास फारसें महत्व वाटलें नसावें असें दिसतें. कारण, त्यांनीं तो उघडून पाहतांच त्याजवर एकवार नजर फेंकून त्यास पूर्वींच्या खलित्याच्या जोडीस लावून ठेविलें. पुनः एक दोन दिवस गेले. पुनः एक पहिल्याहीपेक्षां चरचरीत असा खलिता आला व त्यांत "या पत्राप्रमाणें आपण उलट गाडीवर निघून आलां नाहीं, तर मी स्वतः निघून येईन आणि वर आपल्यास नोकरीवरून बडतर्फ केलें जाईल हें पक्कें समजावें. चार दिवसांचे आंत आपण इकडे येऊन हजर झालां नाहीं तर आम्हांला येऊन म्हटल्याप्रमाणें करावें लागेल. '' असा मजकूर होता. खालीं सही रंगोपंतदादांची होती. तें पत्र वाचून तर गुंडोतास हंसतां हंसतां अगदीं पुरेवाट झाली व तेंही पत्र त्यांनीं आपल्या त्या पूर्वोक्त दप्तरांत इतर पत्रांच्या जोडीला ठेवून त्यांतील मजकूर गुणाजी पाटील आदिकरून समस्त मंडळीला कळविला व आतां नवीन यजमान खास येणार, सर्वत्र मंडळींनीं त्यांचा चांगला मानमरातब राखण्यास तयार असलें पाहिजे असें सुचविलें. मग काय विचारतां ? मंडळींतही हंशा पिकला. सवड दिलेले चार दिवस तर गेले. गुंडोपंत मुळींच कोठें हलला नाहीं किंवा त्यानें पत्रही लिहिलें नाहीं. ते रंगोपंतदादांच्या येण्याची वाट पाहात बसले.

परंतु रंगोपंतदादा आले नाहींत. येतील असें गुंडोपंतास खरोखर वाटलें नव्हतेंच. सरस्वतीबाईंनीं आपल्याकडून त्यांस, पत्रांत धमकावल्याप्रमाणें खरोखरीच जा असें

अनेक वेळां बजावलें, परंतु " आणखी थोडे दिवस दम धरूं. उगीच वाई करण्यांत तात्पर्य नाहीं. सगळा कारभार आजपर्यंत तो पाहात आला आहे. गहाणखतं-खरेदी-खतं त्याच्या ताब्यांत आहेत, तेव्हां त्याला आणखी चिडवून ठेवलं, अन् त्यानं आपलीं तीं ज्या त्या कुळांच्याकडे परत केलींन् तर काय होईल ? सगळा व्यूह फुकट जाईल कीं नाहीं ? वसूल आला किती , यायचा किती ही सगळी माहिती त्याला, ती गोडीगुलाबीनं जर त्याच्याकडून काढून घेतली नाहीं, कागद्-पत्र जर आपल्या स्वाधीन करून घेतले नाहींत, तर आपल्या हातीं आहे काय ? आजपर्यंत तुमच्या नादीं लागून त्याला धमकावणीचीं पत्रं लिहिलीं हाच थोडासा वाईट प्रकार झाला. तसं नाहीं, आतां माझ्याकडे तें सगळं सोंपवा, मी त्याला वाटेल तशा रीतीनं वळवीन. तुह्मी स्वस्थ बसून मौज पाहा. " असें रंगोपंतानें तिला सांगितलें आणि प्रथमच जरी नाहीं, तरी कांहीं वेळानें विचार करतां करतां रंगो-पंताच्या बोलण्याचा सत्यपणा तिला विशेष तऱ्हेनें मनांत उतरला. मग काय विचारतां ! रंगूच्या शहाणपणाबद्दल तिची खात्रीच झाली. मात्र आपण चुकलों असें कबूल करणें तिला रास्त न वाटल्यामुळें ती ताबडतोब म्हणाली, " तूं कांहीं ह्मण, पण आजपर्यंत तशीं पत्रं आपण त्याला लिहिलीं म्हणून बरं झालं, आतां तो लव-कर फसेल, यांत बिलकुल शंका नाहीं. एकदां त्याला कळून चुकलं, कीं आपण मुळींच भीत नाहीं. आतां वाटलं तर त्याला ल्याहावं कीं ' आपण फार जुने नोकर तेव्हां आपल्याला काढून टाक-ण्याचा विचार रहित केला आहे, आणखी आपण इकडे येण्यापेक्षां तिकडे आम्हीच आल्यानं प्रत्यक्ष कुळांना भेटण्यास वगैरे बरं पडणार आहे, करितां सवड होतांच आह्मी तिकडे येतों. तोंपर्यंत वसुलाचं काम पूर्वीप्रमाणं जारीनं चालवावं. ' वेळ पडली तर त्याची मुरवत कांहीं आह्मी धरणार नाहीं हें त्याला पक्कं कळून चुकलं, आतां तो चांगला वंगेल यांत मुळींच संशय नाहीं. "

दुसरे दिवशीं त्या तऱ्हेचें पत्र गुंडो-पंतास गेलें. तेंही वाचून गुंडोपंतानें एकदां मोठ्यानें हंसून घेतलें आणि तेंही पत्र " ठीक आहे. येथपर्यंत मजल आली तेंही वावगें नाहीं. आतांच मौज आहे काय ती. गोचिडीला तोडून टाकण्या-करितां हिसकाहिसकी करतां करतां निघेना तेव्हां आतां तेलाचा प्रयोग व्हाय-चाच. " इतकें ह्मणून त्या पूर्वीच्या पत्रांत तें सामील केलें, आणि पुढें काय होतें, काय येतें याची वाट पाहात स्वारी बसली. त्यावर सुमारें पंधरा दिवस झाले. रंगोपंताकडून केवळ आदराचीं, अशीं पत्रें तीन आलीं. एका पत्रांत तर " आप-ल्याशिवाय आतां चिंतोबापूचें व सग-ळ्यांचें हित पाहणारा कोणी नाहीं. सर्वस्वी आपल्यावर भरंवसा आहे " असें लिहिलें होतें,तें वाचून गुंडोपंतास काय वाटलें असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. शेवटलें पत्र आलें तें वाचून गुंडोपंत आप-ल्याशींच ह्मणतो: " अरे, मी या पोराला अगदीं शेंबडा, कालचा असं ह्मणत होतों, परंतु तसा प्रकार दिसत नाहीं. याच्या अंगीं कांहींना कांहीं तरी विशेष दिसत आहे. अगदींच त्यांत काय अर्थ आहे ! असं म्हणून चालतां कामा नये. जाणूनच असलं पाहिजे. त्याच्या अंगीं डावपेंच दिसताहेत. आपण गैरसावध राहिलों, तर तो आपल्याला चीत करायलाही सोडा-

यचा नाहीं. लढाई करण्याचं कसब त्याला थोडंसं ठाऊक आहेसं दिसतं. पाहूं, पाहूं तर खरं कसे काय हात करतो ते !"

गुंडोपंत म्हणाला तेंच खरें. येथून पुढें गुंडोपंताची व रंगोपंताची लढाई जुंपली त्यांत रंगोपंतानें हात केले, त्यांची शिताफी गुंडोपंतासही, आश्चर्यांत पाडण्याजोगी आहे असें कबूल करावें लागलें.

# प्रकरण १३ वें.

## राधाबाई.

परंतु आतां आपण रंगोपंत व गुंडोपंत यांस एकमेकांशीं लढण्यास सोडून राधाबाईकडे वळूं. तिला वेड्याप्रमाणें रस्त्यांतून धूम ठोकतांना एका गाडीपाशीं सोडल्यास किती तरी वेळ झाला ! राधाबाईचे कान, डोळे, चित्त, सर्व कांहीं आतां अगदीं एकांततेनें आपल्या मुलांकडे लागलें होतें त्यामुळें तिला रस्त्यांत कांहींसुद्धां दिसत नव्हतें, परंतु आपल्या मुलांपैकीं एकाची हांक कानीं पडल्याबरोबर तिचें सर्व चित्त एकदम त्या गाडीकडे वळलें आणि तीही धांवतच त्या गाडीकडे वळली. सीतारामानें गाडीवाल्यास सांगून गाडी थांबविली आणि दारांतून आपलें डोकें काढून "आई, आई," म्हणून पुनः हांका मारल्या. ती गाडीजवळ आली आणि तिचें तें अश्रुमलिन मुख, त्याचप्रमाणें विखुरलेले केंस पाहतांक्षणींच फेअरब्रेनसाहेबांचें काळीज किती चर्र झालें ! साधारण साहेबलोकांप्रमाणें तो एतद्देशीयांविषयीं निर्दय नव्हता; इतकेंच नव्हे, तर त्याच्या हृदयांत सदसद्विवेकबुद्धि आणि दया हीं जागृत होतीं. हें त्याच्या आतांपर्यंतच्या वर्तनावरून वाचकांस दिसून आलेंच असेल. परंतु या प्रसंगीं त्या दीन मातेचें मुख पाहण्याबरोबर त्याच्या चेहऱ्याची जी स्थिति झाली होती, ती जर कोणीं पाहिली असती, तर तो जातीचा इंग्रज आहे असें कोणास वाटलेंच नसतें. काय बोलावें आणि काय सांगावें हें त्याचें त्याला सुचेचना. त्याला पाहतांच "अगबाई हें कोण ?" करून राधाबाई एकदम मागें झाली आणि सीतारामास कांहीं बोलणार तों सीतारामानें खालीं उतरून एकदम भराभर तिला झालेली सर्व हकीकत सांगितली. सीताराम आपल्या घाबरल्या आवाजानें ती हकीकत सांगत होता, ती इतकी जलद कीं त्याच्या तोंडून धड शब्द निघेनात, पण राधाबाईची उत्कंठा इतकी होती कीं तो याच्याहीपेक्षां झटकन् कां सांगत नाहीं असें तिला होऊन गेलें होतें आणि तो काय बोलतो, हें फेअरब्रेनसाहेब तर अगदीं चित्त लावून ऐकत होता. त्या बिचाऱ्यास एक अक्षर-

सुद्धां समजलें नाहीं. पण तो फार धोरणी व चाणाक्ष, त्यानें सीतारामाच्या व राधाबाईच्या चर्येवरून सर्व कांहीं जाणलें. आपल्याबद्दल तो पोरगा फार चांगलें बोलत असून, आपला कांहीं दोष नाहीं, आपण अतिशय काळजीपूर्वक सर्व व्यवस्था करून सखारामास इस्पितळांत नेलें आहे असें सांगत आहे, हें त्यास समजलें आणि तो एकदम गाडींतून उतरून " बाई, कुच हरकत नाहीं, छोकरा अच्छा हो जायगा. मैं देखुंगा सब. " इतकें जेमतेम रखडत बोलून शेवटीं पुढें रेटेना, तेव्हां सीतारामास आपल्या आईला समजावून सांगण्यास त्यानें सांगितलें, कीं " सखारामाची मी उत्तम व्यवस्था ठेवीन. तुम्हांला काळजी नको. तो लवकर बरा होईल. "

सीतारामानें तें सर्व सांगितलें. त्याबरोबर राधाबाई एकदम ह्मणते: " तें कांहीं असो. पण मी जाऊन राहणार त्याच्यापाशीं, तूं माझ्याबरोबर चल दुसरी गाडी करून. "

फेअरब्रेन तिचें बोलणें समजला: " अच्छा, अच्छा, तुम चलो. हम् दुसरी गाडीनें..." त्याला पुढें शब्द आठवेना परंतु त्यानें हातानें खूण करून आपले मनांतला हेतु कळविला. " तुम्ही या गाडींत जा. मी दुसऱ्या गाडींतून येईन असें ह्मणून त्या गाडीवाल्यास तिला इस्पितळांत घेऊन जाण्यास सांगितलें आणि सीतारामाला त्यानें आपण इस्पितळांत पुनः येतों म्हणून सांगितलें व तो पायींच फिरणार तों राधाबाई त्या गाडींत बसण्यास कां कूं करते आहे असें त्यास वाटलें. तेव्हां पुनः त्यानें तिला आपल्याकडून होईल तितकें साधें हिंदुस्थानी बोलून सांगितलें: " कांहीं हरकत नाहीं. तुम्ही बसा. तुह्मांला कांहीं वाटूं देऊं नका. "

साहेब, ब्राह्मणाची बाई आणि दोन ब्राह्मणाचीं मुलें रस्त्यांत उभीं राहून एकमेकांशीं बोलताहेत असा प्रसंग आजपर्यंत कधीं कोणी पाहिला नसेल, परंतु तो त्यावेळीं तेथें घडला. फेअरब्रेनला तो प्रसंग तितका विलक्षण वाटला असेल कीं नाहीं कोण जाणे; परंतु राधाबाईचें चित्त आतां किंचत्मात्र शांत झालें होतें, यामुळें तिला मात्र कसेंसेंच झालें. लोकांची किती तरी गर्दी जमली. त्याबरोबर आतां विचार करण्यांत अर्थ नाहीं असें समजून ती पटकन् गाडींत बसली, सीताराम व वारीही बसलीं आणि फेअरब्रेननें स्वतः दार लाविलें. जमलेल्या लोकांस हा एकंदर प्रकार इतका विलक्षण वाटला, कीं कित्येकांनीं आपापसांत ' हें काय, हें काय.' असें विचारून आपापसांत जीं मनाला येतील तीं उत्तरें दिलीं. तीं उत्तरें अर्थातच निंदखोर जनतेच्या नीच व कुत्सित मनाप्रमाणें कुत्सितच होतीं. कोणी ह्मणे, " ही बाई ख्रिस्ती होण्यासाठीं पळून जाते आहे आणि हा पाद्री आहे. " कोणी म्हणे, " अरे बरा पाद्री चालला आहे. उडवा गुलामाची टोपी ! द्या एक ढुस्सा पाठीमागून, मारा एक दगड. " तो पाद्री असावा अशी शंका एकानें उच्चारून दाखवितांच दुसऱ्यानें "हो, हो, त्या पत्र्याच्या गेटाजवळ मीं याला शुभवर्तमानाचा प्रसार करतांना पाहिलें खरें, एकदां मीं त्याच्याशीं वादही केला, " असें ठासून उत्तर दिलें. तितक्यांत तिसरा म्हणतो' " मग तेंच तें. ती बाई ब्राह्मणाची खचित्. आणखी ती ठाऊक आहे का ? कोणा तरी सुधारकाचं दिसतं आहे. कपाळाला कुंकू नव्हतं. अगदीं बाटायलाच

खास गेली. अरेरे ! तेव्हां नाहीं लक्षांत आलं आपल्या ! गाडी अडवून सगळा फटफजीता केला असता. " झालें. एकाहून एक तर्क निघून अगदीं पक्कें ठरलें, कीं पाद्र्यानें आज रात्रीं कोठें तरी येऊन गाडी घेऊन उभें राहण्याचें ठरविलें होतें. आणि एक चांगली ब्राह्मणाची बाई दोन मुलांना घेऊन येऊन त्याच्याबरोबर बाटण्यासाठीं पळून गेली. इतका इतिहास तयार होतांच राधाबाईला ओळखणाराही कोणी तरी भेटलाच आणि त्यानें कोणी तरी बाई असें होतें. तेथें चक्क नांव घेतलें. मिशनरी पाद्र्यास खूप बडविण्यासाठीं तर कित्येकांच्या जिभा लुबलुबल्या आणि हात वळले, पण झालें नसतें एकाच्यानेंही. " तो आतां गेला, नाहीं तर असा हात दाखविला असता !" असें तर कित्येकांनीं उद्गारून दाखविलें, परंतु शेवटीं फेअरब्रेन टांग्याच्या टाण्यावर येऊन टांगा करून निघून गेला, आणि ते टवाळ लोक नुसते आपल्या विचित्र मेंदूंनीं बनविलेल्या कल्पना खऱ्या गोष्टी म्हणून सांगून जिकडे तिकडे त्या नीच बातमीचा प्रसार करण्यासाठीं निघून गेले. ते दिवशीं पंचवीस तोंडांनीं पांचशें तोंडीं ती विलक्षण गप्प घातली आणि मग त्या तोंडांस आणखी किती तरी तोंडें फुटलीं.

हिंदु—त्यांतून ब्राह्मण—स्त्रीला " इस्पितळ " हा शब्द ऐकतांच काय वाटतें याची कल्पनासुद्धां इतरां कोणास येणार नाहीं. एक तर त्या ठिकाणीं अन्य जातीच्या लोकांचा स्पर्शास्पर्श होतो, आणि काय खायला घालतात आणि काय नाहीं याचा मुळींच नेम नाहीं, असा सार्वत्रिक समज. त्या ठिकाणीं असणारे नोकर, ज्यांचा ब्राह्मण लोक—किंबहुना कोणीही हिंदु सावलीसुद्धां घेऊं इच्छीत नाहीं—असले असतात आणि त्यांच्या हातून सर्व शुश्रूषा करून घ्यावी लागते. साहेब व मडमा, डाक्टर व डॉक्टरणी असून त्यांनीं तयार केलेलीं औषधें घ्यावीं लागतात, आणि उच्च प्रतीच्या जातींतल्या लोकांना बाटविण्यासाठीं फार प्रयत्न तेथें चाललेले असतात असा जिकडे तिकडे गैरसमज झालेला. यामुळें तसले लोक इस्पितळांत जाण्याला मुळींसुद्धां खुषी नसतात. बरें, तो गैरसमज दूर होण्याला मार्ग नसतो. शिवाय इस्पितळांत जाऊन बरें होणें हें हीनपणाचें काम आहे असाही समज असल्यामुळें तिकडून दुसरा अडथळा असतो. राधाबाई सर्वांसारखीच होती. तिच्याही मनांत हे सर्व अतिशयोक्त गैरसमज नव्हते असें नाहीं. परंतु सध्यांचा प्रसंग असा होता कीं, त्या समजांचें स्मरणसुद्धां तिला झालें नाहीं. तिला असें झालें होतें, कीं ही गाडी एकदां केव्हां जलदी इस्पितळाजवळ जाऊन पोंचेल आणि आपण एकदां सखारामास डोळे भरून पाहूं ! ती आपल्या बोळाच्या तोंडाशीं उभी असतां कोणी गृहस्थांनीं तिला कोणी पोरगा गाडीखालीं चिरडल्याची हकीकत सांगितली व तो जगायचा नाहीं असा उद्गार काढला. तो तिच्या मनांत एकसारखा घागत होता. सीतारामानें आपल्याकडून तिला पुष्कळ सांगितलें, कीं इतकें भिण्याचें कारण नाहीं, पण तिचें कुठलें समाधान व्हायला ? ती एकदम त्याला ह्मणाली, " तूं रिकामें माझें समाधान करूं नकोस. खरें खरें सांग. मला रस्त्यांतल्या दोघांचौघांनीं मघाशींच सांगितलं आहे कीं पोराच्या अगदीं अंगावरून गाडी गेली आहे, तो कांहीं जगत नाहीं. मग असें मला खोटें कां सांगतोस ? माझें दुर्दैव आताशीं ओढवलं आहे.

काय करायचं ? जें होईल तें खरं. हं: पोरं तरी कुठलीं लाभायला ? " असें म्हणून तिनें असा कांहीं दीर्घ उसासा टाकला, कीं जणूं काय तिचा सव प्राणच त्या उसाशाबरोबर बाहेर पडतो आहे असें भासलें. गाडी इतक्या जोरानें चालली असतां तिला असें वाटे, कीं याच्यापेक्षां किती तरी जोरानें चालावी. पण मनाचा वेग त्या भाडोत्री घोड्याच्या दुबळ्या पायांत कोठला यावयाला ?

सरते शेवटीं एकदांचें इस्पितळ गांठलें, तेव्हां तिचा जीव खालीं पडला. ती अवाढव्य इमारत पाहून ती गोंधळून गेली. जायचें कोठें ? सीतारामानें तिला एकदम जिन्यावरून चलण्याविषयीं सांगितलें, परंतु तेथेंच खालीं बसलेल्या एका शिकाऊ हास्पिटल असिस्टंटानें दरडावून " कोणीकडे चालला ? कुठें चालला ? " असें विचारलें. राधाबाईनें गयावया करून " बाबा, माझ्या पोराकडे चाललें. तेवढी मला जाऊं द्या. मला नेऊन पोंचवा. " असें म्हटलें. वास्तविक कोणालाही त्या तिच्या दीनपणाच्या बोलण्याची कींव आली असती आणि त्यानें तिला आपलें काम एकीकडे ठेऊन नेऊन पोंचविलें असतें. परंतु आजपर्यंत असे दुःखी प्राणी हजारों आलेले पाहून त्या हास्पिटल असिस्टंटाचें अंतःकरण निढावलें होतें म्हणून म्हणा किंवा जात्याच त्याचें अंतःकरण तितकें सदय नसेल म्हणून म्हणा, पण त्यानें उलट म्हटलें: " मग आम्हांला विचारल्यावांचून कोणीकडे चालला होतां ? आम्ही इथें बसलों होतों कशाला ? चला त्या तिथें पलीकडे उभ्या राहा. रात्रीची कोणाला इथें वर जायला परवानगी नाहीं. "

राधाबाईनें किती तरी प्रकारांनीं त्याच्या काकुळती केल्या, पण व्यर्थ. त्यानें तिरस्कारानें हंसून " हो, हो, ब्राह्मणाचीं माणसं तुम्ही मोठीं कांगावखोर आणखी लावची. जा. जा. आलांत तशा परत जा. तुम्हांला सोडलं तर आमच्या चाकरीवर पाणी येईल, जा उगीच कटकट करूं नका. सकाळीं या. साहेबांची परवानगी मिळवून मग वर जा." असें दरडावलें.

राधाबाईनें पुनः त्याची काकुळत केली. पण त्याची मगरुरी वाढतच चालली. त्यानें ब्राह्मणास आणखी चार शिव्या दिल्या. पण तितक्यांत फेअरब्रेनसाहेब तेथें आले, आणि त्यांनीं त्या हास्पिटल असिस्टंटाशीं थोडेंसें इंग्रजी संभाषण केलें. त्याबरोबर त्याची नवली अगदीं पालटली. " मी त्यांना आतां घेऊन जाणार होतों. सिस्टर च्यारिटी थोडी कामांत होती म्हणून थांबा ह्मणून सांगितलें. तिला विचारल्याखेरीज त्यांना वर जाऊं देतां येईना. " असें त्यानें आपल्या तोटक्या इंग्रजींत अतिशय नम्रपणानें सांगितलें, आणि सीतारामास व राधाबाईस ह्मणतो: " साहेबाला सांगूं नका बरं का मी जाऊं देत नव्हतोंन् परत जायला सांगितलं ह्मणून ! मला ठाऊक नाहीं मघाशीं साहेबांनीं मुलगा आणला त्याची आई तुम्हीं हें. नाहीं तर मी मुळींच हरकत घेतली नसती. पाहा कृपा करा. नाहीं तर उगीच माझं नुकसान होईल... " आतांचें त्याचें बोलणें आणि मघाचें बोलणें दोनही वेळच्या आवाजांत, हावभावांत, चर्येंत किती तरी फरक ! जमीनअस्मानाचा फरक ! आतांचें बोलणें इतकें हलके तो बोलत होता, कीं कांहीं कमाल ! तो आणखीही आर्जव करता परंतु तितक्यांत फेअरब्रेन-

साहेबानें त्यास " कुच हरकत नाहीं. मैं कहूंगा सिस्टर च्यारिटीको. तुम इनको लेके जाव. " असें साहेबांनीं या देशांत अगदीं साहजिक अशा ऐटीनें ह्मटलें. साहेब म्हटला म्हणजे मग त्याच्यासाठीं सगळे नियम आणि सगळ्या रूळी गडबडतात. त्याचप्रमाणें हॉस्पिटल असिस्टंटसाहेबांनीं ज्याचा एवढा बाऊ केला होता तो रूळही त्यांनीं गडबडला व ते राधाबाईस आणि मुलांस घेऊन वर गेले. जातांना त्यांनीं आपल्या मगरुरीबद्दल साहेबांजवळ कांहीं सांगूं नये अशाबद्दल पंचवीस वेळां विनविलें असेल आणि आपण मघाशीं बोललों हें केवळ गैरसमजामुळें बोललों, असें तितक्याच वेळां सांगून साहेब लोकांच्या कठोरपणाबद्दल चार शिव्या देऊन, ते क्षमा कधीं करणार नाहींत, वगैरे वगैरे चर्पटपंजरी लाविली आणि पांच सात वेळां तरी " नाहीं, नाहीं आह्मी सांगत नाहीं, " असें त्यांच्याकडून कबूल करून घेतलें. इतक्यांत ज्या ठिकाणीं सखारामास ठेविलें होतें, तेथें ती मंडळी गेली. हास्पिटल असिस्टंटानें झट्कन् दार लोटलें, तों एका नित्याच्या मंजुळ परंतु आतां कठोर आवाजानें " कोण आहे " म्हणून विचारलें. त्याबरोबर हास्पिटल असिस्टंटसाहेब भेदरल्याप्रमाणें होऊन " ओ ! बेग युअर पार्डुन, ओ बेग् यू अ पार्डुन आय् नाट् नो यू हिअ " ( क्षमा करा, क्षमा करा, आपण येथें आहांत हें मला माहिती नाहीं. ) असें म्हणून लवून सलाम केला.

त्या सलामाकडे यत्किंचित् सुद्धां लक्ष्य न देतां एक अतिशय सैल बाह्यांचा पांढरा झगा नेसलेली डोक्यावरूनही तसेंच पांढरें पदराप्रमाणें घेऊन तें घट्ट बांधलेली अशी मडम त्यास म्हणते: " रोग्याच्या खोलीचें दार अशा रीतीनें उघडायचें काय ? "

असिस्टंटसाहेब पुनः " मी नाहीं. ही मंडळी इकडे येण्याला आतुर होती यांनीं उघडलें " असें उत्तर दिलें व सीतारामाचा हात हलकेच दाबला. त्याला सुचविलें, कीं " तूं गप्प बैस. नाहीं म्हणून माझ्यावर आणूं नको. " नंतर ही या मुलाची आई त्याच्या शुश्रूषेसाठीं आली आहे, हिला इथें राहण्याची परवानगी द्यावी. असें बोलून असिस्टंटसाहेब हलकेच निसटले.

तेथें उभी असलेली ती स्त्री सिस्टर— च्यारिटी जिला विचारलें पाहिजे असें असिस्टंटसाहेब ह्मणत होते, तीच होय. तिच्याकडे पाहिल्याबरोबर राधाबाईस फार बरें वाटलें, आणि एकदम तिनें " मडमसाहेब, मला इथें राहूं द्या. मी याची शुश्रूषा करीन. नाहीं नका ह्मणूं. मी अगदीं... "

परंतु तितक्यांत फेअरब्रेनसाहेबही तेथें आले. त्यानें सिस्टर चारिटीशीं कांहीं भाषण केलें, आणि राधाबाईस आपल्या मुलाजवळ राहण्याची परवानगी मिळाली.

मुलें घरीं परत गेलीं व फेअरब्रेनसाहेबही आपल्या बंगल्यावर गेले.

---

# प्रकरण १४ वें.

## इस्पितळांत.

कांहीं स्वभाव उत्कट प्रेमळ असतात, प्रेमविकारावर त्यांचा कांहीं केल्या ताबा चालत नाहीं. त्याला आळा घालूं म्हटल्यानें त्यांस तें साधत नाहीं. तो विकार त्यांच्या वश नसतो, त्या विकाराच्या वश ते असतात. मग तें प्रेम मातापितरांविषयीं असो, मुलाविषयीं, भावाविषयीं असो, पतीविषयीं असो, पत्नीविषयीं असो, मित्राविषयीं असो, कोणत्या एखाद्या स्वीकृत कार्याविषयीं असो, किंवा सत्याविषयीं असो तें प्रेम इतकें उत्कट असतें कीं, प्रेमस्थानाचें कल्याण व्हावें, त्याचा विजय व्हावा याकरितां काय वाटेल तें दुःख सहन करण्यास किंवा साहस करण्यास किंवा अन्य मार्गानें आपला इष्ट हेतु सिद्धीस नेण्यास त्या प्रेमी माणसास अणुमात्रसुद्धां भय वाटत नाहीं. मुलानें आईबापांसाठीं, आईनें मुलासाठीं, बंधूनें बंधूसाठीं, पत्नीनें पतीसाठीं आणि पतीनें पत्नीसाठीं, मित्रानें मित्रासाठीं, सत्पुरुषांनीं स्वीकृत कार्यासाठीं आणि सत्यनिष्ठांनीं सत्यासाठीं आपल्या जिवाची परवा न करतां वाटेल तशीं साहसें केल्याचीं उदाहरणें पुराणांतरीं व इतिहासांतरीं किती तरी सांगितलीं आहेत ! प्रेम हें अंध आहे अशी म्हण आहे तिचा उपयोग बहुशः प्रेमातिरेकानें एखाद्या मनुष्याच्या हातून चुकी झाली म्हणजेच करितात. परंतु असें कां करावें, हें मला खरोखर समजत नाहीं. आई आपल्या मुलासाठीं, मूल आपल्या आईसाठीं जीव धोक्यांत घालते तें जसें केवळ प्रेमामुळें होय; त्याचप्रमाणें बुद्ध, ख्रिस्त, तुकाराम, लूथर इत्यादिकांनीं सर्वसंग परित्याग करून आपल्या मनांत वागणाऱ्या सत्याबद्दलच्या प्रेमामुळें त्याच्या दिग्विजयासाठीं आपलीं जीवितें अर्पिलीं, त्यांनीं त्यांची दिक्कत बाळगिली नाहीं. आपल्या जिवाची, कीर्तीची वगैरे कशाची सुद्धां परवा न करतां ईश्वराच्या व सत्याच्या ठिकाणीं असलेल्या प्रेमामुळें इतर सर्व विचारांस व भयांस पार दूर सारून लोकनिंदेस पायाखालीं तुडवून आपली सत्यविजयपताका फडकावीत ते प्रदेशचे प्रदेश आक्रांत करीत गेले. अशा विभूतींच्या अंगीं जी प्रेमळता असते, तीच त्यांच्या स्वीकृत कार्यांत त्यांस यशस्वी करते. त्यांस मग त्या स्वीकृत कार्यापलीकडे कांहीं दिसत नाहीं. परंतु या प्रेमाचा अंश त्या विभूतींच्या अंगीं जितका असतो, तितका प्रत्येकाच्या वांट्याला कोठून येणार ? ज्यांच्या वांट्यास जितक्या मानानें येणार, तितक्या मानानें त्यांच्या हातून स्वीकृत कार्याची सिद्धि होणार. राधाबाईच्या अंगीं अशा प्रेमाचा अंश होता आणि त्या अंशामुळें ती आजपर्यंत वागत आली, तिला स्वावलंबनाचें, सत्याचें आणि अपत्यांचें अतोनात प्रेम होतें, परंतु तिच्या प्रेमाचें मान किती होतें याचें तिलाच पुरतेपणीं ज्ञान नव्हतें

म्हटलें तरी चालेल. प्रेमाचें काय किंवा कशाचें काय, ज्ञान होण्यास तरी तसा प्रसंग लागतो. राधाबाईला या वेळीं तरी लोकापवाद, लोकभय इत्यादिकांचेंच काय, परंतु आपण येथें राहिल्यास आपली आई काय म्हणेल याचें सुद्धां कांहीं मनांत आलें नाहीं.

सखारामास पाहिल्याबरोबर तिला एकदम रडें कोसळलें आणि ती त्याच्या खाटेवर डोकें टेंकून व त्याच्या अंगावर हात टाकून मोठ्यानें रडणार, तोंच सिस्टर च्यारिटीनें मोठ्या प्रेमानें तिच्या खांद्यावर हात ठेवून आपल्या मोडक्या तोडक्या मराठींत तिला म्हटलें, " बाई, असा आक्रोश करायचा असेल, तर मी तुला इथें बसूं देणार नाहीं. मुलाचीं शुश्रूषा करण्यासाठीं आलीस कीं रडून त्याला त्रास देण्यासाठीं आलीस ? "

शब्दांनीं मनुष्याचा आशय जितक्या लवकर समजतो, त्याच्यापेक्षां ते शब्द उच्चारतांना चर्येवर दिसणाऱ्या छाया. आणि त्या वेळचे हावभाव यांनीं किती तरी लवकर अंतःकरणांतील हेतु समजतो. सिस्टर च्यारिटीनें जे शब्द उच्चारिले, ते इतके कांहीं विचित्रपणें उच्चारले होते कीं. राधाबाईस त्यांचा अर्थ समजणें शक्यच नव्हतें. परंतु तिनें ज्या प्रेमळपणानें तिच्या खांद्यावर हात ठेवला. ती बोलत असतांना तिच्या कंठांत जो किंचित् सद्गदितपणाचा लेश होता, त्यावरून ही बाई खरोखर कळकळीनेंच बोलते आहे आणि आपण आपलें दुःख आंवरून मुलाच्या जवळ बसणें हेंच आपलें कर्तव्य आहे. असें तिच्या मनास वाटून तिनें तें दुःख गिळलें व ती येथें राहिली. पुढें आठ दहा दिवस रोज दुपारीं सुमारें बारा वाजतां सीताराम इस्पितळांत येऊन बसे आणि राधाबाई घरीं जेवणास येई व दोन वाजले नाहींत तों पुनः परत जाऊन सीतारामास लावून देई. तिनें सध्या एकभुक्त ठेवलें होतें. मुलाच्या शुश्रूषेंत तिनें अणुरेणुमात्र कमी केलें नाहीं. फेअरब्रेनसाहेब रोज केव्हां तरी एकवार येऊन पाहून जाई आणि राधाबाईस उत्तेजनपर असें कांहीं बोले. सिस्टर च्यारिटी तर त्या मुलाची अतोनात काळजी घेत असे. तिचें व राधाबाईचें मन किती तरी जुळलें ! शिवाय त्या इस्पितळांत दररोज अनेक रोगी येत. त्यांचीं एकंदर दुखणीं आणि त्यांच्या आप्तेष्टांचें दुःख पाहून राधाबाईस आपल्याप्रमाणेंच आणखी किती तरी दुःखी प्राणी आहेत, आपणच आपल्याला इतकें दुःखीं व दुर्दैवी असें समजून कां शोक करीत बसावें ? असा विचार राधाबाईच्या मनांत येऊन तिचें अंतःकरण किती तरी कमी दुःखी होत असे. तिला वाटे, आपणच काय त्या या जगांत अतिशय दुर्दैवी, आपणच काय त्या दुःखी, आपल्यावरच काय तीं सर्व संकटें येऊन कोसळत आहेत, असें जें आपणांस आजपर्यंत वाटत आलें, तें व्यर्थ होय. आपल्यासारखेंच या जगांत आणखी किती तरी अधिक दुःखी प्राणी आहेत. तथापि सखारामाच्या दुखण्यांत एक दिवस उतार आणि एक दिवस चढ होई. यामुळें तिचा जीव फार घाबरे. सिस्टर च्यारिटीला दुसरीकडे काम नसलें ह्मणजे ती राधाबाईजवळ येऊन बसून समाधानाच्या व उत्तेजनाच्या गोष्टी सांगत असे आणि तिचें तें बोबडें व मिशनरी पद्धतीचें विचित्र मराठी बोलणें सगळें जरी राधाबाईस समजत नसे, तरी आतां तिला पुष्कळ संवय झाली असल्यामुळें बहुतेक अर्थ समजे आणि तें

सर्व बोलणें खरोखर कळकळीनें आलेलें असल्यामुळें तिच्या मनास खरोखर समाधानही होत असे. सिस्टर च्यारिटीविषयीं तिच्या मनांत खरीखरी पूज्यबुद्धि उत्पन्न झाली आणि ती आली असतां तिला आनंद होई. राधाबाईची एकंदर स्थिति काय होती, ती सिस्टरला सर्व कळून आली होती आणि त्यामुळें तर तिला राधाबाईविषयीं फारच कळकळ वाटूं लागली. राधाबाईचा व तिचा फार स्नेह जडला. राधाबाई वाटेल त्या वेळीं तिच्या खोलींत येऊं, जाऊं लागली.

अशा स्थितींत एके दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास सखारामाजवळ ती बसली असतां सखाराम फार अस्वस्थ झाला. आज दोन तीन दिवस तो जरा बरा होता. बरा म्हणजे काय ? डावें उजवें इतकेंच काय तें. तसें ह्मटलें तर आज किती दिवसांत तो कधीं शुद्धीवर आला नव्हता; आणि डोळे उघडून राधाबाईकडे पाहून तिला त्यानें ओळखल्याचें तर कधीं चिन्ह दाखविलें नव्हतें. त्याच्या मेंदूंत मुळींच कांहीं ताकद नव्हती. एखादे दिवशीं राधाबाईस वाटे, कीं पोरगा आपल्या हातीं लागत नाहीं आणि एखादे दिवशीं वाटे, कीं आतां त्याला कांहीं भय नाहीं. जे दिवशीं तो आपल्या त्या बेशुद्ध अवस्थेंतच अतोनात अस्वस्थता दाखवील, ते दिवशीं तिचें मनही फार अस्वस्थ होई आणि जे दिवशीं तो अगदीं निपचित पडलेला असे, ते दिवशीं राहून राहून ती त्याच्याजवळ जाऊन त्याचें मुख पाही, त्याचा श्वासोश्वास नीट चालला आहे कीं नाहीं, हें पाही. मुलगा फार अस्वस्थ असेल, ते दिवशीं तिनें कितीदां तरी डाक्तरास, औषध देणारास, “ अहो, असं कां करतो हा ? हा बरा होईल का हो ? ” असें विचारावें आणि सिस्टर च्यारिटीस तर घटकोघटकीं तसे प्रश्न करावे. आपल्या या विचारण्यानें तिला त्रास होईल, ती कदाचित् आपल्यावर संतापेल, असें तिच्या मनांतसुद्धां आलें नाहीं; आणि सिस्टर च्यारिटीनेंही तिला कधीं त्रासून उत्तरें दिलीं नाहींत.

वर सांगितलेल्या दिवशीं आवशी सखारामानें एक वेळां डोळे उघडून “ पाणी ” असा शब्द उच्चारला होता. आज कित्येक दिवसांत त्यानें शब्द उच्चारला असा आजच. यामुळें राधाबाईस किती किती तरी आनंद झाला ! आणि तिनें मनांत अशी पक्की आशा धरली कीं, पोरगा आतां जगणार. थोडेसें पाणी दिल्याबरोबर सखारामाच्या तोंडावर जो तजेला आला तो पाहतांच तर राधाबाईस इतका आनंद झाला, कीं कांहीं पुसूं नये. तिनें आपल्या मुलाच्या खोलीच्या आसपास असणाऱ्या खोल्यांत जाऊन तेथील रोग्यांस आणि शुश्रूषा करणाऱ्या माणसांस ती समाधानकारक गोष्ट सांगितली; परंतु घटकाभऱ्यानेंच त्या पोराच्या तोंडावरचा तो तजेला कोणीकडच्या कोणीकडे जाऊन तो रोजच्यापेक्षांही अधिकच अस्वस्थ झाला असून अंगाला आळेपिळे देतो आहे, असें तिला दिसलें. या आळ्यापिळ्यांचा अर्थ काय ? त्याचा श्वासोच्छ्वास फार जोरानें वाहूं लागला असा तिला भास झाला आणि पोट उडतें आहे कीं काय, म्हणून तिनें हात लावून पाहिलें; या सगळ्याचा अर्थ काय ! तिनें आजपर्यंत एक दोनच मृत्यु पाहिले होते आणि त्या वेळीं अशीं लक्षणें झालेलीं पाहिलीं होतीं. तसाच तर हा प्रकार नाहींना ? असें तिच्या मनांत येऊन

तिला एकदम रडूं कोसळलें. जों जों अधिक विचार करावा, तों तों असें वाटूं लागलें, कीं आपल्याला संशय आला तोच खरा. आतां हा पोरगा आपल्याला लाभत नाहीं असें तिला वाटलें. या वेळीं कोणाच्या तरी गळ्यांत मिठी मारून एकदां मोठ्यानें गळा काढून रडावें अशी फार इच्छा झाली; परंतु त्या ठिकाणीं म्हटल्या कोणी सुद्धां नव्हतें आणि आपण मोठ्यानें गळा काढल्यानें आजूबाजूच्या लोकांस त्रास होईल हा विचार तिच्या मनांत आला; व तिनें मोठ्या कष्टानें आपला शोक आवरला; पण तो केवळ इतक्यापुरताच दाबला गेला, कीं ती मोठ्यानें गळा काढून रडली नाहीं. तिचे हुंदके तिला आवरेनात. एवढ्यासाठीं तिनें आपला एक हात त्या खाटेच्या एका कोपऱ्यावर आडवा ठेवून त्याजवर आपलें शोकानें तापलेलें आणि दुःखद विचारानें गोंधळलेलें मस्तक ठेवून तिनें डोळ्यांतून मनमुराद पाणी गाळण्यास सुरुवात केली. मध्यरात्रींचा वेळ. जिकडे तिकडे अगदीं शांत होतें. मधून मधून आसपासच्या खोल्यांतील रोग्यांपैकीं एखाद्याचें विवळणें काय कानीं पडत असेल तेवढेंच. बाकी कोणी कुठें बोलल्याचा सुद्धां आवाज कधीं ऐकूं येत नव्हता, इतकी जिकडे तिकडे सामसूम होती. त्या खाटेच्या खुरावर आडव्या ठेवलेल्या हाताच्या कोंपराच्या बेचकेंत डोकें टेकून तिनें मनमुराद डोळ्यांतून पाणी गाळलें आणि क्षणोक्षणीं आतां पुढें काय होतें ? या श्वासाला तर हा जिवंत आहे, पुढच्या श्वासाला राहील काय ? असें करीत, मधून मधून त्याच्या नाकाशीं, तोंडाशीं, पोटावर हात ठेवून, पाय चापचून पाहून ती उसासे टाकीत होती. आणि अशा स्थितींत एकाएकीं आपली एकंदर मागली हकीकत तिच्या मनांत आली. इतरांचीं दुःखें पाहून आजपर्यंत जें आपण एकट्याच कांहीं दुःखी नाहीं असें वाटत होतें तें सर्व ती विसरून गेली. परमेश्वरानें आपल्यावर सगळ्या प्रकारचीं संकटें लादण्याचा पुरा निश्चय केलेला दिसतो आहे, असें तिच्या मनास वाटूं लागलें. घर गेलें, दार गेलें, नवरा मेला, बाप मेला, जें काय वित्त होतें, तेंही गेलें; आतां काय तीं मुलें राहिलीं, तीं सुद्धां आपल्याला देवानें लाभूं देऊं नयेत यापरतें अत्यंत दुःखाचें दुसरें काय असणार ? “ देवा नारायणा, असा मीं तुझा अपराध तरी काय केला ! असं मागल्या जन्मीं पाप तरी कोणतं केलं ? ” असले उद्गार तिच्या मनांत कितीदां उभे राहिले ! तिची अगदीं निराशा झाली आणि तिनें आतां पोराला, तीन तीनदां हात लावून चापसून पाहण्याचें सुद्धां सोडून दिलें. केवळ वर सांगितल्याप्रमाणें एक खुरावर हात आडवा टाकून कोंपराच्या बेंचकेंत तोंड खुपसून स्वस्थ रडत बसली. तिच्या मनांत नानाप्रकारचे विचार येऊं लागले. “ आज हा सखाराम जाणार. उद्यां कांहीं दिवसांनीं आणखी एखाद्या पोरावर प्रसंग येणार नाहीं ह्मणून कशावरून ? आपलं नष्टचर्यच जर ओढवलं असलं, तर एकामागून एक आपल्यावर असले प्रसंग येणार नाहींत ह्मणून कशावरून समजावं ? ” तिच्या मनानें पक्कें घेतलें कीं, आपली अशीच स्थिति होणार. आपल्या स्वतःखेरीज जितकी आपली प्रेमाची मंडळी तितक्या सगळ्यांवर गदा येणार आणि आपण करंट्या अगदीं एकट्या या जगांत राहणार. कां रहा ? असा भयंकर प्रसंग येण्याच्या अगोदर आपणच आपला अंत

क. करून घेऊं नये ? हा भयंकर प्रश्न अजूनपर्यंत कधीं तिच्या मनांत आला नव्हता. तिचा नवरा वारला, सावत्र मुलानें वाटेल तें करून आपल्याला घरांतून घालवून देऊन निर्द्रव्य केलें, बाप वारला, परंतु आपलीं मुलें आहेत, आपण नाहींशा झालों तर त्यांची काळजी कोण घेईल ? त्यांना कोण वाढवील ? तीं कोणाच्या दारीं जातील ? असले विचार मनांत वारंवार येऊन ती त्या मुलांच्यासाठीं आपला जीव धरून असे. परंतु आज आतां तिला असें वाटूं लागलें कीं, आपलीं मुलें आपणास खास लाभत नाहींत. तीं एकामागून एक आपल्यास नाहींशीं होणार त्यापेक्षां आपणच आधीं नाहींसें व्हावें. असले भयंकर विचार एकदां मनांत शिरले म्हणजे मग त्या मनाची काय अवस्था होते याची कल्पना तरी कोणास आहे काय? आत्महत्या करण्याची इच्छा हें एक भयंकर वेड आहे असें म्हणतात, तें केवळ खोटें नाहीं. तें वेडच खरें. त्या वेडानें राधाबाईस पछाडण्याची पाळी आली. या पोराचा प्राण याची कुडी सोडून गेला, कीं आपण आपलाही ठेवावयाचा नाहीं असा कृतनिश्चय करावा, असें तिच्या मनानें घेतलें आणि त्याच विचारांत ती बसली. आणखी थोडा वेळ गेला. आतां तिचें मन तिला आवरेनासें झालें आणि तिनें आतां वारंवार आपल्या पोराकडे पाहण्याचें, त्याचें अंग चापसण्याचें किंवा पोटावर हात ठेवून पोट उडतें कीं काय पाहण्याचें सोडून दिलें. त्यांत आतां कांहीं अर्थ उरला नाहीं असें तिच्या मनानें घेतलें; केवळ आपले ते भयंकर विचार आणि आपले हुंदके यांच्यांतच ती निमग्न झाली. तिला आतां कशाचीही आशा राहिली नाहीं. सीताराम जवळ असता, तर त्याला एकदां शेवटचा निरोप दिला असता. असें एकवार तिच्या मनास वाटलें आणि एकदम त्याची ती सुंदर मूर्ति—त्याचा तो मातृभक्तीनें सदा प्रफुल्लित चेहरा, त्याचे ते अभिमानी डोळे तिच्यापुढें दिसूं लागले. पण त्या चेहऱ्यानें, त्या डोळ्यांनीं तिला त्या आपल्या वेडगळ विचारांपासून परावृत्त करण्याच्या ऐवजीं उलट " तो सुद्धां आपल्याला लाभणार नाहीं.कुठला लाभायला" असें मनांत वाटण्यास लागून ती जास्तच उद्विग्न झाली. तिचे हुंदके अतोनात वाढत चालले व तिनें आपली मान जास्तीच खालीं घालून शोक चालविला.

इतक्यांत कोणी हलकेच दार उघडून आंत आलें. राधाबाईच्या मागें कांहीं वेळ उभें राहिलें. तिचे ते हुंदके ऐकून त्या व्यक्तीच्या मनास अतिशय दुःख झालें असावें दिसलें. नंतर हलकेच तिनें आपला एक हात राधाबाईच्या पाठीवर ठेविला. तो हात पडतांच राधाबाईनें चट्कन् मागें पाहिलें. पलीकडच्या टेबलावर अगदीं मंद जळत असलेल्या दिव्याचा उजेड त्या अश्रुमलिन व दुःखव्याप्त अशा चेहऱ्यावर पडला. त्या उजेडांत तो चेहरा पाहण्याबरोबर सिस्टर च्यारिटीस ( आंत हलकेच आलेली व्यक्ति सिस्टर च्यारिटीच होय. ) फारच वाईट वाटलें असावें असें दिसलें; आणि ती आतां कांहीं तरी बोलणार तोंच राधाबाई तिला एकदम किंचित् निष्ठुरपणानें ह्मणते; " सिस्टर, तुह्मी मला फसवलं. माझं पोर मला लाभत नाहीं. तो घटका दोन घटकांचा सोबती आहे. आहे. तुम्ही मला इतके दिवस उगीच, अगदीं उगीच आशा लावलीत. माझा सख्या आतां मला मिळत नाहीं. तो पहा. तो पहा आतां घटक्या दोन घटक्या भरांत मला सोडून जाईल. सांगा. मी ह्मणतें हें

खरं कीं नाहीं. मला कांहीं तरी आशा लावण्यासाठीं बोलूं नका. ''

तो तिचा दुःखावेग पाहून सिस्टरच्यानें कांहींसुद्धां बोलवलें नाहीं.

---

# प्रकरण १५ वें.

## शेवटीं ! ! !

तो देखावा विलक्षणच होता. तिच्या अंतःकरणांत प्रेम--अत्यंत गाढ प्रेम--मूर्तिमत वास करीत होतें. त्याखेरीज दुसरें कांहींच नव्हतें. ज्यांत आत्मत्वाचा अंश अत्यंत अल्प, असें जें मातृप्रेम तेंच तिची मूर्ति घेऊन बसलें होतें म्हटलें तरी चालेल. सगळ्यांत निर्मिश्र, निर्दोष, निराकांक्ष असें प्रेम मातेचें अपत्यावरील प्रेम होय. कोणत्याही प्रेमाशीं त्या प्रेमाची सर येणार नाहीं. कोणतेंही प्रेम त्या प्रेमाच्या पासंगास लागणार नाहीं. जर कोणत्या प्रेमांत अमानुष अंश--दैविक अंश--असेल तर त्यांत असतो; अशा प्रेमानें जिचें अंतःकरण सर्वथा व्यापलें होतें ती राधाबाई एका बाजूस, आपलें दुःखव्याप्त, शोकग्रस्त अंतःकरण जणूं काय मुठींत धरून आपलें अश्रुमलिन मुख वर करून ज्यांतील अश्रुजल आतां अगदीं निस्तोष झालें आहे, असे नेत्र सिस्टर च्यारिटीच्या तोंडाकडे लावून तिला उद्विग्न व कठोर शब्दांनीं बोलत आहे; आणि दुसरीकडे जिनें 'आत्म' हा शब्द विसरून जाऊन 'विश्व' हा शब्द धरिला आहे, आपलें कुटुंब सोडून विश्वच कुटुंबाच्या जागीं मानिलें आहे. आपल्या अपत्याची आकांक्षा न धरतां बालकमात्र आपलेंच अपत्य ही बुद्धि स्वीकारली आहे. जिच्या नेत्रांत अश्रु येतात ते आपल्या व्यक्तिविषयक दुःखामुळें नाहींत तर विश्वविषयक दुःखामुळें होत, जगानें केलेली निंदा, जगानें केलेली अवहेलना, जगानें केलेला मानापमान, जगाच्या दृष्टीनें मानलेलें सुखदुःख या सगळ्यांचा विसर पाडून घेऊन त्याच जगाच्या बऱ्यासाठीं झटण्याचें व्रत स्वीकारलें आहे, अशी सिस्टर च्यारिटी शांतपणें राधाबाईकडे पाहात, राधाबाईच्या दुःखानें विव्हल होऊन आपल्या प्राणव्ययानें जर हा पोरगा या बाईला लाभेल तर लाभून देऊं असा विचार मनांत करीत तटस्थपणें उभी आहे. त्या दोन्हीही मूर्ति एकाच सत्वाच्या होत्या. दोघींची अंतःकरणें एकाच विभूतीचीं, परंतु राधाबाईच्या अंतःकरणास तितकी जागृति आली नव्हती. तिला तितकें आत्मज्ञान झालें नव्हतें. त्या दोघी अगदीं भिन्न भिन्न अशा दोन राष्ट्रांतील कन्या, त्यांचे धर्म, त्यांचे आचार, त्यांचे विचार, अगदीं भिन्न, परंतु सत्त्व एक हें त्या दोघींना जणूं काय नैसर्गिकपणें समजलें. त्यांचें

त्या वेळचें—त्या दुःखप्रसंगींचें—एकमेकींकडे पाहणें म्हणजे सत्त्वपरिज्ञान होय. एक अंतःकरण दुसऱ्या अंतःकरणाशीं आपलें ऐक्य पटवून घेत होतें. अगदीं अजाणपणें एक मन दुसऱ्या मनापासून विश्वविशालता शिकत होतें. शिकविणारें मन शिकणाऱ्या मनास जणूं काय ह्मणत होतें, " बाबारे, तूं या एका अपत्याशीं आपल्याला जखडून घेतलेंस ह्मणूनच तुला इतकें दुःख होत आहे. तुझ्या दुःखाला, तुझ्या उद्वेगाला, तुझ्या प्रेमाला, तुझ्या चिंतातुरतेला पात्र अशीं अपत्यें या विश्वांत असंख्य आहेत, कितींवर प्रेम करशील तितकें थोडें आहे. कितींबरोबर शोक करशील, कितींची चिंता वाहशील, कितींची आशा धरशील, तितकीं अपत्यें लाभून घेणें, तितक्यांना सुख देणें, तितक्यांचें दुःख हलकें करणें, तुझ्या अगदीं हातचें आहे. तर मग हा व्यक्तिविषयक शोक टाक. या व्यक्तिविषयक प्रेमाच्या पाशांतून बाहेर पड. ह्मणजे प्रेम करण्यास, चिंता करण्यास, दुःखितांबरोबर दुःखी व सुखितांबरोबर सुखी होण्यास, अनंत स्थलं सांपडतील." होय. केवळ परस्परावलोकनानें नेत्रांच्या द्वारें एक मन दुसऱ्या मनास न जाणतां हा धडा शिकवीत होतें आणि दुसरें अंतःकरण न जाणतांच त्याचें ग्रहण करीत होतें. शिकविणारें आणि शिकणारें दोनही मनें आपण काय करीत आहोंत हें जाणत नव्हतीं. एक आपल्या नेत्रांवर जणूं काय वर सांगितल्या प्रकारचा पाठ लिहून दाखवीत होतें आणि दुसरें त्या पाठाचें भराभर वाचन करीत होतें. पाठाची भाषा अशी होती, कीं ती एकसत्वाच्या मनासच समजणार. ती समजण्यास धर्माचें, राष्ट्राचें कसलेंही ऐक्य लागत नाहीं. ती विश्वप्रेमाची भाषा विश्वप्रेम धरण्याला शक्य अशाच मनास समजणार. सिस्टर च्यारिटीचें सर्व अंतःकरण तिच्या नेत्रांत येऊन उभें राहिलें होतें. ते तिचे शांत, मृदु, प्रेममय नेत्र जों जों राधाबाईच्या नेत्रांकडे पाहूं लागले, तों तों जणू काय आपल्या मूळच्या ऐक्याची परस्परांस खूण पटली आणि राधाबाईचा कठोरपणा कमी होत चालला. आपल्या पोराकरितां या विधर्मी बाईनें आतांपर्यंत किती श्रम केले,—आपल्यापेक्षांही जास्त केले म्हटलें तरी चालेल—नव्हे—केलेच, त्या बाईस आपण अशा कठोरपणानें बोलणें म्हणजे केवढा कृतघ्नपणा ! असें तिच्या मनास वाटलें आणि एकदम सिस्टर च्यारिटीच्या आजपर्यंतच्या वर्तनाचा तिच्या मनांत विचार आला. ही बाई आपल्या मुलासाठीं कां झटली ? दुःखानें व्याप्त झाल्यामुळें आपल्या मुलाची शुश्रूषा करण्यास आपण असमर्थ झालों असतां हिनें प्रेमानें त्याची शुश्रूषा कां केली ? पैशासाठीं खाचित नाहीं. आपल्यापासून तिला कांहीं मिळणार नाहीं हें तिला पक्कें ठाऊक. सरकारी पगार मिळतो म्हणून ? सरकारी पगार ती घेत नाहीं. तीच मूळची श्रीमंत. तिनें आपली सर्व संपत्ति आपल्या मूळ मठाला वाहून आपलें शरीर परोपकारार्थच वाहिलें. मग तिनें आपल्यासाठीं व आपल्या मुलासाठीं इतके श्रम कां घेतले ? आपलें समाधान करण्याविषयीं इतकी उत्सुकता कां धरली ? आपला देश, आपलीं माणसें सोडून ही इतक्या दूरवर कां आली ? माणसांस बाटवून ख्रिस्ती करण्याकरितां ? तसेंही दिसत नाहीं. कारण, आज इतके दिवसांत तिनें कधींही धर्मसंबंधीं गोष्ट आपल्याजवळ काढली नाहीं. ख्रिस्तीशास्त्राची थोरवी गाऊन तो स्वीकारण्याचा उपदेश केला नाहीं इतकेंच नव्हें तर " बाई,

तुमचा धर्म आणखी माझा धर्म निराळा नाहीं. उघडयांना वस्त्र, तान्हेल्यांना पाणी, भुकेल्यांना अन्न, व्याधिग्रस्तांना औषध आणि दुःखितांना समाधान हीं आपपर भेद न मानतां देणें हें कर्तव्य ज्यांत सांगितलं आहे, तोच धर्म तुमचा आणखी माझा. ज्यांत हें कर्तव्य सांगितलं नाहीं तो माझाही नाहीं, तुमचाही नाहीं, कोणाचाच नाहीं, तर आपमतलबी पाप्यांचा. हें कर्तव्य करील तो ख्रिस्ताला मानणारा असो नसो, ख्रिस्ताचाच. कृष्णाला मानणारा असो नसो कृष्णाचाच. बुद्धाला मानणारा असो नसो बुद्धाचाच. ” असें तिनें राधाबाईस कित्येक वेळां बोलून दाखविलें होतें. तिचें अंतःकरण सर्वतोपरी विश्वविशाल झालेलें होतें. सत्य आणि सत् हीं तिला सर्वत्र दिसत. हीं एकाच ठिकाणीं लपून बसलीं आहेत हें तिला मान्य नव्हतें.

सिस्टर च्यारिटी विद्यालंकृत होती. वृथाभिमानी ख्रिस्त्यांप्रमाणें नव्हती. सत् असोत वा असत् असोत, कांहीं तरी उपाय करून ख्रिस्ताचे अनुयायी वाढवावे हा तिचा हेतु नव्हता. किंबहुना हिंदूंनीं हिंदूच राहून वर सांगितलेलीं कर्तव्यें करावीं ही तिची इच्छा ह्मटलें तरी चालेल. दुसऱ्या मिशनरींचें आणि तिचें कधीं पटत नसे. तिनें ब्रह्मचर्य स्वीकारून आपलें सर्वस्व ख्रिस्ती धर्मप्रसारासाठीं वाहिलें नाहीं तर सत्कार्यप्रसारासाठीं वाहिलें होतें. तिचा मठ साधारण मिशनरी सिस्टरचा मठ नव्हे. ती एका नवीन मठांतली होती. तिचे विचार आणि मार्ग मिशनरींस अगदीं असंमत होते.

ज्या दिवशीं सिस्टर च्यारिटीनें वरील प्रकारचे उद्गार राधाबाईजवळ काढले, त्या दिवसापासून सिस्टर च्यारिटीबद्दलचा तिचा तिटकारा—ती परधर्मी, ख्रिस्ती ह्मणून पूर्वीं वाटत होता, तो—अजीबाद गेला होता आणि जों जों त्या बाईचा निराकांक्ष परोपकारीपणा तिच्या नजरेस पडत चालला, तों तों ती विधर्मी हा भाव मनांतून जाऊन तिला तिच्याबद्दल आदर व प्रेम वाटूं लागलें होतें. आज तें प्रेम परमावधीस जाण्याचा प्रसंग आला होता. आपण कठोरपणानें तिला बोललों हें अगदीं अयोग्य असें मनांत येऊन राधाबाईस फार वाईट वाटलें आणि तिनें अश्रु ढाळीत “ मी विनाकारण तुह्मांला कठोर शब्दांनीं बोललें, मला क्षमा करा.” असें ह्मणून तिच्याकडे केविलवाण्या दृष्टीनें पाहिलें. परंतु सिस्टर च्यारिटीनें तिच्या डोक्यावर हात ठेवून म्हटलें:—“ बाई, ही क्षमा मागण्याची आणि देण्याची वेळ नव्हे, तुझ्या मुलाकडे पाहण्याची वेळ आहे. जर तो आपल्याला सोडून जाणार असेल, तर त्याच्याजवळ बसून त्याच्या वेदना कमी करूं, न जाणों परमेश्वराला तो आपल्याजवळ असावा अशी इच्छा झाली असेल. त्याच्या इच्छेविरुद्ध कोण जाणार आहे ! ”

त्या शांति व धीर देणाऱ्या शब्दांनीं राधाबाईचें क्षुब्ध व क्षीण अंतःकरण शांत व दृढ झालें आणि तिनें पुनः सखारामाकडे पाहिलें. आतां सखारामाची स्थिति खरोखरीच फार दुःखद झाली होती. मधून मधून तो कांहीं पुटपुटे. “ आई, आई, मला बरा करग ! ” असे दीनवाणे शब्द त्यानें उच्चारले काय ? असा भास त्या आईस एकसारखा होत होता. तिच्या अंतःकरणास पराकाष्ठेची पीडा होती. सिस्टर च्यारिटी एकदम तीन कामें करीत होती. ती राधाबाईचें समाधान करीत होती. त्या मुलाच्या वेदना कमी व्हाव्या

म्हणून त्याच्या अंगावरून हात फिरवीत होती आणि तिच्या भक्तिभावाप्रमाणें, त्या अंतकाळच्या शांत व गंभीर प्रसंगाला उचित असा परमेश्वराचा धांवा करीत होती. तिच्या चेहऱ्यावरील प्रत्येक रेषेंत, प्रत्येक छायेंत तिच्या अंतःकरणाचें पावित्र्य, तिच्या मनांतील भक्तिभाव आणि तिच्या अंगची परोपकाराबद्दल उत्सुकता हीं दिसत होतीं. मनांतल्या मनांत उच्चारले जाणारे तिचे धांव्याचे शब्द खरोखर परमेश्वरापर्यंत जाऊन पोंचत असतील याबद्दल कोणासही शंका वाटावयास नको.

मृत्यु ! या शब्दानें काय काय मनांत येतें ! त्याच्यापुढें जातगोत, धर्मकर्म, राष्ट्र, देश सर्व कांहीं सारखीं. त्याच्यापुढें सर्व अभिमान, सर्व आढ्यता पार गळून जातात. त्याच्या समक्ष सर्व एकसारख्या किंमतीनें मानले जातात.तो सर्वांस सारखेंच भिववितो. त्याला जातीचा, गोताचा, धर्माचा, कर्माचा, राष्ट्राचा,कसलाही पक्षपात नाहीं. त्याच्या चरणाशीं सर्व आपापले अभिमान विसरून एकरूप होतात. तो त्या वेळचा देखावा ! त्या खाटेवर तो निष्पाप, निष्कपट, अज्ञान बालक अंतकालच्या वेदना सोशीत पडला होता. मृत्यूनें आपल्या प्रचंड पंखांची सावली त्याजवर पसरली होती आणि आतां अगदीं शेवटीं शेवटीं त्याच्या चर्येवर स्मित दिसूं लागलें होतें. तो आतां कुडीनें इहलोकीं, परंतु त्याचा जीवात्मा अर्धवट परलोकीं होता असें दिसलें. त्यास परलोकींचे देव—गंधर्व दिसूं लागले असतील किंवा दुसरें कांहीं सुखकर दिसूं लागलें असेल. नाहीं तर हें स्मित कां ? ती स्त्री-जिचा जीव कीं प्राण त्याच्या ठिकाणीं एकवटून राहिला होता—तीही आतां आपल्या भक्तिभावाप्रमाणें कांहीं स्तोत्र म्हणूं लागली होती आणि ती परधर्मी स्त्री आतां गुडघे टेंकून आपल्या उरःप्रदेशाशीं आपले एकांत एक बोटें घातलेले हात धरून मान खालीं घालून, डोळे मिटून प्रार्थना करीत होती. प्रसंग फार प्रशांत व गंभीर. त्या आईला आतां हुंदकेसुद्धां येईनात. सर्व संपून गेले. आतां तिच्या डोळ्यांतील अश्रु आटून गेले. इतक्यांत सखाराम खडबडून जागा झाल्याप्रमाणें दचकला. एकवार त्यानें 'आई !' म्हणून किंचाळी फोडून हांक मारली आणि मग एकदांच सर्व कांहीं शांत झालें.

ती शेवटली हांक ऐकून राधाबाईची अवस्था काय झाली असेल तें आतां वर्णन करून सांगणें तर आपल्या शक्तीच्या बाहेरचें आहे. सिस्टर च्यारिटीनें आजपर्यंत अनेक शोकपर प्रसंग पाहिले, परंतु असा हृदयभेदी प्रसंग तिलाही प्रथमच दिसला. आजपर्यंत कधीं कोणाही व्यक्तीवर एका चार सहा महिन्यांत असले भयंकर प्रसंग आलेले तिनें पाहिले नव्हते. ती स्वतः अशीच राधाबाईप्रमाणें दुःखी होती. परंतु राधाबाईच्या दुःखापुढें तिचें स्वतःचें दुःख कांहींच नाहीं असें तिला वाटलें. प्रेमाची भाषा समजण्याला फारशी अडचण पडत नाहीं. त्यांत राधाबाईला तर सिस्टर च्यारिटीचें बोलणें आतां आतां समजूं लागलें होतें. सिस्टर च्यारिटीनें आपल्याकडून तिचें समाधान करण्यासाठीं नाना प्रकारच्या गोष्टी सांगितल्या. शेवटीं आजपर्यंतची आपल्या स्वतःची हकीकत— आपल्यावर कोणता प्रसंग आल्यामुळें आपण संसाराचा त्याग केला, आपण कोणत्या भयंकर संकटाच्या कचाटींत सांपडलों असतां आपणास वैराग्य झालें हें तिनें सांगितलें. ती म्हणाली, " बाई, तझा नवरा, तुझा मुलगा, तुझा बाप हीं

तुझ्या देखत पाहतां पाहतां परमेश्वरानें नेलीं. पण मजवरचा प्रसंग तूं ऐकलास म्हणजे तुला आपल्या दुःखाचें कांहींसुद्धां वाटणार नाहीं." पुढें तिच्यानें बोलवेना. तथापि तिनें एका वर्षांत आपले आईबाप, आपला भाऊ व आपला भावी पति यांचा नाश कसा झाला, त्याची अत्यंत हृदयद्रावक हकीकत शांतपणें सांगितली. भावी पति व भाऊ आफ्रिकेंत जाऊन नाश पावले त्या शोकानें बाप व त्यांच्या मागोमाग आई वारली. बऱ्याचशा संपत्तीची मालकी आपणाकडे आली, तेव्हां आपण ती मठास देऊन हा आश्रम स्वीकारला. या हकीकतीमुळें राधाबाईच्या मनाची क्षुब्धता जाऊन शांतता आली व तिनें आपलें दुःख गिळलें.

# प्रकरण १६ वें.

## खूपखाबादस.



परंतु आतां कांहीं वेळ आपण राधाबाईस सोडून दुसरीकडे त्यांच्यापासून सुमारें हजार कोसांवर जाऊं. आमच्या वाचकांपैकीं ज्यांनीं उत्तरहिंदुस्थानचा कांहीं भाग पाहिला असेल, त्यांनीं तिकडल्या एखाद्या गांवाचें स्वरूप मनांत आणलें असतां आमच्या नबाबी संस्थानाचें वर्णन चटकन् लक्षांत येणार आहे.

खूपखाबाद हें एक नबाबी संस्थान होतें. या संस्थानाची जमाबंदी सुमारें बारा लाखांची असून एकंदर सुमारें एकशेंअडतीस लहानमोठे गांव याच्या ताब्यांत होते. संस्थान फार जुनें. संस्थानच्या नबाबाचें म्हणणें तर असें कीं, संस्थानाचे मूळ संस्थापक तैमूरलंगाच्या स्वारीबरोबर आलेल्या सरदारांपैकीं एक होते. तें कसेंही जरी असलें, तरी एवढी गोष्ट खरी कीं, जहागीर बादशहाच्या वेळीं नूरजहानचें प्राबल्य होतें. त्या वेळीं तिच्या एका दासीवर ती प्रसन्न होऊन त्या दासीच्या नवऱ्यास तिनें कांहीं जहागीर करून दिली आणि त्यास नबाब अल्लीहुसेन अशी किताबत दिली. नबाबअली फार धूर्त व मोठा हुषार माणूस असल्यामुळें त्यानें आपली छाप अधिकाधिकच वाढवून आपली नबाबी कायम केली; इतकेंच नव्हे, तर जहागीरगांवांत भर पडेल अशी तजवीज चालविली. जहागीरच्या पाठीमागें शहाजहान, त्याच्या पाठीमागून औरंगजेब असे बादशहा होऊन गेले; परंतु नबाबअलीच्या तीन चार पिढ्यापर्यंत सगळे त्याच्याचसारखे धूर्त व महत्त्वाकांक्षी वंशज निपजल्यामुळें जहागीर ऊर्जित दशेला येत जाऊन मराठ्यांच्या ऊर्जितकाळींही ही नबाबी कायम राहिली. वारा येईल तशी

पाठ देण्याची आणि ज्याचें नाक वर असेल, त्याची दोस्ती संपादण्याची अपूर्व युक्ति या वंशजांना एकसारखी साधल्यामुळें जहागिरीला केव्हांही धोका आला नाहीं. मध्यंतरीं एक तरुण नबाब थोडें माथेफिराऊ निवण्याचा संभव दिसूं लागला होता, परंतु त्यास लवकरच मद्याचें आणि जनाना वाढविण्याचें व्यसन लागल्यामुळें त्याचा राजकीय बाबतींतला माथेफिराऊपणा विलयाला गेला. इ. स. १८५७ सालीं वस्तुतः खूपखाबादेच्या आसपास कांहींसुद्धां दंगाफिसात नव्हती, तरी त्या वेळचे नबाब खुदरतअली यांनीं आपण होऊन कंपनीसरकारास द्रव्याची आणि मनुष्यबळाची मदत देण्याचें कबूल केलें. पैकीं मनुष्यबळ कंपनीसरकारनें घेतलें नाहीं, पण द्रव्यबळ नबाब खुदरतअलीच्या सामर्थ्याबाहेर सुद्धां स्वीकारलें. नबाबी खजिन्यांत पैसा असला काय आणि कंपनी सरकारच्या जवळ असला काय, प्रसंगीं उपयोगी पडतो आहे, तर तो घ्यावा आणि नबाबानें मोठ्या उदार बुद्धीनें तो द्यावा हें अगदीं साहजिक होतें. त्या वेळीं नबाब खुदरतअलीनें इतकी द्रव्याची मदत देण्याची आपली तयारी दाखविली, यामुळें नबाबाची राजनिष्ठा सरकारच्या चांगली प्रतीतीस येऊन सरकारानें तिचें चीजही केलें. नबाब खुदरतअलीस कित्येक अक्षरी नवीन किताब दिले; तुम्हीं आमचे खरे दोस्त आणि साहाय्यकारी म्हणून त्यास शाबासकी मिळाली आणि त्यास कांहीं तोफांचा मान मिळाला. सत्तावन सालची धामधूम शांत होऊन ही मानपानांची व दोस्त म्हणून ठरलेल्या लोकांस किताबांची वगैरे वांटणी झाल्यानंतर सुमारें दहा वर्षें नबाब खुदरतअली जिवंत होता आणि त्याचें वजनही फार वाढलें होतें. इंग्रज अधिकारी त्यास वचकत. पोलिटिकल एजंटालासुद्धां तो विशेषसा वंगून नसे. कारण त्याचें जवळ राजनिष्ठेचें खरें नाणें होतें आणि आपला योग्य मरातब राखून घेण्याविषयीं फार तत्परताही होती. परंतु त्याच्या पश्चात् त्याच्या गादीवर त्याचा मुलगा बसला. त्यास तितकें कोणीं विचारीनासें झालें. एजंटसाहेब आल्यास अगदीं नम्रपणें टोपी काढून अदबीनें दूर बसून भाषण करण्याची वहिवाट असे, ती जाऊन तिच्या ऐवजीं नबाबानें आपण किंचित् उठून एजंटाची मर्जी नाराज होऊं नये म्हणून अदबी दाखविण्याची वहिवाट पडली. याला कारण एवढेंच झालें होतें कीं, नबाब खुदरतअली वारल्यानंतर सर लाउड्ने स्टाम्पफूट (Sir Loudneigh Stampfoot) नांवाचे एक पोलिटिकल एजंट आले, त्यांनीं आपला मान नबाबापेक्षां फार—कारण आपण राणीचे प्रतिनिधि या नात्यानें संस्थानिकांच्या दरबारीं येतों—तेव्हां आपण आलों असतां आपणांस खुद्द राणी सरकार किंवा निदान व्हाईसरॉय् आल्याप्रमाणें मान जरूर दिला पाहिजे असा आपला हक्क सांगितला आणि पांच पंचवीस वेळां नबाबास बजावून व आपल्या इच्छेप्रमाणें त्याजकडून करवून मान राखून घेण्याचा प्रघात पाडला. पांच चार वेळां नबाबानें आपली नाखुषी दाखविली, परंतु अशा नाखुषीमुळें सर लाउड्ने स्टाम्पफूट यांची आपल्यावर नाराजी होऊन शेवटीं संस्थानचें फार नुकसान होण्याचा रंग दिसूं लागला, तेव्हां तरुण नबाबास आपला अभिमान टाकून सर लाउड्ने स्टाम्पफूट यांचे इच्छेप्रमाणें गादीवरून उठून चार पावलें पुढें जाऊन त्यांचें स्वागत करण्याचा प्रघात

घालावा लागला. सर स्टाम्पफूट थोडे त्रागा करणारे होते आणि आपल्या इच्छेच्या विरुद्ध यत्किंचित् कोणी गेल्यास लागलीच ते त्याच्या हात धुऊन पाठीस लागावयाचे. नबाब आपणास मान देऊं लागला, परंतु आपल्या बायकोस तितका मान नाहीं असें पाहतांच त्याहीबद्दल त्यानें तसदी लावून आपल्या मेमसाहेबांस आपल्यापेक्षां जास्त मान दिला पाहिजे असें बाबासाहेबांस त्यानें चांगल्या प्रकारानें उमजविलें, आणि तेव्हांपासून बिचारा नबाब सर्व साहेब व मडमांस एकसारखा मान देऊं लागला. असो. ही मानपानाची गोष्ट झाली. पण सर लाउड्नें स्टाम्पफूटसाहेबांच्या अंगीं दुसरें कांहीं नव्हतें. ते पैशाच्या बाबतींत अगदीं अलिप्त होते. इतकेंच नव्हे, तर सरकार आणि कोणतेंही संस्थान यांच्या दरम्यान कोणत्याही बाबतींत लढा पडला, तर त्यांनीं सर्वथा संस्थानिकाची बाजु धरून त्याचें नुकसान होऊं द्यावयाचें नाहीं, अशाबद्दल खटपट मनापासून करावयाची. संस्थानिकांनीं आपण होऊन कांहीं नजराणा पाठविला, तर तो एक तर परत करावयाचा, किंवा तो राणीसरकारचा आहे, असें ह्मणून तिकडे सरकारांत पाठवून द्यावयाचा. त्याची नजर सगळी मानमरातब आणि आगतस्वागत या गोष्टींकडेच असे, परंतु सर लाउड्ने स्टाम्पफूट फार दिवस त्या प्रांतींचे एजंट राहिले नाहीं. थोडेच दिवसांनीं त्यांची दुसरीकडे कोठें एका दूरच्या वसाहतींत बदली झाली आणि त्यांचे जागीं मि. फिलपर्स बुलिस्नीक ( Mr. Fillpurse Bully-sneak ) आले. हे गृहस्थ मूळचे इकडे मुलकी खात्यांत नौकर होते. ते अगदीं असिस्टंट कलेक्टरच्या रांकेंतून वर चढले होते. त्यांच्या शिफारशी चांगल्या असल्यामुळें रेव्हेन्यूखात्यांतून ते लवकरच पोलिटिकलखात्यांत गेले आणि तेथून वाढतां वाढतां उत्तरहिंदुस्थानच्या एका क्षुद्र भागांतील कांहीं संस्थानें मिळून एजंट आणि दुसरेही अधिकारी झाले. हे साहेब ज्या वेळीं इकडे मुलकीकडे होते, तेव्हां त्यांच्या हाताखालीं दामोदरपंत होते. किंबहुना मुलकीखात्यांत यांची स्वारी नवीन आली, तेव्हां त्यांस काम शिकवण्याचा दामोदरपंतांवरच प्रसंग असे. दामोदरपंतांस आपल्या वरिष्ठांची, साहेबांची मर्जी संपादन करण्याची हातोटी पहिल्यापासून चांगली साधलेली आणि तो आपल्या कामांतही मोठा वाकब होता. कसलेंही आणि कितीही बिकट काम असो त्यानें तें हां हां ह्मणतां करून टाकलें नाहीं असें व्हावयाचें नाहीं. तो आपलें काम करून शिवाय बुलिस्नीकसाहेबांसही फार मदत करी. कित्येक वेळां त्यांचें कामही आपण उरकून टाकी. शिवाय केव्हां फळफळावळ, केव्हां कांहीं, केव्हां कांहीं अशा गोष्टी वारंवार नजर म्हणून त्यांस देऊन तिकडूनही त्यांची मर्जी त्यानें सुप्रसन्न करून ठेविली होती. असा प्रकार असल्यामुळें मि. बुलिस्नीक यांची बढती होत चालली, तसतसा दामोदरपंतांसही ऊर्जितकाल येऊं लागला बुलिस्नीकसाहेबांकडे काम असलें कीं, दामोदरपंतांमार्फत जावें म्हणजे हटकून काम व्हावयाचें असा लोकांत समज उत्पन्न झाला. आतां या समजाला मूळ कारण काय झालें असेल तें कोणास ठाऊक. आंतली गोष्ट कोण जाणूं शकतो ! पण या समजास भरती पडण्याजोगें बोलणे चालणें दामोदरपंतांकडून होऊं लागलें खरें आणि न जाणों दामोदरपंतांचें वजन बुलिस्नीकसाहेबांवर

बरेंच असल्यामुळें साहेबांस कांहीं सांगितलें म्हणजे त्यांचेवर वजन पडे, हें त्या समजास कारण असेल. परंतु लोकांत तसा समज पसरला आणि त्याला अगदींच आधार नाहीं असें नव्हतें. बुलिस्नीकसाहेबांची दामोदरपंतावर अगदीं बहाल मर्जी आणि त्यांची बढती होऊन ते जेव्हां राजकीय खात्यांत शिरून संस्थानाशीं संबंध आहे अशा अधिकारावर गेले तेव्हां दामोदरपंतांनीं हलकेंच संधान बांधून आपला शिरकाव कोठें तरी व्हावा अशाबद्दल बुलिस्नीकसाहेबांकडे खटपट सुरू केली आणि त्याप्रमाणें त्या खटपटीस लागलीच यश ही येऊन दामोदरपंतांचा एका संस्थानांत शिरकाव झाला. तेथून त्याच्यापेक्षां मोठ्या, तेथून आणखी मोठ्या, करतां करतां त्यांना **खूपखाबाद** संस्थानांत दिवाणीची जागा मिळाली. हा सर्व प्रभाव होता बुलिस्नीकसाहेबांच्याच प्रसादाचा, हें उघडच आहे. वस्तुतः पहातां उत्तरहिंदुस्थानांतल्या नबाबी—मुसलमानी संस्थानांतून दक्षिणी ब्राह्मणाचा शिरकाव व्हावयाचा म्हणजे केवढी विलक्षण गोष्ट ! पण साहेबांच्या आश्रयानें कोणी कोठेंही गेला, तरी त्यांच्या आश्रयाची छत्री त्यांजवर आहे तोंपर्यंत कांहीं कोणाचेंही भय बाळगण्याचें कारण नाहीं. प्रथम दामोदरपंताबद्दल फार दुष्टावा होऊं लागला. जो तो त्यांचा द्वेष करूं लागला. परंतु बुलिस्नीकसाहेबांकडून थोडी जरब मिळतांच दामोदरपंताचें बस्तान तेव्हांच बसलें आणि त्याच्याही अंगीं करामत असल्यामुळें त्यानें नबाब व त्याची खानगीकडील मंडळी यांची मर्जी तेव्हांच संपादन केली. पण दामोदरपंताचा स्वभाव हावरा असल्यामुळें म्हणा किंवा त्यास जों जों अधिक अधिक मिळत चाललें तों तों त्यास अधिक अधिक मिळविण्याची इच्छा होत गेल्यामुळें त्याचें वर्तन सुमाराबाहेर गेलें म्हणून ह्मणा, पण पहिलीं ऐन चार वर्षें बरीं गेल्यानंतर त्यांनीं एका फार महत्वाच्या कामांत बराच डल्ला मारला. त्या बाबतींत एका पक्षाला व्हावें तसें अनुकूल असें काम न झाल्यामुळें दोन्ही पक्षांचा त्यांजवर रोष होऊन एकवार दोन मारेकरीही त्यांच्या निजावयाच्या खोलींत शिरले होते ! व तें महत्वाचें काम फार लांबवर जाऊन त्यांत सकारण असो किंवा अकारण असो, मि. बुलिस्नीकवर शिंतोडा येण्याचें भय पडलें. दामोदरपंतावर तर तो चांगलाच आला. तेव्हां दामोदरपंतास चालतें होण्याविषयीं बुलिस्नीकसाहेबांनीं सुचविलें आणि कांहीं ठिकाणीं तोंडें बंद करण्यास जडजड अशीं सोनेरी व रुपेरी कुलुपें लाविलीं; तेव्हां पंताची स्वारी सुरक्षितपणें दक्षिणेंत आली. पुढें बुलिस्नीकसाहेब कांहीं दिवस रजेवर गेले. पंत दक्षिणेंत परत आल्यावर पुनः संस्थानांत किंवा दुसऱ्या कोठें नोकरी मिळविण्याच्या भानगडींत पडलेच नाहींत. जेवढें मिळवून त्यांनीं आपला तळिराम गार केला होता, तेवढ्याचा यथास्थित उपभोग घ्यावयाचा असा त्यांनीं बेत करून त्याप्रमाणें स्वस्थपणें ते दिवस काढूं लागले. ते कसे, हें वाचकांस या कथानकाच्या प्रारंभींच्या प्रकरणांतून कळविलें आहे.

आतां आपल्याला त्यांच्या चिरंजीवांचा आयुष्यक्रम पहावयाचा आहे.

---

# प्रकरण १७ वें.

## मि. फिल्पर्स बुलिस्नीक.

एका फ्रेंच ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, जॉन बुल ( इंग्रज ) वाटेल तिकडे जाऊं द्या, तो आपल्या घरांत असल्याप्रमाणें ऐषआराम मिळविण्याची तजवीज करणार. मग तो ज्या आपल्या घराला आपला गड समजतो, तें त्याचें इंग्लंडांतलें घर असो, किंवा कोठें प्रवासास निघाला असतां जींत बसला असेल, ती आगबोट असो, अथवा मध्य आफ्रिकेंतलें भयंकर रुक्ष असें वाळवंट असो. इंग्रजांचा हा मोठा गुण आणि त्या गुणामुळेंच आज चोवीस तासांतही त्यांच्या राज्यावर सूर्य मावळत नाहीं, आफ्रिकेंतल्या सारख्या रुक्ष मैदानांतसुद्धां जर तो आपला ऐषआराम विसरत नाहीं, तर ज्या या देशांत त्यानें आपलें एकछत्री राज्य स्थापलें आहे, तेथें तो आपल्या ऐषआरामांत काय म्हणून कमी करील ? तो मुळींच करीत नाहीं. जॉन् बुल या देशांत बादशहा आहे आणि तो बादशहाप्रमाणेंच वागतो. मात्र अकबर बादशहाप्रमाणें त्याची एकंदर वागणूक आहे.

मि. फिल्पर्स बुलिस्नीक हे या बादशहातीचाच एक तुकडा होत. आणि उत्तरहिंदुस्थानांतील ऐषआरामाची लज्जत त्यांस पक्की लागली असल्यामुळें त्यांच्या एकंदर आविर्भावावरून आणि लवाजम्यावरून आपण खरोखरीच बादशहा आहोंत असें त्यांस खात्रीलायक वाटत असलें पाहिजे असें वाटे. सरकारी बंगला—ज्यास रेसिडेन्सी घर असें तिकडील लोक म्हणत—तो चांगला विस्तीर्ण होता. इंग्रज अधिकाऱ्याच्या बंगल्याचें मराठी भाषेंत यथासांग वर्णन करणें म्हणजे मोठें कठिण काम आहे. तथापि वाचकांस त्याची थोडी कल्पना यावी म्हणून अल्पसा प्रयत्न करतों. या बंगल्याच्या सभोंवतालीं मोठा थोरला बगीचा असून त्यांत थोरल्या दरवाज्यापासून बंगाल्याच्या पुढच्या तोंडाशीं जाणारा रस्ता चांगला दोन गाड्या जातील असा विस्तीर्ण होता. या रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं सुरूचीं आणि सायूडरचीं झाडें होतीं आणि पुढें पुढें इंग्रजी फुलझाडांच्या कुंड्या होत्या. रस्ता सोडून बाकीच्या जागेंत सुंदर गवत उगवलेलें असून तें अगदीं बेतानें कापलेलें होतें, यामुळें छान हिरवागार गालिचा पसरून दिल्याप्रमाणें खरोखरीच शोभा दिसत होती. गाडीच्या रस्त्यापासून उजव्या बाजूस सुमारें शंभर यार्ड जागा सोडून पलीकडे दोन चांगलीं टेनिसकोर्टें केलीं होतीं आणि टेनिस खेळण्यास लागणाऱ्या जागेला सुंदर व सुखावह करण्यास जें जें कांहीं अवश्य तें तें सर्व अगदीं तेथें उत्तम तऱ्हेनें सिद्ध केलेलें होतें. टेनिसकोर्टांच्या पलीकडच्या बाजूस दोन समर हाऊसेस—

लतागृहें—फारच रमणीय दिसत. रस्त्याच्या डाव्या बाजूस सुमारें शेंदीडशें यार्ड जागा सोडून पलीकडे एक लहानसें आउट हाऊस—पडबंगला होता. या बंगल्यांत साहेबांचें ऑफिस होतें. या ऑफिसांत बाबू—पण या ऑफिसांतील मंडळीची व वाचकांची मुलाखत करून देण्याच्या आधीं बंगल्याचें वर्णन पुरें करावें तेंच बरें.

बंगल्याच्या पुढच्या बाजूस मोठी थोरली कमानदार आगाशी होती. त्या आगाशीच्या आधारखांबांवर एका प्रकारची एव्हरग्रीन—सदा हिरवी—वेल चढविलेली खांबाला वेढे घालून वरपर्यंत गेलेली होती; आणि दोन खांबांच्या मधून लोखंडी तारांच्या कुंड्यांत निरनिराळ्या प्रकारचीं फर्न्स् टांगून ठेवलेलीं होतीं. बंगल्याच्या पाहिऱ्यांपासून काथ्याचा बिस्तरा बसवून दिलेला होता. आणि पाहिऱ्या संपून वरांडा लागतांच मजीत हिरव्या रंगाचीं गालिचाचीं पट्टीं पसरलेलीं दिसत होतीं. दाराच्या दोनी बाजूंस दोन ब्रांझ धातूचे अर्धवस्त्राच्छादित असे स्त्रीरूप पुतळे ठेवलेले असत. आणि त्यांच्यापलीकडे एक एक लहानसें वाटोळें टेबल असून त्या टेबलावर पुष्कळ इंग्लंडांतलीं व एक दोन या देशांत इंग्रजांनीं काढलेलीं वर्तमानपत्रें होतीं. पलीकडे येणाराजाणारास बसण्यासाठीं पांच चार खुर्च्या होत्या. दार उंच असून ह्यावर प्रथम जपानी बोरूचीं कांडीं आणखी मणी यांनीं तयार केलेला लांब पडदा सोडला होता. त्याच्या मागल्या बाजूस पांढरा नक्षीदार कापडाचा दुभंगलेला पडदा शोभा देत होता. आंत तर सर्व जमीन अतिशय उंची गालिच्यांनीं अगदीं झांकून टाकली असून जिकडे तिकडे खुर्च्या, ऑन्टोमन्, सोफा, वगैरे बैठकींची नुसती रेलचेल उडालेली होती. आणि ठिकठिकाणीं लहान लहान वाटोळीं टेबलें, वर उत्तम प्रकारचे सरपोस घालून ठेवलेलीं असून त्यांवर नानाप्रकारच्या सुंदर सुंदर व प्रेक्षणीय चमत्कारिक वस्तु ठेविलेल्या होत्या. भिंतीवर पंखे, हरणांचीं, वनगायांचीं शिंगें, वगैरे वगैरे होतीं आणि मधून मधून आजपर्यंत होऊन गेलेल्या पोलिटिकल एजंटांच्या मोठमोठाल्या तजबिरी लाविलेल्या होत्या. या ड्रॉइंगरूमच्या मध्यभागीं एक मोठी थोरली कमान असून त्या कमानींत एक मोठा थोरला लांकडी चौकटीचा पडदा ठेवून पलीकडचा भाग वेगळा केला होता. हा अगदीं चांगला विस्तीर्ण होता. ही जेवणाची खोली—डाइनिंगरूम—केली होती. तेथें चांगली चाळीस मंडळी बसतील असें डाइनिंग टेबल असून डिनरसेट वगैरे चीजवस्त पलीकडे असणाऱ्या कपाटांतून अगदीं जय्यत दिसत होती. ड्रॉइंगरूमच्या उजव्या बाजूस एक विस्तीर्ण खोली होती. ही बुलिस्नीकसाहेबांची 'स्टडि' "ल्याहायूवाचायची खोली. या खोलींत भिंतीला टेंचून शेल्फें होतीं. त्यांत खालपासून वरपर्यंत पुस्तकेंच पुस्तकें लावून ठेवलेलीं आणि मध्यभागीं खिडकीपासून थोड्या अंतरावर एक मोठें थोरलें विस्तीर्ण टेबल, त्यावर एक पिजन होल त्याच्या डोक्यावर एक अगदीं छोटेंसें घड्याळ होतें. इतर खोल्यांप्रमाणेंच या खोलींतही टोपीवाल्यांस अगदीं नैसर्गिक अशी जी टापटीप, ती दृष्टीस पडत होती. कागदपत्र जेथल्या तेथें अगदीं नीटनेटके ठेवलेले.

आतां आपण बंगल्याची पहाणी करतां करतां स्नीकसाहेबांच्या ल्याहायूवाचायच्या खोलीपर्यंत आलोंच आहों; तेव्हां इतर खोल्या—त्यांची निजण्याची खोली, त्यांच्या मडमसाहेबांची खासगी खोली,

मुलांची खोली, पाहुण्यासाठीं राखून ठेवलेल्या खोल्या, इत्यादि इतर जागा पाहण्याच्या भानगडींत न पडतां एकदम आपण साहेबांच्याच वर्णनाकडे वळूं.

बुलिस्नीकसाहेब घरांत असण्याच्या वेळचे सैल असे कपडे घालून एका आरामखुर्चीवर पडून वर्तमानपत्र वाचीत होते. मधून मधून चिरुटास आपल्या ओंठांनीं जागृत करीत होते. जवळच एक वेताचें छोटेंसें बैठें वाटोळें टेबल होतें. त्यावर राख झाडण्याचें चिमुकलेंसें भांडें होतें, त्यांत राख झाडीत, आणि खांकरून घसा साफ करीत. खुर्चीवर पडलेल्या त्या शरीराकडे पाहिलें असतां असें दिसून येई कीं, बुलिस्नीकसाहेब चांगले उंच असून त्यांचें हाडपेर बरें जंगी होतें. त्यांचे डोळे अगदीं हिरवे ह्मटलें तरी चालेल इतके घारे होते. आणि मिशा चांगल्या मोठमोठ्या असून, त्यांचा व त्यांच्या डोक्यावरील केंसांचाही रंग अगदीं तांबडा होता. त्यांचा चेहरा लांब व गोब्रा गोब्रा असे. आणि त्यांचा एकंदर दिखाव मोठा चमत्कारिक दिसे. साहेब या वेळीं सहज कांहीं तरी वाचीत होते. त्यांचें लक्ष्य वाचनांत अगदीं गुंतून गेलें होतें असें नाहीं. यामुळें त्या हातांतल्या चिरुटावर वारंवार हल्ला होई. इतक्यांत अगदीं पांढरा पांढरा फेक असा पोषाख केलेला, आणि वाटोळी चक्कीदार पगडी घातलेला एक शिपाई दारावर टिक टिक करून आंत येऊन डाव्या हातानें सलाम करून हात खालीं वर करून " बाबू आये है. साबसे मिलनेकु..."

" कोनसे बाबू ?" साहेब मध्येंच चट्कन् त्रासून बोलले.

" आपने नये रैटर बाबू. "

" आच्छा आने दो. "

पुनः त्या शिपायानें ताठ उभें राहून डाव्या हातानें सलाम करून पुनः तो हात तसा ताठ असाच खालीं करून मग हलकेच आपलें शरीर जागेवरून हलविलें, आणि खोलीच्या बाहेर नेलें. तो बाहेर जाऊन सांगतो, तोंच बाबू मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय-बुलिस्नीकसाहेबांचे हेड रैटर आंत येऊन आपलें दाढीविभूषित मुंड मोठ्या अदबीनें लवबून साहेबांस सलाम करून आतां कांहीं बोलणार, तोंच साहेबांनीं " Well Baboo ! What have you got there ? Any papers that you want me to sign without reading their contents १ !"

असें ह्मणून आपल्या एका डोळ्याला एकच भिंग लावून ते आपल्याच बोलण्याचें कौतुक वाटून हंसले; पण त्यांच्या त्या बोलण्याचें कौतुक करण्यास ते एकटेच नव्हते. बाबू मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय साहेबापेक्षां किती तरी कौतुकानें हंसले. आणि बोटांनीं आपली दाढी विंचरीत व आपल्या तुंदिल उदराला झटके देत म्हणतातः—" No, your most respected honour, I have not the misfortune to belong to that notorious class of Baboos whom Lord Thomas Babington Macaulay in his translucent and most wonderful character २ ....................

१. ( बाबू, काय आणलं आहे आतां ! आंत काय लिहिलं आहे तें न वाचतां सह्या करून घ्याव्या म्हणून कांहीं कागद आणले आहेत ? )

२. नाहीं. अत्यंत सन्मान्य साहेब, लॉर्ड मेकॉलेसाहेब बहादुरांनीं ज्या कुप्रसिद्ध बाबूवर्गाविषयीं आपल्या अत्यंत सोज्ज्वल व आश्चर्यकारक अशा.. ...... त्या कोटींत असल्याचें दुर्दैव माझ्या वांट्यास आलें नाहीं.

बाबूसाहेब आपल्या वाक्प्रवाहांत स्नीकसाहेबांस अगदीं बुडवून टाकण्याच्या विचारांत होते असें दिसलें, परंतु त्या प्रवाहांत सांपडून मग पोहून वर निघण्यापेक्षां आधीं तो मुळांतच प्रवाह खुंटविल्यास बरें असें वाटून लागलींच साहेब म्हणतात: " पुरे. पुरे. तुम्हीं काय प्रकरण आणलं असेल तें काढा. "

**बाबूः**—Yes, your Lordship, but your Lordship[१] ....................

**साहेबः**—काढा—काढा कागद् काढा. कुठून काय प्रकरण आलं आहे ?

तथापि बाबू मृत्तिकाचरण तेवढ्यानें उमजले नाहींत. ते लागलींच पुढें म्हणतात: " I grant – I confess – I avow–I –our people that are generally and commonly, to our shame be it most candidly confessed, your most respected and reverenced honour, our people generally and commonly—and it might be allowed most unexceptionally are[२]–"

" Yes, Yes, Baboo! Your people are Satan's progeny—yes they are but get the papers.[३] "

साहेबांनीं पुनः किंचित् हंसत हंसत पण त्यांतल्या त्यांत तुसडेपणानें त्यास म्हटलें आणि कागदासाठीं हात पुढें केला.

तरी बाबूसाहेब आपली चर्पटपंजरी मुळींच थांबवीनात. इतका वेळ बोलून शेवटीं त्याला सांगावयाचें होतें तें झालेंच नाहीं, यामुळें त्यांस वाईट वाटलें ह्मणून ह्मणा कीं सांगितल्यावांचून राहवेना म्हणून म्हणा, पण त्यांनीं पुनः म्हटलें: "I humbly and most meanly and reverentially submit your honoured lordship, that I am not[१]..."

" I say, I shall pluck your beard if you go on like that, you donkey[२] ..." साहेबांनीं पाय हापटून व तो एक कांच लावलेला डोळा संतापानें त्याजवर फिरवून म्हटलें. " आण ते कागद इकडे आणि हो चालता. "

बाबू मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय यांची दाढी आजपर्यंत कितीक साहेबांच्या तडाख्यांतून सुटून वांचली, तें बुलिस्नीकसाहेबांच्या असल्या धमकावण्यांना कसले जुमानतात ! आपले सगळे जातवाले नीच खरे, परंतु आपण मोठमोठ्या साहेब—लोकांच्या हाताखालीं वागलों असल्यामुळें आपण ते अवगुण सर्व टाकून देऊन फार सच्चे, फार सरळ, असे बनलों आहों हें बाबूसाहेबांचे मनांतून सांगावयाचें होतें, तें त्यांनीं सांगितल्याखेरीज ठेवलेंच नाहीं. बुलिस्नीकसाहेबांनीं त्यास वाटेल तितक्या शिव्या दिल्या, वाटेल तितके पाय हापटले, एक वेळ तर बाबूंच्या दाढीला हात

---

१. होय साहेब, पण साहेब,

२. होय. होय साहेब मला कबूल, मान्य, संमत आहे. मी खात्रीनें म्हणतों कीं, आमचे लोक साधारणतः आणि साधारपणें—लाज वाटली तरी, कबूल केलें पाहिजे कीं, अत्यंत सन्मान्य व मान्यवर साहेब आमचे लोक सामान्यपणें आणि साधारणपणें आणि निरपवादकपणें......

३. होय, होय, तुमचे लोक सैतानाची प्रजा आहेत. पण कागद् काढ.

१. मी नम्रपणें, अतिशय हलकेपणें आणि आदरानें आपणास कळवितों कीं...

२. ए, गद्धा असंच पुढें बोलत राहिलास तर तुझी दाढी उपटून टाकीन.

सुद्धां घालण्यासाठीं ते धांवले; पण बाबूंचें हास्य आणि कौतुक कमी झालें नाहीं. आपल्याकडून सांगावयाचें तें पुरें झाल्यानंतर बाबूंनीं कागद पुढें केले. बाबूंची बोलण्याचालण्याची आणि कोटाच्या खिशांत हात घालून आपलें दाढीविभूषित मुंड हालविण्याची आणि तुंदिल उदराला झटके देण्याची ऐट व लकब अशी कांहीं हास्यकारक होती, आणि इंग्रजी शब्दयोजना अशी मजेदार होती कीं, मनुष्य कितीही संतापला, तरी त्यांतल्या त्यांत त्याला हंसूं यावयाचें, आणि साहेबांस तर त्यांच्या त्या बोलण्याची फारच गंमत वाटे. बाबू महाशयांची बदली नुकतीच होऊन ते बुलिस्नीकसाहेबांच्या हाताखालीं आले होते, यामुळें त्यांच्या त्या सर्व मौजा अजून त्यांस तितक्या जुन्या झाल्या नव्हत्या. साहेबांच्या घरीं कोणी मंडळी आली कीं, त्यांनीं बाबूंची थट्टा करून त्यांच्या गमती सांगावयाच्या, आणि तुह्मांला आतां ती व्यक्ति प्रत्यक्षच दाखवितों असें ह्मणून त्यांनीं पट्टेवाल्यास बाबू महाशयांस ऑफिसांत बोलावणें पाठवून, बोलावून आणावयाचें, व कांहीं तरी प्रश्न विचारून त्याला बोलण्यास लावावयाचें आणि सर्व मंडळींनीं गालांतल्या गालांत हंसतां हंसतां खो खो हंसण्यापर्यंत पाळी यावयाची ! ज्याप्रमाणें एखादें माकड, वानर वगैरे कांहीं बाळगावें, आणि त्याजकडून कांहीं शिकविलेल्या पकडा करवून दाखवाव्या व मंडळींत मौज करावी, त्याचप्रमाणें हा बाबूमहाशयांचा प्रकार होता. बुलिस्नीकसाहेबांचा एक मुलगा नकल्या होता, बाबूमहाशयांचें प्रदर्शन होऊन तो गेला, ह्मणजे, किंवा त्याच्या देखतच त्यानें बाबूप्रमाणें ऐट करून खिशांत हात घालून नक्कल करून दाखवायाची आणि बाबूंनीं "ओहो हो काय गमती मुलगा—और एक बार कर" "What an intelligent son! Divinely gifted ओहो हो काय बुद्धिवान् मुलगा ! अगदीं देवाचीच देणगी त्याला" असें ह्मणून हंसावयाचें आणि परत ऑफिसांत गेल्यावर त्यांच्या हाताखालची मंडळी लाल दीनकोमार व शेख अबदुल हुलूखां यांस सर्व हकीकत सांगून साहेबांची आपल्यावर फारच मर्जी आहे, साहेब आपल्यास फारच मानतो, असें जिकडून त्या मंडळीस वाटेल असल्या बाता झोंकून द्यावयाच्या. ते दोघेही यांची किंमत काय असेल, ती पूर्णपणें जाणणारे, पण यांच्याच वर्गांतले असल्यामुळें त्यांनीं माना डोलवावयाच्या, असला प्रकार चालत असे.

बाबू महाशयांनीं आपल्या मनाप्रमाणें बोलावयाचें तें बोलून घेतलें खरें, परंतु आतां साहेबांची मर्जी फारच नाराज झाली असल्यामुळें, त्यांनीं काय कागद होते ते भीत भीतच पुढें केले आणि एक एक प्रकरण समजावून सांगण्याचें आरंभलें. कागदाचा भारा तर केवढा थोरला तरी होता, आणि दर कागदांतील मजकूर सांगतांना बाबूच्या फाजील बोलण्यानें पिसाळा दिला. मग काय विचारतां ! प्रत्येक वेळां त्या आरामखुर्चीच्या हातावर आणि मधून मधून बाबू महाशयांच्या दंडावर, वळलेल्या मुठीचा आघात खाड्कन् होत असे. पण महाशय नुसते दंड चोळून "No your honour, excuse your highly revered Lordship" असें म्हणून अदबीनें मान लववून पुनः आपल्या चर्पटपंजरीचा फायदा साहेबांस देण्यास झटावयाचे ते झटतच. निघतां निघतां एक प्रकरण आलें त्यांत, खूपखा-

बादेच्या दरबारचे नायब दिवाण आणि सरन्यायाधीश वारल्याचा रिपोर्ट आला. त्याबरोबर बाबू महाशयांनीं विशेषच नम्रता धरली आणि सर्व भाषण विशेष अदबीचें होऊं लागलें. वस्तुतः पाहातां नायब दिवाण आणि सरन्यायाधीश वारल्याचा रिपोर्ट करण्याचें किंवा त्यांच्या जागीं दुसरा इसम नेमावयाचा असल्यास तो नेमण्यास अनुमति मागण्याचें नबाबास मुळींच कारण नव्हतें. कोणीही नेमणें त्याच्या हातचें होतें. परंतु नुकताच स्नीकसाहेबांकडून एक खाजगी वटहुकूम गेला होता त्यांत अशी ताकीद होती कीं, यापुढें कोणतीही बऱ्याच अधिकाराची व पगाराची जागा रिकामी झाल्यास एजंटसाहेबांचे हुजुरास कळविल्याशिवाय ती भरूं नये. त्याप्रमाणें तो रिपोर्ट आला होता. आज तो रिपोर्ट आल्याबरोबर बाबू महाशयांच्या तोंडास पाणी सुटलें, आणि त्यांनीं त्या जागेवर आपली नेमणूक व्हावी अशाविषयीं आपली इच्छा साहेबांस कळवून आपल्या लघळपणानें काम करून घेण्याचा निश्चय केला; आणि आपली उत्सुकता एकदम दिसूं नये म्हणून मुद्दामच तो कागद एकंदर कागदांत मध्यें घालून आणला. हेतु हा कीं, आपणांस जणूं काय सहजीं ती जागा मागण्याचा विचार सुचला असें दाखवावयाचें. साहेबांकडे आलेला तो रिपोर्ट आतां बाबू वाचणार व आपलें घोडें पुढें ढकलणार, तोंच चिंतामणराव बाबू आल्याची वर्दी खानसम्यानें येऊन दिली.

# प्रकरण १८ वें.

## चिंतोपंताची आशा.

निरभ्र, सूर्यप्रकाशरंजित अशा आकाशांत ज्याप्रमाणें एकाएकीं एखादा ढग यावा त्याप्रमाणें बाबू मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय यांच्या मुखाची अवस्था झाली. तो—विवक्षित कागद जों जों जवळ जवळ येऊं लागला, तों तों त्यांच्या मनांतील आशा अधिक अधिक उमलूं लागून त्या आशेची प्रभा त्यांच्या चेहऱ्यावर खुलूं लागली होती. परंतु खानसम्यानें चिंतामणराव बाबू आल्याची वर्दी देतांच ती सर्व प्रभा एकदम अस्तास जाऊन तिच्या जागीं एक कृष्ण विचारमेघ आला. बाबूसही यांची मोठी आशा, कीं आपण आज थोडेबहुत दिवस स्नीकसाहेबांच्या व त्यांच्या कुटुंबाच्या करमणुकीस कारण झालों; वेळ पडली तेव्हां त्यांचे गुद्दे सोसले, बुटाच्या लाथेची केवळ ओळख नव्हतीच असें नाहीं. (परंतु दुसऱ्या कोणास त्याची माहिति नव्हती आणि ज्याप्रमाणें कांहीं प्रसाद जगजाहीर न करण्यांतच भक्तजन

हित समजतात, त्याप्रमाणेंच हा प्रसाद आहे असें बाबूसाहेबांस पक्कें वाटत असल्यामुळें तो कोणाला न कळूं देण्याविषयीं बाबूसाहेबांनीं विशेष खबरदारी घेतली होती. ) तेव्हां असा लत्ताप्रसादही निमूटपणें भक्षण करण्यापर्यंत मजल गेली असतां साहेब सध्याच्या वरप्रदानाचे वेळीं आपणास दूर लोटतील, असें कधीं होणार नाहीं, अशी बाबूसाहेबांच्या मनाची अंतस्थ खात्री होती आणि त्या खात्रीवरून त्यांनीं आपल्या असिस्टंटास " अमुक गोष्ट आतां खास होणार, साहेबांचा हात धरून मी करून घेणार " असें एक दोनवार खात्रीलायक बोलून दाखविलें होतें. असल्या जंगी आशेचा भंग होण्याचा अणुरेणु मात्र संभव दिसला, तर त्याबद्दल मनाला फार वाईट वाटावें आणि भावी निराशेपासून होणाऱ्या दुःखाची किंचित् छाया मुखश्रीवर येऊन तिला ग्रहण लागावें यांत नवल काय ? चिंतोपंतांच्या वडिलांचा आणि बुलिस्नीकसाहेबांचा फार ऋणानुबंध आणि चिंतोपंताला साहेबांनींच इकडे बोलाविलें आहे, ते कोठें तरी त्यांची सोय करून देणार आणि सध्या ही आयतीच जागा आली आहे, त्या अर्थी तीच त्याला मिळवून देतील आणि आपली सर्व आशा व्यर्थ जाईल, तर या वेळीं आपण केवळ स्वस्थ असतां उपयोगी नाहीं, आपल्या अंगांत जितकी करामत असेल, तितकी सगळी योजून आपला कामगिरी साधून घेतली पाहिजे, असा विचार करून स्वारी तशीच उभी राहिली.

खानसम्यानें चिंतोपंताच्या येण्याची वर्दी देतांच साहेब ह्मणाले, " O ! has the beggar come ? All right, Babu leave the papers here I shall..."[१]

साहेब पुढें काय ह्मणणार तें बाबू तेव्हांच समजले व लागलीच ह्मणतात, " But, Sir, your reverenced and highly obliged honour, some papers of highest importance need immediate and instantaneous attention ! "[२]

" Bother take your highest importance, you toady, leave the room at once ! "[३]

असें म्हणून साहेबांनीं एकदम पाय हापटले आणि ते उठून उभे राहिले.

बाबूसाहेबांनीं पाहिलें कीं, आतां आपण अधिक प्रसंग करण्यांत कांहीं शहाणपणा नाहीं. सध्या येथेंच उभें राहून कांहीं अधिकउणा प्रसंग करून घेण्यापेक्षां कागद न ठेवतां येथून जावें ह्मणजे झालें. कागद पाहतां पाहतां जर का तो नायबदिवाण वारल्याचा रिपोर्ट पाहिला, तर खात्रीनें या नव्या भिक्षुकाला ती वर्णी मिळणार, आपल्याला मिळत नाहीं, असा पोक्त विचार करून स्वारी तेथून निघाली मात्र. कागद खाकेंत मारूनच चालली. साहेबांची इच्छा या वेळीं काम करण्याकडे नव्हतीच. तेव्हां बाबूसाहेबांनीं कागद नेल्याचें त्यांस कांहीं विशेष वाटलें नाहीं. तो एकदांचा निघून गेला एवढ्यानेंच त्यांस बरें वाटलें, आणि त्यांनीं चिंतोपंतास आंत बोलावण्यास सांगितलें. बाबूसाहेब

१. हं ? आला का तो भिकारडा ? बरं आहे, बाबू, ते कागद इथें ठेवा. मी...

२. पण अत्यंत सन्मान्य आणि आदरणीय सरकार, कांहीं कागद फार महत्वाचे आहेत त्यांजकडे तावडतोबीनें लक्ष्य पुरवलें पाहिजे.

३. आग लागो तुझ्या त्या अत्यंत महत्वाला ! चल, चालता हो खोलींतून, थुंकी झेल्या !

बाहेर जातां जातां त्यांनीं क्रुद्ध दृष्टीनें एकवार चिंतोपंताकडे पाहिलें. 'याचको याचकं दृष्ट्वा' या ह्मणीला अनुसरूनच त्यांचें वर्तन होतें. चिंतोपंत, आपल्याला आतां बोलावणें येईल, मग येईल म्हणून वाटच पाहत होता. त्यानें आपल्याबरोबर किती तरी करंड्या आणलेल्या दिसल्या. त्या सर्व साहेबांस नजर होत. साहेब त्यांचा स्वीकार करतील किंवा नाहीं याबद्दल त्यांना मुळींच शंका नव्हती, व साहेबांचे बुटेनेर, पट्टेवाले वगैरे मंडळींनाहीं कांहीं त्याबद्दल शंका नव्हती यामुळें साहेबांच्या परवानगीच्या आधींच ते जिन्नस एकामागून एक बंगल्यांत जात होते. इतक्यांत चिंतोपंतास साहेबांकडे आंत जाण्याचा निरोप पोहोंचला आणि ते आंत गेले. आंत जाण्याबरोबर साहेबांची मूर्ति दृष्टीस पडतांच स्वारींनीं अगदीं विलक्षण लवून सलाम केला आणि साहेबांनीं तो नुसत्या मानेनें स्वीकृत केल्याची शंका मात्र येईल इतक्या बेतानें मान हालवून एका खुर्चीकडे बोट केलें, तेवढ्यावरच खुष होऊन स्वारी त्या खुर्चीवर बसली. नंतर साहेबांनीं आणखी एकवार मान हालवून डोळे वर करून 'Well ?' ( काय आहे ? ) असें ह्मटलें. तेवढ्यावरून आतां आपल्यास आपली हांजीगिरी पसरण्याला कांहीं हरकत नाहीं असें वाटून चिंतोपंतांनीं आपल्या इंग्रजी वक्तृत्वास सुरुवात केली. तो यत्किंचित्सुद्धां अडखळला नाहीं.

"Sir, I have come to throw all my burden upon you. By the grace of your honour my beloved father earned little money but abandoned it for charity. Put nothing for me. Something he put for mother and brothers, but won't sufficient for their education. I must obtain something to eat them. Otherwise will not do my duty. I am not careful about my own, but them very much. Father told me last time. go to your honour and hold your feet. Think him in my place. He is father and mother. So I came with anxiety don't leave your feet."

[ " साहेब, आतां आपल्यावर सर्वस्वी भार टाकण्यासाठीं आलों आहें. वडिलांनीं आपल्या कृपेनें थोडाबहुत पैसा मिळविला, पण सगळ्याचा दानधर्म करून टाकला. मला तर कांहींच ठेवलं नाहीं. आमच्या भावंडांना आणखी आईला थोडंबहुत आहे, पण तें त्यांच्या शिक्षणाला आणखी याला काय पुरणार ! मीं मिळवून त्यांना खायला घातलंच पाहिजे. नाहीं तर कर्तव्याला चुकलोंसं होणार आहे. माझं मला कांहीं विशेष वाटत नाहीं. पण त्यांची काळजी फार लागली आहे. वडिलांनीं मला अगदीं शेवटीं जवळ बोलावून सांगितलं कीं, आतां तूं साहेबांचे पाय धर. त्यांनाच माझ्या जागीं मान. ते आपले मायबाप आहेत म्हणून मी आपल्याला एवढ्या उत्कंठेनं येऊन भेटलों. आणखी इकडे निघून आलों. आतां मी आपले पाय सोडायचा नाहीं....... " ]

साहेबांना त्याच्या बोलण्याचा अर्थ कळला कीं नाहीं हें कळणें मोठें दुरापास्त होतें. ते अगदीं स्थिरपणें ऐकत होते; परंतु मधून मधून चिंतोपंताच्या वक्तृत्वांतलें एखादें दुसरें वाक्य ऐकून त्यांस अनावार असें हंसूं येई यामुळें नाइलाज होई आणि ते मोठ्यानें हंसत. शेवटीं जेव्हां चिंतोपंत थांबला, तेव्हां त्यांनीं त्यास

मराठींत एकदम म्हटलें, " बरा पन् तुमच्या बोलना काय ? आह्मांला मराठी समजतो. मराटीच बोलावा. "

पण मराठींत बोलणें म्हणजे मोठें नामुष्कीचें काम, आपल्याला इंग्रजी बोलतां येत नाहीं असा त्याचा अर्थ होतो आणि तें तर कांहीं खरें नाहीं. तेव्हां तो मराठींत कसा बोलणार ? त्यानें पुनः आपलें इंग्रजी सुरू केलें.

"No, Sir, I speak well English, Sir, write more well. You must give me good appointment in some State and see my doing. I must a high place, Sir, big salary, I brought so many presents to day gave them butler, Sir, you promised Bombay when I met."

[ मला इंग्रजी चांगलं बोलतां येतं, साहेब, लिहितां त्याच्याहीपेक्षां चांगलं येतं. एखाद्या संस्थानांत आपण एक मोठीशी चाकरी मला देऊन पाहा म्हणजे माझी कर्तबगारी काय आहे तें समजेल. मोठ्या पगाराची जागा पाहिजे. मुंबईस भेटलों तेव्हां आपण कबूल केलं. ]

परंतु आतां पुढें हें संभाषण चिंतोपंतांच्या इंग्रजींत देण्यापेक्षां दोघांचेंही भाषण सरळ मराठींतच द्यावें हें बरें वाटतें.

**साहेबः**—ठीक आहे. ठीक आहे. जागा कुठें झाली असली म्हणजे मग यायचं होतंस. आतांच कशाला येऊन बसलास ? मी जरी म्हटलं असलं ये म्हणून तरी इतकी जलदी करावयाची नव्हती. जागा काय अगदीं हूं म्हटल्या ठेवलेल्या आहेत ? मला वाटलं होतं देतां येईल म्हणून, पण आतां नाहीं.

**चिंतोपंतः**—साहेब, आपण मनांत आणलं कीं, वाटेल तिथून जागा निघते हें अगदीं मला पक्कं ठाऊक आहे. आपण मनांत मात्र आणलं पाहिजे. रंकाचा राजा आणखी राजाचा रंक करण्याची शक्ति आपल्या हातीं आहे. आपण म्हणाल तें आजकाल सगळीकडे होतं आहे. कोण संस्थानिक असा आहे बरं, कीं जो आपल्या शिफारशीलान् सांगण्याला जुमानणार नाहीं ? आमच्या वडिलांनीं कांहीं आह्मांला आपल्या वजनाच्या गोष्टी थोड्या थोडक्या नाहीं सांगितल्या. आपण मला हातीं धरलंच पाहिजे. अगदीं आपल्यावांचून आमच्या कुटुंबाला कोणाचा आधार नाहीं. आमच्या आईनं तर मला मुद्दाम इकडे आग्रह करून करून पाठवलं. आपण माझ्याकडे नाहीं पण त्यांच्याकडे तरी पाहा. अगदीं अव्हेर करूं नका. माझी हात जोडून विनंति आहे. आतां आणखी काय सांगूं ? साहेब, आमची खरीखरी स्थिति आपल्याला सांगूं गेल्यानं समजायची नाहीं.

साहेबांचा दामोदरपंतांवर खरोखरीच लोभ असल्यामुळें त्यांच्या मुलाचा अव्हेर करावा, असें त्यांच्या मनांत आलें नाहीं. तथापि त्यानें मुलांस कांहींच पैसा ठेवला नसेल किंवा फार थोडा ठेवला असेल, हें त्यांस संभवनीय वाटलें नाहीं आणि ह्मणून ते लागलीच ह्मणतातः—

" अरे, तूं लुच्चा दिसतोस. दामोदरानें अगदींच कांहीं ठेवलें नसेल हें मला खरं वाटत नाहीं, अगदीं शंका नको. त्यानं चांगले पैसे केले होते. "

" मग आपल्याला काय ठाऊक असेल साहेब तें खरं. आमच्या आईनं मला न कळत तें कुठं लांबवलं असेल तर सांगवत नाहीं. मला एका घराखेरीज दुसरं कांहींसुद्धां दिसत नाहीं खरोखर. अन् घर कांहीं मोठं नाहीं. आधीं त्यांनीं धर्मादाय करण्यांतच घरंच घालविलं.

काय दागदागिने रोखठोक असतील ते आईनं लांबवले झालं. मिळून मी गरीब आपला मधच्यामधं उवडाच्या उवडाच. सावत्र आईचा—दुसऱ्या बायकोचा पगडा बसल्यावर, साहेब, आमच्यांत पहिल्या बायकोच्या मुलांना कोणी विचारीत नाहीं. त्यांची कोणी काळजी घेत नाहीं. तशीच माझी स्थिति झाली साहेब. मला आमचे वडील ह्मणतच कीं, मी आतां नाहीं तुझं कांहीं लागत. जा. आपलं पोट भर. आमच्या आईचा तरी त्यांच्या पश्चात् हाच विचार, मला घरांतून घालवून देण्याचा, पण मीं तिला सांगितलं कीं, वडिलोपार्जित घराच्या बाहेर मी कांहीं जायचा नाहीं, आणखी तुह्मी जरी मला सोडलंत, तरी मला तुमचीन् या लहान भावंडांची काळजी वाटायची ती वाटणारच. प्रसंग पडला, तर मी अगदीं मरे मरे तों काम करून त्यांना उत्तम व्यवस्थेंत ठेवीन अगदीं साहेब, ती आपली किती केलं तरी आई, आणखी तीं भावंडं. मग त्यांना बुचाडून, त्यांना सोडून काय ह्मणून वागायचं ? त्यांची काळजी मला. माझी त्यांना नसली तर त्यांचं त्यांना. ''

" पुरेत बोआ तुझीं व्याख्यानं " साहेब त्रासून म्हणाले, " तुझ्या बापाची मला अगदीं पक्की आठवण होते तूं बोलायला लागलास ह्मणजे तो अस्सा बोलका असे. पण मोठा फरडा कारकून, मोठा धोरणी. वस्ताद. तुझ्या अंगीं कांहीं तसा वकूब दिसत नाहीं. आणखी तुला जागा द्यायची कशी ? "

" साहेब, मला जागा देऊन पाहा आपण—आतां आपण द्यालच. मग वकूब पाहा माझा किती आहेन् किती नाहीं तें! मी आपल्या वडिलांचाच मुलगा आहे. आणखी आपली त्यांत शिफारस. मग काय विचारतां ? जागा पण अशी असावी कीं, आपलं दूर घटकेला नांव निघावं. आणखी माझी अशी नेमणूक झाली, ह्मणजे साहेब आपल्याला किती तरी मोठं सोइचं...... "

" बरं बरं कुठें आली जागा कीं पाहतों. सध्या जा आतां. सध्या तर कांहीं कुठें नाहीं दिसत ! "

" आहे ! साहेब. मला आजच थोड्या वेळापूर्वीं समजलं कीं एक जागा अगदीं माझ्या जोगती झाली आहे. आपण हूं म्हटलं कीं मला गरीबाला सहज मिळून जाणार आहे. आपण शोध करून पाहा.... "

# प्रकरण १९ वें.

## स्नीकसाहेबांचे " बाबालोग.

---

" कुठली जागा ? मला बातम्या लागायच्या आधीं तुम्हां लोकांना कशा बातम्या लागतात ? "

" साहेब, आमची दृष्टिच तशी असते. माझ्या अंगीं वकूब नाहीं ह्मणा तुह्मी, मला आपल्यासारखं इंग्रजी लिहितां वाचतां येत नसेल, पण ज्याला धोरण म्हणतात, तें आमच्यांत पूर्ण असतं. इंग्रजीचं काय, हां हां म्हणतां मी तयार करीन. अगदीं काळजी नको. मला एवढी जागा देऊन आपल्या जुन्या असिस्टंटाच्या कुटुंबाला पोसल्याचं श्रेय घ्या. साहेब ! मी आपल्याला आपल्या चाकरगारीनं अगदीं खूष करीन पाहा. आणखी साहेब, आमचे वडील जसे आपल्याला उपयोगीं पडले तस्सा मी पडेन. साहेब, आम्हांला दूर सारूं नका. आपण दूर सारलं तर खंडीभर भावंडांचंन् आईचंन् माझंन् कसं व्हावं ? साहेब, जागा झाली आहे, आणखी ती अगदीं माझ्या योग्य आहे. आपण चौकशी करा. मला अजून चार दिवस झाले नाहींत येऊन, तों मी सगळ्या बातम्या काढल्या, साहेब. मला आपल्याजवळ ठेवून घेतलं. तर साहेब फारच चांगलं होईल. नाहीं तर दूर आपण नेमलं, तरी आपल्याजवळ असल्यासारखंच आहे. साहेब, खुपखाबादेच्या नबाबाचा नायब दिवाण वारला आहे. त्याची तेवढी जागा—"

" काय ? खुपखाबादेचा नायब दिवाण वारला ! कोणीं सांगितलं तो वारला म्हणून ? मला कसं नाहीं कळलं ? मला कसा नाहीं रिपोर्ट आला ? खरोखर वारला ? " असें म्हणून साहेबांनीं जरा उतावळीनें चपराशास बोलावण्याची टेबलावरली घंटा वाजविली. त्याबरोबर चपराशी चट्कन्—इतक्या चट्कन् कीं घंटेचा नाद आणि त्याच्या येण्याचा वेग या दोहोंची जणूं काय चुरस लागली असावी असें दिसलें—आला. चपराशी येण्याबरोबर साहेबांनीं एकदम पाय आपटून " बाबूकु बुलाव जलदी ! " असें फर्माविलें. चपराशानें पुनः लवून सलाम करून तेथून पाय काढला आणि तितक्याच जलदीनें आफिसांत जाऊन "बाबू, साहेब तुमकु पुकारते है. जलदी जाना नहींतो बहोत गुस्सा.........."

पण बाबूंनीं मध्येंच त्याला विचारिलें, " वो दुख्खनका बाबू गया या बैठा है ?"

" हां जी अबी बैठा. गया नहीं. "

" कुच् हरकत नाहीं. " असें ह्मणून त्यानें आपलें कांहीं खरडण्याचें काम पुढें चालविलें. चपराशानें पुनः जलदी करण्याविषयीं अर्जविलें तरी आपली दाढी हलवीत ' हां. हां ' एवढेंच करून हंसून त्यांनीं आपली फर्डेशाई तशीच पुढें चालविली. बाबूमहाशय असें कधीं करणारे नव्हते. साहेबांचा निरोप येण्याचा

अवकाश, कीं स्वारी आपलें तुंदिलोदर आणि जटिलमुंड या दोहोंस देववेल तितका वेग देऊन धांवायचें; पण आज तसल्या प्रकरांत अगदीं 'रामाय शिवाय' असें दिसलें. पुनः दुसरा शिपाई आला, तेव्हां स्वारी उठली, आणि धिम्मेपणानें चालली. स्नीकसाहेबांचा हा एक मोठा विलक्षण स्वभाव असे कीं, त्यांच्या बोलावण्यास अगदीं हजर असलें पाहिजे. तें जर का बिनसलें, तर संपलेंच. बाबूमहाशयास हा त्यांचा स्वभाव माहिती नव्हता असें थोडेंच होतें, परंतु आज त्यांनीं कांहीं हेतूनें साहेबांस तसा राग आणावा ह्मणूनच वर सांगितल्याप्रमाणें दिरंगाईचें वर्तन केलें.

बाबूसाहेब खोलींत शिरतांच साहेबांनीं खूप चेष्टेचा स्वर काढून म्हटलें, "काय बाबू, आज काय तुमचे हत्तीचे पाय आणखी गणपतीचं पोट उचलेना वाटतं? तें फोडून सगळे मोदक बाहेर काढले पाहिजेत असं दिसतं." साहेब दक्षिणेंत असतांना मराठी शिकले तेव्हां त्यांना गणपतीची व त्याला प्रिय अशा मोदकांची माहिती झाली होती, आणि त्या वेळेपासून कोणाचेंही उदर स्थूल पाहिलें कीं, त्यांस त्या लंबोदर देवाची आठवण होऊन तें थट्टा करीत. त्यांतून आज ती थट्टा पूर्णपणें समजण्यास एक दक्षिणी गृहस्थ पुढें बसलेले. मग काय? साहेब तेवढें बोलूनच स्वस्थ राहिले नाहींत. लागलीच उठून "Come along, I shall try and break it open then. Babu Lambodar Pitambar[१]" असें ह्मणत बाबूच्या उदरावर त्यांनीं ढोसा उगारला आणि आपल्या थट्टेखोर स्वभावाबद्दल कौतुक वाटून एकदम फारच मोठ्यानें हंसले. साहेबांची आपल्यावर किती तरी मर्जी! ते आपल्याशीं नेहमीं अशाच सलगीनें वागतात असें चिंतोपंतांस दिसावें या हेतूनें बाबूमहाशयही हंसले. चिंतोपंतांनीं तर हंसणें अगदीं आवश्यकच होतें. ते हंसले, इतकेंच नाहीं तर त्यांनीं साहेबांस लागलीच म्हटलें, "वा! वा! साहेब, आपली स्मरणशक्ति तरी किती विलक्षण आहे! लंबोदर पीतांबर हीं आमच्या आरतींतलीं अक्षरंसुद्धां आपल्याला आठवतात! धन्य आहे तुमची! अशी ही अलौकिक बुद्धि म्हणूनच आपण आज आमच्यावर राज्य करतां आहां. ही आरती अशी आपण कितीकदां ऐकली असेल? पण त्यांतले सगळे शब्द कसे चक्क आपल्या ध्यानांत राहिले आहेत अजून!"

साहेब ही स्तुति ऐकून खरोखर खुष तर झालेच. पण तुह्मी समजतां त्याच्याही पेक्षां माझी स्मृति विलक्षण आहे असें दाखविण्यासाठींच काय ते एकदम ह्मणतात, "तुमचे वडील इकडे होते, तेव्हां त्यांच्या घरीं गणपतीचा उत्सव मोठ्या थाटाचा होई. तेव्हां आरतीच्या वेळीं मला बोलवीत. तेव्हां मी जाऊन सारी आरती ऐकत असें. मला आणखी पुष्कळ येत होत्या. तुमचे वडील फार चांगले, आह्मांला फार मानीत. त्यांची आठवण झाली कीं वाईट वाटतं. बरं बरं, बाबू तुमचं पोट नाहीं आह्मी फोडीत. पण दुसऱ्या वेळेस बोलावल्याबरोबर हजर होत जा. आपलेकडे खूपखाबादच्या नबाबाकडून कांहीं खासगी

१. मी तें आतां फोडून उघडें करतोंच. या बाबू लंबोदर पितांबर.

किंवा डेमिऑफिशल असा रिपोर्ट आला आहे ? ”

तो प्रश्न ऐकतांच चट्कन् बाबूसाहेबांच्या चर्येवर बदल झाला. त्यांनीं “ हं ! हं ! एकूण तूं बातमी काढूनच आलास अं ? पण मी तुझा वस्ताद आहें, ” असें ह्मटल्याप्रमाणें चिंतोपंताकडे पाहिलें. साहेब कां विचारताहेत हें त्यांच्या लक्ष्यांत आलें. खरें सांगावें कीं खोटें सांगावें याबद्दल क्षणमात्र त्यांच्या डोक्यांत विचार झाला, आणि एकदम त्यांनीं “ नाहीं. आजकाल कांहीं रिपोर्ट आला नाहीं ” म्हणून साफ उत्तर दिलें. मनांतला हेतु हा कीं, या वेळीं आपण होय ह्मणून सांगितल्यास आपल्या हातून ती जागा गेली. ती आपल्याला मिळण्याची आशा नाहीं. तेव्हां आपण ही वेळ मारून नेऊन मग साहेब एकटेच असतांना तो कागद काढून आपली वर्णी लावून घेऊं.

बाबूंच्या तोंडून “ रिपोर्ट आला नाहीं ” अशीं अक्षरें ऐकतांच साहेब एकदम चिंतोपंताकडे वळून ह्मणतात, “ कां ? सांगितलं नाहीं मी तुला माझ्याकडे रिपोर्ट आल्याखेरीज राहायचाच नाहीं. तुझ्या बातमीला करतोस काय ? ”

“ साहेब. नायब दिवाण वारला याबद्दल मुळींसुद्धां शंका नाहीं. त्याला वारून तीन चार दिवस झाले. आपल्याला कळवण्याची जरूरी काय, असं म्हणून दिवाणानं कळवलं नसेल. दुसरं कांहीं नाहीं. आपण लिहून विचारा पाहिजे तर. ”

“ No ! No ! लिहून विचारायची मुळींच जरूरी नाहीं. मला रिपोर्ट यायलाच पाहिजे होता. By God, I shall.......

परंतु इतक्यांत बाहेर कर्कश व रागीट अशा आवाजानें केलेला “ Harry, is your father in the study ? ”[१]

असा प्रश्न बुलिस्नीक साहेबांच्या कानीं पडला; आणि त्यावर “ Yes, Mamma with two native soovars. ”[२]

असें उत्तरही कोणीं दिलेलें कानीं आलें.

“ जा तर त्याला सांग कीं मला येऊन ताबडतोब भेट. काम आहे. ”

“ आई, त्यांच्या ल्याहाय् वाचाय्च्या खोलींत ते आहेत. तिथें आपण नाहीं जाणार. ते मारतील. ”

“ जा तूं. मीं धाडलं ह्मणून सांग. मग पाहीन कसे मारतील ते ! ”

ल्याहाय्वाचाय्ची खोली ह्मणजे बुलिस्नीकसाहेबांस अगदीं पवित्रतम जागा होती. तेथें त्यांच्या परवानगीवांचून येऊन कधीं कोणीं त्रास दिल्यास त्यांस मुळींच खपत नसे. त्यांची परवानगी असली ह्मणजे मग हरकत नाहीं. मुलांना तर त्या जागेंत येण्याची अगदीं सक्त मनाई असे. बुलिस्नीकसाहेबासारखे जे लोक असतात, त्यांचा स्वभावच हा कीं, मुलाच्या हातून अगदीं यःकश्चित् अपराध झाला ( असा कीं ज्याबद्दल कधीं कोणी बोलणार सुद्धां नाहीं ) तरी एखादे दिवशीं त्यांच्या डोक्यानें घेतलें कीं, ते त्याला चोप चोप चोपायचे, आणि नाहीं तेव्हां अगदीं मोठा प्रचंड अपराध, ( कीं ज्याबद्दल कोणी क्षमा करणें चुकीचें होणार ) घडला असला, तरी त्याबद्दल क्षमाच

---

१. ह्यारि, तुझा बाप ल्याहाय् वाचाय्च्या खोलींत आहे काय ?

२ हो, आई, आणखी तिथें दोन नेटिव सूवर आहेत.

तर काय, पण वेळीं कौतुक व्हावयाचें आणि विशेष लाड व्हावयाचे. मुलांनीं स्टडींत येणें ह्मणजे शिक्षा करण्यायोग्य असा अपराध होय असें बुलिस्नीकसाहेबांनीं त्यांस अनुभवास आणून दिलें होतें. तथापि बापाच्या निकालावर आईच्या हुकुमाची अगदीं जालिम मात्रा असल्यामुळें आईनें सांगितल्यावर अणुरेणु मात्र भय न बाळगतां मुलें बिनदिक्कत त्या खोलींत जावयाचीं, असा प्रकार असे. ज्या ठिकाणीं जाऊं नको म्हणून मुलांना बंदी केली तेथें जाण्याविषयींची त्यांची उत्कंठा हटकून उत्कट व्हावयाची. या नियमाला अनुसरूनच ह्यारी, जेज़बेल व फ्लॉरी या तीन मुलांचें वर्तन असे. ह्यारीला तर कांहींना कांहीं तरी सबब साधून त्या स्टडींत जावें असें वाटे. आईच्या हुकुमानें जाण्यास मिळालें, तर बरेंच. आठ चार दिवसांत न मिळालें, तर माराची परवा न करतां एकदां जावयाचें धाडस करावयाचाच. याचें कारण त्या खोलींत कांहीं चित्ताकर्षक होतें असें नाहीं. तर केवळ आपल्याला बापानें तेथें येऊं नको म्हणून सांगितलें आहे त्याच्या विरुद्ध करण्याची हौस हें होय. असा प्रकार असल्यामुळें ह्यारी मोठ्या आनंदानें उड्या मारीतच दारापाशीं आला आणि साहेबी रीतीप्रमाणें दारावर " ठोक ठोक ठक ठक " कांहीं न करतां एकदम दाराला धक्के देऊन आंत शिरला व " पपा, पपा. आईनं तुह्मांला आत्तां बोलावलं आहे. आत्तां अगदीं " असें जोरानें ह्मणाला.

त्याबरोबर त्रासून " जा—जा—येतों ह्मणून सांग ! " असें साहेब म्हणाले.

" नाहीं. नाहीं. अगदीं उठाच. या काळ्या सुवरांचं काय एवढं आलं आहे ? आईनं सांगितलं आहे लागलीच या. हे सुवर जात नसले, तर मी इथें बसतों तुह्मी येईपर्यंत. नाहीं तर हे कांहीं चोरून न्यायचे ! बाबू मोठे चोर आहेत. "

बुलिस्नीकसाहेबांनीं या वेळीं मुलाला दाबावयाचें, तें एकीकडेच राहून त्यांनीं त्याच्या बोलण्यानें कौतुकच केलें. उलट हंसून ते बाबूस म्हणतात, " बाबू, तुम्हाला आमच्या चिरंजिवांनीं अगदीं पक्कं ओळखलं आ ! म्हणायचं. He is instinctively clever at reading a man's character. [ माणसाची दानत ओळखण्यांत तो अगदीं उपजत हुषार आहे. ] बरं एक क्षणभर थांबा. मी आंतून जाऊन येतों. "

असें ह्मणून साहेब तेथून उठून गेले. बापकोंचा हुकुम अमान्य करण्याइतकी हिंमत त्यांच्या अंगीं मुळींच नव्हती आणि ही गोष्ट त्यांच्या मुलांनीं पक्की जाणली होती. यामुळें तीं साहेबांपेक्षां आईला खुष ठेवण्यांत अधिक तत्पर असत. साहेब तेथून गेले त्या वेळीं आपले चिरंजीव खोलींतच बसणार हें त्यांच्या लक्ष्यांत राहिलें नाहीं. ते गर्दी गर्दीनें तसेच निघून गेले.

आणखी काय पाहिजे ! ज्या खोलींत पाऊल घातलें तर कधीं चोप मिळाल्याखेरीज झालें नाहीं, त्या खोलींत आज खुशाल वाटेल तें करावयाला मोकळीक मिळाल्यावर आणखी काय पाहिजे ! ह्यारीच्या आनंदास अगदीं पारावार नाहींसा झाला. तो टाळ्या पिटूं लागला. आपण एकट्यानेंच हा आनंद उपभोगावा कीं आपली प्रिय भगिनी जेज़बेल हिलाही त्याचा वांटा द्यावा ? याबद्दल त्याला विचार पडला. आपला बाप कांहीं लवकर परत येत नाहीं, हें त्यास पक्कें ठाऊक होतें. कारण, आईनें ज्या आवाजानें त्यास निरोप

सांगण्याचा हुकूम दिला, तो आवाजच सांगत होता कीं, कांहीं तरी जंगी भांडण होणार आहे, पण त्या भांडणाचा संबंध आतां त्याच्या विचाराशीं मुळींच नव्हता. आपण या प्रतिबंधित जागेंत आलों आहोंत, तेव्हां जमेल तितकें स्वातंत्र्य उपभोगून घ्यावें असा त्याचा विचार दिसला, आणि लागलीच बापासारखी चालण्याची व पाहण्याची ऐट करून बाप ज्या खुर्चीवरून उठून गेला होता त्या खुर्चीवर स्वारी जाऊन बसली. मग बाबू मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय यांच्याकडे पाहून मोठ्या ऐटीनें ह्मणतो, " I say, Kalasoovar Babu, go and call Jezbel here. She is a smart girl. She will enjoy the fun most heartily. Go, go, you kala gaddha. Who is this other Gaddha ! " [१]

बाबू महाशय पोट धरधरून हंसले. आणि ह्यारीस " छे. छे. छे. चोआ ! तुह्मी अगदीं बडेसाहेबांप्रमाणें बोलतां चालतां. अगदीं हुबेहूब नक्कल करतां. वाहवा ! वाहवा ! शाबास. " असें म्हणाले.

मग काय ? ह्यारीला आणखी उत्तेजनच आलें. तो मोठ्या जोरानें मूठ वळून खुर्चीच्या हातावर ती हापटून म्हणतो: " ये दुसरा गद्धा कहांसे आया ? बोलो. कहांसे आया ? "

चिंतोपंतावर बाबू महाशयांचा जो आपला हा प्रतिस्पर्धी म्हणून राग झाला होता, तो शमवावयाला ही वेळ चांगली आहे असें वाटून त्यांनीं हंसतां हंसतां चिंतोपंताकडे पाहून लागलीच उत्तर दिलें, " दखनसे बाबा लोग, ये दख्खनसे आया. "

" ये दख्खनका गद्धा है ? " ह्यारीनें ऐटीनें विचारलें.

" हां, बाबा लोग ! " बाबूंनीं उत्तर दिलें. पण हें उत्तर देतांना चिंतोपंताकडे अशा कांहीं नजरेनें पाहिलें, कीं चिंतोपंतास त्याचा फार फार संताप आला, पण करणार काय ? ही वेळ आणि हा प्रसंगच असा होता, कीं त्याला कांहीं सुद्धां हालचाल करतां येत नव्हती. तो मुकाट्यानें बसला होता.

इकडे ह्यारी आपल्या त्या खुर्चीवरून उठला, आणि चिंतोपंताच्या जवळ जाऊन त्यास मोठ्या गंभीरपणानें म्हणतो, " I say, I have taken a fancy to your Pagri. Let me have it. " [१]

या स्वारीच्या हातीं पगडी गेली, कीं तिचें वाटोळें होईल असें भय वाटून चिंतोपंत आपल्या आधींच मोडक्या तोडक्या आणि त्यांत अशा त्रेधेच्या प्रसंगीं अगदीं दशादिशा झालेल्या इंग्रजींत म्हणतो: " No ! No ! Small Sir, No, my pagri won't sit to your head. Don't, don't, Small Sir, don't, unite my hands. " [२]

' नको ' आणि तें अशा हास्यकारक रीतीनें म्हटल्यावर, मग काय विचारतां ? चिंतोपंताच्या ऐटबाज पगडीला ह्यारीनें

१. " ऐ कालासूवर बाबू, जा आणखी जेझबेलला बोलावून आण. ती मोठी हुशार आहे. तिला मनापासून मौज वाटेल. जाव् जाव् काला गद्धा, ये दुसरा गद्धा कहांसे आया ? "

१. " ए, तुझ्या पगडीवर आमची मर्जी बसली आहे. ती मला दे. "

२. " नाहीं, लहानगे साहेब, माझी पगडी तुमच्या डोक्याला बसणार नाहीं. नको, लहानगे साहेब नको, हात जोडतों. "

हात घातलाच. आणि ती ओढून आपल्या डोक्यावर चढवलीच. ती बिचारी बसेना. सुळकन खालीं पडली. चिंतोपंताचा राग त्याच्या पोटांत मावेना. आणि बाबू महाशयांचा हर्ष खरोखरीच आतां तें स्थूलोदर फोडून बाहेर निघतो असें त्यास वाटलें. मग काय विचारतां? सर्वच जमलें.

बुलिस्नीकसाहेबांच्या सर्व मुलांस नेटिव लोक ह्मणजे आपले नोकर असें वाटे. जितक्या नेटिव स्त्रिया दिसतील तेवढ्या सगळ्या कोणा तरी साहेबांच्या घरीं आय्या (दाया) असल्या पाहिजेत, आणि जेवढे पुरुष, तेवढे बट्लर, चपराशी, फार झालें तर रायटर असले पाहिजेत हा त्यांचा समज. ज्याप्रमाणें आपण आपल्या घरांतल्या नोकारांना वागवितों, त्याप्रमाणें वाटेल त्याला वागविण्याला हरकत नाहीं असा त्यांचा पक्का समज. मान देण्यास योग्य माणसें काय तीं स्वजातीय. जेवढा काळा तेवढा आपल्या नोकरीसाठीं. त्याची वाटेल तशी थट्टा करण्यास, त्याला वाटेल त्या शिव्या देण्यास, मुळींच हरकत नाहीं. काला सूवर, गद्धा, डॉंकी, ब्लॅगार्ड, हीं तर जणूं काय अगदीं साधीं नांवें. तीं वाटेल त्याला वाटेल तशीं लावावींत. स्नीकसाहेबांकडे हमेश येणारे ह्मणजे बहुतकरून थुंकीझेलेच असावयाचे. त्यांना "Small Sir" नीं किती मानखंडना केली तरी हंसण्यावारी घालविणें, किंबहुना त्यांचें कौतुक करणें अगदीं जरूर असें वाटे. जे कोणी बडे यावयाचे, त्यांच्या दृष्टीस आपले 'बाबा लोग' पडणार नाहींत अशी स्नीकसाहेब तजवीज ठेवींत. आणि कधीं पडलेच, तर बेताबाताचें वर्तन होईल अशा तऱ्हेची खबरदारी घेतली जात असे. एक वेळ मात्र एक संस्थानिक स्नीकसाहेबांच्या बंगल्यावर आले असतां आणि स्नीकसाहेबांचें बोलणें अगदीं भरांत चाललें असतां एकदम ह्यारी आंत जाऊन "गुडमॉर्निंग नबाब शूब्ल्याकखा" (Shoe-black-) खान असें म्हणाला, आणि मोठ्यानें फिदी फिदी हंसत दाराच्या पलीकडे जेज्बेल उभी होती तिच्याकडे धांवत गेला. तो नबाब आल्या वेळेपासून "नबाब शूब्ल्याकखा" "नबाब शूब्ल्याकखा" असें पंचवीस वेळां तो म्हणाला. तेव्हां, आंत जाऊन तुला असें बोलण्याचा मुळींच धीर होणार नाहीं, असें जेज्बेल त्यास ह्मणाली. तो ह्मणाला, आपण तसें जाऊन ह्मणणार. दोघांची चुरस लागली, पैज लागली आणि त्यानें मोठ्या ऐटींत जाऊन वर सांगितल्याप्रमाणें म्हटलें. त्या नबाबाचें नशीब कीं त्याला शूब्ल्याक ह्मणजे काय तें समजण्याइतकें इंग्रजी येत नव्हतें. त्याला असें वाटलें कीं, साहेबांच्या मुलानें आपल्यास सलामच केला आणि उलटें त्यानें त्याचें साहेबांजवळ कौतुकच केलें. त्याची हुशारी वाखाणली, धिटाईबद्दल शाबासकी दिली आणि आमच्या लोकांच्या पोरांत हा गुण नसल्याबद्दलची त्यांची निंदा करून मोठी दिलगिरी प्रदर्शित केली. बुलिस्नीकसाहेबांनीं त्या कृत्याबद्दल ह्यारीची कानउघाडणी करावयाची ती मुळींच केली नाहीं, उलट त्या नबाबाच्या अजागळपणाबद्दल सगळ्या दिवसभर थट्टा चालविली होती. कां? तर आपल्या चिरंजीवांनीं त्यांना किताब दिला त्याचें स्वारस्य कळण्याइतकें त्याला ज्ञान नव्हतें. नबाब जाई तों ह्यारीला असें पक्कें वाटत होतें कीं, आज आपल्यास घोड्याच्या चाबकानें खरपूस मार खावा लागतो, पण तसा मार न मिळतां उलट आपल्या चातुर्याचें

व धीटपणाचें कौतुकच झालेलें अनुभवास आल्यावर मग काय पाहिजे ? ते दिवसापासून त्याच्या मनाची पक्कीच खात्री झाली कीं, काळा लोक ह्मणजे आपणा ' बाबा लोगां'च्या मौजेकरितां,आणि आपण थोर झालों ह्मणजे आपली नोकरी करण्याकरितां जगांत उत्पन्न केलेले प्राणी आहेत. कोणी लहान थोर आला कीं, त्याची चेष्टा करण्याला मुळींच हरकत नाहीं आणि तसें त्यांचें चालेही बाबू मृत्तिकाभूषण चट्टोपाध्यायापासून तों तहत घरांतल्या आय्या व मेहतरापर्यंत सर्वजण त्याच्या माकडचेष्टांचें, शिव्यांचें कौतुकच करीत.

चिंतोपंताची पगडी हस्तगत करून ती आपल्या डोक्यावर चढविण्याच्या व तो न बसल्यामुळें पाडण्याच्या व पुनः उचलून डोक्यावर ठेवण्याच्या खटाटोपींत असतां एकदां ती बसण्याला आणि बराच वेळ झाला ह्यारी कोठें दिसत नाहीं ह्मणून त्याचा शोध काढीत जेज्बेल यावयाला एकच गांठ पडली आणि तो आपल्या भावाचा अवतार पाहून तिला जें ह्मणतां हंसू फुटलें आहे तें विचारूंच नका.

ती त्याच्या भोंवतीं गरगर फिरून कांहीं तरी मुलांचें गाणें गुणगुणून पोट धरधरून हंसू लागली. तिच्या मनांत त्या पगडीविषयीं किती तरी गोष्टी विचारण्याचें आलें, परंतु त्या भावाचें तें रूप पाहून तिला हंसू लोटलें, तें कांहीं केल्या आंवरेचना. बाबू महाशय तर तिच्याहीपेक्षां मोठ्यानें हंसत होते. आतां या आपल्या ऐटबाज पगडीचें काय मातेरें होणार कोणास ठाऊक, असा विचार करीत चिंतोपंत मात्र दुर्मुखून बसला होता.

# प्रकरण २० वें.

## अखेर साधली !

त्या पगडीचे त्या दिवशीं फार हाल झाले. जेज्बेल व ह्यारी यांनीं तिची अगदीं धूळधाण आरंभिली, आणि बाबू महाशयांनीं त्या बाबतींत जितका तोंडभार लावावयाचा तितका लावण्यास अणुरेणमात्र कुचराई केली नाहीं. ती पगडी Small Sir नीं डोक्यावर चढवून आरशांत पाहिलें. त्यांत अर्थातच ती उलटी दिसली,तेव्हां सुलटी बसण्यासाठीं तिच्यावर जितके ह्मणून प्रयोग करावयाचे तितके केले. ती आपल्या एकट्याच्या खटपटींनीं बसावयाची नाहीं, असें वाटून जेझीची मदत मागितली. तेथें काय, आधींच उल्हास आणि त्यांत फाल्गुनमास, ती लामलीच पुढें सरसावून तिनें त्या पगडीवर आपलेंही हस्तकौशल्य सुरू केलें. शेवटीं तें कांहीं जुळेना. तेव्हां बाबू महाशयांनीं हातभार लाविला, आणि तेव्हांही कांहीं जुळेना, तेव्हां स्वारी बेलाशक चिंतोपंताकडे येऊन आपल्या डोक्यावर ती पगडी

बसवून 'मी तुमच्यासारखा दिसेन असें करा' असें आग्रहपूर्वक म्हणूं लागली. चिंतोपंतानें प्रथम 'नाहीं होय' ह्मटलें इतकेंच नव्हे तर आपल्या हातांत पगडी घेऊन ती मागें धरून "Not, not, so long pull pull you made her dirty. My head-dress I require to go home. You give another bringing from Poona if father appoint me Tell him Small Sir and Madam about me and I give nice nice, high present." [१]

ह्यारी व जेज्बेल या दोघांस त्या भाषणाची इतकी मौज वाटली कीं, त्यांस हंसता हंसतां अगदीं पुरेवाट झाली, आणि बाबू महाशय तर हें दक्षिणी लोकांचें इंग्रजी भाषेचें ज्ञान पाहून नुसते खो खो खो खो करून हंसून अगदीं लोळकांड्या मारण्याच्या स्थितींत आले, परंतु काय करणार बिचारे! तो बंगला पोलिटिकल एजंटसाहेबांचा आहे. कलकत्त्यांतील आपला राधाबजार स्ट्रीटमधील खोपटमहाल नव्हे हें त्यांना पक्कें लक्ष्यांत बाळगावें लागलें. ह्यारी व जेज्बेल यांची गोष्ट निराळी होती. चिंतोपंताचें इंग्रजी भाषण ऐकून बाबूसाहेबांस खरोखर किती प्रकारानें आपली व आपल्या बंधूंची प्रौढी वाटली ह्मणतां! असलें इंग्रजी बोलून हा गृहस्थ नायब दिवाणीसारखी जागा मिळविणार, आणि आपण प्रत्यक्ष बर्कसाहेबांसारखी भाषा बोलण्यास समर्थ आहों, असें पावलोपावलीं आपल्या भाषणांनीं आपण साहेबांस सिद्ध करून देत असतां, त्यांनीं आपली त्या थोर जागेवर नेमणूक करण्याचें मनांत सुद्धां आणूं नये हा केवढा अन्याय आहे! असें तर बाबूमहाशयांच्या मनांत एक पंचवीस वेळां आलें आणि आपल्या व या दक्षिणी गृहस्थाच्या इंग्लिश भाषाज्ञानांतील अंतर मनांत घेऊन आपल्या ज्ञानाचें प्रदर्शन करून या दक्षिणी भिक्षेकऱ्यास तर दिपवूनच टाकावें असें वाटलें.

"Is this, O my Deccani confrere, your poor and meagre and mi erly knowledge of that stupendously splendid and bombastically beau iful language of the enormously grand rulers by the grace of God the Almighty, of this most ancient and sanctimoneous M therland of ours?–I mean our Ind? Then, O my compatriot, verily for my shame I must confess you are gone–totally absolutely, unfoundably, gone–gone forever. O my brother of the same Aryan Alma Mat rs womb!"

बाबूसाहेबांस या वेळीं आपलें इंग्रजी भाषेचें श्रेष्ठ ज्ञान पूर्णपणें दाखविण्याचा अगदीं अंतरुद्रेक आलेला होता, यांत कांहीं शंका नाहीं. कारण त्यांचा चेहरा, त्यांचे हातवारे, त्यांच्या त्या मानेचे झटके आणि डोळ्यांवरील पापण्यांचा पात हीं आपल्या बंधूच्या अज्ञानाबद्दल त्यांस किती

१. "छे. छे. आतां नाहीं. आतांपर्यंत ओढाताण करून तिची तुम्हीं घाण करून टाकलीत. आमच्या डोक्याला घालायची ती. घरीं जायच्या वेळीं मला पाहिजे. तुमच्या वडिलांनीं माझी नेमणूक केली, तर पुण्याहून आणून देईन, अहो लहानगे साहेब आणि मडमसाहेब; माझ्याबद्दल त्यांना सांगा ह्मणजे चांगले चांगले उंची नजराणे आणून देईन."

वाईट वाटत असावें याबद्दल चांगलीच साक्ष देत होतीं. त्यांचें तें शोकपूर्ण वक्तृत्व आणखी बरेंच लांबलें असतें; परंतु बिचाऱ्या चिंतोपंताचें लक्ष्य बाबूंच्या वक्तृत्वापेक्षां स्वतःच्या पगडीकडे अधिक होतें. ती पगडी ह्यारीनें त्यांच्या हातून केव्हांच हिसकावून घेतली आणि पुनः ती डोक्यावर ठेवून त्यांच्यासारखें दिसण्यासाठीं व त्यांची नक्कल करण्यासाठीं, त्यांचें उपरणें मागूं लागला—तो लवकर देईना. तेव्हां ओढूं लागला. किती केलें, तरी त्याच्या अंगांत दक्षिणी पाणी होतें. त्यास या एकंदर अपमानाबद्दल फार वाईट वाटलें. नव्हे संतापही आला. त्या भरांत त्यानें झट्कन् आपलें उपरणें त्याच्या हातांतून ओढून घेतलें आणि पगडीही ओढून घेतली. ह्यारीला हा अपमान बिलकुल सहन झाला नाहीं. त्यानें लागलीच दांतओंठ खाऊन, कोट काढून दूर फेंकून देऊन आंतल्या शर्टच्या अस्तन्या वर सारून मुठी वळून "Now if I don't give it to you nicely, you Deccani donkey" असें म्हणून अंगावर धांवला. परंतु चिंतोपंताचें नशीब थोर. त्या अप्रतिष्ठेपासून त्याचें रक्षण व्हावयाचें होतें, यामुळें नितक्यांत स्नीकसाहेबांची स्वारी तेथें आली आणि तो प्रकार पाहून "काय आहे ?" म्हणून ह्यारीच्या अंगावर ओरडली. ह्यारी बाचरून अर्थातच थरथर कांपत एक एक पावलानें मागें मागें जात, चट्कन् नाहींसा झाला. जेज्बेल केव्हांच यःपलाय करून गेली होती. चिंतोपंतानें आपली पगडी चट्कन् डोक्यावर ठेविली आणि "कांहीं नाहीं. कांहीं नाहीं साहेब, माझी पगडी छोटेसाहेब, डोक्याला साहेब" असें बोलत बोलत तो उठून उभा राहिला. साहेब तितके रागांत दिसले नाहींत. जनानखान्यांत मडमसाहेबांशीं काय भाषणप्रसंग होत असेल, त्या मानानें आतां स्वारी परत येऊन बोलणार आणि त्या मानानेंच तबायत असणार असें त्यास वाटतच होतें. तेव्हां साहेब आले ते फारसे संतापून आले नाहींत असें पाहून त्यास साहजिकच बरें वाटलें. साहेब लागलीच त्यास म्हणतातः "बरं बरं कांहीं हरकत नाहीं. मेमसाहेबांनीं तुझे आधीं आभार मानायला सांगितले आहेत ते मानूं दे. हो. हो. तूं नजराणे पाठविले आहेस ते फारच चांगले आहेत—काय ह्मणालास ? खुपखाबादेचा नायब दिवाण वारला म्हणतोस ? माझ्याकडे कसा नाहीं रिपोर्ट आला. बाबू, रिपोर्ट आला नाहीं अशी तुमची खात्री आहे ?"

बाबूसाहेब गोंधळले. काय बोलावें हें त्यास समजेना. नजराणे चांगले आहेत, आणखी 'मेमसाब' नीं आभार मानले हें पाहतांच मग काय विचारतां ? ती जागा आतां रिकामी आहे हें समजतांच साहेब याच्या नेमणुकीसाठीं खटपट करील नव्हे खात्रीनें नेमणूक करील, आणि मग आपली सगळी आशा व्यर्थ जाईल. एकदां तर बाबूंनीं रिपोर्ट आला नाहीं म्हणून सांगितलेंच होतें. तेव्हां आतां 'आला आहे' असें ह्मणणें कांहीं शक्य नव्हतें. अर्थातच तेंच खरें म्हणून धरून बसावें लागलें व पुनः त्यांनीं 'नाहीं आला' म्हणून सांगून दिलें. मनांत निश्चय केला, कीं वेळ पडली, तर तो दाबून टाकावयाचा आणि तशी पाळी आलीच. स्नीकसाहेब पुनः चिंतोपंताकडे वळून म्हणतात, "तुला कशी बातमी लागली ? माझ्याकडे रिपोर्ट नाहीं, आणि तुला बातमी कशी लागली ?"

" साहेब, मला लागली खरी आणखी ती अगदीं खरी आहे. आपण पाहिजे तर तार करून चौकशी करवावी. " असें चिंतोपंतानें विनयपूर्वक उत्तर दिलें.

" त्या भानगडींत मी पडत नाहीं. माझ्याकडे रिपोर्ट केल्याखेरीज जागा तर भर म्हणावें, म्हणजे मग सांगतों काय आहे तें. बाबू, नबाबाकडून रिपोर्ट उद्यां आला; तर बरें आहे, नाहीं तर मला आठवण कर या प्रकरणासंबंधाची. "

" ठीक आहे. मी जरूर आठवण करीन. " बाबू साहेबांनीं उत्तर दिलें. परंतु उत्तर देतांना त्यांनीं चिंतोपंताकडे ज्या दृष्टीनें पाहिलें त्या दृष्टीवरून तें मनांतल्या मनांत " मी आठवण करणार ? पाहून घेतों " असेंच म्हणत असावेत असें दिसलें आणि त्यांनीं खरोखरी या आपल्या मनांतल्या मनांत म्हणण्याप्रमाणेंच पुढें केलें.

पण चिंतोपंताची खटपट बाबूपेक्षांही अतोनात विलक्षण. तो बाबूच्या आठवण करण्यावर कुठला अवलंबून राह्यला ? त्यानें कोणाकडून आणखी तार करवून शोध आणविला, तितक्यांत अशी बातमी लागली कीं, ती नायब दिवाणाची रिकामी झालेली जागा नबाबानें आपणच भरलीही. तीही बातमी दुसरे दिवशीं साहेबांकडे येऊन त्यानें कळविली.

मग काय विचारतां ? आपली ताकीद असतां, एक तर आपलेकडे रिपोर्ट केला नाहीं आणि आपल्या संमतीवांचून जागा भरलीसुद्धां. स्नीकसाहेब संतापून गेले.

खालसा प्रांतांत कलेक्टर आणि संस्थानांत पोलिटिकल एजंट किंवा रेसिडेंट हेच बादशहा होत. गरीब अज्ञानी लोकांस बादशाही अंमल कलेक्टराचाच आणि संस्थानिकांना पोलिटिकल एजंटाचा. ज्याप्रमाणें बादशहा अकबरासारखा असला म्हणजे त्याचे हातून लोकांस सुख होतें आणि ते त्यास दुवा देतात, त्याचप्रमाणें कलेक्टर अगर पोलिटिकल एजंट चांगला असल्यास लोक किंवा संस्थानिक सुख पावतात आणि दुवा देतात. तो औरंगजेबासारखा खाष्ट असला, तर उलट प्रकार होतो. कलेक्टर तरी इतका नाहीं पण पोलिटिकल एजंट खरा खरा बादशहा होय.तो बादशाहिणीचा प्रतिनिधि असल्यामुळें त्याचा मानमरातब बराच असतो, आणि त्या ठराविक राजकीय मानमरातबापेक्षांही त्याच्या अधिकारांतल्या संस्थानिकांकडून जो त्याचा मानमरातब होत असतो तो कांहीं विचित्रच. त्या मानमरातबामुळें इतरांना तर काय, परंतु त्याचें त्याला सुद्धां असें वाटूं लागतें, कीं आपण दिल्लीपद बादशहाच्या अगदीं नजीक आहों. किंबहुना आपण त्या तक्तावर प्रत्यक्ष बसलों नाहीं इतकेंच, बाकी आपला सर्व अधिकार तसाच आहे. त्याच्या कमीअधिक दर्जाप्रमाणें पांचचार महाराज, दोनचार नबाब, दहावीस राजे आणि पांचपन्नास चिप्स त्याच्या तावडींत असतात; अर्थातच त्या मानानें त्याचा लवाजमा आणि एकंदर व्यवस्था ठेवणें भाग असतें. कांहींना दहा, बारा, पंधरा तोफांचा मानही असतो. मग त्यांस मोगल पादशहातीच्या अधिकाराचें स्मरण होऊन तसा अंमल आपण गाजविल्यास मोठीशी हरकत येणार नाहीं असें वाटलें, तर त्यांत नवल काय ? महाराज, नबाब, राजे यांच्या दरबारीं, रंगमहालीं, खानगींत जी कांहीं उलाढाल होत असेल, ती आपल्याला कळल्याखेरीज होणें म्हणजे त्यास एक प्रकारचें मोठेंच वैषम्य वाटतें. एवढ्या

तेवढ्या बाबतींत सुद्धां त्यांनीं आपणांस विचारून मग आपण त्यांस तुमच्या सोईला येईल तसें करा असें उत्तर देणें यांत जो आपला मान आहे तो त्यांनीं आपल्याला न कळवतां कांहीं करण्यांत नाहीं, ही त्यांची बुद्धि. यामुळें तो आपला मान राखून घेण्याकडे त्यांची नेहमीं दृष्टि असते. त्यांत आणखी आपल्या शिफारशीचीं माणसें शिरकवावयाचीं असा हेतु असला म्हणजे मग काय विचारतां? बुलिस्नीक-साहेब या मानी कोटींतले होते. आपल्या नजरेखालीं असणाऱ्या संस्थानिकांनीं आपल्या संस्थानांतल्या लहान मोठ्या घडामोडी आपल्याला कळविल्याखेरीज चालवूं नयेत. आपली सला घ्यावी. निदान आपल्या कानावर तरी त्या घालाव्या असें त्यांस वाटे व तसें त्या संस्थानिकांकडून करवून घेण्याची ते नेहमीं खबरदारी घेत. असें असल्यामुळें खुपखाबादच्या नबाबानें नायब दिवाणाच्या मृत्यूसंबंधानें व त्यामुळें रिकाम्या झालेल्या जागेवर नेमणूक केली त्यासंबंधानें आपणास कळविलें नाहीं, म्हणून स्नीकसाहेबांची मर्जी फारच खप्पा झाली; अर्थातच ती चिंतोपंताच्या पथ्या-वर पडली. त्याच्या उदरीं शनि आला म्हटलें तरी चालेल. स्नीकसाहेबांनीं स्वद-स्तूरचें खाजगी पत्र नबाबास लिहून, रिपोर्ट न करतां वाटेल तसें वागण्याचा परिणाम बरा नाहीं असें सुचविलें. आपण रिपोर्ट केला होता आणि तो पावल्याचेंही लिहून आलें नाहीं, तेव्हां आपण जागा भरली असें नबाबाचें उत्तर आलें. तें उत्तर आल्यावर पुनः साहेबांनीं चाचूस रिपोर्ट आला होता काय? असें विचा-रिलें. बाबूंनीं साफ "नाहीं" म्हणून आपलें पहिलेंच म्हणणें कायम केलें आणि तो रिपोर्ट दडपून टाकला. लहानापासून थोरांपर्यंत सगळे इंडियन्स् लुच्चे. लबाड, कृतघ्न त्यांतलाच हा नबाब आणि त्याला आतां शिक्षा म्हणजे त्यानें केलेली नेम-णूक रद्द करून आपला माणूस नेमावा हीच योग्य, असा साहेबांचा उद्गार निघून व विचार ठरून बाबूसाहेबांच्या निराशेस व द्वेषास कारण अशी चिंतोपंताची नेमणूक झाली. चिंतोपंत अगदीं आनंदला आणि लागलीच जाणाऱ्या डाकेनें पुढील पत्र सर-स्वतीबाईस गेलें.

* * *

"एकदांची अखेर ला. आपल्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं झालें एकंदरींत आपण नशीबवान् खऱ्या, नाहीं तर इतक्या सहज आणि इतक्या दर्जाची जागा एकदम मिळायची? मी येथें येण्याला, आणि सर्व गोष्टी जम-ण्याला काय पण एकच गांठ पडली! एकदां चोट शिरकलें; आणि तेंही इतक्या लवकर, कीं माझें मलाच आपल्या चांगल्या नशिबाबद्दल कौतुक वाटत आहे. आपल्या त्या प्रांतीं काय किंवा या प्रांतीं काय, चाकऱ्या मिळणें ह्मणजे फारच दुरापास्त झालें आहे. परंतु मला मुळींसुद्धां अड-चण पडली नाहीं. " वडिलांनीं पैसा मिळ-विला खरा; परंतु तो सगळा दानधर्मांत खर्च करून टाकला. आह्मां मुलांना किंवा आमच्या आईला त्यांनीं कांहींसुद्धां ठेविलें नाहीं ह्मटलें तरी चालेल. आपण मला इकडे कोठें चांगल्या अधिकारावर लावि-ल्यास त्या भावंडांचें शिक्षण तरी होईल. मी त्यांना पांचपन्नास रुपये पाठवीन." असें अनेक वेळां साहेबांपाशीं व विशेषतः मडमसाहेबांपाशीं अगदीं गयावया करून सांगून ठेऊन आपलें काम तर सध्या करून घेतलें आहे. आतां मी पुढें वाढत जाऊन चांगल्या मोठ्या संस्थानाची दिवाणगिरी

मिळवतों. त्याची अगदीं काळजी नको. सध्याच आपल्याला जसा थाटमाट पाहिजे होता, तसा अगदीं हुबेहुब जरी नाहीं, तरी बराच झाला आहे. मग आतां चपराशी व कारकून आपल्याला येण्यासाठीं कधीं पाठवूं ? आपल्याकडून लिहून येतांच पाठवून देतों, अगदीं थाटानें यावें, पण लवकर यावें. अशा अधिकाराचा उपभोग माझ्या एकट्याच्यानें घेववणार नाहीं. करितां येण्यास विलंब लावूं नये. तिकडली व्यवस्था काय लावावयाची ती लावावी. चेंड्याची प्रकृति कशी काय आहे, तें उत्तरीं कळवावें. त्याचेंच गुलाभाचें नशीब चांगलें दिसतें आहे. कळावें, हे प्रेमपूर्वक आशीर्वाद. ”

या पत्रानें सरस्वतीबाईस केवढा उल्हास वाटला असेल याची कल्पना तरी वाचकांस येईल काय ? आपल्या इच्छेप्रमाणें अधिकाराची जागा मिळाली याबद्दल तिला आनंद तर झालाच; परंतु सगळ्यांत आनंद झाला तो, आपल्या शहाणपणामुळें हे दिवस आपल्यास दिसत आहेत, आपण आपला शहाणपणा उपयोगांत आणून नवऱ्याच्या पाठीस लागलों नसतों, तर नवरा येथेंच माशा मारीत बसला असता. आणि मग आतां उपभोगण्यास सांपडणारा भावि आनंद आपणास लाभला नसता, ह्या आत्मप्रतिष्ठेच्या विचारामुळें हा विचार तिच्या मनांत मात्र आला असें नाहीं, तर तिनें तो ज्याच्या त्याच्याजवळ बोलनही दाखविला.

# प्रकरण २१ वें.

## गरिबीचा संसार.

कालानें राधाबाईवर प्रसंग भयंकर आणला, आणि त्यानेंच तिच्या चित्ताला स्थैर्यही आणलें. तोच सर्व कांहीं करतो, दुःखानें आतां आपण जगतों कीं मरतों अशी अवस्थाही तोच करवितो, सर्व आशा नष्ट करून टाकण्याला तोच कारण असतो, आणि अंतःकरण करपवून टाकणारा तोच; परंतु आश्चर्य हेंच कीं, जो झाडांवरील पानांस पिकवून खालीं पाडतो, तोच काळ पुनः त्याच ठिकाणीं हिरवी पालवी आणतो. जो अंतःकरण करपवून त्यांतील आशावृक्ष समूळ भाजून काढल्याप्रमाणें करतो, तोच पुनः भिन्नस्थानीं त्या आशावृक्षास अंकुर आणतो. सखाराम वारला त्या वेळीं राधाबाईची स्थिति इतकी दुर्धर झाली कीं, त्या स्थितींतून ती आतां जगेल असें तिचें तिला तर नाहींच वाटलें, परंतु इतरां कोणासही वाटेना. सीताराम तर अहोरात्र तिच्याबद्दल काळजींत असे. कित्येक दिवसपर्यंत राधाबाई केवळ वेड्याप्रमाणें वागली. तिला भ्रम झाला म्हटलें तरी चालेल. थोरल्या मुलावर तर तिचें प्रेम होतेंच, परंतु सखारामावर फार होतें. आणि तो आजारी पडल्या दिवसापासून तर तिचें तनमनधन त्याच्याकडे लागून राहिलें होतें. तिला असें वाटे कीं. आपल्या निष्काळजीपणामुळें तो मुलगा मेला. आपण त्यास जाऊं दिलें नसतें, तर त्याच्यावर असा प्रसंग येताना. परंतु होणारासारखी बुद्धि होते असें म्हणतात तेंच खरें. तिची आई तिला अतोनात बोले. ही वेळ बोलण्याची नव्हे, आपल्या बोलण्यानें एखादा भयंकर परिणाम व्हावयाचा, हा विचार त्या म्हातारीच्या मनांत कधीं आला नाहीं. यामुळें ती प्रसंग सांपडेल तेव्हां राधाबाईस हाणी. ‘ एका पोराला मारून टाकलात, आतां हायशा बसायला झालं ना ? ’ असें म्हणण्यास ती मागेंपुढें पहात नसे. सरस्वतीबाईच्या तोंडींच हे असले शब्द शोभायचे, परंतु राधाबाईच्या आईवर—आणि राधाबाईवरही—जे प्रसंग एकामागून एक येत गेले, त्या प्रसंगांमुळें त्या बाईलाही भ्रम होऊन काय बोलावें, कोणाला बोलावें कांहीं समजेनासें झालें होतें. आईची अशी स्थिति झालेली पाहून तर राधाबाईची फारच वाईट स्थिति झाली. घरांतलें सगळें काम तिच्या स्वतःवर पडलें. मुलीच्या लग्नाची काळजी पडली आणि संसार मोठ्या कष्टानें पार पाडणें तर अतोनात अवश्य झालें. एक वर्षांत—वर्ष अजून झालें होतें तरी कोठें ? बाप, नवरा आणि एक मुलगा इतकीं माणसें नाहींशीं झालीं. यथास्थित संपत्ति असल्यामुळें कधीं कोण्याही गोष्टीची ददात ठाऊक नव्हती, ती सर्वच गोष्टींची एकदम ददात झाली. असा दुर्धर प्रसंग

येऊन पडला. या प्रसंगांतून आतां पार तरी कसें पडावयाचें असा वारंवार तिला प्रश्न येऊन ती अगदीं कष्टी असे. परंतु कांहीं दिवस त्या इस्पितळांतल्या वासानें म्हणा, अगर जीं संकटें ओढवलीं त्या संकटांच्या अतिरेकानें मन थोडेंसें वट्ट झालें म्हणून म्हणा, अथवा सिस्टर च्यारिटीचें व तिचें जें बोलणें झालें, त्यामुळें म्हणा, किंवा त्या परोकारार्थ देह वाहिलेल्या स्त्रीच्या उदाहरणानें म्हणा, थोडेच दिवसांत ती अगदीं पूर्ववत् बनण्याची आशा दिसूं लागली. तिनें आपल्या थोरल्या (सावत्र) मुलाचा व सुनेचा संबंध तोडून टाकल्या दिवसापासून तिच्या मागला केवढा मोठा त्रास तरी चुकला होता ! आतां कोणी चिटपांखरूंसुद्धां इकडचें तिकडे फिरकत नसे. जणूं काय एकमेकांचें अस्तित्व सुद्धां एकमेकांना माहिती नाहीं असा प्रकार दिसूं लागला. दुःखांत सुख राधाबाईस तेवढेंच होतें कीं, परमेश्वरी अवकृपेमुळें पितृशोक, भर्तृशोक व पुत्रशोक झाला, त्याच्या अपरिमित दुःखांत त्या दुष्ट दांपत्याचा छळ पाठीस लागला नाहीं. त्यांनीं नेमून दिलेली गोमुखी सोडून विश्वनाथपंताच्या बिऱ्हाडाजवळच अडीच रुपये भाड्याच्या तीन खोल्या घेतल्या होत्या, त्या तिला आपल्या मूळच्या स्वतःच्या घरापेक्षां सहस्रपटीनें सुखकर झाल्या. सैंपाकीण, आचारी वगैरेंनीं केलेल्या अनेक पदार्थांपेक्षां स्वतःच्या हातानें भाजलेल्या भाकरी आतां तिला अधिक बऱ्या वाटूं लागल्या. कारण या ठिकाणीं तिची तीच मालकीण होती. तें नवऱ्याच्या अमदानींतले सुखाचे दिवस आठवून विनाकारण दुःख करीत बसण्यांत कांहीं आतां अर्थ नाहीं; त्यापासून केवळ ताप मात्र होणार, आणखी कांहीं नाहीं; त्याचप्रमाणें जे जे प्रसंग आपल्यावर गुदरले, त्या त्या प्रसंगांबद्दल आतां खेद करीत बसण्यापेक्षां धीर धरून पुढला मार्ग आक्रमण करावा यांतच विशेष आहे असेंही तिच्या मनावर बिंबण्यास कारणें झालीं. जे गेले, त्यांच्याबद्दल शोक करून, जे आहेत त्यांच्याविषयीं निष्काळजी होण्यांत काय फायदा ! जें कांहीं गेलें, तें पुन: परत येणारें नव्हे, त्याच्याबद्दल विनाकारण हळहळ लावून घेऊन जें आहे त्याची अनास्था करणें हें शहाणपणाचें कार्य नव्हे. हा विचार तिच्या मनानें पक्का धरिला आणि त्या विचारास बळकटी आणण्याजोगें वर्तन तिच्याच सीतारामाच्या हातून होऊं लागलें. सीतारामाचें तिजवर अगदीं केवळ अनन्यभावानें प्रेम होतें. त्यानें तिला अणुरेणु मात्र दुःख होऊं नये म्हणून किती मार्गांनीं तरी आपला उपयोग होईल असें करावें. आतां आपला आधार, आपलें सर्वस्व सीताराम असें तिला वाटूं लागून त्याच्या भावि उन्नतीसाठीं जितके म्हणून आपल्या हातून कष्ट होतील तितके करणें आणि त्यास उदयाला आणणें हेंच आपलें कर्तव्य असें तिला वाटलें, आणि त्याच्या मनाला अणुरेणु मात्र दुःख होईल, किंवा त्याच्या अभ्यासादिकांत व्यत्यय येईल असें बोलणें किंवा करणें आपल्या हातून होणार नाहीं अशाबद्दल ती काळजी वाहूं लागली.

त्याचप्रमाणें आपण आपल्या दुःखांत चूर होऊन व्यर्थ असमाधानांत बसण्यापेक्षां सिस्टर च्यारिटीप्रमाणें दुसऱ्याच्या उपयोगीं पडण्यानें आपल्या मनास समाधान कां करून घेऊं नये ? आपल्यापेक्षांही शतपटीनें दुःखी असे प्राणी या जगांत काय थोडे आहेत ? दुसऱ्याच्या उपयोगीं पडण्याला प्रसंग काय कमी

आहेत? असे उदार विचारही तिच्या मनांत येऊं लागून, तिच्या आचरणांत फरक पडत चालला.

सीतारामास यावेळीं विश्वनाथपंतांची फारच मदत झाली. ज्याप्रमाणें एखाद्या कर्तव्यतत्पर वडील भावानें आपलें शिक्षण वगैरे होऊन आपण स्वतंत्र होण्याला योग्य झालों, असें पाहातांच आपल्या धाकट्या भावाला शिक्षणाच्या कामीं मदत करण्याच्या मार्गाला, आणि त्याची उन्नति जितक्या लवकर होईल तितक्या लवकर होण्यास जें जें कांहीं सुलभ तें तें हस्तगत करण्याला मोठ्या उत्सुकतेनें लागावें, त्याप्रमाणेंच विश्वनाथपंतानें चालविलें. सीताराम हा आपला धाकटा भाऊ, आणि यास सर्वतोपरी मदत करणें आपलें अगदीं कर्तव्य, अशा बुद्धीनें त्यानें त्यास हातीं धरलें आणि त्याच्या वागणुकीवर, शिक्षणावर वगैरे अनेक गोष्टींवर लक्ष्य पुरविण्याचें पतकरिलें.

सीतारामावर अशी चांगली नजर ठेवून त्याचें हित होण्याबद्दल मनोभावानें प्रयत्न करूं इच्छिणारी आणखीही एक व्यक्ति होती. ती व्यक्ति फेअरब्रेनसाहेब होत. सखाराम वारल्यादिवसापासून फेअरब्रेनसाहेबांस असें वाटूं लागलें कीं, केवळ आपल्या हलगर्जीपणानें बिचाऱ्या एका विधवेचा एक भावि आधार आपण नाहींसा केला. तेव्हां आतां तिचे उरलेले आधारस्तंभ तरी नीट उभे राहूं शकतील अशी तजवीज ठेवणें आपलें कर्तव्य आहे. ज्या दानतीचीं माणसें बुलिस्नीक वगैरे होत, त्या दानतीपैकीं मि. फेअरब्रेन् नव्हत. त्यांचा मार्ग निराळा. काळा लोक म्हटला म्हणजे त्याची किड्यांमुंग्यांपेक्षां फारशी अधिक किंमत नाहीं असें त्यांच्या मनास कधीं वाटलें नाहीं. तींही माणसेंच आहेत, आणि त्यांनाही आपल्याप्रमाणेंच विचारविकार आहेत, सुखदुःखादि गोष्टी आहेत; तसेंच न्यायान्यायापासून जें कांहीं वाटावयाचें तें त्यांसही वाटणारच, असें जाणून त्याप्रमाणें वर्तन ठेवणारे जे तुरळक साहेबलोक आपल्या देशाच्या वांट्यास क्वचित् येतात, त्यांपैकीं फेअरब्रेन्साहेब होते. गोरा आणि काळा यांत भेद मानणें यासारखें नीचपणाचें कोणतेंही वर्तन नाहीं असें त्यांचें पक्कें मत होतें. इतकेंच नव्हे तर गोरे लोक शहाणे आहेत, त्यांना सर्व प्रकारचें ज्ञान आहे, त्यांच्यांत शिक्षण अगदीं परमावधीला गेलें आहे, असा डौल मिरविणारांनीं काळ्या लोकांच्या अज्ञानीपणाचा, त्यांच्या अशक्तपणाचा फायदा घेऊन वाटेल तसें आचरण करणें हें त्यांस फारच वाईट वाटे. आपल्या निष्काळजीपणामुळें आपण एका गरीब मुलाची प्राणहानि केली. न जाणों हा मुलगा पुढें चांगला निपजून त्यानें आपला भाग्योदय करून घेतला असता असें त्यांच्या मनास वाटूं लागलें. आणि सिस्टर च्यारिटीच्या तोंडून त्यानें राधाबाईच्या एक दोन गोष्टी ऐकल्यावरून तर त्यास असें वाटूं लागलें होतें कीं, आतां आपल्या हातून जें कांहीं होईल तें करून झाल्या पातकाचें परिमार्जन केलें पाहिजे. दुसरा कांहीं मार्ग नाहीं. वाईल्डसाहेब आणि फेअरब्रेन यांचा मोठा स्नेह. फेअरब्रेनसाहेबांला ते दिवशीं—सखाराम गाडीखालीं सांपडला ते दिवशीं——त्यानें चांगल्या कृत्यापासून पराङ्मुख करण्याविषयीं खटपट केली. परंतु त्या खटपटीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. यामुळें त्याला मोठा राग आला. फेअरब्रेन तरुण आहे. तो या देशांत अगदीं नवखा आहे, त्याला

अद्यापि माहिती नाहीं. यामुळें या लोकांवर दया करून त्यांच्याशीं असल्या सलगीनें वागूं लागेल, तर विनाकारण आपलें नुकसान करून घेईल, असें वाईल्डसाहेबांस खरोखर मनापासून वाटत होतें. त्यांचें मत अगदीं असें कीं, या देशांतले लोक स्वभावतःच नीच व कृतघ्न, त्यांजवर किती उपकार करा त्याबद्दल त्यांना कृतज्ञता बिलकुल वाटावयाची नाहीं. आपलें काम असेल, तोंपर्यंत ते अगदीं पुढें पुढें करतील, काय वाटेल तें नीच काम करण्यास कधीं मागें पुढें पहावयाचे नाहींत. आपल्या तोंडावर एक बोलतील, आपल्या मागें काय बोलतील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. सत्यता ह्मणजे काय ? हें यांना ठाऊक नाहीं. यांच्या अंगीं कर्तृत्वशक्ति मुळींच नाहीं. अप्पलपोटेपणापलीकडे यांची दृष्टि नाहीं. एकमेकांच्या चुगल्या करून दुसऱ्यापेक्षां आपण वर चढावें आणि मग दुसऱ्यावर तोरा कसा मिरवावा या विचारांत यांचा सगळा जन्म जावयाचा. खऱ्या तऱ्हेनें पाहिलें, तर यांच्याशीं वागतांना जबरदस्तीनेंच वागलें पाहिजे. अशा मताचे जे असंख्य ऑफिसर इंग्लंडाहून इकडे आमच्यावर अंमल बजावण्यासाठीं येतात, त्यांच्यापैकीं अगदीं अस्सल मासला ह्मणजे वाईल्डसाहेब होता. तो म्हणे: “ आजपर्यंत मला ज्याला Gentleman गृहस्थ-असें म्हणतां येईल, असा काळा गृहस्थ भेटला नाहीं आणि ह्मणून त्यांच्यांशीं वागतांना आपण अगदीं दुरून दुरूनच वागलें पाहिजे. ” तो हंसत हंसत अगदीं स्पष्ट असें म्हणे, “ We are the Brahmins of this age– आम्ही या युगांतले ब्राह्मण आहोंत आणि हे सगळे अतिशूद्र आहेत–आपण त्यांना तसेंच वागवलें पाहिजे. एक वेळ मी महारांमांगांना जवळ करीन, पण these Brahmins!--No never.’ ज्या तत्त्वांची जपमाळ वाईल्डसाहेबांनीं आपल्या हातीं निरंतर घेतलेली होती, तीं तत्त्वें वर दिलेलीं होत. फेअरब्रेन खरोखरीच या देशांत अगदीं नवीन आलेला होता. पण नवीन आलेल्या इतर तरुण पोरांप्रमाणें, तिकडूनच पेन्शनर आंग्लो–इंडियन काकामामांकडून दीक्षा घेऊन आलेला नव्हता. किंवा लॉर्ड मेकॉलेची बाबूची व्याख्या पाठ करून ती जोटीवर घोकीत आलेला नव्हता. त्याला ज्या ज्या अनुभवशाली आंग्लो-इंडियनांनीं पढविण्याचा प्रयत्न केला होता, त्यांचा त्यांचा तो प्रयत्न फारसा सुफलित झाला नव्हता. त्याचें मन इतकें मात्र तयार झालें होतें कीं, ज्या देशांत आपण आतां नोकरी करावयाला जात आहोंत, त्या देशांतले लोक फार सौम्य, गरीब, निराधार, वाईट तऱ्हेनें वागविले गेलेले असले पाहिजेत. ज्या राष्ट्रानें एके काळीं सुधारणेचें शिखर पाहिलें, त्यांतले लोक केवळ अत्यंत नीच अवस्थेला गेले असतील, त्यांची माणुसकी पार नाहींशी झाली असेल, हें त्यास बिलकुल संभवनीय वाटेना. आफ्रिकेंतल्या गुलामांतसुद्धां माणुसकी आहे, सबब त्यांना मनुष्याप्रमाणें वागवावें म्हणून बढाया मारणाऱ्या आंग्लो–सॅक्सन लोकांनीं, असल्या लोकांना कुचकामाचें ठरवावें हें त्यास बरें वाटेना; आणि त्यानें आपलें मन या अशा दुराग्रही विचारांपासून अगदीं अलिप्त ठेविलें. आंग्लो–सॅक्सन रक्ताचे व मांसाचे बनलेले उत्तम गृहस्थ, ज्यांना ‘ gentleman ’ ही संज्ञा अगदीं बरोबर शोभणार, ज्यांच्या चातुर्यावर, वीर्यावर, न्यायबुद्धीवर, दयाशीलते-

वर व नीतिपटुत्वावर इंग्लंड देशानें आज चतुर्दिङ्मंडलव्यापी असें राज्य स्थापिलें, त्यांच्यापैकींच फेअरब्रेन होता. त्याचें मन कोतें नव्हतें. परमेश्वरानें एवढा थोरला देश आपल्या स्वाधीन केला आहे तो, त्यांतील लोकांच्या व आपल्या बऱ्याकरितांच **होय,** असें मनांत वागवून त्याप्रमाणें वर्तन ठेवणें, हेंच आपल्या लोकांचें कर्तव्य असें वाटून प्रत्येक गोष्टींत हिंदुस्थानवासी लोकांशीं प्रेमाची वागणूक करणाऱ्यांपैकीं तो होता. तो आपल्या नोकरांचाकरांशीं कधीं हुमरीतुमरीनं वागला नाहीं. कधीं त्यानें त्यांस दुखविलें नाहीं. जेव्हां जेव्हां त्यांच्या उपयोगी पडण्याचा प्रसंग येईल, त्यांचें हित आपल्याकडून होईल, तेव्हां तेव्हां त्यानें आपल्याकडून कसूर केली नाहीं. कोणाशीं कधीं उद्धट वृत्तीनें वागला नाहीं, यामुळें आणि असेंच वागणें चांगलें असें जेव्हां जेव्हां तो प्रतिपादन करी, त्यामुळें वाईल्डसाहेबांसारख्या लोकांत त्याची चेष्टा होई, आणि सखारामाच्या संबंधांत त्यानें जें एकंदर वर्तन केलें, त्यानें तर त्या चेष्टेची परमावधिच झाली. त्यास त्याच्या क्लबांत व मंडळींत फेअरब्रेन म्हणण्याचें सोडून कित्येक मंडळी ( Georgie Softbrain ) म्हणूं लागली. परंतु या आडनांवाबद्दल त्यानें कधींही राग दाखविला नाहीं. उलट स्नेही मंडळींत हंसण्यावारीच त्यानें तें मारून न्यावें. जें न्याय्य तें करण्याबद्दल आपली कुचेष्टा होते, याबद्दल त्याला आश्चर्य मात्र वाटे. परंतु यामुळें तो आपल्या वागणुकीपासून यत्किंचितही ढळला नाहीं. उलट दिवसानुदिवस त्याची मूळ बुद्धि कायम राहून तो त्याप्रमाणें नेकीनें वागत राहिला.

सीतारामास त्यानें आपला असें म्हटलें आणि सीतारामाची एकंदर हुशारी पाहून त्यास आपला म्हटल्याबद्दल त्याला मुळींसुद्धां कधीं पश्चात्ताप वाटला नाहीं. इतकेंच नव्हे, तर तो नेहमीं विश्वनाथपंताजवळ म्हणे, " या मुलाला इंग्लंडांत पाठविल्यास त्याचे अंगीं पौर्वात्य आणि पाश्चिमात्य उत्तमपणा एकवटून दिसेल. " फेअरब्रेनसाहेब स्वतः श्रीमंत नव्हता, किंवा त्याची नोकरीही कांहीं इतकीं वर्षें झाली नव्हती कीं, पगारांतून तो सीतारामास विलायतेस पाठवूं शकता; तथापि वेळ पडल्यास कांहीं तरी करून याला तिकडे पाठवूं असें तो ह्मणत असे. विश्वनाथपंताचा व फेअरब्रेनसाहेबांचा या मुलामुळें बराच स्नेह झाला होता. त्यांच्या बऱ्याच गांठी पडून एकमेकांत पुष्कळ गोष्टींचा खल होई. त्यांत एक वेळ विश्वनाथपंतानें राधाबाईची संसारास्थिति होती कशी, आणि झाली कशी याबद्दल बोलणें निघालें. तेव्हां राधाबाईच्या उत्तम स्वभावाबद्दल व सच्चारित्र्याबद्दल, त्यानें बरेंच सांगितलें आणि राधाबाईची एकंदर हकीकत ऐकून तर फेअरब्रेनसाहेबांस तिच्याविषयीं फारच पूज्यभाव उत्पन्न झाला. " अशी स्त्री कोणत्याही देशांत वंद्यच असणार " असें त्यानें दोनदां तीनदां म्हटलें.

याप्रमाणें दिवस चालले असतां एके दिवशीं एक चमत्कार घडला.

# प्रकरण २२ वें.

## पन्नास रुपयांची नोट.

महिन्याची पहिली तारीख होती आणि शनिवार होता. फेअरब्रेनसाहेब लवकरच आपल्या ऑफिसांतून येऊन आपल्या क्लबांतील खोलींत एक नवीन पुस्तक वाचीत एका ईझीचेअरवर पडला होता. जॉर्ज् फेअरब्रेन हा फार तरुण, अगदीं पंचवीस सव्वीस वर्षांचा होता. याचें मूळ ठिकाण इंग्लंडांत यार्क काउंटीमध्यें एक गांव होय. या गांवांत त्याचा बाप फार धर्मशील असा पाद्री होता. रेव्हरेंड चार्लस फेअरब्रेन डी. डी. हा खरोखरीच मोठा धर्मभीरु, उदारधी व सज्जन होता. त्याच्या प्यारिशमध्यें ( धर्मोपाध्याय या नात्यानें ताब्यांत असणारा टापू ) त्याजबद्दल आदरयुक्त प्रेम वाटत नाहीं, असा एकही—स्त्री किंवा पुरुष—रहिवाशी नव्हता म्हटलें तरी चालेल. त्याची बायकोही त्याच्याचप्रमाणें फार सुशील व दयाशील होती. आपल्या प्यारिशमधील गरीबगुरीब लोकांच्या ऐहिक व पारलौकिक, कायिक, मानसिक व जैविक सुख जितकें आपल्याकडून वाढवितां येईल तितकें वाढविणें हें आपल्या नवऱ्याप्रमाणें आपलेंही खरें खरें कर्तव्य असें मानून त्याप्रमाणें वागणारी होती. अशा आईबापांच्या पोटीं जें संतान होतें, तें साधारणतः चांगलेंच निपजेल यांत शंका काय ? रेव्हरेंड चार्लस फेअरब्रेन यांस बरींच मुलें झालीं. त्यांत तीन मुलगे व दोन मुली आजमितीस हयात होतीं. ज्याप्रमाणें आमच्या देशांत सध्यांच्या काळीं सगळ्या मुलांना एकच मार्ग लावून देण्याची चाल पडली आहे, त्याप्रमाणें इंग्लंडांत नाहीं. आमच्या मुलांसाठीं साधारणतः आम्हीं एकच मार्ग रेखून ठेवलेला. त्या मार्गांतून तीं पिळून न निघालीं, तर कोठें तरी गळून पडावयाचीं. आह्मीं आपल्या मुलांस होतां होईल तों परीक्षांच्या दिव्यांत घालून त्यांतून तीं निघालीं, तरी सरकारी चाकरींत, मास्तरकींत किंवा वकिलींत घालणार. फारच झालें तर डॉक्टरींत, पण त्यांतसुद्धां सरकारी चाकरी मिळविण्याकडे जितका प्रयत्न होईल तितका करून न जुळल्यास स्वतंत्रपणांत. एका गृहस्थास पांच मुलगे असले तरी ते एकाच चरकांत ढकलून होतां होईल तों सरकारी नोकरींत पडतील असें करण्याकडे त्याची प्रवृत्ति. इंग्लंडांतील बापांचें तसें नाहीं. मुलगा स्वतःचें कल्याण जाणण्याच्या वयांत आला, म्हणजे त्याला जो मार्ग आवडेल, जिकडे त्याची गति असेल, तिकडे त्यास जाऊं देण्याबद्दल व त्या मार्गांत यश यावें म्हणून जी मदत शक्य असेल, ती करण्यांत मुळींच हरकत होत नाहीं. पांच मुलगे असले तर एक फौजेंत जाईल, एक बारिस्टर होईल, एक धर्मोपाध्याय बनून पृथ्वीच्या

दुसऱ्या टोंकाला आणि एखाद्याच्या अंगांत धमक असल्यास तो आर्तिकमहासागराच्या पलीकडील जमिनीचा शोध लावण्यासाठीं जीव धोक्यांत घालील. रेव्हरेंड चार्लस फेअरब्रेन यानें आपल्या तीनही मुलांस घावयाचें तितकें शिक्षण देऊन तीन निरनिराळ्या धंद्यांत जाण्यास परवानगी दिली होती. पहिला, चार्लस फेअरब्रेन हा देशांतल्या देशांतच आरमारांत शिरला. दुसरा जॉर्ज फेअरब्रेनसाहेब हिंदुस्थानच्या सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरला, आणि तिसरा लहान वयांतच मिशनरी पंथांत शिरून चीन देशांत गेला. त्याचप्रमाणें मुलींपैकीं एक जूलिआ ही मिशनरी होऊन आफ्रिकेंत गेली व दुसरी लहान होती, ती अद्यापि त्यांच्याजवळ होती.

वृद्ध फेअरब्रेन यांची व त्यांच्या पत्नीची दानत अति उत्तम असल्यामुळें व परमेश्वराला भिऊन वागण्याचें शिक्षण त्यांनीं आपल्या मुलांस मनोभावापासून दिल्याकारणानें त्यांची सर्व मुलें फार सद्गुणी निपजलीं. मुलें घराचा आश्रय सोडून जाण्यास सिद्ध झालीं म्हणजे मातापितरांनीं मुलांस एवढेंच म्हणावें: “ मुला, तूं जाशील तिथें सगळ्यांशीं ममतेने वाग. हा नेटिव, हा देशी असला फरक मानूं नको. जो अनाथांवर प्रेम करील तोच देवावर प्रेम करतो. जा. अशा तऱ्हेनें वागलास म्हणजे तुला परमेश्वर कधींही कुठेंही सोडून जाणार नाहीं. ” कोणत्याही धर्माचा मनुष्य असो, त्याची त्याच्या धर्मावर पूर्ण श्रद्धा असली म्हणजे तो आपल्या मुलास, जसा मनःपूर्वक उपदेश करील, तसाच या ख्रिस्ती धर्माच्या उपदेशकानें आपल्या मुलांस नेहमीं उपदेश केला. तो त्या सच्छील बापाचा उपदेश जॉर्ज फेअरब्रेनच्या मनावर जसा ठसला तसा पुढें त्याच्या मनावर कोणताही उपदेश ठसला नाहीं. त्याच्या आंग्लो—इंडिअन उपदेशकांनीं हिंदुस्थानवासी जनांशीं त्यानें कशी वागणूक ठेवावी, याबद्दल अनेक प्रकारचा त्यास उपदेश केला, व वाइल्डसाहेबांसारखे कांहीं वर्षें आधीं येथें राहिलेले, आणि म्हणून एतद्देशीय लोकांविषयीं जास्त ज्ञान आपल्यास आहे अशी घमेंड मारणारे जे होते, त्यांस असें वाटे, कीं आपण या पोरास हातीं न धरला, तर हा आपली सगळी घाण करून घेईल. परंतु रेव्हरेंड चार्लस् फेअरब्रेनसाहेबांनीं आपल्या मुलाच्या मनावर जो लहानपणापासून ठसा उमटून दिला होता, त्यामुळें जॉर्ज यास उलटें असें वाटूं लागलें कीं, वाइल्डसारख्या गृहस्थाचें आपण ऐकूं लागलों, तर मात्र आपण आपल्या मनाची घाण करून घेऊं खरी. जॉर्ज फेअरब्रेन येथें येऊन सहा आठ महिने झाले नव्हते, तोंच त्यानें आपल्या आईस एका पत्रांत पुढील मजकूर लिहिला होता. “ आई, या हिंदुस्थानांत अगदीं खालच्या प्रतीच्या लोकांसारखे गरीब व पापभीरु लोक फार थोडे असतील. यांच्यांतलि मध्यम वर्गांतले लोक थोडे आळशी त्यांस कामं करण्याची हातोटी व उत्साह तितका दिसत नाहीं; पण त्यांच्याबद्दल आपल्याला ज्या विलक्षण कल्पना झालेल्या असतात, त्य अगदीं निराधार होत. यांच्यासारखे कृतज्ञ लोक तर फार क्वचित्. एखादा साहेब त्यांच्याशीं दोन गोड शब्द बोलला, तर त्यांस त्याबद्दल किती तरी कौतुक वाटतें, आणि ते किती तरी कृतज्ञता दाखवितात. पण साधारणतः पहातों तों या लोकांशीं बोलणें, त्यांच्याशीं मिळून मिसळन असणें ह्मणजे अगदीं कमीपणाचें काम,

असा साहेब अधिकाऱ्यांचा समज दिसतो. एके दिवशीं मी कामानिमित्त गांवगन्ना हिंडत असतां दिवसाचं काम संपून संध्याकाळीं हाताखालच्या कारकुनांस तंबूत बोलावून आणून अगदीं मोकळेपणानं बोलत होतों, त्यांच्या चालीरीतींविषयीं माहिती विचारीत होतों आणि मीही आपली हकीकत सांगत होतों, तर त्या कारकुनांस इतकी धन्यता वाटली कीं कांहीं पुसूं नये. पण काय ? दुसरे दिवशीं आमच्या वरिष्ठ साहेबांनीं आह्मांला मुद्दाम सांगितलं कीं, या हाताखालच्या लोकांशीं मोकळेपणानं बोलण्यापासून मुळींच फायदा नाहीं. उलट आपलं वजन नाहींसं होऊन हे आपल्या मनमोकळेपणाचा दुरुपयोग करितात. मला खरोखर यांत कांहीं तथ्यांश वाटला नाहीं. मी त्या त्याच्या उपदेशाप्रमाणं कधींच वागणार नाहीं म्हणा, पण तुला एक आपली मौज सांगितली. मला तर अद्यापि तसा ह्मणण्याजोगा अनुभव आला नाहीं. पण यदाकदाचित् एखाद्या व्यक्तीच्या बाबतींत आला, तरी तेवढ्यावरून सगळ्यांचा मीं तिटकारा करूं लागावं ? आई, तूं आणखी बाबांनीं मला असं शिकविलं नाहीं; आणि ज्याप्रमाणं तुह्मी लहानपणीं शिकविलेल्या अनेक चांगल्या गोष्टी मी कधीं विसरेन असं होणार नाहीं, त्याचप्रमाणं ह्याही गोष्टींत मी वागेन. साहेब ह्मटला, कीं हे गरीब लोक काय भितात ! मला वाटतं वाघास सुद्धां इतके भीत नसतील. आह्मीं प्रेम उत्पन्न करावं कीं भय ? तूं इथें असतीस आणि या नेटिव लोकांविषयीं येथल्या आंग्लो-इंडिअन समाजांत जीं भाषणं चालतात तीं ऐकतीस, तर तुला त्यांचा तिटकारा आला असता. मला तर ऐकून ऐकून कंटाळा आला आहे. एक दोन माणसं तर अशीं आहेत कीं, तीं बोलूं लागलीं, आणि त्यांचीं तीं नेटिवांच्या दुःशीलाविषयींचीं विधानं ऐकलीं, ह्मणजे यांचा व माझा मूळ देश एक असावा, हे माझे देशबंधु असावेत याबद्दल मला खरोखर लाज वाटूं लागते. ते मला नेहमीं ह्मणत असतात, ' तूं अजून बच्चा आहेस. तुला अनुभव नाहीं. आमच्या इतकीं वर्षे तुला झालीं, ह्मणजे तुझं आमच्याचप्रमाणं मत होईल.' आई, माझी फार इच्छा आहे कीं, तूं एकदां या देशांत यावंस......"

येथें आल्यानंतर सहा महिन्यांनीं आईला लिहिलेल्या या पत्रांत जॉर्ज फेअरब्रेननें जे विचार नमूद केले होते, तेच विचार अद्यापि त्यावर इतके दिवस झाले तरी कायम होते, इतकेंच नव्हे, तर त्या अवधींत जे जे अनुभव आले, त्या त्या अनुभवांवरून ते ते विचार कायम करण्यासच त्यास कारणें दिसून आलीं.

प्रारंभीं सांगितलेंच आहे, कीं आज शनिवार होता, आणि जॉर्ज फेअरब्रेन आपलें ऑफिसचें काम रीतीप्रमाणें आटपून लवकर घरीं येऊन एक पुस्तक वाचीत होता; परंतु त्याचें सर्व लक्ष्य त्यानें टपालांत पाठविलेल्या आपल्या शिपायाकडे होतें. बिलायतची डांक आज यावयाची होती. टपालचा शिपाई वांटीत वांटीत आल्यास त्यास उशीर लागतो, तेव्हां नेहमीं प्रमाणें त्यानें आपल्या शिपायास मुद्दाम पोस्टांत पाठविलें होतें. त्याचें आज कांहीं अपेक्षित पत्र यावयाचें होतें. त्यानें, आपल्या हातून एका गरीब मुलाचा प्राण कसा गेला, आणि आपण त्या बाबतींत कसें वर्तन केलें, याबद्दलची अगदीं कच्ची हकीकत आईबापांस लिहून कळविली होती. यापूर्वीं त्यानें ती त्रोटक त्रोटक कळविली होती, समग्र कळविण्यास त्यास वेळ झाला नव्हता. तेव्हां सुमारें महिना

सव्वा महिना झाला, त्यानें ती कळवून त्यांत राधाबाईची, व तिच्या मुलांची सर्व हकीकत लिहिली होती आणि आतां आईचें उत्तर येईल, त्यांत आपल्या वागणुकीविषयीं काय लिहिलेलें असेल तें वाचण्याची त्यास उत्कंठा झाली होती. त्याचें आपल्या आईबापांवर अतिशय प्रेम होतें, आणि आईनें एक चांगला शब्द लिहिला असतां जें त्याला समाधान होई, तें वरिष्ठांच्या पंचवीस चांगल्या रिपोर्टांनीं सुद्धां होणारें नव्हतें. इकडे जें काय होईल आपण जें काय पाहिलें असेल, जें काय केलें असेल, किंवा आपल्या हातून जें काय झालें असेल, त्या सगळ्याची झाडून हकीकत आईला ल्याहावयाची हा त्याचा अगदीं हिंदुस्थानांत आल्या दिवसापासूनचा परिपाठ. कामाकाजामुळें अधिक उणा वेळ मिळेल त्याप्रमाणें आगें मागें होईल त्याला त्याचा नाइलाज होता. त्याची आईही त्यास आपल्या तिकडील सर्व हकीकतीचें साद्यंत पत्र लिहीत असे. असा प्रकार असल्यामुळें आई कांहींना कांहीं तरी आपण लिहिलेल्या हकीकतीबद्दल लिहिणारच, अशी त्याची अपेक्षा होती. शिवाय आणखीही कोणा इष्ट व्यक्तीचें पत्र याच डांकेनें त्यास येणार होतें, त्यांतही आपल्या वागणुकीबद्दल कांहीं लिहून येईल अशी त्याची अपेक्षा होतीच. तो तीन तीनदां शिपाई आला कीं काय हें पाही, आणि तो दिसला नाहीं ह्मणजे पुनः आपल्या हातांत असलेल्या नवीन पुस्तकाकडे पाही. त्याचे मनांतून एकदां आज आपण स्वतःच डांकेकडे जावें असें आलें होतें, परंतु आज त्यानें सीतारामास आपलेकडे बोलाविलें होतें, तेव्हां आपण एकीकडे जावें, आणि त्यानें आपल्या पश्चात् येथें येऊन निराश होऊन परत जावें हें बरें नाहीं, असें वाटून त्यानें स्वतः टपालांत जाण्याचा बेत रहित केला होता. अमुक वेळीं तूं ये, असा सीतारामाशीं त्यानें संकेत केला, तेव्हां विलायतची डांक आज संध्याकाळला आपल्या हातीं येईल असें त्याला वाटलें नव्हतें. फेअरब्रेनसाहेब याप्रमाणें अगदीं उत्कंठित होऊन डांकेची वाट पाहात आहेत, तों सीताराम बरोबर नेमलेल्या वेळीं आला. फेअरब्रेनसाहेबांशीं सहवास झाल्यानें त्यास नियमितपणाचा गुण बराच साध्य करावा लागला होता. येतांच त्यानें स्मित करून साहेबांकडे पाहिलें आणि साहेबांसही त्याचें तें स्मितयुक्त मुख पाहून बरें वाटलें व ते लागलीच त्यास म्हणतात, “ तूं अगदीं बोलल्या मिनिटाला आलास हें पाहून मला मोठें समाधान वाटतें. तुम्हांला सगळ्यांना ही संवय खरोखरच लागावयास पाहिजे आहे. कशी काय आहेत मंडळी ! तुझ्या आईची प्रकृति बरी आहे ? तिच्या प्रकृतीची तुला काळजी घेतली पाहिजे. आज मला एकसारखी माझ्या आईची आठवण होत आहे. आज तिचें मोठें थोरलें पत्र येईल, असें मला वाटत आहे आईचीं पत्रें म्हणजे किती आनंद व प्रेम उत्पन्न करणारीं असतात याची तुम्हांला कधीं कल्पना नाहीं. तिच्या अंतःकरणांत जितकें म्हणून प्रेम असेल तितकें ती सर्व अशा पत्रांत ओतीत असते. माझी आई तर मला किती लांब लांब पत्रें लिहीत असते. तिचें पत्र अमक्या डांकेनें येणार असें मला वाटूं लागलें, कीं मी फारच उत्सुक होतों आणि मौज ही कीं, ज्या डांकेला येईल येईलसें वाटतें त्या डाकेला तें हटकून येतेंच ! आई ह्मणजे एक अजब व्यक्ति आहे नाहीं बरें ? ” इतकें फेअरब्रेनसाहेब बोलत आहे तों त्यांच्या ऑफि

सांतला एक शिपाई कांहीं कागद घेऊन आला. त्यांत एका पाकिटांत फेअरब्रेन-साहेबांचा पगार होता, तो शिपायानें मुद्दामच लवून सलाम करून त्यांच्यापुढें केला. " सारे कागद आंत माझ्या टेबलावर ठेव " असें ह्मणून त्यांनीं त्यास टेबलाकडे बोट दाखविलें. परंतु त्यानें, ' यांत पगार आहे, तो मोजून घ्यावा ह्मणजे तिकडे ठेवितों ' असें म्हटलें आणि चमत्कारिक तऱ्हेनें साहेबांकडे पाहिलें. " ठीक आहे ! " असें म्हणून फेअरब्रेनसाहेबांनीं त्याच्या हातचें तें पाकिट घेतलें व आंतील नोटा वगैरे मोजून कांहीं फुटकळ रुपये होते त्यांतील एक त्याचे अंगावर टाकून, " जा. ही तुला बक्षिशी घे, " असें ह्मणून पुनः तें पाकिट टेबलावर ठेवण्याविषयीं त्यास सांगितलें आणि पुनः त्यांचें व सीतारामाचें बोलणें सुरू झालें. त्या बोलण्यांत विचार आले ते सर्व येथें नमूद करण्यास आपले जवळ अवकाश नाहीं. त्यांचें बोलणें चाललें होतें, तोंच ज्याची फेअरब्रेनसाहेब इतका वेळ वाट पाहात होते तो त्यांचा शिपाई डांक घेऊन आला. त्यास पाहतांच फेअरब्रेनसाहेबांस अर्थातच फार आनंद झाला व पत्रें हातीं येण्याबरोबर तीं वाचण्यांत गढून गेला. त्याच्या आईच्या पत्रांत पहिलेंच वाक्य होतें, त्याचा अर्थ असाः— " माझ्या मुला, तूं आह्मांला शोभे असें वर्तन केलेंस; चांगल्या ख्रिस्त्यानें जसें वागावें तसें तंतोतंत तूं वागलास. याबद्दल मला व तुझ्या बापाला इतका अभिमान वाटत आहे कीं तो पत्रीं वर्णन करितां येत नाहीं... .."

पत्र फार लांब होतें. तें वाचण्यांत फेअरब्रेनसाहेब अगदीं तल्लीन झाला. एक वेळ पत्र वाचून झाल्याबरोबर तो सीतारामाकडे वळून म्हणतो, " तुला उशीर होत असेल. तूं जा. मात्र त्या टेबलावर एक पाकिट तुझ्या नांवचा पत्ता लिहिलेलें ठेविलें आहे तें घेऊन जा. आंत काय आहे तें येथें पाहूं नको. मला आणखी एक पत्र वाचावयाचें आहे आणि दोन्ही पत्रें किती वेळां तरी पुनःपुनः मी वाचीन. " इतकें ह्मणून तो पुनः आपल्या पत्रांत गढला. सीताराम त्या टेबलापाशीं गेला. साहेबांनीं सांगितलेलें पाकिट त्यास लवकर सांपडेना. बराच वेळ तो त्या टेबलाजवळ गुटमळला. शेवटीं एकदांचें तें त्यास सांपडलें. तें घेऊन तो साहेबांस सलाम करून निघाला; परंतु साहेबांचें लक्ष्य नसल्यामुळें त्यांस त्याचा सलाम दिसला नाहीं, किंवा तोंडानें " गुड् इव्हिनिंग " ह्मटलेलें ऐकूं आलें नाहीं. त्या रात्रीं त्या पत्राच्या आनंदांत त्यांनीं आपल्या पगाराचें पाकिट पाहिलें नाहीं. दुसरे दिवशीं सकाळीं पाहिलें तों त्यांत एक पन्नास रुपयांची नोट कमी.

# प्रकरण २३ वें.

## सीताराम.

सीताराम फेअरब्रेनसाहेबांनीं दिलेलें पाकिट घेऊन एकटाच चालला असतांना त्याच्या मनांत किती तरी प्रकारचे विचार येत होते. घरीं जाईपर्यंत त्या पाकिटांत काय आहे तें पहावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला होता, त्यामुळें त्याच्या विचारशक्तीस किंबहुना कल्पनाशक्तीस व्यायाम करण्यास सवडही झाली होती. त्या पाकिटांत काय असेल बरें ? तें घरीं गेल्यावर फोड, आपल्या येथें फोडूं नको असें साहेबांनीं कां सांगितलें ? वगैरे प्रश्न त्याच्या मनांत वारंवार येऊन तो त्यांचीं उत्तरें देण्यास झटत होता. पूर्ववयांत संकटावर संकटें येऊन जर कोणाच्या आयुःक्रमावर किंबहुना मनावर कांहीं परिणाम होत असेल, तर तो मन निराश, दुःखविचारमय व उत्साहहीन करून टाकण्याकडेच व्हावयाचा; परंतु सीतारामाची स्थिति तशी झालेली नव्हती. त्याच्या इतकें आशापूर्ण, सुखविचारी व उत्साहमय असें अंतःकरण क्वचितच कोणा मुलाचें असेल. आपलीं साधनें अगदीं परिमित हें त्यास पक्कें ठाऊक असूनही नेहमीं त्याचे विचार भराऱ्या मारून तो आपणास नानाप्रकारच्या उच्चस्थितींत कल्पीत असे. त्याच्यावर इतक्या अपक्क वयांत इतकीं संकटें आलीं, असलीं दुष्कृत्यें पहावीं लागलीं, दुःशब्द ऐकावे लागले, एकदम आशाभंग सोसावा लागला, श्रीमंतीच्या ऐन अमदानींतून दारिद्र्याच्या विलक्षण कचाटींत जाऊन पडावें लागलें; परंतु त्या मुलाच्या नैसर्गिक उदात्त स्वभावामुळें म्हणा किंवा त्याच्या आईच्या विलक्षण धैर्यामुळें म्हणा, त्यास त्या स्थितीचें कांहीं सुद्धां वाटेनासें झालें. तो बिनदिक्कत आहे, किंवा त्यास आपल्यावर काय प्रसंग आले, त्यांचें ज्ञानच झालें नाहीं अशाप्रमाणें वागूं लागला. त्याच्या एकंदर वर्तनाचें तत्व एक होतें. तें त्याच्या आईवरील प्रेम होय. तें अत्यंत निगाढ. त्या प्रेमापलीकडे त्याला कांहींसुद्धां दिसत नसे. त्या आईसाठीं वेळ प्रसंग पडला असतां तो वाटेल त्या दिव्यांतून जाता, वाटेल त्या धोक्यांत आपला प्राण घालता, वाटेल तितके प्रसंग आले तरी सोसता. आपल्याला जिवापाड श्रम करावे लागत आहेत परंतु तेवढे केल्यानें आपल्या आईचे क्षणाभऱ्याचे श्रम वांचणार आहेत, असें त्याला दिसून आलें, तर तो हटकून ते जिवापाड श्रम करणारच. त्यांत कधींही माघार घेणार नाहीं. ज्या कोणत्या गोष्टीपासून तिला अणुमात्र दुःख होईल, किंवा तिला मागल्या काळची आठवण होईल, ती गोष्ट टाळण्याविषयींची त्याची तत्परता किती होती ही जर कोणीं पाहिली, तर

असली मातृभक्ति कोठें कधींच निदर्शनास आली नाहीं असें ह्मटल्याखेरीज तो राहणारच नाहीं. लहानपणापासून त्याचें चित्त त्याच्या आईच्या ठिकाणीं होतें, परंतु बापाच्या मरणापासून जे भयंकर प्रकार झाले, त्यांनीं आणि सखाराम इस्पितळांत जाऊन पडला असतां जें तिचें वर्तन त्यानें पाहिलें, त्यानें त्याचें मन तिच्या ठिकाणीं इतकें जडलें—गढलें—कीं, तें एक त्याला किंवा तिलाच माहीत. आपला मुलगा प्रत्येक बारीकसारीक गोष्टींतही आपल्यास श्रम पडूं नयेत, मागल्या गोष्टी आपल्या मनांत येऊं नयेत ह्मणून किती झटत असतो, आणि प्रत्येक वेळीं किती बेतानें आणि मोजेनें आपलीं कामें करीत असतो, हें व बारीकसारीक दगदगी जितक्या चुकवितां येतील तितक्या चुकविण्याविषयींची त्याची तत्परता पाहून तिला तिच्या दुःखस्थितींतही मोठें समाधान वाटे. आणि आपल्याप्रमाणेंच बाकीच्या भांवडांच्या मनांत आपल्या आईविषयीं प्रेम उत्पन्न करून तिला त्रास न देण्याविषयींची प्रवृत्ति आणण्याचा, व बारीकसारीक गोष्टींत त्यांस स्वावलंबन शिकविण्याचा किंवा आईला त्रास न होतां आपणच आपल्या हातून होईल तितकें त्यांचें करण्याचा त्याचा सतत चाललेला प्रयत्न पाहून तिला कितीदां तरी धन्यता वाटत असे. आपल्या अशा स्थितींत आपल्यास भगवंतानें पुत्राचें असें सुख दिलेलें पाहून तिचें अंतःकरण त्याच्याविषयीं किती तरी भक्तिपूर्ण होई. इस्पितळांत राहिल्यानें तिला स्वतःला जो अत्यंत कटु असा अनुभव आला, व जो दुसऱ्या दुर्दैवी लोकांचा अनुभव तिनें पाहिला, तो खरोखर तिच्या हितास कारण झाला. राधाबाई मूळची अतिशय सोज्ज्वल व उदार अंतःकरणाची स्त्री, परंतु जन्मापासून श्रीमंती आरामांत वाढून नवऱ्याच्या अमदानींत तर इकडची काडी तिकडे करण्याचीही तिला संवय नव्हती. अर्थातच गरिबांचीं दुःखें काय, त्यांची स्थिति कोण्या प्रकारची असते इत्यादि गोष्टींच्या ज्ञानाचें तिला वारेंसुद्धां नव्हतें. पण तें ज्ञान आतां तिला पूर्णपणें झालें. जर कोणास चांगल्या शब्दाची व अल्पस्वल्प मदतीची अपेक्षा असेल, तर ती गरिबांस असते, असें तिला अगदीं पक्कें समजलें. आणि तें ज्ञान झाल्यापासून ती आपलें सर्व दुःख विसरून व वर्षभर तोंडसुद्धां कोणाच्या नजरेस पडूं देतां उपयोगी नाहीं, काळोखांत बसून रहावें, अशी जी लोकाचारानें बंदी करून ठेविली आहे, तिला न जुमानतां ती गरीबगुरिबांच्या उपयोगी पडण्यासाठीं जें काय करणें शक्य असेल, तें करण्यास मागें येईनाशी झाली. तिला पांच सहा मुलें झालेलीं; श्रीमंतीच्या स्थितींत का होईना, परंतु तिला तितका अनुभव आलेला, तेव्हां बाळंतिणीच्या व्यवस्थेंत, बाळांच्या संगोपनांत जी जी ह्मणून सल्लामसलतीची किंवा इतर कांहीं प्रकारांनीं मदत करणें तिला शक्य होतें, ती ती तिनें करण्यास कधीं मागें घेतलें नाहीं. " गरीब बाई " म्हटली, कीं ती कोणीही असो, अडल्या वेळीं ही दुःखापन्न बाई तिच्या मदतीस धांवलीच ह्मणून समजावें. तिच्या आसपासच्या प्रदेशांत तिचें नांव निघूं लागलें होतें आणि तें नांव कोठेंही निघालें तर प्रेमयुक्त आदरानेंच निघे. तिचा एकंदर दुःखमय इतिहास ज्यांना ठाऊक नाहीं, अशीं कुटुंबें तिच्या आसपास नव्हतींच, असें ह्मटल्यास अतिशयोक्ति केल्याचा दोष येईल ही भीतिच नाहीं. परंतु राधा-

बाईस तिच्या दुःखानें अद्यापि सोडलें नव्हतें. तिची आई ह्मणजे तिला एक कायमचें दुःख होऊन बसली होती. त्या आईस एकावर एक संकटें आल्याकारणानें आणि आपल्या लेंकीच्या सावत्र मुलानें अत्यंत नीचपणानें वागविल्यामुळें संताप उत्पन्न होऊन तिला विचार न राहून ती अद्वातद्वा बोले हें मागें सांगितलेंच आहे. त्या संतापाचा परिणाम अखेरीस असा झाला कीं, तिला एके दिवशीं कांहीं कारणानें संतापवायु होऊन तिचें डोकें भडकून गेलें, आणि ती अगदीं वेडी झाली. ती शुद्धीवर असून वाटेल तितकें बोलती, वाटेल ते शब्दांचे घाय तिनें रोज रोज केले असते, तरी आपण सदोदित अगदीं शांतपणें सोसले असते; परंतु झाला हा प्रकार फारच अघटित आणखी अनिष्ट झाला, असें राधाबाईला नित्य वाटे. पण करणार काय ? तिचा एक सावत्र मुलगा वेडगळ—किंबहुना वेडा होताच, परंतु त्याचा वेडगळपणा कधीं कोणास त्रासदायक झाला नाहीं. त्याच्या बिचाऱ्याच्या डोक्यांत मेंदूच नसल्यामुळें त्यास धड बोलतां येत नसे, किंवा जें समजण्याला अणुरेणु मात्र श्रम पडतील तसलें कांहीं त्यास समजत नसे इतकेंच. परंतु त्याच्यापासून कधीं कोणाला त्रास झाला नाहीं, किंवा त्याच्यासंबंधानें म्हणून कोणाला विशेष दगदग पडली नाहीं. काय वेळेवर असेल तें गोळाभर अन्न खाऊन तो आपल्या भावाच्या मागें मागें असे. सीताराम म्हणजे त्याला अगदीं पूज्य. त्याच्या प्रेमाचें मोठें स्थान, त्याच्यासाठीं तो पडेल तें काम करावयाचा. त्याची प्रकृति चांगली असल्यामुळें कधीं औषधपाण्याची किंवा दुखण्याबाण्याचीही कोणास तसदी घ्यावी लागली नाहीं, उलट त्याची आपली सर्वांस एक करमणूकच असे. उलट सीतारामाप्रमाणेंच तोही आपल्या आईस सर्व बाबतींत होईल ती मदत करी; परंतु राधाबाईच्या आईस वेड लागलें तें केवळ संतापवायूच्या लहरी येऊन. लहरींत ती बडबडे काय, आरडे काय, शिव्या काय देई, नानातऱ्हा करी. तिला संभाळणें फार श्रमाचें काम झालें होतें. आतांपर्यंत एकावर एक येऊन पडलेल्या प्रसंगांनीं जितकी राधाबाईच्या धैर्याची व सोशिकपणाची परीक्षा झाली नव्हती, तितकी या आतांच्या एका विलक्षण प्रसंगानें होण्याचा प्रसंग आला. ती बिचारी करणार काय ? तिच्या आईच्या वेडाचें आणखी एक मोठें विलक्षण लक्षण होतें, कीं राधाबाईला पाहिलें, कीं तिनें चवताळल्याप्रमाणें व्हावयाचें. सारा दिवस जी काय बडबड चालावयाची ती केव्हां तरी थांबून ती स्वस्थ पडली असली, तरी राधाबाईची चाहूल लागली, कीं तिनें पुनः संतापाच्या बडबडीला सुरुवात केलीच म्हणून समजावें. यामुळें तिचें सर्व करणें-संवरणेंही राधाबाईस मोठें अवघड जाई. अगदीं आवश्यक तेवढ्यापुरतीच ती पुढें जावयाची नाहीं तर तिनें सीतारामाकडून किंवा थोरल्या मुलीकडून तिला काय हवें नको तें करावयाचें. सीतारामावर तिचा तितका राग नसे. तो आला ह्मणजे तिनें सर्व कांहीं निमुटपणें करावें, बोलावें, प्यावें, ल्यावें, खावें. वारी आली ह्मणजे तिच्या जिवाचा थोडासा संताप उडे. कारण तिचें लग्न चांगलें थाटाचें व्हावयाचें, तें तिच्या आईच्या मूर्खपणामुळें भलतेंच झालें. अजून लग्नही झालें नाहीं किंवा त्याची गोष्ट निघत नाहीं हें सारें तिच्या मनांत येऊन तिची टकळी सुरू होई. परंतु आईप्रमाणें तिच्यावर राग नव्हता, आणि मूळचें

तिजवर लहानपणापासूनचें प्रेम, यामुळें तिच्या हातून काय वाटेल तें करून घेण्याकडे तिची प्रवृत्ति असे. अशी एकंदर राधाबाईच्या दुर्दशेंत भर पडली होती. परंतु इतक्या सगळ्यावर सीतारामाच्या अपरिमित प्रेमानें आणि काळजीनें विरजण पडून ती तें दुःख गिळण्यास व आल्या स्थितींत उत्तम प्रकारें दिवस काढण्यास तयार झाली होती. अशा स्थितींतही परमेश्वर चांगल्या माणसांस धैर्य देतो, व त्या धैर्याचा उपयोग आपल्या हातून कितपत होतो याची कसोटी पाहात असतो, असा तिचा दृढ विश्वास होता, व त्या कसोटीला उतरून आपण पार पडूं असा तिच्या सच्छील मनाचा निर्धार होता. असो.

सीताराम फेअरब्रेनसाहेबानें दिलेला लखोटा घेऊन आंत काय असेल याच्याविषयीं अनेक विचार व कल्पना करीत करीत, व फेअरब्रेनसाहेबांच्या एकंदर चांगुलपणाविषयींही विचार करीत घरीं येत होता. आजपर्यंत फेअरब्रेनसाहेबांनीं त्यास आपण कोण्या तऱ्हेनें मदत करावी याचा अनेक प्रकारानीं विचार केला आणि त्यांनीं पुस्तकांच्या वगैरे रूपानें त्यास मदत केलीही. परंतु प्रत्यक्ष पैसे देण्याचें सुचविलें असतां तें सीतारामाच्या आईनें व त्यानें स्वतःही मोठ्या नाजूक तऱ्हेनें टाळलें. " मला आपण आपलासा म्हणून मजवर व माझ्या माणसांवर लोभ करतां हेंच आम्हांला फार आहे. सध्या चालतें आहे तोंपर्यंत आपल्याला विनाकारण तोशीस लावावी हें आम्हांला बरें दिसत नाहीं. वेळ प्रसंग पडला, तर मी परकेपणा समजणार नाहींच. " असें चतुर उत्तर आईनें शिकवून तें सीतारामानें अनेकवार त्यांस दिलें. फेअरब्रेनसाहेबांनीं विश्वनाथपंताच्या मार्फतही एक दोन वेळां मदतीची गोष्ट काढली; परंतु तीही तशीच नाजूक तऱ्हेनें नाकारली गेली. यामुळें तर फेअरब्रेनसाहेबांस त्या कुटुंबाविषयीं विशेषच आदर व प्रेम वाटूं लागलें. प्रत्यक्ष पैशाची मदत घेण्याचें होतां होईल तों नाकारणें हें योग्य अशा मानीपणाचें पहिलें लक्षण होय, आणि हें लक्षण ज्याच्या ठिकाणीं दिसेल, त्याच्याविषयीं देणाराच्या मनांत आदर उत्पन्न झाल्याखेरीज कधींही राहणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर अशा माणसांस योग्य वेळीं मदत करण्याची संधि आपणास कधीं येईल अशी उत्कंठा त्यांस वाटल्याखेरीज राहणारच नाहीं. त्याचप्रमाणें फेअरब्रेनसाहेबांची स्थिति झाली होती. सखारामाच्या अंगावरून गाडी गेली, त्या वेळीं वाइल्डसाहेबांनीं त्यास असें म्हटलें होतें कीं, " अरे, दहा रुपयांची नोट त्यांच्या अंगावर फेंकून देऊन चालतें होण्याशिवाय अशा प्रसंगीं दुसरा मार्ग नाहीं. " आणि त्यानंतर अनेक वेळां आपल्या म्हणण्याच्या सत्यतेबद्दल खात्री करून देण्यासाठीं त्यानें वारंवार फेअरब्रेनजवळ असे उद्गार काढले कीं, " नेटिव बाप व नेटिव आया अशा वेळीं फारशा दुःखित होत नाहींत. साहेबाच्या गाडीखालीं आपलं पोर किंवा आपलं कोणी सांपडलं किंवा साहेबाच्या हातून त्याच्या जिवास कांहीं झालं, तर त्याजबद्दल त्यांना फारसं कांहीं वाटत नाहीं, कारण त्यांना त्याचा पैशाच्या रूपानं मोबदला ( compensation ) मिळण्याची आशा असते ! " फेअरब्रेनसाहेबांस राधाबाईच्या दुःखाचा प्रत्यक्ष अनुभव होता. तो अशा बाष्कळ व निर्दय बोलण्यावर थोडाच विश्वास ठेवणार होता ! त्यानें आपल्याकडून राधाबाईच्या कडे-

लोट दुःखाचें वर्णन वाइल्डसाहेबाजवळ केलें, पण त्यास वाइल्डसाहेबांनीं एवढेंच उत्तर दिलें, " कदाचित् तिच्या मनांतून तुला दया आणून खूपसा पैसा उपटायचा असेल. तुला या नेटिवांचा अनुभव नाहीं. तूं गोत्यांत पडणार. फसणार. त्यांच्यासारखी कृतघ्न पण लावची मंडळी जगांत दुसरीकडे कोठें नसतील. " तें ऐकून फेअरब्रेनसाहेब केवळ तिरस्कारानें हंसला. असले अमानुष उद्गार कानांनीं ऐकणेंसुद्धां त्यास फार कडू वाटलें. त्याचा मार्ग निराळा. त्याचें अंतःकरण निराळें. त्याचे विचार निराळे. त्यानें तिरस्कारयुक्त हंसून शेक्सपिअरच्या Merchant of Venice मधील " Hath not a Jew eyes? ......fed with the same food, hurt with the same weapons !..." हें शायलॉकचें भाषण पाठ म्हणून दाखविलें. त्यावर वाइल्डसाहेबांनीं हंसत हंसत ' Never-the-less they are the Jews, you must admit, 'असें विचारलें व फेअरब्रेनसाहेबांनीं " O certainly not! They are as good as any and better than many of us! " असें डोळे मिचकावीत उत्तर दिलें होतें. Many शब्द उच्चारतांना डोळे मिचकाविले, त्याचा अर्थ समजून वाइल्डसाहेब फार रागावले, व ते दिवसापासून वाइल्डसाहेबांपाशीं या बाबतींत बोलण्यांत तात्पर्य नाहीं ह्मणून त्यांनीं तो विषय वर्ज केला होता. मात्र पैसे देत असतांही ती मंडळी आपल्यापासून पैसे घेत नाहींत हें त्यानें एकवार त्याच्या कानीं घातलेंच, पण तें केवळ पालथ्या घड्यावर ओतलेल्या पाण्याप्रमाणेंच झालें.

ती मंडळी पैसे घेईनात, तेव्हां तर फेअरब्रेनसाहेबांस आपण कोणत्याना कोणत्या तरी मार्गानें त्यांच्या उपयोगी पडावें असें फार वाटूं लागलें, आणि त्याप्रमाणें करण्याची काय तजवीज करावी याबद्दल तो विचार करूं लागला होता. विश्वनाथपंताकडून त्यास राधाबाईची व तिच्या एकंदर कुटुंबाची स्थिति समजली, तेव्हां तर त्याला आपल्या प्रयत्नांची अवश्यकता विशेषच वाटली. तो आपल्याकडून पुस्तकें वगैरेंचा पुरवठा तर सीतारामास करीच, आणि त्याचें इंग्रजी भाषेचें ज्ञान वाढावें म्हणून केव्हां केव्हां त्या मुलास योग्य अशा मासिक पुस्तकांचे व्हाल्युम बक्षीस देई व स्वतः त्याजकडून वाचवून घेऊन त्यास शिकवी; त्याचप्रमाणें त्याच्याशीं नेहमीं इंग्रजींत बोलून त्याला समजेल व बोलतां येईल अशी तजवीज करी.

सीतारामाचें अंतःकरण जितकें प्रेमळ तितकीच त्याची उद्योगाविषयींची आवड होती व अतिशय चलाख अशा बुद्धीचें, आणि फार तीक्ष्ण अशा स्मृतीचें पाठबळ त्या उद्योगीपणास मिळाल्याकारणानें शाळेंत त्याची चांगली सरशीच होत गेली. त्याच्या सुस्वभावामुळें त्यास त्याच्या सोबत्यांत कोणी शत्रु नव्हते. कांहीं फाजील मुलें त्याची कांहीं गोष्टींवरून टवाळकी करण्याचा यत्न करीत, परंतु तसल्या भिकार टवाळक्यांकडे त्यानें कधीं लक्ष्य दिलें नाहीं. कोणा मुलास कोणच्याही योग्य कामांत मदत लागल्यास त्यानें ती देण्यास कधीं कांकूं केलें नाहीं. आपल्या हातचें काम एका बाजूस ठेऊन तो त्यांस मदत करीत असे. त्याचप्रमाणें उदाहरणें वगैरे समजावून घेण्यास त्याच्या घरीं कितीतरी मुलें येत; त्यांस कधींही त्यानें नाहीं म्हटलें नाहीं. मात्र एके दिवशीं शाळेंत मास्तरांनीं लिहून आणण्यास सांगितलेला एक्सर्साइज् सीतारामानें लिहून

ठेविला असतां त्याची हुबेहूब नक्कल करण्यासाठीं एका मुलानें मागितला, तेव्हां त्यानें तो देण्याचें नाकारलें त्यावरून त्या मुलानें त्याच्याशीं वैर धरून होईल त्या प्रकारांनीं त्याची नुकसानी करण्याचा चंग बांधिला. हा मुलगा वाचकांच्या ओळखीचे सरस्वतीबाईचे कारभारी रंगोपंत यांचा पुतण्या होय. याचें नांव भास्कर. रंगोपंतांचें बस्तान बसतांच त्यांचे बंधु नरसोपंत यांनीं आपले चिरंजीव शिकण्याच्या कायम सोयीसाठीं रंगोपंतांजवळ ठेवण्याचा विचार केला व तो अर्थातच रंगोपंतास पसंत पडला. हा भास्कर कसा मुलगा होता, हें पुढें समजेलच. ही एक्ससाईजची हकीकत घडल्या दिवसापासून त्या भास्करानें सीतारामाच्या विरुद्ध एक कट बनवून त्याची नालस्ती व नाचक्की करण्याची संधि वायां जाऊं द्यावयाची नाहीं असें चालविलें होतें. वेड्यावांकड्या टवाळक्या कित्येक मुलें करीत म्हणून जें वर सांगितलें आहे, त्या मुलांचे अधिपति हे भास्करराव. तेव्हां त्यांच्या टवाळकीचे विषय काय असतील, आणि कसे असतील याविषयीं कांहीं विशेष निराळें वर्णन करून सांगण्यास पाहिजे असें नाहीं; परंतु सीतारामास अशा टवाळ्या म्हणजे टांचणीच्या बोंचण्याप्रमाणें वाटत. त्यानें कधीं सुद्धां तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. मास्तरांजवळ त्याचें वजन फार चांगलें असे. ते त्याजवर फारच प्रेम करीत आणि विश्वास ठेवीत. कोणत्याही मुलाच्या दांडगाईच्या वगैरे बाबतींत कांहीं शंका आली कीं, त्यांनीं त्याचें मत विचारावें, आणि तो जें सांगेल तें खरें मानून पुढें काय करावयाचें असेल तें ते करीत. यामुळें एक दोन वेळां असे प्रसंग आले, कीं भास्कराच्या व त्याच्या एकदोघां दांडग्या सोबत्यांच्या विरुद्ध साक्ष देण्याचें त्यास भाग पडलें; आणि त्याच्या तशा साक्षीमुळें त्या मुलांस शिक्षा झाली. मग काय विचारतां ? आगींत तेल पडल्याप्रमाणेंच झालें. भास्कर व त्याचे साथीदार फारच चिडले आणि कांहीं तरी करून याला आपण पालथा पाडूं, याची छी:थू: करूं, असा त्यांनीं अगदीं पक्का निश्चय केला. सीतारामास बिचाऱ्यास आपल्या विरुद्ध कांहीं मुलांचा कट होऊन तीं आपणास पालथें पाडण्यासाठीं अहोरात्र टपणीस बसलीं असतील असा संशयसुद्धां आला नाहीं. मास्तरांनीं आपल्यास आपल्या वर्गबंधूंच्या बाबतींत कधीं कांहीं विचारलें नाहीं तर फार चांगलें होईल असें त्यास नेहमीं वाटे; आणि त्याप्रमाणें त्यानें मास्तरांस स्पष्टपणें सुचविलेंही; परंतु तो असें जों जों सुचवी, तों तों मास्तरचें त्याच्यावरचें प्रेम व विश्वास अधिकच वाढत जाऊन मास्तर ज्या त्या बाबतींत त्यास हातीं धरीत. यामुळें त्याचा नाइलाज झाला होता. पण तो भिऊन कधीं खोटें मात्र बोलला नाहीं. असो.

आज तो वर सांगितल्याप्रमाणें फेअरब्रनसाहेबांच्या पत्राकडे पाहात विचार करीत येत असतां त्याचे शत्रु त्यास भेटले.

# प्रकरण २४ वें.

## सीतारामाचे शत्रु.

त्या मंडळीस पाहतांच सीतारामाच्या कपाळास साहजिकपणें आंठ्या पडल्या, व तो आपल्या हातांतील पत्रें खिशांत घालून त्यांस टाळणाच्या उद्देशानें त्यांचा रस्ता सोडून रस्त्याच्या दुसऱ्या अंगास गेला; परंतु भास्कर व त्याच्या बरोबरील त्याचे दोघे स्नेही यांस त्याची कुरापत काढणें इष्ट होतें; अर्थात् त्यास अडवावें व त्याची कुचेष्टा करावी असा हेतु भास्करभाऊच्या मनांत उत्पन्न झाला; परंतु भास्करभाऊच्या अंगीं धैर्य, शौर्य व वीर्य बेतापुरतेंच असल्यामुळें त्यांनीं कधींही आजपर्यंत सरळपणानें धर्मयुद्ध केलें नव्हतें. अशा पोरास नैसर्गिक अशी जी मनाची वक्रता ती त्याच्या फाटक्या अंगांत पूर्णपणें भरलेली होती. जर कोणाचें कांहीं नुकसान करावयाचें असेल तर तें सपाटून सरळपणानें जाऊन आपल्या हातानें करण्याइतकें त्याच्या अंगीं धैर्य नव्हतें, आणि तितकी शक्तिही नव्हती. जें काय कोणाचें नुकसान करावयाचें असेल तें स्वतः सरळपणानें न करतां हलकेच चुगलखोरी करून अगर कोणा मोठ्या मुलाकडून करावायचें. सगळ्या ' अशक्तं दुर्जनम् ' लोकांची तऱ्हाच ही. कोणा एखाद्यावर, ते संतापण्यास कारण झालें असल्यास त्याचा सूड आपण स्वतः अस्तन्या सारून पुढें होऊन मारामारी करून घ्यावयाचा, हें त्यांच्या स्वप्नांतरींही येत नाहीं. ते कोणाच्या ( अर्थात् सगळ्यांच्याच ) पोटांत शिरून त्यांजकडून आपल्या शत्रूस दंड करावयाचे; आणि तो तसा झाला असतां आपण आनंदानें तांडव करावयाचें. बरें, पुढें मागें अशा तऱ्हेनें कायदा आपण हातीं घेतल्याचें प्रायश्चित्त भोगण्याची पाळी आली असतां प्रत्यक्ष ज्यानें दांडगाई केली तो बिचारा बळी जाण्यास तयार असतोच. आपण आपले नामानिराळेच. वेळ पडल्यास त्याच्यावर उलटून पडण्यासही हरकत नाहीं. भास्कर या ' अशक्तं दुर्जनम् ' लोकांच्या कोटीपैकींच एक होता. तो वयानें फार नव्हता. परंतु अशा कोटींतील लोकांच्या अंगीं जे कांहीं अवगुण असावयाचे ते सारे कांहीं बीजरूपानें, कांहीं अंकुररूपानें व कांहीं बालतरुरूपानें अस्तित्वांत होते. खोटें बोलणें हें तर त्याच्या अंगीं इतकें भिनून गेलेलें होतें कीं, कोणच्याही बाबतींत त्यास केव्हांही प्रश्न केला असतां अणुरेणुमात्र कारण नसतांही त्याचे तोंडून खोटेच शब्द बाहेर पडावयाचे. हा अवगुण त्याचे अंगीं केव्हांपासून जडला हें सांगणें फार कठिण आहे. कां कीं, ज्या वेळेपासून त्यास शब्दज्ञान झालें त्या वेळेपासून वस्तुस्थितीहून भिन्न अशाच गोष्टी उच्चारलेल्या त्याच्या कानीं पडूं लागल्या होत्या. मुलांची ग्राहकशक्ति

इतकी विलक्षण असते व त्यांचें बालमन फोटोग्राफाच्या छायाग्राहकाप्रमाणें किती ग्रहणपटु असतें याची कल्पना सहसा कोणासही होत नाहीं. जी गोष्ट, त्यांचे लक्षांत येणार नाहीं, ती त्यांना काय समजणार आहे, असें वाटून आपण बोलतों किंवा उच्चारतों, तिचें ग्रहण तीं केव्हांच करून टाकतात, आणि पुढें तिचें अनुकरण करण्याचा प्रसंग येतांक्षणींच ताबडतोब अनुकरणही करतात. तें त्याचें अनुकरण केवळ अज्ञपणानें केलेलें असतें, व तसें आहे असें समजूनच आईबाप प्रथमतः त्याचा बीमोड न करतां केवळ कौतुकावारी, हंसण्यावारी घालवितात. फोटोग्राफ उत्तम व निर्भिश्र यावा अशी इच्छा असल्यास ज्याप्रमाणें फोटोग्राफ काढणारा कोणत्याही आगंतुक वस्तूस मध्यंतरीं येऊं देत नाहीं, त्याप्रमाणेंच बालकांच्या मनावर होणाऱ्या प्रतिबिंबांची गोष्ट होय. परंतु फोटोग्राफ काढण्याचे वेळीं तो नासूं नये म्हणून आपण जितकी काळजी घेतों, तितकी काळजी मुलाच्या मनावर होणाऱ्या प्रतिबिंबांची सहसा कोणी घेतांना दृष्टीस पडत नाहीं, किंबहुना त्याजवर होणारीं प्रतिबिंबें कायम होत असतील, तीं एकवार कायम झालीं ह्मणजे पुन्हां सहसा कोणत्याही उपायांनीं प्रणष्ट करतां येत नाहींत, हें लक्ष्यांत धरून कोणीही वागत नाहीं. नरसोपंत व त्यांची पत्नी, रंगोपंत व त्यांची पत्नी व त्यांच्या मातुश्री, यांपैकीं कोणीही भास्कराच्या मनावर काय प्रतिबिंबें उठत असतील याची कधीं काळजी केली नाहीं; व विशेष मौज ही होती कीं, या परस्परांत प्रत्येक व्यक्तीस आपआपलीं बरींचशीं कृत्यें दुसऱ्यांच्यापासून चोरून ठेवण्याची बुद्धि असल्यामुळें बिचाऱ्या भास्करास खोटें बोलणें, एक बोलून भलतेंच सांगणें, दुसरें कोणी नसतांना जिन्नस लपवून ठेवणें, यांखेरीज ऐकावयास व पाहावयास सांपडलें नाहीं. भास्करभाऊची आजी खाष्ट असल्यामुळें तिचा सुनांवर मुळींच विश्वास नसे. अर्थातच ती जेथें तेथें कुलुपें लावून जो तो जिन्नस कुलुपांत ठेवी व सुनांनीं थोडाबहुत अपराध केला असल्यास आपण काय बोलतों, कोणाचे देखत बोलतों याचा विचार न करितां ती अद्वातद्वा खांडकाळ्या शिव्याही देत असे. अर्थातच सुना तिला चोरून किल्ल्या लावून वाटेल ते जिन्नस हव्या त्या वेळीं काढून घेत. भास्कर अगदीं लहान असे त्या वेळेपासून त्याच्या नजरेपुढें या गोष्टी घडत असत. त्यास बोलतां चालतां येऊं लागलें तेव्हां त्यानें अजाणपणानें आपल्या आईची व काकीची कांहीं कृति पाहून तिचा रिपोर्ट लाडिकपणानें आजीजवळ केला. आणि त्यामुळें आजीच्या शिव्याशापांचा सुनांवर सडकून वर्षाव झाला. मग काय विचारतां? आजी दृष्टिआड होण्याचाच काय तो अवकाश ! भास्कराच्या आईनें ‘चुगलखोर कारट्याला’ असा मार दिला आहे, कीं तो त्याच्या किचकट अंगास किंवा तिच्या लांब सडक बोटांसच ठाऊक. “ मेल्या, पुनः तुझी जीभ अशी लबलब करूं तर दे, म्हणजे तुला सांगत्यें कसं काय आहे तें ? मेलास तरी पत्करलास. पण अशा चुगलखोरीबद्दल कधींसुद्धां क्षमा करणार नाहीं. ” असें त्यास बजबजावून सांगितलें. आणि पुढें ज्या ज्या वेळीं त्याच्या आईस सासूला चोरून कांहीं करणें असेल, त्या त्या वेळीं तिनें तें त्याच्या देखत करून त्यास “ मेल्या, जर एक अक्षर कोणाजवळ बोलशील तर तुला मरेमरेतें मारीन; कधींसुद्धां गय करणार नाहीं. ”

असें बजावून सांगावें, व असे बजावण्याचे प्रसंग दिवसांतून एक दोन वेळां तरी तिला येतच असत. भास्कराच्या शिक्षणाचें मूळबीज हें होय. यासच पुढें अंकुर फुटत चालले. भास्कराच्या आईच्या जिभेस खाण्याची चटक लागलेली असल्यामुळें, नरसोपंतास नोकरी लागल्यावर ते नोकरीवर गेले तेव्हां मुलांस व बायकोस घेऊन गेले असतां बायकोनें दुपारीं त्यांच्या पश्चात् वाटेल ते जिन्नस विकत घेऊन किंवा करून खावे. आणि मुलानें त्याबद्दल चुकूनसुद्धां नवऱ्यास वर्दी देऊं नये म्हणून केव्हां त्यास अधिक उणा खरा खाऊ द्यावा, अगर हाताचा खाऊ पाठीवर द्यावा असें चाललें होतें. व इतर बाबतींतही बापापासून गोष्टी लपविण्याचा त्यास उत्तम प्रकारानें धडा मिळत गेला. ज्या मुलाच्या शिक्षणाचा असा पाया होऊन दिवसानुदिवस त्याच धोरणानें मजल्यावर मजले चढत चालले, त्याचें मनोमंदिर कोणच्या प्रकारचें झालें असेल यासंबंधाची कल्पना आतां विशेष विस्तारानें वाचकांस देण्याचें प्रयोजन नाहीं. भास्कराच्या देखत अनेक गोष्टी घडत गेल्या. त्याच्या आईकडूनच त्याच्या शिक्षणास मदत झाली असें नाहीं. बाप, चुलता, काकू होती तोंपर्यंत आजी, या सर्वांकडून हस्तें परहस्तें यथाशक्ति त्या मनोमंदिराच्या घटनेस मदत होत गेली. आतां जणूं काय त्या मंदिरास शिखर कमी होतें तें बसविण्यास भास्करभाऊ रंगोपंताच्या नजरेखालीं आले. नरसोपंताची नोकरी भास्कराच्या विद्येसंबंधीं शिक्षणास प्रतिकूल असल्यामुळें अनुकूल अशा साधनांत म्हणून त्यास त्यानें आणून ठेविलें होतें. वर सांगितलेंच आहे कीं, कोणतीही गोष्ट धैर्यानें स्वतः करण्याची ताकद भास्करास नव्हती. वर्गांत कोणतीही खोडी अगर कोणताही पाजीपणा करावयाचा असल्यास तो भास्करानें स्वतः कधींही केला नाहीं. कोणा तरी भोळ्या भाबड्या परंतु खोडकर अशा मुलास पुढें करून त्यानें त्याच्या हातून खोड्या करवाव्या. ज्या मुलास मार देववावयाचा असेल त्या मुलाविरुद्ध एखाद्या लढंभारती मुलाजवळ "तुझी तो चेष्टा करीत होता, तुझी अशी निंदा करीत होता," अशा चुगल्या कराव्या, आणि त्या लढंभारती मुलाकडून त्यास चोपवावें. जर मास्तरपर्यंत तक्रार गेलीच, तर तो मारणारा जाणे आणि मार खाणारा जाणे, आपण आपले नामानिराळेच. चोऱ्या करावयाच्या असल्या तरी त्या दुसऱ्याकडून करवावयाच्या आणि त्याचें फळ मात्र जितकें स्वतःस लाभेल तितकें लाभून घ्यावयाचें. अशी ही लहानशी मूर्ति होती. मास्तरास त्याची एकंदर कृति आणि कीर्ति थोडेच दिवसांत ठाऊक झाली. परंतु तो अद्यापि चांगली चोख शिक्षा करण्याजोगा त्यांचे तडाक्यांत सांपडला नव्हता. कधीं तरी सांपडेल आणि त्यास आपण तडकावूं अशी त्यांस उमेद मात्र आली होती.

असो; वर सांगितल्याप्रमाणें भास्करभाऊची स्वारी आपल्या दोन निवडक मित्रांसह समोरून येण्यास आणि फेअरब्रेनसाहेबानें दिलेला तो कागद हातीं घेऊन सीताराम रस्त्यानें जाण्यास एकच गांठ पडली. "दुर्जनं प्रथमं वन्दे" या न्यायानें त्या त्रयीस दुरूनच टाळण्याच्या निमित्तानें सीताराम रस्त्याचे एके बाजूस झाला, व मुकाट्यानें जाऊं लागला. भास्करभाऊचा आज बरेच दिवस त्याजवर मोठा डोळा. तेव्हां यास चोपण्यास ही संधि मोठी चांगली आहे असें जाणून त्यानें आपल्या शेजारच्या मित्रास कोंपर-

खळीनें डंवचून, " ते पाहिले का मोठे सत्यवक्ते चालले आहेत ! तूं भिडी ओढतो आहेस हें मास्तरला कळल्यावांचून उद्यां राहत नाहीं. या गुलामाला एकदां चांगला मार मिळाल्याखेरीज त्याची ही चुगलखोरीची संवय कधीं जायची नाहीं. पण, पंड्या, तुझ्या मनांत अजून तेवढं कांहीं येत नाहीं. "

पंड्या हा एक आडबाप्या मुलगा होता. बुद्धीच्या नांवानें अगदीं आंवळ्याएवढें असून आज कित्येक वर्षें त्याचीं आईबापें खुशाल शाळेची फी भरीत आलीं होतीं. दर दर यत्तेंत दोन दोन वर्षें, तीन तीन वर्षें ठेवून शेवटीं मास्तरांनीं बापाच्या शिफारशीस कंटाळून एक वर्ग वर ढकलावें, असें करीत करीत स्वारी या वर्गांत आली होती. याचा धंदा केवळ वर्गांतल्या लहान लहान मुलांस बिघडवावें एवढाच होता, असें ह्मटलें तरी चालेल. अठरा एकोणीस वर्षेंपर्यंत केवळ स्वतंत्रपणें अद्वातद्वा वाढत आलेल्या मुलास जे काय अवगुण लागावयाचे ते सर्व या मुलाचे अंगीं होते आणि शरीरप्रकृति चांगली धट्टाकट्टा असून गलेलठ्ठपणाही यथास्थित असल्यामुळें वर्गांतील बहुतेक मुलें त्यास अगदीं भिऊन असत. बहुतेक मुलें लहान वयाचीं असल्यामुळें त्यांस हा एक जंगी तीन राक्षसांपैकीं राक्षसच वाटे. त्याचे वाटेस तर कधीं कोणी जात नसे, परंतु पुष्कळशीं मुलें त्याची मर्जी संपादावी एवढ्याकरितां त्याच्या अनुसंधानांत असत. अर्थातच हा पुष्कळ मुलांस बिघडविण्यास कारण होत होता. परंतु इतर शाळामास्तरांप्रमाणेंच या शाळेचे मास्तर असल्यामुळें या सर्व गोष्टींत त्यांस कधीं मन घालण्यास किंवा यांत मन घालणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजून त्यास उपाय करण्यास उद्युक्त झाले नाहींत. आमचा सीताराम मात्र कधीं यास नमूनही नव्हता किंवा तेढीनेंही नव्हता. होतां होईतों तो कधीं त्याच्या वाटेला गेला नाहीं. त्याच्या वर्तनांतच असें कांहीं होतें, कीं त्याच्यायोगानें पंड्यासारख्या उपटसूळ दांडग्या पोरास सुद्धां एक प्रकारची आदरयुक्त प्रीति वाटत असे. परंतु भास्करपंडिताच्या विषमय भाषणानें या पंड्याच्या मनांतही सीतारामासंबंधानें विनाकारण द्वेष माजत चालला होता. केव्हां केव्हां भास्कर त्यास, " तूं त्याला भितोस असं दिसतं, " असं बोलून चीड आणीत असे. केव्हां "तुझ्याबद्दल मास्तरांजवळ सीताराम अशी अशी चुगली करीत होता, आणि मग मास्तर त्यावर असं असं ह्मणाले, " असें खोटेंच सांगत असे. केव्हां पंड्यानें एखाद्या लहान मुलास मारलें असतां, " सीताराम त्या मुलाजवळ जाऊन ' तूं असा गप्प कां बसतोस ? मास्तरकडे तक्रार ने. मी साक्ष देईन. त्याची एकदां खोडकी मोडून टाकूं. चल तूं.' असं म्हणत होता, हें मीं स्वतःऐकिलं" असेंही खोटेंच सांगून देई. या सगळ्याचा परिणाम पंड्याच्या मनावर झालाच. परंतु " सगळ्या मुलांवर तुझा तोरा चालतो, पण याच्यापुढें नांगी पडते " अशा बोलण्यानें तो फार चिडे व त्या पोरास एकवार चांगला चोपून काढून आपण त्याला मुळींच भीत नाहीं आणि मास्तरला त्याच्याहूनही भीत नाहीं, असें दाखविण्यासाठीं तो थोडाबहुत उत्सुक झाला होता. भास्करभाऊची स्वारी वयानें लहान होती, तरी ती मन ओळखण्यांत मोठी बिलंद होती; अर्थातच त्यानें पंड्याच्या मनाची ही स्थिति पक्की जाणली होती. व आजचा हा कपिला-

षष्ठीचा योग आला आहे, तेव्हां त्याचा फायदा घ्यावा असें त्यानें पक्कें मनांत आणून त्याप्रमाणें करण्यास सुरुवात केली.

" बघ, बघ, लुच्चा लेकाचा कांहीं तरी लपवितो आहे. तो बघ. तो बघ. खिशांत कसला कागद दडवितो आहे. मला वाटतं मास्तरनीं उद्यांच्या परीक्षेचा कागद त्याच्याजवळ दिला असेल तो आपण हिसकून घेऊन पाहूं. केवढा मास्तरचा त्याच्यावर विश्वास ! आणखी आपल्या सगळ्यांना ते चोर समजतात. साव काय-तो हा एवढा. मी अगदीं खात्रीनें सांगतो, कीं मास्तरांना उद्यां यायला उशीर होईल तर पहिली घंटा वाजतांच यानें येऊन क्लासांत डिक्टेट करावा म्हणून त्याच्याजवळ दिला आहे. चल त्याला चोपून आपण हिसकून घेऊं ' आणखी तुम्हीं एवढ्या विश्वासानं त्याच्याजवळ दिलात, पण तो फोडून उघडून वाचीत असतांना आम्हीं त्याला पकडलं, ' असं जाऊन सांगूं. म्हणजे तुझ्या हातचा चोपचा चोपही खाऊन वर मास्तरचा विश्वास उडेल तें निराळेंच. बघ, पंड्या, अशी संधि कधीं यायची नाहीं. या वेळीं आजपर्यंतचं सगळ्याचं उट्टं काढून घे. ऐसा लंबे करशील !... ..."

हें चेतवणीचें बोलणें चाललें आहे तोंच त्यांच्या बोलण्याचा विषय त्यांचे अगदीं नजीक आला.

# प्रकरण २५ वें.

## फेअरब्रेनसाहेबांचें पत्र

जात्या पंड्या म्हणजे मोठासा शहाणा होता असें नाहीं. शिकण्याकडे मुळींच प्रवृत्ति नाहीं, आणि आईबापांनीं तर शाळेंत जाऊन शिकण्यासाठीं अतोनात त्रास दिलेला, तेव्हां आपलें शाळेंत जाऊन बांक शिणवावें झालें. अशांपैकीं अगदीं अट्टल स्वारी होती, आणि तालीमबाजीचा मोठा थोरला गर्व. शरीरप्रकृति अशी आपलीच याबद्दल मोठा अभिमान. आणि त्यांतल्या त्यांत विद्येकडे लक्ष्य नाहीं हें त्यास एक मोठेंच भूषण वाटे. कोठेंही हल्लींच्या काळच्या विद्यार्थ्यांत शरीरसामर्थ्य अगदीं नाहीं अशाबद्दल बोलणें निघालें, आणि पंड्या तेथें असला तर त्यानें फुगून दंड थोपटून पुढें उभें रहावें. जणूं काय हे सकलविद्यापरिपूर्ण असूनही शरीरप्रकृतीनें इतके सुसंपन्न आहेत असें वाटावें. आणि विद्येची गोष्ट निघाली असतां यानें लाजण्याचें एकीकडेच राहून " नुसती विद्या काय जाळायची आहे !

शरीरप्रकृति नीट असेल तर ती विद्या. आपण बोआ पहिल्या प्रथम शरीरप्रकृतीकडे लक्ष्य देतों तनदुरुस्ती आधीं ; " हें तो आधीं बोलावयाचा. व कित्येक ठिकाणीं तर, " सध्याच्या काळीं विद्येची आपणास जरूरच नाहीं. आमची प्राचीन विद्या पुष्कळ झाली. जी काय पाहिजे ती तनदुरुस्ती पाहिजे. ती असली तर काय पाहिजे तें होतं, " अशी बडबड करावयाचा. आणि या बाबतींत त्यास होस हो मिळाली म्हणजे मग तो खुष असावयाचा. त्याला स्वतःची अक्कल काडीमात्र नव्हती. परंतु ती गोष्ट कोणीं त्याचे तोंडावर बोलून दाखविली तर त्याच्या संतापास पारावार नाहींसा होत असे. आणि या त्याच्या चिडखोरपणाचा फायदा भास्कर पंडितासारखे कार्यसाधु हटकन घेत असत. पंड्या आपणास बडा देशाभिमानी व धर्माभिमानी म्हणवून घेत असे. यामुळें तर त्याच्या मनाशीं वाटेल तसें खेळणें भास्करासारख्या दुष्ट पोरास फारच सोपें जात असे. असो.

पिस्तव पेटविण्यासाठीं नानाप्रकारच्या शीघ्र ज्वालाग्राही सरपणाची रास करून ठेवावी त्याप्रमाणें आजपर्यंत अनेक कारणांनीं पंड्याच्या मनाची स्थिति झालेली होती. या पंड्याकडून एकवार सीतारामास चोप द्यावा ही भास्कराची फारा दिवसांची इच्छा होय. व त्या इच्छेच्या पूर्ततेसाठीं त्यानें आजपर्यंत बरेच प्रयत्न करून ठेविलेले होते. ते निष्फळ नव्हते. आज त्यांचें फळ त्यास प्राप्त होण्याची वेळ आली होती.

वर सांगितल्याप्रमाणें सीताराम व भास्कर आणि त्याचे सोबती यांची नजरानजर झाली. विनाकारण यांच्या वाटेंत आपण असूं नये अशा इच्छेनें सीतारामानें त्यांस टाळण्याचा प्रयत्न केला. ही मंडळी कोणत्या किंमतीची आहेत हें तो पूर्णपणें जाणून होताच. तेव्हां यांच्यापासून जितकें दूर असावें तितकें चांगलें अशी त्याची इच्छा होती, पण ती इच्छा साधली नाहीं. तथापि आपण आपलें सरळ मार्गानें जावें असा विचार करून त्यानें त्यांचेकडे न पाहतां आपला मार्ग धरिला. पण यांचा हेतु तर त्यास छळणें हा होता. पंड्याचे बरोबर आणखी एक जे तिसरे राजश्री होते, ते या दोहोंहून अगदीं निराळ्याच प्रकारचे होते. कांहीं मुलें, मोठीं माणसेंही अशा स्वभावाचीं असतात कीं, त्यांस स्वतःचे अंगीं कांहीं अवसान नसलें तरी आपली कड घेणारा कोणी आपलेजवळ आहे एवढें त्यांस ठाऊक असलें, कीं त्याच्या मगरूरीस पारावार नाहींसा होतो. गांवठी कुत्र्यांची आणि या व्यक्तींची अगदीं एक तऱ्हा. गांवठी कुत्रीं आपल्या आळींत असतील तों पर्यंत त्यांच्या जोराला पारावार नाहींसा होतो. त्यांचें शेंपूट कांहीं केल्या खालीं म्हणून होत नाहीं. परंतु एकदां आपल्यास आश्रय नाहीं, आपला धनी आजूबाजूस कोठें नाहीं असें त्यांच्या मनास वाटूं लागलें, कीं त्यांचा सर्व जोर संपला. भास्करभाऊ व पंड्याजी यांचेबरोबर असलेले रघ्याजीही याच पंथांतले होते. त्यास स्वतःचें अवसान केवळ पूज्यप्राय होतें. परंतु एखाद्या प्रसिद्ध तालीमबाजाबरोबर त्याच्या छायेप्रमाणें हिंडणाऱ्या हुरडफुंक्यांस ज्याप्रमाणें त्याचेबरोबर इरड करण्यास व जेथें तेथें त्याची कीर्ति गाण्यास, त्याचे जोरावर सगळ्या जगाशीं उद्धटपणें वागण्यास मोठी हौस वाटते, त्याचप्रमाणें आमच्या या रघ्याजींची हुबेहुब स्थिति होती. त्यास या वेळीं फारच

उत्तम प्रसंग आला असें वाटून व जर या वेळीं कोणी पुढें होण्याचा धीर करील तर तो आपणच ( कारण पंड्याजींनीं पुढें होणें हें त्यांच्या मोठेपणास कमी योग्यतेचें व भास्करभाऊस तर तें अशक्य ) असें मनांत आणून त्यांनीं आपलें उद्दाम पाऊल पुढें टाकिलें आणि अतिशय तिट्कारा येण्याजोगें स्मित करून स्वारी डुलत डुलत सीतारामाजवळ जाऊन त्याचे पाठीवर एक थप्पड मारून ' ह्याः ह्याः ' करीत त्यास म्हणते, " कां, सित्याजी, तुमचं हल्लीं फारसं बंड माजलंय्. तो कोण साहेब तुझी गांठलाय म्हणून एवढ्या गमजा की काय ? ह्याः ह्याः ! पर असल्या गमजा आह्मी ऐकूं असं समजूं नको. मारे गचांड्या देऊन लंबे करून टाकूं. तूं समजलास काय ? " असें म्हणून त्यानें बिचाऱ्या सीतारामाच्या मानेमागें हात घातला व दुसऱ्या दोघांकडे विलक्षण तऱ्हेनें डोळे मिचकावीत त्याचे पायांत पाय घालून टांग मारण्याचा प्रयत्न केला. सीताराम आणि रघ्याजी यांचेमध्यें शक्तीच्या मानानें जमीनअस्मानचें अंतर होतें. दोघांचीच झटापट झाली असती तर सीतारामानें त्यास क्षणार्धांत ची ची करण्यास लाविलें असतें, आणि रघ्याजी हें पूर्णपणें जाणून होता. परंतु त्याचा जोर स्वतःच्या ताकदीवर थोडाच होता ! त्याला पक्कें ठाऊक होतें कीं, सीतारामानें जरा हातपाय हालविला किंवा तोंडांतून वावगा शब्द उच्चारला, कीं आपल्या पंड्याजी पक्ष्यांनीं त्याची तिरपीट उडविलीच ! असा जोर असल्यावर मग आणखी काय पाहिजे ! सीतारामानें त्याच्या टांगेस तर दाद दिली नाहींच. परंतु आपल्यास यांनीं विनाकारण छळूं नये, निदान तसें छळण्यास आपण तरी त्यांस कारण देऊं नये, या हेतूनें त्यानें आपणास कचाटींतून सोडून घेऊन दुरून जाण्याचा प्रयत्न केला. पण त्या त्याच्या करण्यानें रघ्याजीस अधिकच जोर आला. ते लागलीच त्याच्या कमरेस विळखा घालून " अबे लंडी, गमजा करून जातीस कुठें ? मास्तराकडे जाऊन चुगल्या करायला ? आतां त्या चुगल्या करायला तुझं तोंडच ठेवीत नाहीं ! " असें म्हणून त्यानें त्याच्या कुशींत एक ठोसा लगावला. त्या ठोशाबरोबर मात्र सीतारामास अतोनात त्वेष आला. आतां काय होईल तें होवो, आपण बिलकुल मागें घ्यावयाचें नाहीं, असा विचार करून त्यानें रघ्याजीचें मानगूट धरून त्यास असा हिसडा दिला कीं, त्याबरोबर त्याचा विळखा सुटून तो कोलमडतच पलीकडे गेला. तोंडानें मात्र वाक्शौर्याचा एकसारखा प्रवाह वाहत होता, व पंड्याजीच्या नांवाचा जप चालला होता. पंड्याजीस अर्थातच आपल्या आश्रिताच्या हाकेस धांवावें लागलें, आणि त्यानें सीतारामाचें मानगूट धड्ड धरून अणुमात्र कसलाही विचार न करितां त्यास दोन झणझणीत चपराकी लगाविल्या. सीतारामाची त्या राक्षसापुढें ताकद ती काय ? परंतु विनाकारण आपण यांच्या अध्यामध्यांतही नसतां यांनीं आपणच असें छळावें हें अर्थातच त्यास फार गैर वाटलें, व तो एकदम त्यास ह्मणतो, " कांरे बाबा, मी मुळींसुद्धां तुझ्या किंवा कोणाच्या वाटेंत गेलों नसतां कां विनाकारण मला त्रास देतां ? " भास्करभाऊस आपलें जिव्हाचांचल्य प्रकट करण्यास नुसती सबबच पाहिजे होती. त्यानें लागलीच मध्यें तोंड घालून म्हटलें, " आणखी रघ्या तुझ्या वाटेस गेला होता नाहीं का ? त्या एव-

ढ्याशा पोराला मारलेंस, तुला कांहीं लाज वाटते ? तुझ्यावर आली तेव्हां मोठ्या दिमाखानं अस्सं नाहीं, तस्सं नाहीं ह्मणतो आहेस ? आणखी मास्तरांच्या जवळ गुळुगुळु बोलून चहाड्या करायला कसा तयार ! पंड्याजी, या एक दोन चार ठेवून, ह्मणजे पुन: तें तोंड जाऊन चुगल्या करायला नको. अन् तो उद्यांच्या परीक्षेचा कागद कुठें आहे ? आण ! खिशांत घालून ठेवतोस नाहीं का ! आह्मीं पाह्यलं ह्मणून ? पण आम्हीं पाह्यलं तें पाह्यलंच तें कांहीं आतां मास्तरच्या कानावर गेल्याखेरीज राहात नाहीं. रघ्या, रघ्या, काढ लेका तो खिशांतला कागद. मास्तरच्या जवळ नेऊन देऊं म्हणजे पक्की त्यांची खात्री होईल हा कसा लुच्चा आहे तो ! काढ. काय बिशाद आहे आतां तो तुझ्या अंगाला हात लावील ? पंड्या, त्याचा हात पिरगळूनच टाकील. रघ्याजीस जो धक्का बसला होता त्यामुळें पायांत शेंपूट घातलेल्या कुत्र्याची व त्याची जवळ जवळ अवस्था एक झाली होती, व ती जणूं काय पूर्णपणें एक करण्याच्या हेतूनेंच, तो जेथें कोलमडत गेला होता, तेथेंच उभा राहून पुढें न येतां अद्वातद्वा शिव्या देऊं लागला. " अरे, काय त्याची बिशाद आहे माझ्या इकडून जाण्याची ? मी इथें खमक्या उभा आहें. त्याला पळूं देत नाहीं. तुम्हाला काळजी नको. घाला त्याला पालथा आणि घ्या तो कागद हिसकावून ! " काठीनें हाणल्यामुळें केंकाटत दूर गेलेलें कुत्रें असेंच बसल्या जागेवरून मारणाराच्या अंगावर भोंकत असतें. भास्करभाऊंची नेहमींची पद्धतच ही कीं, आपण पुढें जाऊन केव्हांही कोणाच्या भानगडींत पडावयाचें नाहीं. जें काय करावयाचें तें परस्पर करवून जमेल तोंवर आपण त्याचें फळ मात्र भोगावयाचें. अर्थशास्त्रांतील श्रमविभागाचें महातत्त्व भास्करावजी फारच उत्तम तऱ्हेनें जाणत असत. स्वार्थासाठीं त्याचा उपयोग कसा करावा हें तर त्यांस इतक्या उत्तम तऱ्हेनें अवगत होतें कीं, तसें कधींच कोणास अवगत नसेल. कोणचीही गोष्ट साध्य करण्याचे श्रम ते बहुतकरून दुसऱ्याकडून करवीत असत. आणि जेथें तसा दुसरा कोणी लाभण्याचा संभव नसेल, तेथें स्वारीनें साधण्याच्या भानगडींत पडणेंच नसे. जें साध्य होईल त्याचा उपभोग घेण्याचे श्रम मात्र स्वारी अगदीं यत्किंचितही मागेंपुढें न पाहतां आपण स्वत: घेत असे. रघ्याजी पुढें येऊन खिशास हात घालीत नाहींत असें पाहतांच स्वारी पंड्याजीकडे वळली आणि त्यास म्हणतात, " त्या भिकारड्यापासून तो कागद तेवढा छिनावून घे. आणखी जाऊं दे लेकाला. उगीच केंकाटतो आहे. तेवढा तो कागद हिसकावून घेतला म्हणून मग आजच्या या माराबद्दल त्याला कांहींसुद्धां करितां येणार नाहीं. त्याची शेंडीच आपल्या हातांत सांपडल्यासारखी होईल. एकदां मास्तराच्या मनांतला त्याच्याबद्दलचा चांगला ग्रह आहे तो काढून टाकला, कीं आपण मिळविली ! मग या लेकाचं तोंडच बंद झालं. खूप मारल्यापेक्षां त्याचा कागद घेण्यांतच विशेष बहार होणार आहे. बच्चंजीप्याऱ्याची मग अशी खात्री करूं कीं याद रखीसे. घे, तो कागद घे. आणखी माझ्याजवळ दे. मी त्या कागदाचा असा पण उपयोग करीन, कीं त्याला कुठें तोंड काढायला जागा ठेवणार नाहीं. दोन चपराकी लगावल्या पुष्कळ झाल्या. पहा, कसं जुन्या खेटरासारखं

तोंड करून उभा आहे ! धर गचांडी आणखी घे कागद. " घे कागद, असें एकसारखें म्हणत गेल्याकारणानें आपला कागद हातचा जातो असें खात्रीनें वाटून बिचारा सीताराम अगदीं घाबरून गेला आणि आपला कागद आपल्या हातून सुटूं नये म्हणून अधिकाधिकच त्याचा हात खिशाकडे वळूं लागला. काय वाटेल तें होवो, आपल्या हातचा कागद नाऊं द्यावयाचा नाहीं, असा त्यानें आपल्या मनांत निश्चय केला. त्याचा हात जों जों त्या कागदाकडे विशेष जात आहे असें दिसलें, तों तों त्याच्या त्या शत्रूंस अधिकाधिकच तो कागद घेण्याविषयीं उत्सुकता झाली. आणि त्यांनीं पुनः त्याच्यावर हल्ला केला. यावेळेस सीताराम स्वस्थ बसला नाहीं. त्यानें आपल्याकडून जितकी म्हणून ताकद खर्चावयाची तितकी खर्च केली, पण त्या राक्षसांपुढें त्याचें काय चालणार ? त्याला बराच त्रास सोसावा लागला. शेवटीं येथपर्यंत स्थिति आली कीं, रस्त्यांतील गृहस्थानें मध्यें पडून त्याची सुटका केली. पण तितक्यांत पंड्यानें त्याचा खिसा फाडून त्यांतील तो कागद काढून तो भास्कराकडे फेंकून दिला. आणि भास्करभाऊंनीं तो चट्कन उचलून इतक्या जोरानें यःपलाय केलें कीं, सीतारामास आपल्या सोडविणाऱ्या गृहस्थांस, " माझा तो कागद फार महत्त्वाचा आहे. तो त्यांनीं नेला. तेवढा घेऊं द्या, " असें म्हणण्याची फुरसत सुद्धां राहिली नाहीं. तो त्या गृहस्थाच्या मदतीनें सुटून धांपा टाकीतच होता. कागद जातांना ' तो कागद परीक्षेचा नाहीं. खाजगी कागद आहे, " वगैरे वगैरे तो म्हणतो तों आपलें काम झालें असें समजून पंड्याजीही त्या गृहस्थावर मध्येंच रिकामटेंकडी उठाठेव करण्याबद्दल गुरकावत गुरकावत तेथून निघून गेला. रघ्याजी केव्हांच प्रणष्ट झाले होते. त्या गृहस्थानें पंड्याजीस दरडावण्याबरोबरच त्याच्या पायांस विजेचा धक्का बसून त्यांत अशी कांहीं गति उत्पन्न झाली कीं, त्या वेळीं मालानें भरलेल्या दहावीस गाड्या जरी त्याचे कमरेस जोडिल्या असत्या, तरी त्या सगळ्यांसह ते विजेच्या वेगानें निघून गेले असते. मग त्यांचें स्वतःचें शरीरच त्यांस वाहून नेण्याचें असल्यावर ते तेथून किती जलद गेले असतील याचें वर्णन करून सांगण्याची जरूरी नाहीं.

इकडे भास्करभाऊ तो कागद हातीं घेण्याबरोबर इतके आनंदले कीं, कोठें तरी जाऊन थांबेन केव्हां आणि तो कागद डोळे भरून पाहीन केव्हां, असें त्यास झालें होतें. तो कागद परीक्षेच्या प्रश्नाचा कागदच असें अद्यापि त्यास वाटत होतें व आपण फोडून मास्तरच्या जवळ नेऊन दिला असतां त्यांचे जवळ आपली किंमत वाढेल, व त्या सित्याची कमी होईल, याबद्दल त्यास मुळींसुद्धां शंका नव्हती. निदान त्याची मोठी उमेद तरी ही होती. सरतेशेवटीं एकदां त्यास पाहिजे तशी जागा मिळाली आणि त्यानें झट्कन् तें पत्र उघडून पाहिलें. पाहातो तों आंत परीक्षेचा कागद मुळींच नसून एक फार लांबलचक असें पत्र आणि एक पन्नास रुपयांची नोट होती. ती पाहतांच तो चपापला. असें कांहीं तरी निराळेंच त्यांत निघेल असें स्वप्नांतसुद्धां त्याला वाटलें नव्हतें. तो आतां विलक्षण बुचकळ्यांत पडला. वाचकहो, याचा अर्थ, तें पत्र व ती नोट ज्याची त्यास परत नेऊन द्यावी अशी बुद्धि जागृत झाली असें समजूं

नका. तसें मुळींच नाहीं. परंतु ही नोट याला कोणी दिली ? आणि हें पत्र कोणाचें ? हें जाणून घेण्याविषयीं त्यास उत्सुकता उत्पन्न झाली, व या पत्राचा तरी आपणास त्या पोराच्या नुकसानी-साठीं उपयोग करून घेतां येईल कीं नाहीं, हा प्रश्न त्याच्या मनांत उभा राहिला. तें पत्र त्यानें पालथें उलथें करून पाहिलें. वाचण्याचा यत्न करून पाहिला, परंतु तें अक्षर त्यास लागेना. एवढ्यावरूनच त्यानें तें त्या साहेबाचें असावें असें जाणलें. आणि तसें वाटतांच पत्रांत काय आहे हें पाहावें, त्यांतील मजकूर आपल्या उपयोगी पडेल तर पाहावा, अशी त्यास इच्छा झाली, मग काय विचारतां ? लागलीच कोणी तरी गांठून तें पत्र वाचून घेण्याची त्यानें तज-वीज केली.

# प्रकरण २६ वें.

## रंगोपंत.

पुढें एक पत्र पडलेलें, आणि रंगोपंत फार अस्वस्थचित्त दिसले. चिंतोपंतदादा गेल्या दिवसापासून कांहीं दिवसपर्यंत रंगोपंतांचे दिवस सरस्वतीबाईंची मर्जी संपादण्याकडेच गेले, आणि सरस्वती-बाईंची मर्जी संपादण्यांत त्यांनीं बरेंच यशही मिळविलें. इत्यादि गोष्टी वाचकांस विशेषतः सांगावयास पाहिजेत असें नाहीं. सरस्वतीबाईंचा आतां त्यांजवर पूर्ण भरं-वसा बसला. पूर्ण म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, याचेपूर्वीं त्यांस रंगोपंताचा कारभार कसा काय होणार याबद्दल थोडीबहुत शंका होती.. गुंडोपंत जबरदस्त माणूस, तो याची डाळ शिजूं देणार नाहीं, अशी त्यास शंका होती. ती शंका दूर होण्या-जोगें कांहीं बाबतींत रंगोपंताचे हातून वर्तन झालें, व त्यामुळें गुंडोपंताकडून होणारा त्रास कमी झाला, अशी सरस्वती-बाईंची समजूत झाली. या समजुतींत खरेपणा कितपत होता हें सांगणें आज फारच कठिण आहे. जसजसें कथानक पुढें सरत जाईल, तसतशी त्याची माहिती वाचकांस होणार आहे. सरस्वतीबाईंच्या चिंतोपंताचें, आपल्यास यश कितपत आलें, याबद्दलचें पत्र गेलें व त्यावेळीं किती आनंद झाला, इत्यादि गोष्टीही वाचकांस विदित आहेत. त्या आनंदस्थि-तीचा उपयोग सरस्वतीबाईंनीं तावडतोब केलाच. थोडेच दिवसांत रंगोपंताचे अंगा-वर तेथील सर्व घर टाकून व गुंडोपंताच्या तडाक्यांत न सांपडण्याविषयीं वारंवार बजावून सरस्वतीबाईंची स्वारी खपखा-बादेहून आलेल्या लवाजम्यासकट चिंतो-पंतास तिकडे मिळालेल्या अधिकाराचें

सुख भोगण्यास निघून गेल्या. अर्थातच रंगोपंतांस पुरतें स्थानिक स्वराज्य मिळालें. घराचे मालक रंगोपंत बनले, व एकंदर इस्टेटीची वहिवाट करण्याचें काम सर्वथा आपले ताब्यांत त्यांनीं घेतलें. ज्या ज्या गांवीं शेतवाडी किंवा वतनवाडी होती, त्या त्या गांवीं कुळांस वगैरे नोटिसा पाठविल्या कीं, "आजपासून चिंतोपंताचे कारभारी आह्मी झालों आहोंत. जें कांहीं देणें घेणें असेल तें आपल्यास दिलें पाहिजे. दुसऱ्या कोणास देण्याचें कारण नाहीं. तसें दिलें असतां तें जमेला धरलें जाणार नाहीं. त्याच्या नुकसानीची जबाबदारी ज्याची त्याजवर राहील. आणि आमचें देणें कोणच्याही सबबीवर चुकणार नाहीं." ही नोटिस केवळ खासगी तऱ्हेनें लिहून लोकांकडे गेली असें नव्हे, तर वर्तमानपत्रांतही फडकली. त्याचप्रमाणें त्या नोटिशींत एक मुख्य भाग असा होता कीं, "गुंडोपंत आजपर्यंत जरी आमची गुमास्तेगिरी करीत असे, तरी त्यानें त्या करण्यांत इमानीपणा दाखविला नसल्यामुळें त्यास कामावरून दूर केलें आहे. आतां त्यास कोणी आमचा तो गुमास्ता या नात्यानें पैसे देऊं नयेत. त्याची पावती आम्हांस मान्य होणार नाहीं." अशा नोटिसा सरस्वतीबाई येथें असतांनाच रंगोपंतानें दिल्या व या नोटिशी दिल्याकारणानेंच रंगोपंत काम खास करील असें सरस्वतीबाईस वाटून आलें. कारण गुंडोपंतास इतक्या बेधडकपणानें असें लिहिण्याचें धाडस जो करील तो त्याची मुरवत खचितच बाळगणार नाहीं, आणि त्याचें कांहीं चालूं देणार नाहीं, अशी तिची समजूत होती. या नोटिसा गेल्यानंतर गुंडोपंत कांहीं तरी हालचाल करील असें रंगोपंतास व सरस्वतीबाईस वाटलें होतें. परंतु तशी हालचाल कांहींच दिसली नाहीं. तेव्हां रामबाण औषध लागू पडलें असें त्या जोडीला वाटलें. आणि गुंडोपंत अगदीं बंगला, आतां तो आपल्या वाटेला जाणार नाहीं असें पक्कें भासून चुकलें. मग काय! सरस्वतीबाई गेल्यापासून एकसारखीं आबादीआबादीचीं व उत्तम काम चालू असल्याबद्दलचीं पत्रांवर पत्रें जाऊं लागलीं. मात्र त्या पत्रांतून नक्की अमुक एक वसूल झाला किंवा अमुक कुळाकडून अमुक धान्य आलें असें चोखपणें मुळींसुद्धां लिहिलेलें नसे. वसूल होतो आहे. चालला आहे. गुंडोपंताचा ठावठिकाण नाहीं तो आतां अगदीं गुप्त झाला. आपल्या भानगडींत मुळींसुद्धां कोठें दिसत नाहीं, त्याला आपण अगदीं ठेंचून टाकला. पुनः त्याचें डोकें वर येईलसें दिसत नाहीं, इत्यादि उत्तेजनपर पत्रें येत होतीं, व अलीकडे अलीकडे जीं पत्रें आलीं त्यांत "आपलेकडून अमुक अमुक रक्कम आली ती जमा केली. अमुक एका व्यापारांत हल्लीं चांगलें शेंकडा १५ रुपयेपर्यंत व्याज पडण्याचा संभव आहे. तेव्हां तो व्यापार सुरू करावा त्याबद्दलची माहिती मीं फार चांगली मिळविली आहे, आणि असें घरचें भांडवल मिळाल्यास नुकसानी म्हणून येऊंच देणार नाहीं. हल्लीं व्यापाराचा हंगाम आहे. आपलेकडून ताबडतोब उत्तर यावें, ह्मणजे माल गुंतवून टाकतों. विलायतेंत हल्लीं या मालाचा पुरवठा इतका पाहिजे आहे कीं, ठिकठिकाणच्या शेतकऱ्यांस आज थोडथोडक्या आगाऊ रकमा देऊन ठेविल्या असतां माल आपले ताब्यांत राहिल्यासारखा राहील. आणि तसा तो अडवून धरून आपण सांगूं ती किंमत देण्यास त्यांस भाग पडेल. यांत खरोखर किती

फायदा आहे हें पत्रीं मला लिहितां येत नाहीं. प्रत्यक्ष जेव्हां फायदा आपल्याला दिसेल तेव्हांच माझ्या म्हणण्याचा खरे-पणा आपणास समजून येईल. मजजवळ आज कांहीं व्यापारी अडल्यासारखे आहेत. तर हें पत्र पाहातांच आपली संमति कळवावी, ह्मणजे त्यासारखें करितां येईल. ”

हें पत्र गेल्यानंतर अर्थातच चिंतोपंता-कडे अधिकउणा विचार झाला. या व्यापा-राच्या वगैरे भानगडींत आपण पडूं नये, सरकारी नोटा घेऊन ठेवाव्या, फार झालें तर कोठें तरी जमीनजुमला गहाणबिहाण ठेवावा, असें चिंतोपंताचें मत पडलें. परंतु सरस्वतीबाईचें अर्थातच ह्यांच्या मताच्या विरुद्ध पडलें कीं, या कामांत रंगूवरच आपण विश्वास टाकून चाललें पाहिजे, हें उघडच आहे. रंगूच्या पत्राचें उत्तर लिहि-ण्यांत याप्रमाणें थोडीबहुत लटपट झाल्या-नंतर अर्थातच तें उत्तर जाण्यास उशीर लागला. इकडे रंगोपंतांनीं दोन दिवस टपालाची वाट पाहून शेवटीं पुनः पत्र लिहिलें:—“ आपल्या उत्तराची बराच वेळ वाट पाहिली. उत्तर आलें नाहीं, सबब आपणाकडून जमा झालेल्या रकमा गुंत-वून टाकिल्या. पुढें जसजशा आणखी रकमा लागतील तसतशा कळवीन. एक-वार हा व्यापार आपल्या हातून होतो कीं नाहीं हें पाहणें अगदीं जरूर आहे. साव-कारी देणें घेणें करून आठ आणे अन् बारा आणे व्याज घेण्यांत उगीच पैसा गुंतवून ठेवणें रास्त नाहीं. इत्यादि, इत्यादि. ”

अशीं पत्रें बरींच गेलीं आलीं व आपल्या कल्पनेपेक्षांही जास्त किफायत होण्याचा संभव असल्याबद्दलचीं उत्तेजनपर पत्रेंही जाऊं लागलीं, असा एकंदर रंगोपंतांनीं बस बसवून टाकिला होता. वसुलापैकीं आलेल्या रकमा तिकडे कधीं गेल्या नाहीं-तच. तिकडून मात्र वारंवार रकमा घेऊन त्या वर सांगितल्याप्रमाणें व्यापारांत गुंत-ल्याबद्दलचीं पत्रें वारंवार जात असत. असो, एकंदरींत गुंडोपंताचा ठावठिकाण नाहींसा होऊन रंगोपंताचें अधिष्ठान कायम झालें आणि दिवसानुदिवस त्यास असें वाटूं लागलें कीं, आतां आपण जें काय करूं तें होणार आहे. त्यांनीं आपला संसार अगदीं उत्तम तऱ्हेनें थाटला, आणि ते गांवांतील ढुढ्ढाचार्य बनण्याच्या स्थि-तीस लागले.

प्रारंभीं सांगितलेंच आहे कीं, त्यांचे-पुढें एक पत्र पडलें होतें, व ते अगदीं चिंतामग्न असे बसले होते. मधूनमधून त्या पत्राकडे ते पाहात व कपाळास आंठ्या घालून डोकें चोळीत. नंतर पुनः तें पत्र घेऊन उलथेंपालथें करीत, आणि पुनः विचार करीत. मग आपल्याशींच त्यांनीं पुढील उद्गार काढले:—झालं तर ठीक. न झालं तर मोठीच पंचाईत. या भानगडींत पडावं कीं नाहीं हा प्रश्न आहे. बाहेर येईल असं तर कांहीं वाटत नाहीं. आपण काम बेमालूम करून टाकूं. बेमालूम ह्मणजे इतकं कीं, कुठं कसलाही मागमूस कोणाला लागूं देणार नाहीं. पण इतकं सगळं करून तसा लभ्यांश झाला तरच त्यांत फायदा. जर नाहीं झाला तर सगळे श्रम व्यर्थ होणार आहेत. श्रमच व्यर्थ होऊन बचावलं तर त्याचंही कांहीं वाटणार नाहीं, पण आमचे श्रम वायां जाऊन जर का सगळं भांडवल बाहेर पडलं तर मग........” परंतु त्यांचे विचार किंवा मानसांतील उद्गार तितकेच राहिले. कारण तितक्यांत कोणी तरी दारांतून डोकावून रामराम केला. आणि एक कुळंबाऊ पागोटें घातलेला

इसम आंत आला. त्याला पाहाण्याबरोबर रंगोपंत मोठ्यानें म्हणतात, " कायरे तुळसाजी, कां आलास ? " त्या इसमानें लागलीच उत्तर दिलें, " कांहीं नाहीं उगीच म्हटलं आज आठपंधरा दिवसांत भेट झाली नाहीं. आज सुट्टी आहे. तर भेट घेऊन जावी. " " ये बैस. कसं काय चैन आहेना ? तुमचे साहेब तर नुसते धर्माचे अवतार आहेत ह्मणतात. "

" हो, मोठे चांगले आहेत खरे, पण एकदां का बस्तान बिघडलं ह्मणजे मग त्यांच्यासारखे वाईटही कोणी नाहींत. सरळ सरळ वागलं पाहिजे, मग कधीं कांहीं बोलायचे नाहींत. तें चुकलं कीं गेलंच. बिघडलंच. आपण कधीं त्यांच्यापुढें जातच नाहीं. असं वाटतं कीं, एखाद् वेळ आपले हातून जायचा एखादा खोटानाटा शब्द्. अन् एकदां का मग त्यांचं मन बिघडलं कीं मग झालं. मग काय वाटेल तें करा. त्यापेक्षां दूरदूर असलेलंच बरं. पण चांगला तर खरा. कधीं ह्मणून कोणावर संतापलाय, शिव्या दिल्यात असं झालं नाहीं. अन् दिलदारही पण मोठा. पगाराचे दिवशीं जो कोणी पगार कळपांत नेऊन पोहोंचवील, त्याला रुपया आठ आणे मिळायचेच. नाहीं मिळायचे असं व्हायचंच नाहीं. कुणाच्या घरीं कांहीं असो, साहेबांकडे जाऊन सांगून जरा तोंड वेडं करण्याचा अवकाश, कीं स्वारीनं उठून पांच चार रुपये हातावर ठेवलेच ह्मणून समजावं. अशी मोठी मौज आहे. असा साहेब पुनः येणार नाहीं."

" अरे वः ! तूं तर त्याला नुसता देवच बनविलंस ! मीं तर ऐकलं कीं तो इकडे हाताखालच्या लोकांना चांगला आहे खरा, परंतु ज्यांचीं त्यांच्याकडे कामं असतील त्यांच्याशीं मोठा कडक असतो. आजी इतके जे खर्च होतात ते कांहीं निवळ पगारावरच......"

" तें काय असेल तें तुमचं तुह्मांला ठाऊक ! आह्मांला काय त्याचा अनुभव ? पण गोरा असून मोठा चांगला आहे खरा. सरळ काम असलं तर तें करायला मागेंपुढें घेत नाहीं. जर का त्यांत लबाडीलचाडी असली, तर ठार बुडालेंच काम म्हणून समजा. तुह्मांला तर त्याचा चांगला अनुभव असला पाहिजे. तुमचीं कामं त्यांच्यापुढें कितीक जात असतील. जो तुमचा अनुभव असेल तो खरा. आमचा गरीब चपराशाचा अनुभव काय ? साहेब जरा गुड्गुड् ह्मणाला, आणखी महिन्याचे कांहीं चार आठ आणे आमच्या तोंडावर टाकले म्हणजे आम्ही ह्मणतों साहेब मोठा चांगला. परंतु तुह्मी एवढं पक्कं समजा आह्मी ज्याला चांगला म्हणतों तो खरा खरा चांगलाच असतो. "

" जाऊं दे. मरूं दे तुझा साहेबन् तूं ? आह्मांला काय त्याचं ? दुसरं कांहीं कामबिम आहे का तुझं ? असलं तर बोल. नाहीं तर जा. आतां मी थोडा कामांत आहें. "

" आमचं गरिबाचं काय काम असायचं ? कुठें चार पैसे लागले तर मागायचे, कुठें मिळाले तर आपल्यापाशीं आणून ठेवायचे. आमच्या घरांत थोड्याच कांहीं तिजोऱ्या अन् पेट्या आहेत ! "

" हां हां ! ! मग आज कांहीं मागायला आला आहेस का कांहीं ठेवायला आला आहेस ? ठेवायला तर आजपर्यंत आलेला मला कधीं नाहीं आठवत. मागायला आला असलास तर आपल्याजवळ कांहीं आज पैसा नाहीं. आपला आल्या वाटेनं चालता हो. जो अगदीं गाढव असेल

तो गुलामांनो तुम्हाला पैसा देईल. बोल, आटप अन् चालता हो. "

" हें काय दादासाहेब, आपणच असं बोलायला लागलां तर आमचं गरिबाचं चालणार कसं ? एकदां सोडून धा वक्ता आपल्या पायांपाशीं आम्ही येणार. तुम्ही नाहीं म्हटलं तरी पैसे घेऊन जाणार. हें असं काय बोलतां ? "

रंगोपंत नुसते तुच्छतादर्शक हंसले. " बरं, बरं. तुला कांहीं रक्कम पाहिजे असली तर आतां उद्यां ये. आज मला नुसतं तुझ्याशीं बोलायला सुद्धां वेळ नाहीं, जा. उद्यांबिद्यां ये पुनः केव्हां तरी. तुम्ही लेको म्हणजे या हापिसांतलीं कुत्रीं. तुमच्या तोंडावर कांहीं तरी टाकलं नाहीं कीं तुम्ही एवढ्या तेवढ्या गोष्टींत आम्हांला त्रास देणार. म्हणून आपलं तुमच्याशीं बरं असायचं. "

" काय वाटेल तें म्हणा आपुन् दादासाहेब. कांहीं जरी म्हटलं तरी तुमच्याबिगर आम्हाला गत नाहीं. अन् आमच्याही बिगर तुम्हांला नाहीं."

" बरं बरं. जा आतां. असलं कांहीं तर करूं तुझं काम उद्यां. जा."

" उद्यांच काय आहे ? आजच का कराना ? त्यांत काय बिनसतं !"

" अरे, आज वेळ नाहीं म्हणून सांगतोंना ? उद्यां ये सावकाश. "

" माझं काम कांहीं फार नाहीं. एक पन्नास रुप........."

" छेः छेः छेः आज अगदीं अक्षरसुद्धां काढूं नकोस. मला बिलकुल वेळ नाहीं. "

" पण दादासाहेब ! ऐकून तर घ्याल ! असं काय लावलंय् वेळ नाहीं वेळ नाहीं. फार नाहीं एक पन्नास..."

" मोठा लोंचट बाबा तूं. नाहीं वेळ म्हणून सांगतों, तरी आपलंच. जा आतां, जा. "

तुळशाजी मोठ्यानें हंसला. " दादासाहेब, मला रुपये नकोत. ही एक माझी पन्नासाची नोट आहे, तेवढी आपल्याजवळ ठेवा. दुसरं माझं कांहीं काम नाहीं."

रंगोपंतदादाही लागलीच थोडेसे खजिल होऊन पण सांवरून त्याच्यासारखे हंसले, आणि म्हणतात, " मग त्याला एवढी प्रस्तावनारे कशाला हवी होती ? केव्हांच रुपये ठेवायचे अन् चालतं व्हायचं. लेका आणलेस तरी कोठून ! एकदम पन्नास रुपयांची नोट तुझ्याजवळ आली कुठली ! बडा पाताळयंत्र्या दिसतोस तूं. कुठें लग्गा साधलास वाटतं ! "

" काय रावसाहेब, आपलं गरीब पायलं, मग त्याला कांहींबी बोलावं ना ! आतां चार महिन्यांनीं पोराचं लगीन करायचं म्हणून जमवाजमवी करतोय. गांवचे रुपये आज किती दिवस भाऊच खाऊन बसत असे. त्याच्या पाठीमागं लागून लागून हे पन्नास आतां कुठें काढले. आणखी एक पन्नास असेच त्याच्याकडून यायचे आहेत. ते आले म्हणजे होतील शंभर. मग तुमच्यासारख्याकडून एक शेंदीडशें काढून टाकूं म्हणतों पोराचे चार हात करून. दुसरं काय ? पोरीला द्यायलाच लागतील एक दोनशें रुपये. मग जेवणखाण, कापडचोपड याला काय लागतील ते काढायचे कोठून तरी. आमचा जन्म हा असाच भीक मागत अन् उसनं पासनं काढण्यांत जायचा. ठेवा एवढी ही नोट आणखी कारभारणीनं थोडंबहुत काय केलंय गळसरी बिळसरी. ती तर गेचा आज तीन सालं लागलीय् पाठीस."

रंगोपंतानें हात पुढें करून ती नोट घेतली आणि त्यास जाण्यास सांगितलें. परंतु तो आपलें रडगाणें कांहीं केल्या संपविना. लग्नाला किती रुपये लागतील, आपल्याजवळ आहेत किती आणि आपण ते जमवणार कसे; भावाच्याकडे आजपर्यंत आपल्या गांवच्या वतनाचे किती रुपये खरोखर थकले आहेत; आपण इकडे चाकरींत गुंतल्यामुळें आपणास ते मिळण्याची आशा कशी नाहींशी झाली आहे, पैसा मिळवावयाला काय श्रम पडतात, आणि त्यांतही आपल्यासारखे केवळ इमानानें नोकरी बजावणारे व दुसऱ्या भानगडींत न पडणारे लोक असले म्हणजे त्यांस संसारांत किती त्रास होतो, पैशाची कशी तारंबळ उडते, या महिन्याची त्या महिन्याला कशी गांठ पडत नाहीं, नुसती मीठभाकरी खाऊन दिवस काढण्यास देखील किती कठिण जातें, वगैरे वगैरे अनेक गोष्टींनीं भरलेलें लांबलचक चऱ्हाट वळीत तो बसला. वारंवार वारंवार तो आपल्या इमानाविषयीं सांगूं लागला. आणि विशेषत: ही पन्नासाची नोट मोठ्या कष्टानें आपल्या भावाच्या तडाक्यांतून आपण काढली आहे असें त्याच्या बोलण्यांत आलें. रंगोपंत बिचारा आपल्यापुढें असणाऱ्या पत्राविषयीं विचार करीत होता. त्यास हा इसम एकदांचा केव्हां जाईल असें झालें होतें. शेवटीं त्यानें, " तुझ्या पोराच्या लग्नाच्या वेळीं मी तुला खास मदत करीन " असें आश्वासन देऊन घालवून दिलें आणि पुन: तो आपल्या मूळच्या विचाराकडे लागला. त्याला कांहीं तरी अतिशय काळजी उत्पन्न करणारा गूढ असा प्रश्न पडला होता. मग तें काय असेल कोण जाणे ! कांहीं वेळ विचार करतां करतां तो एकदम आपल्याशींच म्हणतो, " ठोकून तर टाकावं. साहस नाहीं तर किफायतही नाहीं. करूं कीं नको, करूं कीं नको, असं केल्यानं कोणाच्या हातून कधीं कांहीं झालं नाहीं. तेंच खरं. संधि आली आहे. घालवायची नाहीं. " असें म्हणून बाह्यत: तो स्तब्ध बसला. पण आंतून त्याच्या डोक्यांत कांहीं तरी रचना चालली होती. त्याचे हातवारे, त्याच्या चुटक्या, त्याच्या माना, त्याच्या भिंवया, या सर्वांवरून त्याच्या चेताची रचना त्याला स्वत:ला तरी क्षणोक्षणीं अधिक अधिक पसंत पडत चालली असावी, असें दिसे. इतक्यांत पुन: कोणी डोकावल्याचा त्यास भास झाला. " कोण आहे ? " म्हणून विचारतांच एक स्त्री त्याच्यापुढें आली व हंसत त्यास म्हणते, " मग माझ्या त्या सरींत कांहीं भर घालण्याचं मनांत येत नाहींना ? इतकी सगळी आपली चैन चालली आहे. आणखी माझ्या सरीनंच तेवढं काय • केलं आहे ? घालायची होती तेवढी भर. मग मी कधीं कांहीं बोलणार नाहीं. अगदीं ब्र काढणार नाहीं. "

" हो. हो. या गेल्या सहा आठ महिन्यांत दागिन्यांसंबंधानं आपण ब्र तरी काढला आहे का ? मुळींच नाहीं. मला खरोखर कधीं वाटलं नव्हतं, कीं तुला म्हणजे दागिन्यांची इतकी हाव असेल. इथें आल्यापासून आणखी मला पैसे मिळताहेत असं पाहिल्यापासून एकसारखं कांहींना कांहीं तरी तुझं आहेच. बरं, चला असेच पैसे मिळूं देत. तुला तेंच मला सुख. अन् आतां तर असा एक डल्ला साधण्याचं योजिलं आहे, कीं तो साधला तर आपण स्वतंत्र घरदार करून व्यापारधंदा सुरू करूं. कांहीं नाहीं तरी एक लाख रुपये या कामांत मिळतील.

देईल आणि सरळपणानें वाटेल तेवढें नुकसान सांगून संवरून करील, परंतु भास्कराप्रमाणें चुगलखोऱ्या, चोऱ्या करून कधींसुद्धां त्रास देणार नाहीं असा होता. शरीर निरोगी व सुदृढ असें असलें, तर लुच्चेगिऱ्या, डांबिसगिऱ्या सहसा सुचत नाहींत. शरीराप्रमाणेंच हृदयही मोठें सुदृढ होतें आणि तेंच शरीर जर का फाटकें असलें, तर आंतलें मन ( हृदय ) ही तसेंच फाटकेंतुटकें असतें. हा अनुभव एका काळचा किंवा एका स्थळाचा नाहीं; नेहमींचा सर्व ठिकाणचा आहे. मागें जें पंड्याचें वर्णन दिलें आहे, त्यावरून त्याचा स्वभाव कसा होता हें वाचकांस समजलेंच असेल. या स्वभावाला अनुसरूनच त्याची सर्व कृति होती. ज्याला " हलकट " किंवा " क्षुद्र " अशीं विशेषणें शोभतील अशीं त्याचीं कृत्यें नव्हतीं. त्याच्या सरळपणाचा व भोळ्या मनाचा फायदा घेऊन भास्करासारखीं धूर्त पोरें मात्र त्याच्याकडून वाटेल तें करवीत. आपलें पत्र परत मिळण्याचा जर कांहीं संभव असला तर तो त्याच्याकडून आहे असा सीतारामाच्या मनाचा ग्रह झाला आणि आपण सरळपणानें त्याच्याकडे जाऊन त्यास खरी खरी हकीकत सांगून भास्कराकडून आपला कागद आणवावा असा त्यानें विचार केला आणि तो त्याप्रमाणें त्याची गांठ कोठें पडेल याच्या विचारास लागला. संध्याकाळपर्यंत त्यानें दोनदां तिनदां त्याच्या घरीं हेलपाटे घातले. मनांतला विचार हा कीं, साहेबांकडे जाऊन हकीकत सांगण्यापूर्वी पत्राचा पत्ता लागून पत्र हातीं आल्यास पहावें, म्हणजे साहेबांस रागावण्यास फारसें कारण राहणार नाहीं. त्याच्यापासून लपवून तर अर्थातच कांहीं ठेवावयाचें नाहीं. दोन्ही तिन्ही हेलपाटे बिचाऱ्याचे वायां गेले. तेव्हां निराश होऊन डोळ्यांत अगदीं आंसवें उभीं राहून बिचारा परत घरीं आला. काय करतो ?

त्याचा रोजचा नियम असा असे कीं, संध्याकाळचीं जेवणेंखाणें झालीं म्हणजे आईचें काम आटपून ती रिकामी होईपर्यंत आपल्या भावंडांचीं अंथरुणें वगैरे घालून देऊन त्यांस निजवावयाचें व तेथें आगाऱ्या समईपाशीं आपला अभ्यास करीत बसावयाचें. आईचें काम वगैरे आटपून आई तेथें येऊन बसली म्हणजे भक्तलीलामृत किंवा संतलीलामृत अशा एखाद्या पोथीचा एक अध्याय तिला वाचून दाखवावयाचा आणि मग एकंदर दिवसांत जें कांहीं झालें असेल, तें सर्व तिला सांगावयाचें व घरांत जें काय झालें असेल, तें आईनें त्याला सांगावयाचें. त्याचें वय कांहीं विशेष नव्हतें हें वाचकांस माहीत आहेच. परंतु तो आपल्या आईचा एक मोठा मंत्री होता, व आई त्याला अगदीं मोठ्या शहाण्या माणसाप्रमाणें मानून तशीच त्याच्याशीं वागत असे. घरांत कांहींही सगळ्या दिवसांत होवो, आई कोठेंही कोणाच्याही घरीं कांहींही कामानिमित्त गेलेली असो, तेथें जें काय बोलणें चालणें झालें असेल, तें तिनें आपल्या मुलास सांगावयाचें. " अं: ! त्यांत काय पोराला समजायचं आहे ! त्याला काय पोराला सांगायचं आहे ! " असें तिनें कधींच म्हटलें नाहीं. बारीकसारीक कशीही गोष्ट असो, तिनें त्याला सांगून टाकावयाची. आई अशा तऱ्हेनें वागत असल्यावर मग मुलगा काय म्हणून गैरविश्वासानें वागेल ? त्याचें शिक्षण जर असें उत्तम तर तो वावगा कसा निवणार ? त्यानें वर्गांत झालेल्या बारीकसारीक गोष्टी सुद्धां आईला सांगावयाच्या. आपल्याला अमक्या तासाला अमक्या विषयांत मार्क

किती मिळाले, अमक्या अभ्यासांत किती प्रश्न चुकले, अमक्या मुलानें आज काय केलें, मास्तरनीं काय म्हटलें वगैरे सगळ्या गोष्टी मोठ्या आनंदानें आईला सांगून नंतर दहाचे सुमारास त्यानें झोंपीं जावें व आईनें त्यास पहांटेस पांच वाजतां उठवून अभ्यासास बसवावें, असा क्रम असे. सुमारें तीन तास अभ्यास झाल्यानंतर त्यानें स्नान वगैरे करून मंडईत जावें आणि घरीं आल्यावर आपल्या धाकट्या भावाच्या अभ्यासाकडे नजर टाकून जेवून खाऊन शाळेंत जावें. आपल्या वेड्या भावाशीं थोडेंबहुत खेळण्याबोलण्यांतही वेळ घालविण्यास त्यानें कधीं कमी केलें नाहीं. त्याच्याशीं तर तो फार प्रेमानें वागे. तो वेडा खरा, परंतु त्याची सीतारामाच्या ठिकाणीं जी भक्ति होती, ती तर अपरिमितच होती. असो.

वर सांगितलेल्या आपल्या क्रमास अनुसरून त्यानें आई काम आटपून येईपर्यंत वेळ काढला. आणि आई येतांच आईला आपण झालेली हकीकत सांगूं असें तो म्हणत होता. परंतु आई प्रत्यक्ष आल्यावर चटकन् एकदम त्याच्यानें बोलवेना. त्याला वाटलें, आपल्याला वर्गांत शत्रु आहेत, हें ऐकून आईला फार वाईट वाटेल. परंतु तो विचार त्याच्या सांगण्याच्या आड आला नाहींच. आई येऊन बसतांच त्यानें नियमित अध्याय वाचला आणि फेअरब्रेनसाहेबांकडे गेलों होतों तेव्हां काय झालें याबद्दलची हकीकत त्यानें सर्व सांगितली. आपल्या आईबद्दल फेअरब्रेनसाहेबांनीं ज्या ज्या वेळीं फार उत्कृष्ट उद्गार काढले, त्या त्या वेळीं सीतारामास किती तरी अभिमान वाटे, आणि तें सर्व आईजवळ संध्याकाळीं सांगण्यांत त्यास किती तरी आनंद होई ! " आज साहेबांच्या आईचं पत्र येणार होतं यामुळें ते उत्सुक होते, फारसे कांहीं बोलले नाहींत; पण तुम्ही फार फार काळजी घेण्याबद्दल मला त्यांनीं बजावलं. ' आई म्हणजे एक अजब व्यक्ति आहे नाहीं रे?' असं त्यांनीं आपल्याला म्हटलं, आणखी मग पत्र आल्यावर तें पत्र वाचण्यांत अगदीं गढून गेले. मला माझ्या नांवचं एक पत्र लिहून ठेविलेलं आहे तें घेऊन जाण्याबद्दल मात्र सांगितलं. आई, त्यांची आई देखील तुझ्याचसारखी असेल काय ? त्यांचं सुद्धां आईवर मोठं प्रेम दिसतं बरं का ! आईची गोष्ट निघाली, ह्मणजे कसे पण मोठ्या प्रेमानं बोलतात ! त्यांची आई कां बरं इकडे त्यांच्याजवळ रहायला येत नाहीं ? बिचारे कुठें क्लबांत, हॉटेलांत रहातात, त्याच्यापेक्षां आईला आणून निराळ्या बंगल्यांत राह्यले तर काय वाईट?"

" विचार त्यांना एक दिवस, " राधाबाई हंसून त्यास म्हणाली, " बरं पण तुझ्या नांवचं पत्र कसलं लिहून ठेवलं होतं त्यांनीं, आणखी त्यांत काय होतं?"

तो प्रश्न ऐकतांच सीतारामाचा चेहरा एकदम म्लान झाला. " आईला काय सांगायचं आहे ! कांहीं सांगूं नये झालं तें " असा विचार त्याच्या मनास शिवला सुद्धां नाहीं "पण आईला सांगितल्यानं तिला फार वाईट वाटेल, क्लासांत आपण जितक्या चांगल्या तऱ्हेनं वागायला पाहिजे, मुलांशीं जितकं मिळून मिसळून असलं पाहिजे तितकें असत नाहीं असं तिला वाटेल " अशीही त्याच्या मनास शंका आली. परंतु तेवढ्यानें त्यानें " तर मग सांगूं नये तेंच चांगलं, " अशा विचारास काडी मात्र जागा दिली काय? नाहीं. त्यानें अगदीं सरळपणानें झाली हकीकत आरंभापासून अखेरपर्यंत सांगि-

तली. आणि कोणाच्याजवळ गेलें असतां व विनविलें असतां आपल्याला तें पत्र परत मिळेल असें आपल्यास वाटून आपण त्याच्याकडे एकदां दोनदां कसे गेलों हेंही सांगितलें. आईस अर्थातच फार वाईट वाटलें. परंतु पुढें काय करावें, याबद्दल तिनें स्वतः उपाय सुचविण्या-पूर्वीं मुलगा काय म्हणतो हें जाणण्याच्या बुद्धीनें त्यास ह्मटलें, " मग आतां तें पत्र मिळालं तर बरं, नाहीं तर साहेबां-कडे जाणं बंद झालं कीं नाहीं ? नाहीं तर त्यांना कांहीं तरी..............."

" तें कां ह्मणून ? वा ! मी तर तामडतोब तसाच परत जाऊन झालेली हकीकत त्यांना कळवून येणार होतों. पण म्हटलं, पत्र मिळालं परत तर पहावं आणखी मग काय तें करावं. आतां सकाळीं आणखी एकदां त्या पंडूकडे जाऊन खटपट करायची, नाहीं तर सरळ-पणानं जाऊन झाली हकीकत जाऊन सांगायची. त्या पत्रांत त्यांनीं काय लिहिलं होतं, तें कळायला नको आपल्याला ?"

मुलाचें हें बोलणें ऐकून आईस फार समाधान झालें. मुलाचा स्वतःचा कांहीं अपराध नव्हता, परंतु दुसरा एखादा मुलगा असता, तर खचित कांहीं तरी गफलतीचा विचार तरी करता, असें तिला वाटलें, आणि आपला मुलगा तसा नाहीं, जें सरळपणाला उचित तेंच करण्याची प्रवृत्ति त्याला झाली, हें पाहून तिला बरें वाटलें. सीतारामानें सरळ तोच विचार केला, यांतही खरोखर विशेष कांहीं केलें असें कोणास वाटणार नाहीं. कां कीं, बाब मोठीशी मोह उत्पन्न करून त्यास कसोटीस लावणारी नव्हती. सर्व खरें, परंतु आजकाल अगदीं यःकश्चित् गोष्टींतही आपला उणेपणा कबूल करून सरळपणानें खरें तें सांग-ण्याची प्रवृत्ति असणारीं व त्या प्रवृत्तीस विरोध न करतां तीप्रमाणें वागणारीं किती मुलें निघतील ? ज्यांत कांहीं नफा नुकसानी असेल ती तर गोष्ट भिन्नच, परंतु ज्यांत कांहीं नफा नाहीं, नुकसान नाहीं, अशा गोष्टी सांगत असतांनासुद्धां थोडेसें आपल्या पदरचें अधिक घालून, किंवा उगीच आपला उणेपणा दिसेल तो कमी करून, त्याच्या ऐवजीं दुसरेंच कांहीं तरी सांगण्याची प्रवृत्ति असणारीं मुलें किती असतात, याचा उगीच थोडासा तपास वाचकांनीं आपल्या अनु-भवाशीं करावा, ह्मणजे सीतारामाच्या वागण्याचें थोडेसें महत्त्व लक्ष्यांत येणार आहे. राधाबाईस तरी निदान त्या तिच्या सरळपणाचें कौतुक वाटलें. सरळपणा ज्यांत नाहीं अशा तऱ्हेनें तो वागेल, किंवा वागण्याचें त्याच्या मनांत येईल असें तिला वाटलें नव्हतेंच, पण न जाणों, मूलस्वभाव आहे, काय विचार करील आणि काय नाहीं, असें तिच्या मनांत आलें. वर सांगितल्याप्रमाणें उत्तर येतांच तिला फार समाधान झालें आणि तिनें त्यास शाबासकी दिली. ती त्याला म्ह-णाली, " उद्यांच्या उद्यां तूं जाऊन त्यांना झालेली हकीकत सांग. उशीर केलास तर विनाकारण संशय येईल कीं यानेंच कुठें तरी तो कागद हरवून कांहीं तरी बयादें हा सांगतो आहे. तें पाहिजे कशाला ? पण त्यांत कांहीं कोणा दुसऱ्याला द्यायचं पत्र असलं, नाहीं तर पैसे असले तर ? तें आपलं त्यांना सांगून टाकलेलं बरं ! " असें बोलून तिनें त्याला बराच उप-देश केला.

दुसरे दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर त्यानें पंड्याची गांठ पडली तर पहावी

म्हणून त्याच्या घरची वाट धरली, परंतु पंड्याचा मुळींच ठावठिकाण नाहीं. तेव्हां आतां अधिक विलंब करण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं असें मनांत म्हणून तो नऊ साडेनऊ वाजण्याच्या सुमारास क्लबांत फेअरब्रेनसाहेबांची गांठ घेण्यासाठीं गेला. परंतु फेअरब्रेनसाहेब अजून देवळांतून आले नव्हते. आदले दिवशीं आईचें तें आनंदकारक पत्र वाचून त्यांची चित्तवृत्ति आनंदमय झाली होती, आणि सकाळीं उठतांच आज देवळांत जाऊन कांहीं तरी चांगला धर्मादाय करावयाचा अशी त्यांस इच्छा उत्पन्न झाली. त्या इच्छेला अनुसरून कांहीं तरी पैसे बरोबर घ्यावे, म्हणून ते आदले दिवशींच आलेल्या पगाराच्या नोटांत पाहूं लागले तों त्यांच्या पगाराच्या लखोट्यांत एक पन्नास रुपयांची नोट कमी ! आपण कोणास दिली किंवा कोठें ठेविली असें क्षणमात्र वाटून त्यांनीं बरेंच डोकें खाजविलें, परंतु कांहीं आठवण होईना. तेव्हां, करूं मग आल्यावर आठवण अगर शोध, असें म्हणून त्यांनीं एक वीस रुपयांची नोट खिशांत घालून बाकीचा लखोटा पेटींत ठेवून देवळाचा मार्ग धरला. परंतु नोट गेल्याबद्दलचा विचार त्यांच्या डोक्यांत एकसारखा होताच. जेवण झालेलें असावें, तसाच उष्टा हात रहावा, धुतला जाऊं नये, आणि त्याचें स्मरण जसें एकसारखें मनास डाचत असतें, तसेंच एखाद्या हरवलेल्या जिनसेचें असतें. ती अमुक तऱ्हेनें हरवली, किंवा तिचें अमुक झालें असें मनाला पक्कें समजून येईपर्यंत मन इतकें अस्वस्थ असतें कीं कांहीं पुसूं नये. फेअरब्रेनसाहेबांची अवस्था तीच झाली होती. देवळांतून परत येतांच सीतारामास पाहून त्यांना आश्चर्य वाटलें, आणि क्षणमात्र—अगदीं क्षणमात्र—त्यांच्या मनांत कांहीं अनुचित विचार आला. पण तो लागलीच दूर सारून त्यांनीं स्मित करून त्यास ' कां आलास ? ' म्हणून विचारलें. सीतारामानें आपले येण्याचें कारण सविस्तरपणें सांगतांच त्यांसही समाधान वाटलें आणि ते त्यास, "कांहीं हरकत नाहीं, तूं येऊन मला सांगितलेंस हें फार चांगलें केलेंस. मी आतां पहातों काय करतां येईल तें ," असें म्हणाले.

नंतर किंचित् वेळ स्तब्ध राहून त्यास म्हणतात, " कायरे सीताराम, तूं आंत तुझा तो लखोटा न्यायला आलास, तेव्हां इथें एखादा लखोटा पडला होता टेबलावर ? "

" हो होता. आपल्या शिपायानें आणून ठेवला नाहीं का ? "

" त्या शिपायानें कांहीं इथें गडबड केली त्या लखोट्यापाशीं ? "

" मीं तर कांहीं पाहिली नाहीं. मला वाटतें, तो लखोटा टाकून तो लागलीच गेला. "

फेअरब्रेनसाहेबांनीं फक्त सचिंतपणें 'हूं' असें केलें.

# प्रकरण २८ वें.

## भास्करभाऊ.

ऑफिसातून पगार आला, तेव्हां अर्थातच नोटींचे नंबर टिपून ठेविलेले असतील असें मनांत येऊन फेअरब्रेनसाहेबांनीं आपल्या शिरस्तेदाराकडून चौकशी करविली, आणि माहिती आणून ठेविली. आपल्या पगाराच्या नोटांतून नोट जावी कशी ? शिपायानें पगाराचा लखोटा आणून ठेविला, तो आपण नुकताच फोडून त्याच्याजवळ देऊन टेबलावर ठेवण्यास सांगितलें. त्यानंतर त्या खोलींत दुसरें कोणी गेलें नाहीं. फक्त सीताराम गेला होता, त्याचा आणि ती नोट जाण्याचा कांहीं संबंध असेल ? हा विचार क्षणमात्र फेअरब्रेनसाहेबांच्या मनांत आला. परंतु आजपर्यंतचें त्याचें वर्तन मनांत आणतां तो मुलगा ह्मणजे केवळ सरळपणाची व सभ्यपणाची मूर्ति असतां, आजच असें कांहीं त्याच्या हातून होईल हें अणुभरसुद्धां त्यांस संभवनीय वाटेना. जो शिपाई पगार घेऊन आला, त्यानें तर कांहींसुद्धां त्या लखोट्यास केलें नाहीं. क्लबांतील नौकर कोणी संध्याकाळीं आला असून त्यानें कांहीं केलें म्हणावें, तर तें संभवनीय दिसत नाहीं. कारण आपण काल सार्वजनिक टेबलावर जेवण्यास सुद्धां गेलों नाहीं. जेवण आपल्या खोलींत मागविलें. मग नोट जाण्याचा हा विलक्षण प्रकार व्हावा कसा ? कांहीं सुद्धां नक्की विचार सुचेना. तेव्हां, असेल, लागेल पत्ता, असें म्हणूनच तो विचार दूर सारणें त्यांस भाग पडलें. पण " जाऊं द्या " असें म्हणून एखादा विचार दूर सारण्यासाठीं प्रयत्न करणें जितकें सोपें असतें, तितकें त्यांत सिद्धि येणें सोपें नसतें. तो त्या नोटीचा विचार त्यांच्या मनास अगदीं चिकटून राहिला. शिपायास विचारलें. त्यानें अर्थातच, ' आपल्यास कांहीं माहिती नाहीं. आपण लखोटा पाहून टेबलावर ठेवण्यास सांगितलं. मीं ठेवला. आंत काय आहे तें कोण पहाणार ? ' असें अगदीं सरळपणाचें उत्तर दिलें. पगार मोजून पाकिटांत घालणारा माणूस चुकला असेल म्हणावें, तर तशी चौकशी करतां तेंही शक्य दिसेना. पगार घेतांना सह्या करून आपण दिल्या त्या वेळीं नोटा बरोबर फक्त पाकिटांत घालून पाठविण्याचें काम कारकुनास सांगितलें, त्यास विचारावें, त्याच्या उत्तरावरून व उत्तर देण्याच्या पद्धतीवरून त्याला खरोखरच कांहीं माहिती नाहीं असें वाटे. आणि संशय घेण्यास खात्रीलायक आधार असल्याखेरीज उगीच एखाद्याला पकडून, लाव चाप, दे ठोक, असें करूं जाणाऱ्या महात्म्यांपैकीं फेअरब्रेनसाहेब नसल्यामुळें एकएकदां सरळपणानें विचारण्यापलीकडे त्यांनीं कांहीं केलें नाहीं. " लागेल तपास—नाहीं तर आपण ५

चुकून कोणाला दिली असेल, " असें मनांत आणून त्यांनीं आपलें मन दुसरीकडे लाविलें. सीतारामास त्याच वेळीं "जा. कांहीं हरकत नाहीं. तें सांपडलें पत्र, परत आलं, तर ठीक. नाहीं तर मी पुनः लिहून पांठवीन, " असें आश्वासन दिलें आणि जाण्यास सांगितलें. जातां जातां ते एवढेंच ह्मणाले, " तुला शत्रु कोणी असतील असं मला नव्हतं वाटलं. पण सच्चे मुलगे असतात त्यांना कांहीं तरी शत्रु होतातच. कांहीं हरकत नाहीं. मी मास्तरला लिहितों आणि त्या पोराची चांगली........... " सीतारामास भय वाटत होतें तें हेंच. साहेबांनीं एकदां मास्तरला लिहिण्याचें मनांत आणलें, म्हणजे मग तें बरें होणार नाहीं. मुलांना क्षमा होणार नाहीं, आणि मला सांगण्याच्या आधीं, ' तूं साहेबाला कां जाऊन सांगितलंस, ' असा टपका मास्तर आपल्याला देतील अशी भीति त्यास वाटली. आपण मास्तरलाही जाऊन सांगणें हें आपलें काम होतें, तें आपण केलें नाहीं, याबद्दल ते आपल्याला रागें भरतील. शिवाय एकदां साहेबांची चिठ्ठी जाऊन पोंचली, कीं तें प्रकरण विकोपाला जाईल. तेव्हां, " मीच मास्तरला जाऊन सर्व हकीकत सांगतों, आपण चिठ्ठी लिहूं नये; आपल्या पत्रांत कदाचित् कांहीं ताबडतोब येऊन सांगण्याजोगं असेल, तेव्हां झाली गोष्ट आपल्याला आधीं सांगणं योग्य वाटल्यावरून मी आलों. मी मास्तरला सांगून तें पत्र काढतों. आपण लिहूं नये. आपण लिहिल्यानं मास्तर त्या मुलांना अतिशय कडक शिक्षा देतील. त्या मुलांना, तो उद्यांच्या आठवडेपरीक्षेचा कागद असावा असं वाटून त्यांनीं तो माझ्यापासून घेतला. तसं कांहीं नाहीं असं पाहतांच माझ्याकडे आणून देतील, नाहीं तर त्यांनीं तो मास्तरांकडे नेऊन दिलाही असेल." असें बोलून साहेबांनीं मास्तरांस लिहूं नये अशाबद्दल त्यानें विनंति केली, परंतु फेअरब्रेनसाहेबांस तें बरें वाटलें नाहीं. ते ह्मणाले, "अशा मुलांबद्दल हेडमास्तरांस पत्र लिहून कांहीं तरी केलंच पाहिजे. " सीतारामानें पुनः त्यांस विनंति केली कीं, " हेडमास्तरांपर्यंत गेल्यानंतर त्या मुलांचं फार नुकसान होईल. मास्तर त्यांना शाळेंतून घालवून सुद्धां देतील. मी मास्तरांना सांगतों, इतकं करून जर कांहीं नाहीं झालं तर मी येऊन सांगेन. पण आपण कांहीं लिहूं नये. " फेअरब्रेनसाहेबांनीं अंमळ विचार केला. आणि " बरं तर, तूं जाऊन सांग. तूं आपल्या मास्तराला सांग, जर कागद परत येऊन मुलांना योग्य शिक्षा झाली तर ठीकच, न झाली तर मग पाहूं काय होतं तें ! "

मोठीच गोष्ट झाली. साहेबांनीं एक वेळ जी गोष्ट करणार म्हणून म्हटलें ती गोष्ट फिरविली, ह्मणजे मोठीच गोष्ट खरी, सीतारामाचा जीव खालीं पडला. त्याला खरोखर असें वाटत होतें कीं, साहेबांनीं जर का हेडमास्तरला लिहिलें, तर आपण अशा बाबतींत कधींच गय करीत नाहीं, हें दाखविण्यासाठीं ते फारच कडक शिक्षा करतील. आणि तशी शिक्षा बसून त्या मुलांचें नुकसान होऊं नये, एवढ्याच हेतूनें त्यानें तरी साहेबांस विनंति करून मास्तरांस पत्र लिहिण्याचा त्यांचा हेतु बदलविला. मास्तराकडे जाऊन, झाली गोष्ट सांगण्याशिवाय आतां आपल्यास दुसरा मार्गच नाहीं, असें समजून त्यानें जेवण होतांच मास्तराकडे जाऊन झालेली इत्थंभूत हकीकत निवेदन करण्याचा बेत केला. परंतु अजून तेंही त्याच्या मनास

बरें वाटेना. त्याला वाटे कीं, मास्तरकडे जाऊन सांगण्याच्या आधीं त्या मुलांना भेटून त्यांच्याचकडून जर कागद मिळाला तर बरें, नाहीं तर मास्तराकडे जाणें आहेच. त्याचें मन अतोनात विचारांत पडलें. शेवटीं सर्व गोष्टींत त्याचें विश्वास-स्थान, त्याच्या मनाचा संशय घालवून सद्विचाराचा बोध करणारी देवता जी त्याची आई, तिला विचारून ती सांगेल त्याप्रमाणेंच करण्याचें त्यानें योजिलें. आईनेंही, " आधीं त्या मुलांना तूं भेटून त्यांना सर्व नीटपणें सांग, ह्मणजे आपसांत समजून जर तीं ताळ्यावर आलीं, तर इतका त्रास त्यांना व्हायचा नाहीं. आपल्याकडून बजाविल्यावरही जर त्यांना तें पत्र परत देणं बरं वाटलं नाहीं, तर जें काय करायला पाहिजे तें करूंच. " सीतारामाला वाटत होता तसाच आईचा सल्ला पडलेला पाहून त्यानें पुन: एकदां पंड्याची निदान रघ्याची, शेवटीं निदान भास्कराची तरी गांठ घेऊन त्यास निक्षून सांगून कागद मागावयाचा असा विचार ठरविला आणि त्याप्रमाणें तिसऱ्या प्रहरीं तो निघालाही.

* * * *

भास्करभाऊला आज किती आनंद झाला ह्मणतां ! दोन दिवसांत पन्नास पन्नास रुपयांच्या दोन नोटा हातीं पडल्या. बिचाऱ्यास रुपया आठ आण्याच्या वर कधीं एकदम पैसे हातीं आलेले ठाऊक नाहींत. आणि तेंही पैसे कोठे चुलतीच्या नकळत तिच्या फडताळांतून काढून घेतलेले किंवा चुलत्याच्या नकळत त्याच्या पेटींतून उपटलेले आणि आज आतां एकदम पन्नासपन्नासाच्या दोन नोटा ! या नोटांचें आपण करणार काय ? ज्याच्या त्याला परत देणार ? छे. त्याचा जीव लहान, तेव्हां असला थोर विचार त्याच्या मनांत क्षणभर सुद्धां टिकाव धरीना. मग पण आतां या नोटांचें करणार काय ? मोडणार कशा ? ठेवणार कोठें ? करणार काय ? कांहीं त्याला सुचेना. आनंद तर गगनांत मावेना. कांहीं तरी करून हे रुपये हातचे जाऊं देतां उपयोगी नाहीं, आणि एकदम शंभर रुपये आपल्या हातांत गुपचिप राहणें तर केवळ अशक्य वाटूं लागलें. नुसत्या त्या नोटा कोठें तरी ठेवाव्या. त्या काय म्हणून ? जर कांहीं त्यांतला खर्च करावयाचा नाहीं, जर आपल्याला पाहिजे तशी टोपी, पाहिजे तसे कपडे घेतां येणार नाहींत, तर रुपये आपल्याजवळ ठेवून उपयोग काय ? मग त्या जिकडच्या तिकडे दिल्या तर काय वाईट ? तें चांगलें. पण तसें नाहीं उपयोगी. कांहीं तरी खटपट लटपट करून आपल्याला त्याचा उपयोग घेतां आला पाहिजे. त्या नोटी पचविल्या पाहिजेत. चार दिवस कोठें तरी पुरून टाकल्या पाहिजेत. काय वाटेल तें झालें, तरी त्या बाहेर निघतां कामा नयेत. पण त्या पचाव्या कशा ? सीताराम मास्तरांकडे गाऱ्हाणें घेऊन गेलाच असेल. त्याबद्दल चौकशी होणारच. तें पत्र आपल्या हातून जाणारच. अर्थात् त्या पत्राबरोबर नोटही पण दिली पाहिजे. ती गेली तरी दुसरी ह्मणजे पचणार आहे असा थोडाच कांहीं संभव आहे ! काका घरीं येतांच त्याही नोटीचा तपास लावणार. सोडणार नाहींत. घरांत आपल्याखेरीज येथें कोणी आलें नाहीं, असें बाहेर येणार. आणि काका ते ! मग असे तसे नाहींत. ताबडतोब फोडून काढून कबूल करून घेतील. नोटी मिळाल्याकारणानें झालेला आनंद, आणि हे विचार मनांत येऊन

झालेली निराशा दोनीचा मोठा लढा पडून गेला. आपण वाटेल त्या युक्त्या करून घरांतल्या नोटीचा तपास लागेनासा करूं. काकांच्या नुसत्या माराला कांहीं दाद देणार नाहीं. मारतील मारतील, आणखी हात शिणून गेले तरी मी कांहीं कबूल होत नाहीं तेव्हां ' यानं खरोखरच घेतलेली नाहीं ' असें म्हणून स्वस्थ बसतील; नोट गेली म्हणतील आणखी चिंतोपंताच्या खर्चांत कोठें तरी लिहितील! दुसऱ्या नोटीचें कसें होणार ? ती नुसत्या मारानें आपल्याला पचावयाची नाहीं. ती आपल्यापासून ते काढणारच. अन् आपण तर ती काढूं देतां उपयोगी नाहीं. असे विचारावर विचार त्याच्या मनांत येत होते. शेवटीं त्याला एक मोठा खरपूस विचार सुचला. यंव्रे यंव् ! आपलें डोकें तें ! अगदीं बरोबर विचार. त्या विचाराला तोडच नाहीं. पंड्याजीला आपण मथवून आपल्या कटांत घ्यावा. तो व आपण होऊं एक. आणखी नोट दडवून टाकूं. रघ्याला देऊं तोंडवशी. त्यानें लखोटा फाडला, आणखी आपल्याजवळ आणून दिला. आणून दिला तेव्हां त्यांत नोट मुळींच नव्हती. आपण आधींच शंख करून उठूं. तो फुटलेला लखोटा घेऊन मास्तराकडे जाऊं. त्यांना तो देऊन 'हा रघ्यानं आमच्याजवळ आणून दिला म्हणून सांगूं. नाहीं, नाहीं ! रघ्याच्या जवळच देऊन तो मास्तराकडे नेऊन द्यायला सांगूं. तो फसण्याजोगा आहे. मास्तरची मर्जी संपादण्याला ही तुला चांगली युक्ति आहे, असं त्याच्या मनांत भरवून दिलं, कीं झालं ! मास्तरांच्या हातीं लखोटा देऊन त्यांनीं तो उघडून पाहिला. नोटीची गोष्ट बाहेर पडलीच, तर या रघ्यानं लांबवली असं दोघेहीजण म्हणून त्याच्या अंगावर घसरू. जों जों अधिकाअधिक विचार होत चालला तों तें भास्करभाऊंस तो अधिकाधिकच सुसंभाव्य अर्थात् पसंत वाटूं लागला. रघ्याच्या चिथावणीवरूनच मुळीं सीतारामाला आह्मीं अडवून त्याचा तो कागद हिसकून घेतला. तो परीक्षेचा पेपर नाहीं असें पाहतांच, आह्मी त्याला शिव्या देऊं लागलों. तर तो आपण नेऊन देतों म्हणूं लागलाच; परंतु तो कदाचित् खरोखर तसें करणार नाहीं असें वाटून आम्ही त्याच्याशीं तंडूं लागलों. शेवटीं मास्तरजवळ खचित् नेऊन देतों अशा शपथा आणा वाहूं लागला, तेव्हां त्याच्या हातीं कागद देण्याचें कबूल केलें असें म्हणून आपण आकांडतांडव करूं. असा पक्का विचार भास्करभाऊंनीं केला. या आपल्या करण्यांत, आपल्याला सिद्धि येणार याबद्दल मुळीं सुद्धां शंका घ्यावयाला नको. पंड्या मात्र आपल्याला मिळाला पाहिजे. असा विचार करून स्वारी आत्मसंतुष्ट तर झाली. बेत केल्याप्रमाणें प्रकार घडल्यास सर्व कांहीं ठीक होईल. आपल्यास नोटी पचतील, आणि पंड्याजी व आपण चार दोन महिने, नाटकांची, कपड्यालत्त्यांची अगदीं चैन उडवूं ! रुपये शंभर—शंभर—रुपये—शं—भ—र काय लहान रक्कम ! नुसतीं नाटकें पाहिलीं तरी किती महिने जातील ! नुसत्या भरजरीच्या टोप्या किती तरी मिळतील ! आणखी चिवडा आणला, तर तो किती दिवस तरी आणतां येईल ! पंड्याच्या "बालमैत्रसमाजा" ला फंड म्हणून तर नाहींना पण तो सगळा पैसा मागणार ? ओहो ! पण आपण घरांतल्या नोटीची वार्ता तरी त्याला कशाला लागूं देतों ? तें कांहीं नाहीं. आपण आपली या लखोट्यांतली

नोट तेवढी त्याला सांगून आपल्या वांट्याला येईल तेवढें लाटूं. त्याच्या वांट्याला जाईल त्याचें तो काय वाटेल तें करीना! पंड्याला मथविल्यावांचून ती नोट पचण्याचा संभवच नाहीं, म्हणून आपला त्याला घ्यावयाचा! असले अत्यंत वाईट, अत्यंत नीच, दुष्ट विचार वारंवार वारंवार मनांत घोळवून तो आपल्या मनास अधिकाधिकच वाईट करून टाकीत असतां त्याचें अगदीं तादात्म्य झालें. असल्या चोरट्या विचारांनीं त्याचें मन व्याप्त केल्याचा हा पहिलाच प्रसंग नव्हे; परंतु आज जितक्या रकमेबद्दल जितक्या जोरानें त्याच्या डोक्यांत विचार येत होते, तसे यापूर्वीं कधीं आले नव्हते. लहानपणच्या अपराधांत गणण्याजोगे जे क्षुल्लक अपराध असतात, त्यांत गणण्याजोगा आजचा हा जो अपराध करण्याचें त्याच्या मनांत वागूं लागलें होतें तो नव्हता. थोरपणींही अगदीं डांबिस म्हणून नाणावण्यापैकीं तो अपराध होता. थोरपणीं त्याच्या आयुःक्रमाची जी बनावट व्हावयाची, तिचा आज पक्का पायाच भरला जात होता ह्मटलें तरी चालेल. या वेळीं त्यास कोणी तरी शुद्धीवर आणण्यास पाहिजे होते. या वेळीं असें कांहीं तरी घडावयास पाहिजे होतें कीं, त्याच्यायोगानें त्याचे डोळे एकदम लक्कन उघडले असते. परंतु तसें कांहीं होण्याचा संभव दिसेना. वाईटपणाचा पाया रचला जातो तो असाच. वाईट विचार मनांत येतांच ते खुडून टाकण्यास कोणी तरी पाहिजे. रोपांस कीड लागते कीं काय असा संशय येतांच ती नाहींशी करून टाकण्याच्या मार्गास माळ्यानें लागलें पाहिजे. तें जर न झालें, तर रोप बिघडतें व मरतें. मनाची स्थिति तशीच आहे. त्याला कीड अगदीं लहानपणींच लागते आणि ती जर का वेळींच काढून टाकली नाहीं, तर मग झालें. तें मन सडतच चाललें; त्याजवर किडींचा बुजबुजाट झालाच म्हणून समजावें. जशी किडीची, तशीच दुर्विचारांचीही गोष्ट असते. एकदां कीड लागली म्हणजे जशी ती हजारों, लाखों प्रजा उत्पन्न करते, तशीच दुर्विचारांची गोष्ट आहे. एक दुर्विचार आला कीं तो अनंत दुर्विचारांस प्रसवतो आणि तो दुर्विचार आचाररूपांत आला ह्मणजे मग तर कांहीं विचारूंच नका. भास्करभाऊ जों जों अधिकाधिक विचार करूं लागला, तों तों त्याला त्याच्या त्या विचारांचें कौतुकच वाटूं लागलें आणि आपल्या विचारांप्रमाणें जर यथास्थित झालें, तर सर्व कांहीं जुळलेंच म्हणून समजावें अशी त्याची बुद्धि झाली. मग काय विचारतां? आतां पंड्याजींची व आपली भेट होते केव्हां आणि आपण आपल्या मनांत आलेल्या विचारांप्रमाणें वागतों केव्हां, असेंच काय तें त्यांस झालें होतें व त्याप्रमाणें पंड्याजीस कोठें गांठावें या विचारांत त्यांचें मन गढून गेलें; इतक्यांत त्यांच्या प्रिय मित्राची शीळ त्यांचे कानीं पडली. मग काय विचारतां? त्यास जाऊन भेटण्याची व झाली हकीकत सांगण्याची अगदीं एकच गर्दी उडून गेली. लागलीच स्वारी खालीं उतरली आणि पंड्याजीच्या हातांत हात घालून म्हणतात, "ओहो, मनोमय साक्ष असते म्हणतात तें अगदीं खोटें नाहीं बोआ. मी आतां एकसारखं तुझंच चिंतन करीत होतों. आणखी तूं कुठें भेटशील या विचारांत पडलों होतों तों तुझी ही मूर्ति हजर. खरंच पंड्या, तुझा आणखी माझा स्नेह जर असाच कायम राहिला, तर आपण काय काय तरी गोष्टी करूं, आणखी

तितक्या गोष्टींत चांगलीच सिद्धि मिळवूं पहा. आतां मला सोडूं नको ह्मणजे झालं. मी तर तुला कधीं सोडणार नाहीं. तुझ्यावर माझा असा कांहीं विश्वास बसला आहे, आणखी तुझ्याबद्दल मला असें कांहीं वाटायला लागलं आहे कीं, तुझ्या व माझ्या हातून कांहींतरी या जगांत होणार आहे. तुझ्यावांचून माझं आणखी माझ्यावांचून तुझं कधीं चालायचं नाहीं. ''

परंतु आतां या पाजी भास्कराचीं सगळीं लाडीगोडीचीं भाषणें या ठिकाणीं नमूद करीत नाहीं. त्यानें आपला हेतु सांगण्यापूर्वी काय काय हिकमतीचीं भाषणें केलीं, पंड्यास कसा चढविला, रघ्याच्या पाजीपणाबद्दल खोट्या नाट्या गोष्टी सांगून त्याचें मन कसें दूषित केलें, पंड्याच्या पश्चात् रघ्या आपल्याकडे येऊन काल शिंत्यापासून घेतलेला लखोटा मिळण्यासाठीं काय काय बहाणे करीत होता, इत्यादि इत्यादि गोष्टी त्यानें पंड्याच्या मनांत कशा रीतीनें भरवून दिल्या आणि एकंदरींत रघ्याच्या विरुद्ध कारस्थान करण्याची बुद्धि त्याच्या मनांत उभी करण्यास काय काय प्रयत्न केले, त्यांचें वर्णन करणें इष्ट व योग्य वाटत नाहीं. एवढें पक्कें समजावें, कीं त्यास पूर्णपणें त्या गोष्टींत यश आलें. रघ्याजीस तोंडघशीं देण्याची इच्छा पंड्यास उत्तम प्रकारें मानवली आणि नोटीचा अर्धा हिस्सा हातीं लागणार असल्यामुळें तर फारच उत्तम वाटलें. या दोघांची जरी अशी तयारी झाली, तरी पण सर्वच गोष्टी प्रत्येकाच्या इच्छेप्रमाणें थोड्याच होत असतात ! अशा कांहीं विलक्षण गोष्टी घडल्या, कीं शेवटपर्यंत व्यूह बरोबर बसला नाहीं. पंड्याजी न भेटल्यामुळें सीतारामास शेवटीं मास्तरांस सर्व हकीकत सांगावी लागली आणि पंड्या व भास्कर यांच्या फसवेपणानें फसलेला रघ्या जाऊन सगळी हकीकत सांगणार तों मास्तरांनींच त्याचें कानशील झणझणवून त्याचेकडून सर्व हकीकत काढून घेतली. मार खाऊन लोकांचे हात शिणवूं, पण कबूल होणार नाहीं असें वाटणारे भास्करभाऊ प्रत्यक्ष मार खाण्याचा प्रसंग येतांच डगमगले. आणि मास्तरांनीं नोट मागतांच त्यांनीं शाळेच्या शिपायाबरोबर घरीं जाऊन पन्नासाची एक नोट पाठवून दिली.

परंतु...पण ' परंतु ' काथतें एव्हांच नाहीं.

# प्रकरण २१ वें.

## हेंच तें कारण !

मनुष्याचें मन एक वेळ संशयित झालें ह्मणजे त्यास राहून राहून तो संशय आपलें अस्तित्व प्रकट करण्यासाठीं जागृत करीत असतो. मग त्यास कितीही दूर करण्याविषयीं खटपट करा. त्यांतून तो संशय आपलें सत्याधारत्व प्रकट करण्याविषयीं प्रयत्न करीत असला ह्मणजे तर कांहीं विचारूंच नका. ज्या गोष्टी सहसा कधींही आठवावयाच्या नाहींत त्या गोष्टी आठवूं लागतात. ज्या गोष्टी घडल्या त्या वेळीं मुळींसुद्धां त्यांचें महत्व मनांत येत नाहीं, त्याच गोष्टींचें असतें नसतें महत्त्व अशा प्रसंगीं मनांत येऊं लागतें. ज्या गोष्टींचा कार्यकारणभाव असेल असें पूर्वीं केव्हांही वाटलें नसेल, त्या गोष्टींचा कार्यकारणभाव नजरेला येऊं लागतो; आलेला संशय आपल्या विश्वासस्थानाच्या विरुद्ध असल्यास तो निराधार आहे असें दुसरें मन सिद्ध करीत असतें. परंतु संशय मोठा द्वाड. तो नसते आधार पुढें करितो. याचा अनुभव आजपर्यंत अनेकवार प्रत्येकास आलाच असेल. फेअरब्रेनसाहेबांचा सीतारामावर आजपर्यंत इतका विश्वास होता कीं, त्याच्याबद्दल कधीं आपल्या मनांत कशाही प्रकारचा अनिष्ट संशय कोणत्याही बाबतींत येईल असें चार दिवसांपूर्वीं कोणी त्यांजवळ बोललें असतें तर त्यास त्यांनीं तिरस्कारिलें असतें. परंतु पन्नास रुपयांची नोट गेलेवेळेपासून त्यांचे मनाविरुद्ध—ते दूर सारीत असतांही—संशय आला. त्या संशयास अणुरेणुभरही वाजवी कारण नसतां तो उपस्थित झाला. आणि प्रारंभींच सांगितल्याप्रमाणें आपलें साधारत्व किंबहुना सत्याधारत्व साहेबांच्या प्रत्ययास आणून देण्यासाठीं खटपट करीत होता. प्रथमतः या संशयाचा उगम झाला तो अगदीं सहजीं, कांहीं कारण नसतां झाला. परंतु जों जों त्यास त्यांनीं दूर सारण्याचा प्रयत्न चालविला, तों तों तो आपलें अस्तित्व साधार आहे असें दाखवूं लागला. साहेबांनीं नोट जावी कशी याबद्दल अनेक प्रकारें चौकशी केली. त्या चौकशींत कांहींसुद्धां निष्पन्न झालें नाहीं. शिपायाचा संशय घेण्यास जागा नव्हती. शिपाई पाकिट ठेवून लागलीच चालता झाल्याचें त्यानेंही सांगितलें, साहेबांस स्वतःही वाटलें; आणि सीतारामास विचारतां त्याच्याही बोलण्यांत तसेंच आलें. तेव्हां शिपाई तर संशयांतून सुटला. क्लबांतील दुसऱ्या नोकरानें येऊन डल्ला मारला, असें ह्मणावें तर आपण सकाळपर्यंत खोलीच्या बाहेर पडलों नाहीं. एक वेळां पुनः सीतारामाविषयीं त्यांच्या मनांत आलें परंतु पुनः असें मनांत येणें ह्मणजे त्या पोरास अगदीं अन्याय करणें होय असेंही मनांत आलें. त्या वेळीं तो

संशय अजीबाद् गेला आणि दुसरे दिवशीं सीतारामानें येऊन सरळपणानें काय झालें तें सांगितल्यानंतर तर त्यास अजीबाद्च फांटा बसला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. परंतु सीताराम गेल्यानंतर कांहीं वेळानें त्याच संबंधांत विचार करीत असतां, त्या संबंधांत विचार करावयाचा नाहीं असें म्हणून तो दूर सारला असतांही पुनः मनास त्रास देऊं लागला. शिपाई नाहीं. क्लबांतला माणूस नाहीं. सीताराम नाहीं. तर कोणाच्या हातून ही गोष्ट झाली ? कोणाच्या तरी हातून झाली यांत तर शंका नाहीं. आपण पत्र वाचीत असतां आपलें लक्ष्य त्या पत्रांत गढून गेलें होतें. पण सीताराम बराच वेळ आंत टेबलाजवळ होता; आणि जातांना आपल्यास न विचारतां गेला. असा तो कां गेला ? छेः पण त्यानें विचारलें असेल आणि आपलें लक्ष्य तिकडे नसल्यामुळें तें आपल्यास समजलें नाहीं. पण टेबलावर पुढेंच ठेवलेलें पत्र उचलून घेण्यास त्यास इतका उशीर कां बरें लागला ? इतका उशीर लागण्याचें खरोखर कांहीं कारण नव्हतें; आणि आपण पत्र वाचण्यांत कितीही गढून गेलों असलों, तरी त्यानें जातांना विचारलें असतें तर केवळ लक्ष्यांत आलें नसतें असें नाहीं. त्यानें विचारलेंच नसावें असें वाटतें. विचारलें असतें तर आपल्या लक्ष्यांत खचित आलें असतें. झालें. संशयाची चिरेबंदी होण्यास सुरुवात झाली. न करावें तें कृत्य केल्यावर विचारून जाणें शक्यच नाहीं. साहजिकपणेंच त्याची त्यास लज्जा वाटली असावी, नाहीं तर तो खास विचारता. संशयानें आतां आधार धरिला. साहेब वारंवार तो आधार खोटा आहे, तो आधारच नव्हे, असें मनास सांगूं लागले, तरी त्यानें दशमुखी रावणाच्या छिन्न केलेल्या तोंडांप्रमाणें वारंवार पुनः जीवन धारण केलें. होतां होतां त्या संशयाच्या वारंवार उत्थानामुळें फेअरब्रेनसाहेबांस आपण अपात्रीं विश्वास ठेविला नाहींना, असें वाटूं लागलें. "अपात्रीं विश्वास ठेविला असेल काय ?" असें मनांत येतांच त्यांस खरोखर वाईट वाटलें पण सर्व बाह्य कारणें जरी तसें करण्यास पुष्टीकरणच देऊं लागलीं, तथापि पूर्णपणें शोध करून काय तो पक्का तलास लागेपर्यंत आपल्या संशयास कोणत्याही तऱ्हेचें प्राबल्य येऊं द्यावयाचें नाहीं, असा त्यांनीं आपल्याकडून विचार केला. येथपर्यंतही तरी आपल्या संशयास त्यांनीं प्रबल होऊं दिलें नाहीं, याबद्दल वाचकांस मोठें आश्चर्य वाटत असेल. परंतु फेअरब्रेनसाहेब किती केलें तरी आपल्या इतरांप्रमाणेंच मनुष्य होते ही गोष्ट लक्ष्यांत धरिली ह्मणजे त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींही नाहीं. फेअरब्रेनसाहेबांच्या जागीं त्यांचे स्नेही वाईल्डसाहेब असते, तर त्यांनीं एव्हांना काय केलें असतें याची कल्पना ज्यांस साहेब लोकांचा किंचित् मात्र तरी अनुभव असेल अशासच करतां येणार आहे. फेअरब्रेनसाहेब किती तरी विचारी होते. त्यांनीं अद्यापि आपल्या विचारास मागें सारलें नव्हतें. नेटिवांसंबंधीं त्यांचे विचार जर वाईल्डप्रभृति मंडळीसारखे असते, तर एक तर सीतारामाचा व त्यांचा इतका ऋणानुबंध झाला नसता आणि यदाकदाचित् यदृच्छेनें तो झाला असता, तरी एव्हांना त्यांनीं या संबंधांत तडकाफडकी कांहीं तरी निकाल उडवून टाकिला असता. असो. फेअरब्रेनसाहेब आपल्या मनांतील संशयास दाबीत दाबीत व "पाहूं या बरं पुढें काय निष्पन्न होतं तें !" असें ह्मणत इतर कामास लागले. फेअरब्रेन-

साहेबांचें पत्र हातीं पडल्यावर तें वाचून सीतारामास अर्थातच फार आनंद झाला. त्या पत्रांत सीतारामास फारच चांगला उपदेश केला असून त्याची व त्याच्या आईची अनेक प्रकारांनीं स्तुति केलेली होती व त्यास लवकर लवकर आणि चांगल्या प्रकारानें शिकण्याविषयीं उत्तेजनपरही लिहिलें होतें. इंग्रज गृहस्थाच्या दृष्टीनें उत्तम मुलगा म्हणजे कसा असतो आणि त्याच्या अंगीं कोणकोणते गुण असतात, तें उत्तम प्रकारानें त्यांत वर्णन करून सांगितलें असून "तुझ्या अंगीं त्यांतले बहुतेक गुण आहेत, जे कित्येक नाहींत ते अंगीं आणण्याविषयीं खटपट कर" असेंही लिहिलें होतें. एकंदरींत तें पत्र वाचून सीतारामाला फार आनंद वाटला आणि तें त्यानें विश्वनाथपंताला नेऊन दाखविलें. शेवटीं त्या पत्रांत एक ताजा-कलम घातलें असून त्यांत "तुला एक पन्नास रुपयांची नोट नजर म्हणून देत आहें तिचा स्वीकार कर व तुला अवश्यक अशा कांहीं जिनसा व पुस्तकें विकत घे," असें सांगितलें होतें. पत्र अशा तऱ्हेनें लिहिलें होतें कीं, तें वाचून कोणाही मुलास फार आनंद झाला असता. सीतारामास तर फारच झाला. परंतु आपण ही पन्नास रुपयांची नोट स्वीकारावी कीं परत करावी, याबद्दल त्याचे मनांत अनेक विचार येऊं लागले. एकवार त्यास वाटे आपली दीन-दशा आहे असें समजून त्यांनीं आपणास धर्म करावयाचा अशा बुद्धीनें तर पाठवून दिली नसेलना ! अशा तऱ्हेनें धर्म म्हणून घेणें त्याच्या मनास बरें वाटेना. परंतु दुसऱ्या पक्षीं मनांत असें येऊं लागलें कीं, आपण नाकारल्यानें कदाचित् त्यांस वाईट वाटेल. न जाणों रागही येईल. लहानसान रक्कम असती तर गोष्ट निराळी. परंतु एवढी थोरली रक्कम विनाकारण आपण स्वीकारावी हें बरें नव्हे. आपल्या भावाचा त्यांचे हातून अंत झाला त्याजबद्दल कांहीं तरी आपणास पोंचवावें या हेतूनें तर ही नोट त्यांनीं आपणास पाठविली नसेलना ! हा विचार मनांत आला तेव्हां तर त्यास ती नोट खास घेऊं नये असेंच वाटलें. परंतु कोणतीही गोष्ट आईला विचारल्याखेरीज करणें त्यास ठाऊक नव्हतें. त्यानें सरळ-पणानें त्या पत्रांतील मजकूर आईला सांगून पन्नास रुपयांच्या नोटीबद्दल तिचा विचार त्यानें विचारला; व आपल्या मनांत जे जे कांहीं विचार आले तेही त्यानें तिला सांगून दिले. आपण हे रुपये घेणें रास्त नव्हे. निदान आपण आग्रह करून ते परत घेत असें तरी करावें. मग त्यांनीं नच घेतल्यास पाहतां येईल. ठरलें. पत्र परत आल्याची व नोटीची हकीकत समक्ष जाऊन सांगावी आणि नोट न घेण्याविषयींची आपली इच्छा स्पष्टपणें दर्शवावी, असें ठरलें. आणि सीताराम साहेबांकडे गेला. सीताराम येतांच साहेबांनीं त्याचें नेहमींप्रमाणें स्वागत केलें. परंतु आपल्या संशयास दृढीकरण मिळण्यास त्याच्या चर्येवरून कांहीं आधार मिळतो कीं काय हें पाहाण्यासाठीं त्यांनीं आपले तीक्ष्ण नेत्र त्याच्या चर्येवर एक-सारखे लाविले होते. सीताराम या वेळीं जें काय बोलावयाचें मनांत धरून आला होता तें अशा तऱ्हेचें होतें कीं, साहजिकच त्याची चर्या थोडीबहुत विलक्षण झाली होती अद्यापि बोलूं कीं नको, आपण बोललों तर यांस काय वाटेल, असें मनांत येऊन त्या मनांतील विचारांची त्याचे चर्येवर छायाही दिसत होती. परंतु फेअरब्रेन-साहेबांचें मन अधिकच संशयपूर्ण होण्यास तेवढें कारण पुरें झालें. त्यांस असें वाटलें,

कीं आपणास झाल्या गोष्टीचा संशय येऊं नये म्हणून तर हा इतक्यांत वारंवार आला नसेलना ? तथापि पुढें काय होतें हें पाहावें असा विचार करून त्यांनीं त्यास 'ये बस' म्हटलें. किती वेळ झाला. सीतारामाच्यानें लौकर बोलवेचना. तो त्या ठिकाणीं येईपर्यंत आपले मनाशीं काय काय बोलावयाचें तें अगदीं पूर्णपणें ठरवीत आला. परंतु येथें आल्यानंतर त्यास त्या पत्राचा व नोटीचा उल्लेख करून कसें बोलावें हें मुळींच सुचेना. बिचारा खालीं मान घातल्याप्रमाणें होऊन आतां बोलूं नये, मग बोलूं, असें करीत स्वस्थ बसला. साहेबही तो काय बोलतो तें ऐकून मग आपण त्याप्रमाणें बोलावयाचें असा विचार करून स्वस्थ बसले होते. बराच वेळ झाला तो कांहीं बोलेना. तेव्हां त्यांस जास्तच संशयाला कारण झालें. शेवटीं त्याच्याच्यानें तर लवकर बोलवेचना. साहेबांचा संशय दृढ झाला व ते लागलीच म्हणतात, " तूं गप्प कां बसलास ? काय सांगणार आहेस तें सांगून दे. मला सगळं कांहीं लक्ष्यांत येऊन चुकलं आहे. असं कांहीं तुझ्या हातून होईल हें मला बिलकुल वाटलं नव्हतं. सांग आतां काय सांगायला आला आहेस तें ! " हें बोलणें ऐकतांच सीतारामास एकदम चमत्कारिक वाटलें. आणि तो कावराबावरा होऊन साहेबांस ह्मणतो, " मी त्या नोटीविषयीं आणखी पत्राविषयीं सांगायला आलों आहे. "

" हो हो " साहेब जरा कठोरपणानें म्हणाले; मीं ताडलंच तें; काय सांगायचं आहे तें समजलों मी. टाक सांगून एकदां. "

साहेब अशा कठोरपणानें बोलतात कां ? सीतारामास कांहींच अजमास लागेना. तेव्हां त्यानें सहज म्हटलें: तें पत्र आणखी नोट सांपडली. "

" हं ? कशी सांपडली ? आमच्या त्या पाकिटांत ? आमची नजर नसतांना ? ",

पुनः बिचारा सीताराम बुचकळ्यांत पडला. आणि साहेब हें बोलताहेत तरी काय कांहीं सुद्धां त्या बिचाऱ्यास समजेना. जों जों तो साहेबांकडे पाहूं लागला, तों तों त्यांची चर्या अधिकाधिकच कठोर भासूं लागली, आणि कांहीं तरी कारणानें स्वारी आपल्यावर रागावली आहे खचित् असें त्यास कळून आलें. परंतु रागावण्याचें कारण काय असावें याचा त्यास अदमास लागेना. आपल्या हातून कोणत्याही प्रकारचा अपराध झाला असेल अशी त्याची तर मनोदेवता त्यास सांगेना, आणि ज्याअर्थीं आपल्या हातून कांहीं झालें नाहीं, त्याअर्थीं कांहीं निराळेंच कारण घडलें असलें पाहिजे हें उघड होतें. पण तें कारण आपल्यास कसें कळणार ? आपण ज्या पत्राविषयीं व नोटीविषयीं बोलत आहों, त्याच्या व्यतिरिक्त कांहीं तरी विषयासंबंधानें साहेब बोलत असावे, असें त्यास पक्कें वाटलें. कारण शेवटलें त्यांचें बोलणें अगदीं स्पष्ट होतें. सरतेशेवटीं त्यास राहावेना. तो एकदम त्यांस म्हणाला, " साहेब, तुम्ही काय म्हणतां हें मला कळत नाहीं. भास्करभाऊनं आणखी त्यांच्या सोबत्यांनीं आपलं पत्र माझ्या हातून हिसकावून घेतलं, तें पत्र मला परत मिळालं. त्यांत एक नोट होती तीही पण......... "

परंतु तितक्यांत साहेब त्यास म्हणतात, " बरं ती नोट मिळाली, पण दुसरीही एक मिळाली ती ? "

फेअरब्रेनसाहेब थट्टा करताहेत कीं गंभीरपणानें बोलताहेत, त्याच्या कांहीं

लक्ष्यांत येईना. थट्टा करीत आहेत म्हणावें, तर त्यांच्या चेहऱ्यावर हास्याची कळा मुळींसुद्धां दिसेना. तेव्हां कांहीं तरी विचित्र किंतु मनांत येऊन स्वारी बोलते आहे कीं काय ?

साहेबही मुद्दामच तसें बोलून कठोर व तीक्ष्ण दृष्टीनें त्याच्याकडे पहात होते कीं, बरें आपल्या या अशा बोलण्याचा त्याच्या मनावर काय परिणाम घडतो व तो त्याच्या चेहऱ्यावर कितपत दिसतो, परंतु एवढी वेळ तसा कांहीं फरक दिसला नाहीं. तो भांबावला मात्र. पण ती भांबावल्याची स्थिति मघांपासून बराच वेळ होती.

तितक्यांत तो त्यांस म्हणतो, "साहेब, आपण मला असं पत्र लिहून उत्तेजन देतां आहां, याबद्दल मी तुमचा आभारी आहे, पण ही नोट घेण्या इतकी आमची स्थिति नाहीं आली. तेवढी परत...... आपली कृपादृष्टि मजवर असली म्हणजे केव्हां तरी मागण्याचा प्रसंग येणारच. पण आतांच अशी मोठी रक्कम घेतां आईला आणखी मलाही पण बरं वाटत नाहीं."

साहेब थोडेसे चकित झाले. काय ? तो आपण दिलेलीच नोट परत देतो आहे ? याचा अर्थ काय ? अशी नोट जो परत देतो आहे, तो दुसरी चोरून कशाला घेईल ? असा विचार एकदम मनांत येऊन त्यांच्या मनांतील संशयानें एकदम कचर खाल्ली. पण न जाणों, कदाचित् यांत कांहीं लबाडी असेल. नाहीं कशावरून ? ती दुसरी नोट उपटली ती लाभलीचं, त्यांत आतां ही दुसरी आली, तेव्हां आपण एक परत केल्यानें भलेपणाचा भलेपणा राखला जाऊन काम होणार आहे. साहेबांच्या मनास संशयानें पुरें ग्रासलें होतें. त्यांत आतां असे विचार मनांत येऊन त्यांचें चित्त अधिकच विलक्षण झालें. संशयाचें बीं ह्मणजे असें विलक्षण असतें कीं, अगदीं खडकाळ रखरखीत प्रदेशावर पडलें असलें, तरी सुद्धां रुजून असंख्य रोपें बनावयाचीं. तशीच गोष्ट सध्या झाली. तेव्हां साहेब ह्मणतात, "मग काय ? ती नोट परत करणार ? आणि मी परत घेऊं ह्मणतोस ? तुमच्या मर्जीची गोष्ट आहे. पण मीं ती अगदीं मनोभावानं तुह्मांला दिली होती. माझं तुझ्याबद्दल फार फार चांगलं मत होतें."

'होतं' हा शब्द ऐकण्याबरोबर सीतारामास फारच चमत्कारिक वाटलें. आतांपर्यंत त्याच्या मनाला जो संशय वाटत होता, तो दूर झाला आणि त्यास फार वाईट वाटलें आणि तो एकदम उठून ह्मणाला, "होतं असं कां ह्मणतां ?"

"तुझ्या तूंच मनाला विचार. माझ्याच तोंडून ऐकायला पाहिजे असल्यास थोडा अवकाश आहे."

"अवकाश कां ? माझ्या हातून कांहीं अपराध झाला असल्यास मी क्षमा मागतों. मला तो अपराध कळवावा. आपल्या मनांत माझ्याविषयीं वाईट ग्रह झाला असल्यावर ही नोट मीं ठेवणं तर मुळींच बरोबर नाहीं. ही घ्यावी."

त्यानें ती नोट साहेबांच्यापुढें ठेविली.

नोटीकडे साहेबांचें लक्ष्य गेलें आणि तेही एकदम कठोरपणानें उठून म्हणतातः "हेंच, हेंच तें कारण !"

---

# प्रकरण ३० वें.

## मग काय करणार ?

वज्राघात ज्या माणसावर होतो, त्या माणसाची स्थिति केवळ कल्पनेनेंच जाणावी लागते. ती वर्णन करणारासही बरोबर वर्णन करून सांगतां येणें शक्य नाहीं; आणि जो तें वर्णन वाचील, त्यासही त्या वर्णनावरून ती बरोबर जाणतां येणें शक्य नाहीं. परंतु प्रत्येक कल्पनाशाली व्यक्तीस ती बरोबर जाणतां येते. फेअरब्रेनसाहेबांचें बोलणें, त्यांच्या तोंडून निघालेलीं तीं " हेंच तें कारण ! " अशीं अक्षरें कानीं पडतांच बिचाऱ्या सीताःरामाची तशीच अवस्था झाली. त्यांचीं तीं अक्षरें, त्यांचा तो कठोर दृष्टिपात, त्यांचें तें एकदम उठणें, त्यांचं तें नोटीच्या नंबराकडे केलेलें बोट, हीं सर्व एकदम एखाद्या वज्रघाताप्रमाणें त्या गरीब पोराच्या कानावर व दृष्टीवर पडलीं. साहेबांच्या बोलण्याचा अर्थ तरी काय ? आपल्याविषयीं जो त्याचा सुग्रह होता तो वर्तमानकाळांतून भूतकाळांत जाण्यास ' हेंच तें कारण ! ' ह्मणजे काय? आपण त्यांची नोट परत करतों हें ? त्यांनीं दिलेली नोट आपण परत करतों हें त्यांच्या सुग्रहनिरासास कारण व्हावें ? आपण फार उद्धट आहों, आपण फाजील अभिमानी आहों, असा त्यांचा समज झाला ? असें तर होऊं नये. कां व्हावें ? आपण त्यांच्यापासून त्यांनीं दिलेली देणगी घेत नाहीं ह्याबद्दल त्यांचें आपल्याविषयींचें वाईट मत जावें, आणि तें त्यांनीं इतक्या कठोरपणानें जाणवावें ? याचा अर्थ काय ? हें सर्व त्या बिचाऱ्या पोरास केवळ जबरदस्त गूढ पडलें. आजपर्यंत त्यानें कोणापासूनही अशी वागणूक मिळविली नव्हती. आजपर्यंत कोणी अशी वागणूक देण्याजोगें वर्तन आपल्या हातून झालें आहे असें त्यास वाटत नव्हतें. आणि आज ज्याच्या स्नेहामुळें आपणास पुष्कळ गोष्टी करतां येतील अशी त्यास आशा उत्पन्न झाली होती, त्याच गृहस्थाकडून आपल्यास अशा तऱ्हेचा दोष देण्यांत येत आहे, तोच गृहस्थ आपणाशीं फार कठोरपणानें बोलत आहे, असें पाहून त्यास फार फार चमत्कारिक वाटेल यांत नवल काय ? त्याला तो एकंदर प्रकार एखाद्या विचित्र गूढाप्रमाणें भासला. तो मुलगा फार पापभीरु होता. आणि कोणाचाही—मग फेअरब्रेनसारख्या सच्छील व थोर गृहस्थाचा तर विशेष—अविश्वास आपल्या ठिकाणीं झाला असें दिसतांच त्यास फार वाईट वाटलें, यांत नवल काय ? आपल्या हातून तो कधींही कोणाचें मन दुखावेल असलें कृत्य करीत नसे. आणि तशांत असें कांहीं झालें तर त्याचें मन फार फार अस्वस्थ होई, आणि तो भांबावून जाई. सध्याच्या

विचित्र प्रसंगीं तसाच प्रकार झाला, आणि तो एकदम गांगरून जाऊन थरथर कांपूं लागला. आतां याबेळीं साहेबांस काय उत्तर यावें त्यास कांहींही समजेना. फेअरब्रेनसाहेबांच्या नजरेस, त्याचे ते थरथरणारे ओंठ, त्याचें तें घाबरलेलें मुख व आसवांनीं अगदीं भरून आलेले डोळे पडतांच त्यांस आपला संशय अगदीं खरा असें पक्कें वाटलें, आणि ते एकदम त्यास आणखी ह्मणतात, "इतका तूं बिलंद असशील असं मला वाटलं नव्हतं. तुझ्या चेहऱ्यावरून आणखी आजपर्यंतच्या तुझ्या बोलण्याचालण्यावरून झालेला ग्रह अगदीं खोटा असावा असं अजूनसुद्धां मला वाटत नाहीं. पण आज हें प्रत्यक्ष प्रमाण दिसून आलं. आतां उपाय नाहीं. तूं आपल्या आईच्या नांवाला काळोखी आणण्याजोगं काम केलंस याबद्दल पश्चात्ताप वाटूं दे. माझ्याजवळ जरी कबूल केलं नाहींस केलेलं कृत्य, तरी आपल्या त्या भल्या आईजवळ कबूल कर, आणखी पुनः असं कधींही करणार नाहीं असा देवाजवळ निश्चय कर. जा. तुला देव पुनः झाल्या गोष्टीबद्दल खरा पश्चात्ताप झाला तर क्षमा करील. मीही करतों. पण पुनः असा प्रकार तुझ्या हातून होऊं नये इतकंच. तूं जर माझ्याजवळ मागतास, तर मी मोठ्या आनंदानं दिलं असतं. तुला ठाऊक नाहीं, नोट नाहींशी झाल्याचं माझ्या ध्यानांत आल्या वेळेपासून काय असेल तें असो, माझ्या मनांत नसता नसता तुझ्याबद्दलचा संशय आला. हा काय वेड्यासारखा संशय घेतों, ह्मणून मी कितीकदां तो संशय दूर लोटला, तरी पण तो पुनः माझ्या मनांत घुसेच. शेवटपर्यंत मला अशी आशा होती, कीं तो कसा तरी खोटा ठरेल. पण तो अगदीं खरा ठरला. असो. इलाज नाहीं. जा. आतां तुझा आणि माझा ऋणानुबंध संपला. तुझ्या आईला मात्र मी कधीं विसरणार नाहीं. जी नोट माझ्या पत्रांत होती, ती आतां घरीं गेल्याबरोबर—तिच्याजवळ दे, आणखी दोनही हातांनीं तोंड झांकून मान खालीं घालून डोळ्यांतून पाणी गाळून पश्चात्ताप कर. तिला झालं आहे, तेवढं दुःख पुष्कळ झालं. आणखी उगीच कुपुत्रापासून होणारं दुःख तरी तिच्यावर लादूं नकोस. जा, बाबा. जों जों तुझ्या या चेहऱ्याकडे पाहावं तों तों किती आपण फसलों असं वाटतं. आणि अशा मोहक चेहऱ्याच्या मागं असलं पापी अंतःकरण असावं काय, असं मनांत येऊन वाईट वाटतं. जा. देव तुला सद्बुद्धि देवो !" इतकें बोलून साहेब एकदम तेथून उठून गेले. फेअरब्रेनसाहेबानें त्याच्या दोन तोंडांत मारून जर त्यास शासन केलें असतें, तरी सुद्धां सीतारामास इतकें वाईट वाटलें नसतें; परंतु त्यांच्या या प्रेमळ परंतु अत्यंत खेदपूर्ण अशा भाषणानें त्यास फार वाईट वाटलें. आपण काय अपराध केला आणि काय नाहीं याचें ज्ञान मुळींच न होतां, आपली ज्याच्यावर फार भक्ति असें माणूस आपल्यावर रागावलें असतां, अगदीं निरपराधी मनाची स्थिति काय होते याची कल्पना ज्यास तसा अनुभव असेल, त्यासच करतां येणार आहे, इतरांस कोठून येणार ! सीतारामाचें सर्व शरीर जड झालें. पावलें तर कांहीं केल्या तेथून निघेनात. तेथून शांतपणें निघून जाणाऱ्या फेअरब्रेनसाहेबांच्या पाठीकडे त्याची नजर लागली होती. आणि त्यांस परत बोला-

वून " हें आहे तरी काय ? तुम्ही ह्मणतां तरी काय ? दुसरी नोट कुठली ? " असे प्रश्न विचारावे असें त्यांच्या मनांत किती वेळां आलें. परंतु शरीराप्रमाणेंच त्याची जीभही जड झाली होती. ज्याप्रमाणें शरीर बाहेर जाण्यास हलेना, पाय उचलेनात, त्याचप्रमाणें जीभ अगदीं टाळ्यास अडकून बसली होती. ती कांहीं केल्या सुटेना आणि शब्द उच्चारवेना. फेअरब्रेनसाहेब तर अगदीं कठोर बनले. त्यांच्या मनांत त्याच्याशीं कठोरपणानेंच बोलावें असें आलें! परंतु तें त्यास बरें वाटेना. आपण आणखी कांहीं वेळ असेंच येथें बसलों, तर कठोरपणानें बोलूं—न जाणों—असें वाटूनच ते तेथून निघून गेले. कदाचित् असेंही असेल, कीं त्याच्याशीं कठोरपणानें बोलूं नये, प्रेमानेंच बोलावें, असें मनांत आलें असेल, परंतु या वेळीं कठोरपणाच हितावह, प्रेम उपयोगी नाहीं असें वाटून ते तेथून गेले असतील. कसेंही असो. ते गेले आणि सीतारामासही आपलें शरीर तेथून हलवावें लागलें.

* * * *

वर सांगितल्या गोष्टीस दोन तीन दिवस झाले. फेअरब्रेन यांचे स्नेही मि० वाइल्ड यांचे घरीं एक लहानशी डिनर पार्टी (मेजवानी) होती. सुमारें पांच सहा पाहुणे आणि घरचीं दोन—मिया आणि बिबी—मास्तर आणि मिसेस वाइल्ड अशी मंडळी होती. पाहुणे मंडळींत आपले फेअरब्रेनसाहेब होते, हें सांगणें नकोच. परंतु सिस्टर च्यारिटी होती हें सांगणें अवश्य आहे. वाइल्डसाहेबांची पत्नी आणि सिस्टर च्यारिटी या दोघी लहानपणच्या मैत्रिणी, यामुळें तिनें सिस्टर च्यारिटीस विश्रांति मिळावी म्हणून मुद्दाम चार दिवस आपले घरीं राहण्यास बोलविलें होतें आणि फारच आग्रह झाला असल्यामुळें व आपल्या मैत्रिणीचा शब्द मोडावयाचा नाहीं म्हणून ती आली. त्याचप्रमाणें वाइल्डसाहेबांचे एक स्नेही मि० ब्ल्याक्मेल स्कॅपँ नांवाचे उत्तर?—हिंदुस्थानांतून कांहीं दिवस दक्षिणेंतील प्रवास करण्यासाठीं आले होते, त्यांच्या सन्मानार्थ आज ही मेजवानी होती. वाइल्डसाहेबांचे आणखीही दोघे स्नेही सहकुटुंब आले होते; पुढील संभाषण कळण्याजोगें होण्यास त्यांचीं नांवें मात्र येथें देतों. त्यांचा या कथानकाशीं अर्थाअर्थीं संबंध नसल्यामुळें त्यांचा दर्जा किंवा त्यांची चेहरेपट्टी येथें देण्याचें कारण दिसत नाहीं. एकाचें नांव मि० माइल्डमॅनर आणि दुसऱ्याचें नांव मि० रॅशवर्क. यांचें वर्णन अधिक देतच नाहीं. परंतु वाइल्डसाहेबांचे मुख्य जे स्नेही मि० ब्ल्याक्मेल स्कॅपँ त्यांचें मात्र थोडक्यांत वर्णन देतों. कारण ते या कथानकांत आणखी पांच सात वेळां वाचकांस भेटणार आहेत. हे गृहस्थ अतिशय उंच व धिप्पाड होते. यांचा चेहरा अगदीं मोहक असे आणि बोलणें तर फारच मिठ्ठें. कधीं कोणास त्यांच्याशीं बोलण्याचा कंटाळा म्हणून यावयाचा नाहीं. इतकेंच नव्हे, तर यांच्याशीं एक वेळा ज्याचें भाषण झालें, तो मनुष्य नेहमीं असेंच म्हणत राहावयाचा कीं, यांच्यासारखा विविधविषयज्ञ, मधुरभाषी आणि आचारव्यवहारज्ञ माणूस कोठें सुद्धां सांपडावयाचा नाहीं. त्यांची अदब व लकब अशी कांहीं होती कीं, त्यांच्या मोहक भाषणजालांत मनुष्य सांपडला ह्मणजे त्यांतून निसटण्याची इच्छा करण्यापेक्षां त्यांत आणखी आणखी गुरफटून घेण्याचीच इच्छा करावयाची. नवखा मनुष्य

असला कीं, तो तर यांच्या प्रेमळ भाषणानें मेस्मेरितच होऊन जावयाचा. ही यांची प्रवृत्ति लहानपणापासून असल्यामुळें यांचे वडील यांस नेहमीं " Smooth-tongued Satan " (मधुजिव्ह दैत्य) असें म्हणत असत. असो. ही स्वारी उत्तर-हिंदुस्थानांतील एका मोठ्या शहरीं एका फार वजनदार अशा पत्राचे एडिटर होती. त्यांचा टांकही मोठा जोरदार व सणसणीत असल्याकारणानें त्यांचें वजन फार असे. खासगी व्यवहारांत हा इतका मोहकपणा, आणि जसा भाषणांत तसाच लिहिण्यांतही तो असल्यामुळें आणि आणखीही कित्येक कला—ज्या कलांचें आजच येथें वर्णन देण्याचें कारण नाहीं—त्यांना अवगत असल्यामुळें त्यांच्या त्या पत्राचें फार वजन असे. वजन सरकारी अधिकाऱ्यांजवळ फार आणि त्यामुळें संस्थानादिकांतूनही पत्राचा खप फार चांगला. वर्गणी बरीच असून एकएका संस्थानांत बऱ्याच प्रतींना आश्रय. शिवाय सर्व मोठमोठे अधिकारीही यांच्या पत्राचे क्वचित् क्वचित् लेखक. यांचा प्रवेश, साहेबसमाजाचा जो कांहीं श्रेष्ठ थर त्यांत असल्यामुळें सर्व बाबतींची माहिती आणि अशी खाजगी तऱ्हेनें माहिती लागली, तरी तिचा शिताफीनें उपयोग करून पत्राचें महत्त्व व वजन वाढविण्याची शिताफी यांचे अंगीं विशेष, मग काय विचारतां? त्यांच्या पत्राची भरभराट चांगल्याच तऱ्हेनें झालेली असून त्यांस दरमहा फारच मोठी रक्कम पगार म्हणून पडत असे. असो.

मिस्टर वाइल्ड यांचें हें पाहुणेमंडळ वर सांगितल्याप्रमाणें भोजनासाठीं रात्रीं आठाचे सुमारास जमलें होतें. भोजनाचे वेळीं रीतीप्रमाणें टेबलाभोंवतीं मुख्य पाहुणे व गृहस्वामिणी यांनीं आपापल्या जागा व्यापिल्या व इतर मंडळीही बसली. सिस्टर च्यारिटी आणि मि० फेअरब्रेन हीं दोघें जवळ जवळ बसलीं. फेअरब्रेनसाहेबांच्या दुसऱ्या बाजूस मिसेस् माइल्ड-मॅनर बसली होती. आणि समोरच्या बाजूस मिस्टर रॅशवर्क, मिस्टर वाइल्ड व मिसेस रॅशवर्क अशी मंडळी होती. सिस्टर च्यारिटीची व मि० फेअरब्रेन यांची गांठ आज कित्येक दिवसांत पडली नसल्यामुळें सहजगत्याच इस्पितळांतील हकीकतीची व त्या दुर्दैवी मुलाची आणि त्याच्या आईची गोष्ट निघाली. दोघेंही अगदीं हळूच बोलत होतीं, कारण इतरांना त्यांत कांहीं विशेष महत्त्व वाटलें नसतें. ती त्या दुर्दैवी कुटुंबाची गोष्ट निघतांच फेअरब्रेनसाहेबांस कसेंसेंच झालें. त्यानें कांहीं तरी उत्तरें देऊन तो विषय टाळण्याचा प्रयत्न केला. परंतु सिस्टर च्यारिटीनें त्यांस सहजगत्या म्हटलें " पण तुम्ही इस्पितळांत माझ्या देखत त्या मुलाला आणि बाईला म्हटल्याप्रमाणं भेटून विचारतांना ? "

फेअरब्रेनसाहेबांस त्या प्रश्नाचें उत्तर काय द्यावें हें सुचेना. जर खरें काय झालें तें सांगितलें, तर वाइल्डसाहेब अगदीं ताबडतोब फजिती करूं लागणार. कारण आपण त्या कुटुंबाची, विशेषतः त्या पोराची तारीफ करीत होतों, आणि आतां आपल्या तोंडानें त्याच्या हातून काय गुन्हा झाला त्याचें वर्णन करून सांगावयाचें म्हणजे काय ? तर वाइल्डसाहेबांस उंच सूर काढून "कां ? मी म्हणत होतों तें खोटं ?" असें आरवण्यास संधि द्यावयाची दुसरें काय ? इतकें सगळें मनांत येऊन बिचारा किंचिन्मात्र स्तब्ध झाला. परंतु त्या स्तब्धपणाचा अर्थ सिस्टर च्यारिटी कदाचित्

भलताच करील असें पुनः मनांत येऊन तो म्हणतोः—

" मी आपल्याकडून त्यांना जितकी मदत होईल तितकी करीत आलों, पण त्या मदतीचं चीज होईलसं कांहीं दिसत नाहीं "

" चीज होईलसं दिसत नाहीं म्हणजे काय ?—चीज तें काय व्हायचं ? " सिस्टर च्यारिटीनें शोधक असा प्रश्न केला. कांहीं तरी, " सांगूं कीं नको, " " सांगूं कीं नको, " असें फेअरब्रेनसाहेबांच्या मनांत चाललें आहे असें तिनें केव्हांच ताडलें होतें. फेअरब्रेनसाहेब उत्तर देण्यापूर्वीं पुनः गुटमळला. परंतु मग लागलीच म्हणतोः—

" तो मुलगा जितका गरीब आणखी सचा वाटत होता, तितका नसावा असं वाटायला कारण झालं आहे. "

" तें कारण सांगण्याला हरकत नसली तर मला ऐकावयाची इच्छा आहे. "

" हरकत कसली ? पण कारण लांबलचक आहे, तेव्हां इथें इतक्या मंडळींत सांगतां यायचं नाहीं. "

वाइल्डसाहेबांचे कान मोठे तीक्ष्ण. त्यांनीं ह्यांच्या संभाषणाचा शेवटचा बहुतेक भाग ऐकिला, आणि ते एकदम म्हणतात, " इतक्या मंडळींत सांगतां यायचं नाहीं, कारण इतकी मंडळी यांच्या भोळेपणाबद्दल फजिती उडवितील ! फेअरब्रेन, मीं तुला कितीकदां सांगितलं तूं या नेटिवांशीं इतक्या सलगीनं वागतोस, त्यांना मदत देऊन विनाकारण पैशाचा खराबा करतोस, हे अगदीं चांगलं नव्हे. त्यांच्यासारखे कृतघ्न लोक सगळ्या दुनियेंत कोठेंही नाहींत. त्यांना उठतां लाथ, आणखी बसतां बुक्कीच पाहिजे. मी म्हणतों हें खरं का खोटं याचा निवाडा मि० स्कॅपँ सांगतील. त्यांना या नेटिवांचा चांगला पंधरा वीस वर्षांचा अनुभव आहे. त्यांच्या वर्तमानपत्रामुळें ज्या नेटिवांच्या मौजा त्यांना बघायला सांपडतात, त्या ते सांगूं लागले कीं, पोट धरधरून हंसूं येतं आणखी किळसही पण येते. ( मि० स्कॅपँकडे वळून ) मि० स्कॅपँ, हा एक वेडापीर नेटिवांना अगदीं भाळून गेलेला आहे. याचं वेड उतरेल असं करा एकदां ! "

मि० स्कॅपँ ह्मणतातः" अंः ! काळ आणि अनुभव हीं तेव्हांच त्याचं तें वेड घालवितील. या रोगानं झपाटलेले लोक अनुभवाखेरीज ताळ्यावर यायचे नाहींत. त्या कांग्रेसांत पुढाकार घेणाऱ्या ह्यूम वगैरेकडे पहा—कसे ते आतां बोलूं लागले आहेत नेटिवांविषयीं ! परवांच एक पैशासाठीं तगाद्याचं त्याच्याकडून आलेलं—खाजगी व गोपनीय—पत्र पाहिलं. त्यांत त्यानं छान केली आहे ! तें पत्र दोन तीन दिवसांपूर्वींच्या माझ्या पत्राच्या अंकांत प्रकाशित झालंच असेल. "

# प्रकरण ३१ वें.

## सिस्टर च्यारिटी.

मि. स्कॅपॅ यांचें वरील भाषण अशा तऱ्हेनें हंसून वगैरे झालें कीं, जणूं काय ते एखादी मौजेची गोष्ट सांगत होते. ते वरील बोलणें बोलूनच थांबले नाहींत; मोहक असें स्मित करून ते फेअरब्रेन-साहेबांकडे वळले, व मान हालवून, " माफ करा, मला बरेच दिवसांचा अनुभव आहे. आणि माझी तर पक्की समजूत झाली आहे कीं, मेकॉलेनं बंगाली बाबूविषयीं जें ह्मटलें आहे तें फार तर अल्पस्वल्प फरक करून सगळ्या नेटिवांना लागू हो-णार आहे. खरोखर मला त्यांच्या अंगीं एक सुद्धां गुण दिसत नाहीं. आमच्या-पैकीं अगदीं पक्का बिलंद भामट्यासुद्धां एकंदरींत त्यांच्यापैकीं उत्तमापेक्षां बरा. एक आठ दिवस माझ्या ऑफिसांत जर कोणी येऊन बसेल, तर मी त्याला सगळ्या मौजा दाखवीन. त्यांचीं पत्रं, त्यांचे हेतु, भेटायला आलं असतां त्यांचीं बोलणीं, त्यांच्या एकमे-कांबद्दलच्या चुगल्या टवाळक्या, दुष्ट प्रकारच्या निंदा या ऐकायला तिथें चांगल्या सांपडतात. आणि त्या एकदां ऐकल्या म्हणजे या लोकांबद्दल रतिभर सुद्धां प्रेम किंवा मान वाटणं अगदीं अ-शक्य आहे. "

स्कॅपॅसाहेबांचें हें भाषण ऐकतांच वाइल्डसाहेबांस अशा कांहीं गुदगुल्या झालेल्या दिसल्या कीं बः ! ते एकदम " हिअर हिअर " असें म्हणून खदांखदां हंसूं लागले फेअरब्रेन किंचित् कपाळास आंठ्या घालून, " तर मग आम्हांला हा सगळा अनुभव नाहीं हें मोठं चांगलंच आहे, " असें ह्मणाले. आणि त्यांनीं आपल्यापुढें आलेल्या पदा-र्थाकडे दृष्टि दिली. तितक्यांत मि० माईल्डमॅनर मध्येंच ह्मणाले, " मला मोठा खेद वा तो कीं, तुह्माला सगळे वाईटच लोक भेटतात. माझा तरी अनु-भव फार निराळा आहे. जसे आपल्या-मध्यें चांगले वाईट आहेत तसेच त्यांच्यां-तही आहेत. त्यांची खरी किंमत कळण्या-ला आपण त्यांच्याशीं मिसळून वागतों कधीं ! आपल चाकर नोकर असतील त्यांच्या वर्तनावरून आपण सगळ्या नेटि-वांची किंमत करतों. चांगल्या लोकांचा व आपला एकत्र बसण्याचा, मन मोकळं करून बोलण्याचा प्रसंग तरी कधीं येतो ? पोटांत शिरून त्यांचं हृद्गत का-ढण्याचा आपण यत्न तरी कधीं करतों ?"

सिस्टर च्यारिटी मध्येंच म्हणाली, " अगदीं बरोबर ! तुह्मी म्हणतां हीच गोष्ट खरी. अधिकउणं मोकळे मनानं बोललं तर हे साहेब लोक काय ह्मणतील आणि काय नाहीं असं वाटूनच ते लोक आपल्याशीं फार बुरून बुरून वागतात

मला तर पुष्कळांशीं प्रसंग येतो. मला अजून मि० स्कॅर्पॅ यांनीं वर्णन केल्याप्रमाणं एकही व्यक्ति भेटली नाहीं. त्यांच्याकरितां आपण थोडं जरी केलं, तरी ते लोक किती तरी कृतज्ञता दाखवितात. जे वरच्या वर्गांतले लोक आहेत ते खरोखर तुमच्यासारख्याकडे येत नाहींत, बोलत नाहींत, बसत नाहींत. कारण त्यांना वरच्या वर्गांतील लोकांस नैसर्गिक असा स्वाभिमान असतो. साहजिकच त्यांना वाटतं कीं, आपण होऊन तुमच्याकडे आलं आणि तुह्मी धड बोललां नाहीं, स्वागत केलं नाहीं, तर आपल्या जाण्याचा उपयोग काय ? ''

स्कॅर्पॅ लागलीच म्हणाले, '' मी खालच्या दर्ज्याच्या लोकांबद्दल बोलतच नाहीं. चांगल्या शिक्षित लोकांचीच गोष्ट सांगितली. कसं तरी करून आपलं नांव पुढं यावं या हेतूनं कित्येक येतात; कित्येक दुसऱ्याची माझ्या मार्फत विनाकारण विटंबना व्हावी, म्हणून येतात; सहजी बोलण्यांत तर एकमेकांविषयीं किती तरी कुत्सितपणानं बोलतात.... ''

'' होय. होय. '' सिस्टर च्यारिटी मध्येंच म्हणते, '' तुम्ही म्हणतां तें मी खोटं म्हणत नाहीं. माझं ह्मणणं एवढंच कीं, असे जे तुमच्याकडे येतात ते शिक्षित जरी असले, तरी उच्च प्रतीचे नव्हेत म्हणूनच येतात. तुमच्यापासून ज्यांना कांहीं साधायचं नाहीं, तुमचा कांहीं कामांत उपयोग करून घ्यावा अशी ज्यांना बुद्धि होण्याचा संभव नाहीं, अशा लोकांना तुह्मी आपण होऊन कधीं भेटलां होतां कीं काय सांगा. कार्यसाधु लोक येऊन तशा तऱ्हेनं वागले; तर त्यांच्यावरून एकंदर राष्ट्राबद्दल मत ठोकून देणं ह्मणजे ख्रिस्ताच्या दृष्टीनं सुद्धां किती पाप करणं आहे ! माझं सगळं काम नेटिवांतच आहे. अगदीं अनाथ-कंगाल अशा लोकांपासून तों चांगल्या चांगल्या लोकांपर्यंत मला अनुभव आलेला आहे. मला तर तुमच्या ह्मणण्याचा सत्यपणा कुठेंही दिसला नाहीं. तुमच्यासारख्यांना इतक्या जोरानं आपलं मत देण्याला खरोखर काय कारण असेल आणि कितपत पुरं असेल तें तुमचं तुम्हांलाच माहीत. आपल्याला तर त्या बाबतींत संकुचित दृष्टीखेरीज कांहीं कारण दिसत नाहीं. अगदीं हीन कुळांतले व जातींतले असे आपले नोकर आणि थोडेसे नीच प्रवृत्तीचे कार्यसाधु लोक यांच्याच वरून जर राष्ट्राचं शील कसं आहे हें निदान ठरवायचं, तर मला वाटतं कोणतंच राष्ट्र कधींच तुमच्या कसोटीला उतरणार नाहीं. असा निश्चय करा कीं, गरीब लोकांना आपण होऊन भेटायचं, त्यांचीं मतं कशीं आहेत तीं काढून घ्यायचीं, त्यांचीं सर्व सुखदुःखं समजून घ्यायचीं, त्यांना आपलेविषयीं फाजील पूज्यबुद्धि आहे ती त्यांचे मनांतून काढून प्रेमभाव उत्पन्न होईल अशी वागणूक ठेवायची, म्हणजे तीं माणसं किती प्रेमळ आहेत, किती सहनशील आहेत, हें तुमचं तुम्हांलाच दिसून येईल. ''

मिसेस् माईल्डमॅनर मध्येंच म्हणाल्या, '' ओः ! नेटिवांशीं इतक्या तऱ्हेनं वागणं ह्मणजे आपली किंमत कमी करून घेणं आहे. आह्मी त्यांच्याशीं बरोबरीच्या नात्यानं वागणं म्हणजे त्यांना भलताच मान देऊन रिकामा डौल त्यांचे अंगीं येईल असं करण्यासारखं आहे. आपण त्यांच्याशीं बोलण्याइतकी खरोखरी त्यांची योग्यता नाहीं. ''

तें ऐकतांच मि० माइल्डमॅनर यांस थोडेंसें वाईट वाटलेंसें दिसलें. तों इतक्यांत मिसेस् माइल्डमॅनर आणखी ह्मणाल्या, " आमचे पति तुमच्याच मताचे आहेत. पण त्यांनीं त्या तसल्या आपल्या कल्पना आचारांत आणून रिकामी खेंगटीं करूं नयेत म्हणून मी नेहमीं त्यांस मागं ओढीत असतें. हे असले तुमच्यासारखे विचार मनांत ठेवण्यासच ठीक. ते आचारांत आणले तर त्यांच्यापासून आपलं व या नेटिवांचेंही फार नुकसान होणार, कारण त्यांस फाजील महत्त्व दिलं म्हणजे ते आपली खरी योग्यता विसरून जातात. "

सिस्टर च्यारिटी चट्कन म्हणाली, " छे ! छे ! छे ! चांगल्या कृत्यांचा वाईट परिणाम कधींसुद्धां होणार नाहीं. माझ्या म्हणण्याप्रमाणं आणि अनुभवाप्रमाणं हे लोक खरोखर असतील तर ( आहेत अशी माझी खात्रीच आहे ) आपली चूक आपल्याला दिसून येऊन एका मोठ्या राष्ट्राची कृतज्ञता आपण आपलीशी करून घेतलीसं होईल. कदाचित् तुमच्यासारख्यांच्या समजाप्रमाणं जरी ते असले, तरी आपण त्यांना अशा दयाशीलपणानं व शालीनतेनं वागविलं म्हणजे ते उन्नति पावतील; आणि एक राष्ट्र आपण केवळ खिस्तानुकरणानं उन्नतीस नेल्याचं श्रेयही संपादूं. "

स्कॅपॅ मध्येंच म्हणाले, " सिस्टर च्यारिटी, तुम्ही बोलतां हें तुम्हांला सर्व योग्य आहे. पण व्यवहारांत जर ही गोष्ट आम्हीं आणली तर केवळ अनर्थ होतील. या लोकांशीं बरोबरीच्या नात्यानं वागणं म्हणजे त्यांना उन्नतीला पोंचविणं नव्हे, तर आपण अधोगतीला जाणं आहे. "

सिस्टर च्यारिटी लगेच म्हणाली, " छे, छे ! असा विचार सुद्धां मनांत आणूं नका. तुम्ही जितकं त्याचं चित्र काळं दाखवितां तितकं तें काळं नाहीं. त्यांत पांढरेपणाचा पुष्कळ भाग आहे. ते लोक जिंकलेले आहेत. त्यांना स्वभावतः-च थोडाबहुत आत्माभिमान वाटून ते आपण होऊन आपल्याकडे येणार नाहींत. आपणच मोठेपणा करून त्यांच्याकडे गेलं पाहिजे, म्हणजे ते आनंदानें आपल्याशीं मिळूनमिसळून वागतील. कधीं सुद्धां आपलं अहित करणार नाहींत. त्यांच्याकडे जाणं हा आपला मोठेपणा आहे. तो जर आपण केला नाहीं, तर कर्तव्यांत चुकलों असं होईल. "

फेअरब्रेनसाहेब इतक्या या भाषणांत मुळींच कांहीं बोलले नाहींत. दोन चार दिवसांपूर्वीं त्यांना जो एक अनुभव आला होता, तोच त्यांच्या मनांत घोळत होता, आणि त्यामुळेंच ते गप्प बसले होते. तितक्यांत दुसरा कांहीं प्रश्न निघून तें बोलणेंही तितकेंच राहिलें, आणि मंडळीचा भोजनविधि आटपला. मंडळी बसण्याच्या खोलींत जाऊन बसली. तेथें सिस्टर च्यारिटीनें फेअरब्रेनसाहेबांस एकीकडे नेऊन पुनः सीतारामाविषयीं व त्याच्या आईविषयीं हकीकत विचारली. तेव्हां फेअरब्रेनसाहेबांनीं तीस सर्व कांहीं सांगितलें. तेव्हां सिस्टर च्यारिटी त्यास म्हणते, " यांत कांहीं तरी विनाकारण गैरसमज तर झाला नसेलना ? "

फेअरब्रेनसाहेब म्हणाले, " गैरसमजाचं कारण तर मला कांहीं दिसत नाहीं. नोटीचा झालेला प्रकार अगदीं उघड उघड आहे. त्यांत गैरसमज तो काय होणार ? "

"नोटीच्याच बाबतींत मी विचारतें."

" नंबरापेक्षां आणखी प्रमाण काय पाहिजे ? त्याच्या हातीं ती नोट जावी कशी ? "

" त्यानं घेतली असती तर ती इतक्या साळसुरत तो आणून देता तरी कसा ? हाही प्रश्न विचार करण्यासारखा आहे, " असें सिस्टर च्यारिटीनें त्यास म्हटलें.

" त्याचं कारण अगदीं थोडं आहे. दोन नोटींपैकीं एक परत आणून द्यायची. ती देतांना चुकून भलतीच आली. दुसरं काय ! "

" कांहीं असो. त्या मुलाविषयीं माझी कांहीं अशी बुद्धि होत नाहीं. "

" माझ्याही मनाची स्थिति तशीच आहे. मीं त्याला थोड्या कठोरपणानं वागविलं खरं. पण पुढं माझं मलाच चमत्कारिक वाटूं लागलं आणि अजूनही त्याबद्दल मनांत कसंसंच वाटत आहे. माझ्या मनांतला संशय जर जाईल, आणखी तो मुलगा जसा आहे असं मला आजपर्यंत वाटत होतं, तसाच तो आहे अशी खात्री होईल, तर मला इतका आनंद होईल कीं, आजपर्यंत तसा कधीं झाला नसेल. जें कांहीं झालं आहे तें सगळं डोळ्यापुढें उभं असतांनाही मला त्याच्याबद्दल अजून अतिशय प्रेम वाटत आहे. "

फेअरब्रेनसाहेब जें ह्मणाले तें अगदीं अक्षरशः खरें होतें. त्यांनीं सीतारामाशीं कठोर वर्तन केलें. त्याचप्रमाणें त्याच्या दोषीपणाबद्दल त्यांच्या मनाची बहुतेक खात्रीही झाली होती, तरी पण या सगळ्याच्यावर वारंवार त्यांच्या मनांत असा विचार येई कीं, आपण चुकत तर नसूं ? पण पुनः वाटे, चुकण्याचा संभव काय ? येऊन जाऊन ती नोट त्यानें घेतली नसेल एवढेंच कीं नाहीं ? दुसऱ्या कोणीं घेतली असेल असा तर्क करावयाचा. परंतु दुसऱ्यानें घेऊन ती याच्या हातीं कशी यावी, या प्रश्नाचें उत्तर कांहीं सुचेना. जर त्यानें घेतली नाहीं, तर घेणाराचा आणि त्याचा कांहीं तरी संबंध असला पाहिजे आणि अशा बाबतींत प्रत्यक्ष त्यानें घेतली काय आणि ज्यानें घेतली त्याच्याशीं संगनमत केलें काय, अर्थ एकच; दोष सारखाच. किंबहुना संगनमत करण्यांत दोष अधिक; कारण मनुष्य दुसऱ्या अपराध्याशीं संगनमत करितो तो विचारपूर्वक करितो. दोष करणाराच्या हातून पुष्कळदां दोष बुद्धीचा क्षणिक भ्रंश होऊन होतो. कांहीं जरी असलें तरी याच्या हातून दोष घडला नाहीं अशी मनाची कांहीं केल्या खात्री होत नाहीं.

असे अनेक विचार अनेक वेळां फेअरब्रेनच्या मनांत आले व ते त्यानें सिस्टर च्यारिटीला स्पष्टपणें सांगितलेही. सिस्टर च्यारिटीनें ते सर्व मुकाट्यानें ऐकले आणि शेवटीं ती म्हणाली:

" मी थोडं स्पष्टपणानं बोलतें याच्याबद्दल क्षमा करा. पण तुह्मी ( पलीकडे बोट दाखवून ) त्या मंडळीपैकीं नाहीं म्हणूनच मी हें बोलण्याचं साहस करितें. तुह्मांला या मुलाबद्दल शंका आली ती दिसलेल्या प्रमाणावरून अगदीं योग्य. पण किती झालं तरी ती शंकाच होय. या शंकेला तुह्मीं आपल्या मनावर एवढं प्रबळ राज्य करूं दिलं हें बरं नव्हे. यदाकदाचित् तो मुलगा खरोखर दोषी असला तरीसुद्धां तें बरं नव्हे. तुह्मी त्याच्याशीं कठोरपणानं न वागतां सौम्यपणानं वागून त्याचे मनांत काय होतं आणि त्याचे हातून असं कां घडलं हें काढून घेतलं असतं, तर त्याला पश्चात्ताप झाला नसता काय ? 'हेंच तें कारण !' असं कठोरपणानं बोलून तुह्मी त्याच्या समोरून उठून

गेलांत, त्याला आपल्या बाजूनं बोलण्याची फुरसत सुद्धां दिली नाहीं, हें बरं झालं काय? ख्रिस्तधर्मी या नात्यानं तुझी त्याच्याशीं सौम्यपणानंच वागलां असतां तर खरोखर चांगलं झालं असतं. मी तुमच्या ठिकाणीं असतं तर त्याच्या पाठीवरून हात फिरविला असता, त्याला मृदुशब्दांनीं आपली शंका कळविली असती. त्या लहान मुलाचं मन किती कोवळं असेल ! त्या कोवळेपणास धक्का लागेल असे शब्द मीं कधीं बोललं नसतं. माझी मनोदेवता सांगत नाहीं कीं, त्याच्या हातून हें कृत्य घडलं असेल. पण यदाकदाचित् घडलं असलं तरी तें पुनः घडूं नये असं करणं माझं कर्तव्य असं समजून मी ममतेनें त्याच्याशीं बोललं असतं. ”

फेअरब्रेन स्वस्थपणें मन लावून तिचें तें बोलणें ऐकून घेत होता, आणि प्रत्येक अक्षर कानीं पडत असतां, “ खरंच, आपण असं केलं असतं तर बरं झालं असतं; त्याला इतक्या कठोरपणानं वागविणं योग्य नव्हतं ! ” असें त्याच्या मनांत किती वेळां तरी आलें. सिस्टर च्यारिटी त्यास ह्मणाली, “ इतकं सगळं असून जर तुमचा संशय खोटा ठरला, जर झाल्या गोष्टीचा उलगडा निराळ्याच प्रकारानं झाला, तर आपण विनाकारण दोष लाविल्याबद्दल तुह्माला किती वाईट वाटेल ! मी उद्यां त्या मुलाला जाऊन भेटेन आणि सर्व खरी खरी हकीकत काढून घेईन. ”

# प्रकरण ३२ वें.

## वेडा.

सीताराम फेअरब्रेनसाहेबांच्या खोलींतून त्यांच्या कठोर वागणुकीमुळें उठून आला, त्यावेळीं त्याचें मन किती विव्हल झालें होतें ! त्याच्या मनांत किती तरी प्रकारचे खिन्न विचार येत होते ! त्याचें मन किती गोंधळून गेलें होतें ! साहेबांच्या या वागण्याचें, “हेंच तें कारण!” म्हणून उठून जाण्याचें कारण तरी काय ? आपण आजपर्यंत असें वर्तन तरी कोणतें केलें, कीं ज्याच्यायोगानें त्यांचा आपल्यावरील विश्वास उडावा ! कांहीं झटल्या कांहीं सुद्धां कल्पना त्यास होईना. कांहीं कारण त्यास सुचेना. आपल्यावर त्यांचा अमुक एक आरोप असेल, आणि म्हणून ते आपणाशीं अशा कठोरपणानें वागले असतील अशी कल्पनासुद्धां त्यास करतां येईना. तो ज्या वेळीं ती नोट त्यांच्याकडे घेऊन चालला, त्या वेळचे त्याचे विचार आणि झाला तो प्रकार होऊन तो परत चालला त्यावेळचे त्याचे विचार, यांत किती अंतर ! जातेवेळीं त्यास असें वाटत होतें, कीं आपण नोट परत करतों हें पाहून साहेबांस फार वाईट वाटेल, कदाचित् ते आपल्याला इतका आग्रह कर-

तील, कीं ती नोट आपल्याला परत सुद्धां घेऊन जावी लागेल. कदाचित् ते आपल्यास ती नोट परत आणून दिल्याबद्दल दोष देतील, आणि 'रिकामा डौल करण्यांत काय तात्पर्य आहे ? मी सांगतों ती नोट ठेवून घे,' असें ह्मणून आपल्यास रागें भरतील. इत्यादि विचार त्याच्या मनांत येऊन तो मोठ्या सुखानें त्यांच्या क्लबाकडे जात होता. परंतु तेथें झाला तो प्रकार अगदींच भिन्न. कधीं स्वप्नांतही जो प्रकार आला नाहीं, तो त्या ठिकाणीं घडला. त्यामुळें हा काय प्रकार झाला, आणि कां व कसा झाला, या विचारांनींच त्याचें मन फार विव्हल झालें. त्यानें नानाप्रकारच्या कल्पना केल्या, परंतु बिचाऱ्यास कांहीं सुद्धां सुचेना. काय सुचणार ? आतां घरीं कसें जावें ? आणि 'आईला काय सांगावें ? असें वारंवार त्याचें मन त्याला विचारी. परंतु न सांगावें असें मुळींच त्यास वाटलें नाहीं. छे. त्याचें सर्व विश्वासाचें स्थान आई. तिच्यापासून कधीं कांहीं चोरून ठेवावें किंवा तिला दुःख होईल म्हणून सांगूं नये असा विचार आजपर्यंत कधीं त्याच्या मनास शिवलासुद्धां नाहीं. ह्या गोष्टींत, आईला काय सांगायचें आहे ? तिच्यांत तिला काय समजायचें आहे ?' अशा प्रकारच्या विचारांनीं त्याच्या मनांत कधींही प्रवेश केला नाहीं. आपल्या आईला सर्व कांहीं समजतें, तिची मसलत प्रत्येक कामीं आपल्याला हितकर आहे, असा त्याचा दृढ विश्वास, आणि त्या विश्वासाला अनुसरून त्याचें नित्याचें वर्तन असे. या त्याच्या नित्याच्या परिपाठाप्रमाणें घरीं गेल्याबरोबर आपण आईला सर्व कांहीं हकीकत सांगूं, आणि ती काय तर्क करते तें पाहूं, असें त्याच्या मनांत एकसारखें चाललें होतें. होतां होतां तो घरीं गेला. तो जाण्याबरोबर त्याच्या नजरेस दुसरीच एक चमत्कारिक गोष्ट पडली.

त्याची आई त्याच्या येण्याचीच वाट पहात होती. इतक्यांत तिचा तो वेडा सावत्र मुलगा कोठून बाहेरून आला. तो वाटेल त्यावेळीं घटका दोन घटका बाहेर जात असे. मना केलें, तरी ऐकत नसे. आणि त्याचें बाहेर जाऊन बसण्याचें ठिकाण कोणतें ? तर आपल्या जुन्या घराच्या आसपास कोठें तरी अगर त्याच घरांत. कोणी नको नको म्हटलें तरी तो आंत जावयाचा, सगळ्या माड्या हिंडावयाचा आणि परत यावयाचा. प्रथम एकदोन वेळां त्यास रंगोपंतानें व त्याच्या घरांतील मंडळींनीं हांकून देण्याचा प्रयत्न केला, परंतु हा कोठला ऐकावयाला ? हा "नाई जाचा" "नाई जाचा" "दोंदू नाई जाचा. ऐकल, बसल." असें एकसारखें बडबडून आंतच घुसावयाचा. कधीं मागें ह्मणून घ्यावयाचा नाहीं. आणि तो वेडा असल्यामुळें त्याचा तिटकारा येण्याच्या ऐवजीं हंसूं येई व बोलण्याची, हातवारे करण्याची वगैरे फार मौज वाटे, यामुळें अलीकडे अलीकडे अगदीं त्यास तेथें जाण्याची मुभा असे. ती मुभा मिळण्याला आणखी एक कारण असे. तें रंगोपंतांच्या पत्नीची—स्त्रियांना निदान तसल्या स्त्रियांना तरी नैसर्गिक—जिज्ञासाच कारण होय. वेडा आला, म्हणजे त्याच्याशीं बोलून, त्याच्या पोटांत शिरून राधाबाईचें, तिच्या आईचें, तिच्या इतर मुलांचें कसें काय चालतें, जेवतात काय, खातात काय, वगैरे वगैरे प्रश्न विचारून नानाप्रकारची माहिती तिनें काढून घ्यावी,; यासाठीं त्याचा उपयोग

होऊं लागला. मग काय विचारतां ? त्याच्या येण्याचा तिला कंटाळा येईनासा झाला. इतकेंच नव्हे, तर ती त्याचें स्वागत करी ! आणि वेड्याचा नाद एक. मनांत आलें कीं उठावें आणि त्या आपल्या घरीं जाऊन भिरीभिरी हिंडावें आणि कांहीं वेळ तेथें बसून गप्पागोष्टी कराव्या व निघून यावें. पण मौज ही कीं, कोणीं कांहीं खावयाला दिलें, तर खावयाचा नाहीं. कोणच्याही जिनसेला कधीं हात लावावयाचा नाहीं. "बाऊ" "बाऊ" म्हणून म्हणावयाचा आणि तसा तेथून चालता व्हावयाचा. यामुळें तो तेथील मंडळीच्या डोळ्यांत खुपत नसे. असो.

जे दिवशीं सीताराम ती पन्नासाची नोट घेऊन फेअरब्रेनसाहेबांकडे गेला, ते दिवशीं त्या वेड्यालाही तिकडे जाण्याची हुक्की आली. आणि एकदां हुक्की आली म्हणजे मग ब्रह्मदेवाचेंही त्याच्यापुढें कांहीं चालावयाचें नाहीं. मग स्वारी निघालीच. प्रत्यक्ष राधाबाईनेंच त्याला नको म्हणून सांगितलें तर तो तितक्यापुरता दबे. परंतु त्याला विनाकारण दबविणें राधाबाईस कधीं बरें वाटत नसे. यामुळें त्यास ती होतां होईल तों बोलत नसे. आणि बोलण्याजोगें तो कधीं कांहीं करीतही नसे. कधींही बाहेर गेला, तरी तो आपला घटका दोन घटकांत परत यावयाचा. त्याचें वेड कोणास त्रास देणारें नसल्यामुळें कधीं त्याच्याबद्दल गाऱ्हाणीं येत नसत. आणि त्याला कधीं कोणी मारहाण केल्याचेंही उदाहरण घडलें नाहीं. मग त्याला त्याच्या मनाप्रमाणें वागूं देण्यास काय हरकत होती ? गोंदू—वेडा—घरांतून जो थेट निघाला, तो थेट आपल्या जुन्या घरांत गेला आणि थेट रंगोपंताच्या पत्नीजवळ गेला.. ती बाई त्यास पाहतांच, "या गोंदू ताता' असें म्हणून त्याच्याशीं कांहीं बोलणार, तोंच स्वारीचें लक्ष्य वर माडीवर कोणी शिव्या देऊन घुमत होतें, आणि कोणी रडत होतें तिकडे गेलें. अर्थात च स्वारींनीं, "तोन् ललतो ? तोन् मालतो ? मी ज्यातो पहाला— मी ज्यातो पहाला ! तोन् ललतो, तोन मालतो, मी ज्यातो पहाला ! मी ज्यातो पहाला," असें म्हणून उड्डाण केलें. आणि दुड्दुड् माडीवर स्वारी गेली. पाहातों तो काय ? बाहेर जातांना हातांत घेण्याची काठी रंगोपंतांनीं हातीं घेतलेली आणि "नाहीं नाहीं—काका, नाहीं. मी नाहीं. तुम्ही..." असें म्हणत व चळचळां कांपत भास्करभाऊ त्यांच्यापुढें उभा. त्याच्या डोळ्यांस एक टिपुससुद्धां नव्हता. तो फक्त कांगावा करून "मीं नाहीं का—काका नाहीं मी. तुम्ही ..." इतकेंच वारंवार म्हणत होता, आणि रंगोपंत दांतओंठ खाऊन "मी नाहींन् तुम्हीं ? मला म्हणतोस लेका चोर ? सांग कुठें आहे ती पन्नासाची नोट. तुझ्याखेरीज गेली नाहीं. तूं काय काय केलंस, काय काय नाहीं,माझ्या सगळं लक्ष्यांत आलं आहे. सगळं मला कळलं आहे. अगदीं तुला नवं करून टाकतों. तूं काय समजला आहेस ? ती दुसरी नोट अशीच चोरलीस आणखी माझ्या तोंडाला काळोखी लाविलीस ? गाढवा, चोरली तर पचवायचा तरी शहाणपणा पाहिजे. तें कुठें आहे ? द्यावी लागली कीं नाहीं काढून ? आणखी ती उडवून टाकतोस म्हणजे आला होता कीं नाहीं भुर्दंड भरण्याचा प्रसंग ? (एक काठीचा सपाटा हाणून) बोल ! घेतलीस का नाहीं ती नोट ? "

"नाहीं, काका, नाहीं. मीं घेतली नाहीं. मीं पाहिलीसुद्धां नाहीं. तुमच्या

गळ्याची शपथ वाहतों. देवांची शपथ वाहतों. पण मारूं नका. काका, मीं नाहीं घेतली नोट. मला काय करायची नोट ? मला काय कमी आहे ? तुम्ही काय कमी करतां ? ”

“ अरे मानभाव्या ! मी काय कमी करतों ? मी हें कमी करतों. तुला चोपीत नाहीं हें कमी करतों. आतां नाहीं तें कमी करणार. घे ! ” असें ह्मणून पुनः दोन रट्टे लगाविले. पण तो बिलंद असला, कीं तो नुसता धुसमुसे. “ नाहीं, नाहीं ” ह्मणे, पण कबूल ह्मणून होईना. “आपण नोट घेतली नाहीं, नोट पाहिली नाहीं, आपल्याला नोटीचा प्रकार माहीत सुद्धां नाहीं ” अशीं उत्तरें एकसारखीं चाललीं होतीं. आणि रंगोपंतांची तर खात्री झालेली दिसत होती कीं, नोट या पोरावांचून गेलेली नाहीं. त्यांत त्या सीतारामाच्या नोटीचा आणखी सर्व प्रकार बाहेर आल्याकारणानें आणि तें सर्व प्रकरण मास्तराकडून रंगोपंताच्या कानीं आल्यामुळें त्याची खात्री होण्यास तसें कारणही झालें होतें. गोंदू वेडा तेथें जाऊन उभा राहिला आणि तो मारण्याचा सपाटा पाहूं लागला, तो नुसता घाबरून गेला. परंतु त्याच्या येण्यानें भास्करभाऊस मोठाच आधार सांपडला. त्यास पहातांच स्वारी एकदम ह्मणते, “ काका, मीं नाहीं, मीं खरोखर नाहीं घेतली नोट. हा गोंद्या इथें आला होता ते दिवशीं त्यानं घेतली असेल. त्यानं नेली असेल. तो वेडा आहे यावर जाऊं नका. तो मोठा लुच्चा आहे.” त्या मिस्किलानें असें ह्मणतांच रंगोपंतास जास्तच संताप आला. त्यांनीं दोन तीन सपाटे जोरानें मारून, “ भामट्या, त्या वेड्याचं नांव घेतोस ? दम धर तुला आतां उलटा टांगून बिच्यांची धुरीच दिली पाहिजे. त्याखेरीज नाहीं तें व्हायचं. या वेड्यानं नोट घेतली का ? ” भास्करभाऊ पुनः ह्मणतो, “ खरंच काका, काका खरंच त्यानं घेतली असेल. मीं नाहीं...” इतकें चाललें आहे, तोंच, कर्मधर्मसंयोगाची गोष्ट, भास्करभाऊंचे जीवश्चकंठश्च स्नेही पंड्याजी कांहीं कामानिमित्त म्हणून तेथें आले. त्यास पाहतांच रंगोपंताचा संताप फार वाढला, आणि पंड्याजी मागल्या पावलीं जाणार तोंच त्यांनीं त्याचा पदर धरून एकदम त्याला ओढून दरडावलें, “ कायर, गल्या दोन चार दिवसांत या पोरानं एखादी नोट तुझ्या देखत मोडलीबिडली कीं नाहीं ? सांग ! ” पंड्याजी शरीरानें जरी पक्के होते, तरी मनानें कच्चे होते. दरडावणी ऐकण्याबरोबर तोंडांतून जरी, “ नाहीं, मी कांहीं नाहीं, मला कांहीं ठाऊक नाहीं, मीं कांहीं घेतली नाहीं, ” असें ह्मणत होता, तरी त्याच्या तोंडावरून एकदम लक्ष्यांत आलें कीं त्यास माहिती आहे. रंगोपंतांनीं तें पहातांच एकदम त्याला म्हटलें, “ तूं काय खरं आहे तें सांगितलंस तर बरं आहे, नाहीं तर मी तुला पोलिसांत गुदरून देईन. मला कांहीं तुला मारायला येत नाहीं; पण पोलिसांत दिल्याखेरीज कांहीं रहात नाहीं.” इतकें दरडाविल्यावर मग काय विचारतां ? त्याची तिरपिटच उडाली. त्यानें आपल्याकडून बाह्यतः उर्मटपणाचा आविर्भाव आणून म्हटलें, “ मला काय ह्मणून पोलिसांत नेणार ? मी काय म्हणून तुमच्या गोष्टी ऐकून घेईन ? मला त्या नोटीशीं काय करायचं आहे ? त्यानं घेतली असेल ! त्याच्याजवळ होत्या खऱ्या दोन नोटी. त्यांतली एक तर मास्तरांनीं झोडपल्यामुळें त्यानें

सीतारामाची सीतारामाला दिलीच. दुसरी त्याच्याचजवळ असेल. माझ्याजवळ कांहीं नाहीं. मला काय करायचं आहे असल्या भामट्याची संगत धरून ? हा मी चाललों ! ”

“ असा कसा जाणार, बाबा ? तसा कसा मी तुला जाऊं देणार ? तुला पोलिसांत देणार आणखी यालाही देणार. जाऊं दे असलं चोरटं कारटं पाहिजे तरी कशाला घरांत ? ”

“ द्याला द्या पाहिजे तर. मी सांगेन त्याच्याजवळ नोट होती म्हणून. पण मला काय म्हणून त्याबद्दल त्रास ? मीं कांहीं घेतली नाहीं तो माझ्याजवळ देत होता तरी ! ”

“ काका, काका, तर मग मीं याच्याचजवळ दिली. नाहीं. त्यानं हिसकावून घेतली. मी खरंच सांगतों. अगदीं खोटं नाहीं सांगत. मी, मोडून आणून देतों म्हणून त्यानं मला थाप मारून माझ्यापासून नेली. मीं, काका, त्याला सांगितलं होतं, कोणी शिपायानं काकाच्याजवळ आणून दिली होती, ती काका विसरून घाईघाईनं गेले तेव्हां मीं चोरिली म्हणून. मग तो म्हणाला कीं, म्हणूनच तूं ठेवूं नकोस आपल्याजवळ. आण माझ्याकडे, मीं ती युक्तीनें मोडून आणतों. ”

पंड्याजींनीं ते शब्द ऐकतांच त्यांच्या अंगाचा नुसता संताप झाला. कारण, भास्कर सांगत होता ती गोष्ट अक्षरशः खोटी होती. तींत कांहीं सुद्धां खरें नव्हतें. त्यानें ती नोट पंड्याजीला दाखविली होती. व ती ठेवण्याविषयीं त्याला आग्रह करून ती त्याजवळ दिलीही होती. परंतु दुसरे दिवशीं त्या दुसऱ्या नोटीबद्दल हकीकत घडतांच हें लचांड आपल्याकडे नको म्हणून त्यानें लागलीच ती नोट भास्करभाऊकडे परत केली होती. आणि आतां ती नोट आपल्याकडे असल्याबद्दल भास्करभाऊ बोलूं लागला, तें पाहातांच [illegible] एकदम त्याच्या अंगावर गेली [illegible] हाताला झिणझिण्या येतील अशी [illegible] चपराक त्याच्या गालावर झणझणावून [illegible] त्यास, “ अरे भामट्या, आपण [illegible] करून आणखी माझं नांव घेतोस [illegible] ? दमधर सांगतों तुला काय आहे [illegible] ! ” असें म्हणाला.

इतक्या स्थितीवर गोष्ट [illegible] मग काय विचारतां ? [illegible] तिकडून कोंडमारा झाल्याप्रमाणेंच भास्करभाऊची स्थिति झाली आणि त्यास [illegible] सर्व गोष्टी कबूल कराव्या लागल्या.

गोंदू वेडा सर्व चमत्कार [illegible] होता आणि त्याच्या डोक्यांत [illegible] कांहीं नांवें आणि कांहीं कांहीं [illegible] बसल्याप्रमाणें झाल्या. कोणा शिपायानें एक नोट आणून दिली, आणखी ती [illegible] भास्करभाऊनें चोरली, इतक्या [illegible] गोष्टी त्याच्या डोक्यांत ठसून [illegible] उच्चार करण्याचाच त्यास नाद [illegible]. आणि तो एकसारखा तसेंच गात [illegible] निघाला आणि घरीं येऊन [illegible] तेंच सर्व सांगत होता. “ भामटा [illegible] शिपाई नोट चोलला ! ” “ [illegible] बाऊ शिपाई नोट चोलला. [illegible] रंगूकाका त्याला माल माल माला. [illegible] रंगूकाका त्याला माल माल माला ! ”

असें गाणें एकसारखें [illegible] गात होती, आणि रंगूकाका भास्करभाऊला ( वेड्याचा भामटा बाऊ ) कसे मारीत [illegible] आणि तो नाहीं नाहीं म्हणून कसा [illegible] होता, हें सर्व हावभावानिशीं तो सांगत होता. आणि पुनः त्याचें तें गाणें ( शिपायाची

नोट चोर[illegible] व मारल्याबद्दलच ) तो म्हणतच [illegible]. आईच्या लक्ष्यांत तें कांहींच येईन[illegible] री ती आपलें त्याचें बोलणें ऐकू[illegible] होती. तिला वाटत होतें कीं, [illegible] टीबद्दल मास्तरांपर्यंत हकीकत [illegible] च नोटीबद्दल कांहीं तेथें झालें [illegible] आणि तें त्या वेड्यानें ऐकलें अस[illegible] येथें येऊन कांहीं तरी सांगतों आ[illegible] कितीं वेळां ऐकून घेतलें, तरी [illegible] पुनः गाणें चाललेलेंच. नाचें काय, [illegible] काय, भास्करभाऊसारखें तोंड करून [illegible] पुनः ' मी नाहीं, मी नाहीं ' म्हण[illegible] यासारखें करी. रंगोपंताप्रमाणें [illegible] मारण्याचा आविर्भाव करी. असा [illegible] प्रकार चालला होता. इतक्यांत [illegible] तेथें आला. मग काय ? पुनः एकदां [illegible] ची आवृत्ति, द्विरावृत्ति सुरू झाली. [illegible] रामाचें मन अस्वस्थ झालें होतें. [illegible] पण त्या वेड्याला त्यानें कांहीं हि[illegible] डिस केलें नाहीं. तो काय सांगत [illegible] तें ऐकून घ्यावें अशी त्याची नेहमींची रीत असे. त्याप्रमाणेंच त्यानें आज केलें. प्रथम अर्थातच त्याच्या कांहीं लक्ष्यांत येईना. पण मग तेंच तेंच पुनः पुनः ऐकून त्यास त्यांत थोडेंसें कांहीं लक्ष्य लावण्याजोगें दिसलें. शिपायाची नोट भास्करभाऊनें चोरली, आणखी रंगूकाका त्याला मारीत होते, याचा अर्थ काय ? शिपायाची नोट कोठली ? फेअरब्रेनसाहेबांनीं ज्या चोरीस गेलेल्या नोटीबद्दल आपल्याला एवढ्या कठोर शब्दांनीं ताडन केलें तीच तर ती नोट नव्हेना ? अशी त्यास किंचित् शंका आली आणि म्हणून त्या वेड्यास पुनः एकदां काय झालें, काय पाहिलें तें विचारलें. मग काय विचारतां ? त्याला फारच उल्हास होऊन त्यानें पुनः सर्व जितकें आपल्या मंद डोक्यांत सांठविलें होतें, तितकें हातवारे करून तोंड वेडींवांकडीं करून सांगितलें.

पण तेवढ्यानें काय बोध होणार ?

# प्रकरण ३३ वें.

## दुसरीकड.

याच सुमारास दुसऱ्याही एके ठिकाणीं आमच्या वाचकांस लक्ष्य देण्याजोगें-किंबहुना मुद्दाम लक्ष्यांत ठेवण्याजोगें—घडत होतें, तें सांगणें अवश्य आहे. एक खेडेगांव—सुमारें तीनशें साडेतीनशें घरांची वस्ती; परंतु तितक्या वस्तीच्या मानाच्या इतर गांवांपेक्षां बराच सुसंपन्न गांव. या गांवांत एका ब्राह्मणाच्या घरांत एक गृहस्थ कानावर लेखणी ठेवून व पुढें एक पत्र ठेवून त्याचप्रमाणें अर्धवट लिहिलेला असा एक कागद मांडीवर घेऊन कांहीं विचार करण्यांत गुंतला होता. बराच वेळ विचार झाल्यानंतर त्याच्या तोंडून पुढील उद्गार निघाले:—" झाली ही आपली चूकच झाली. आतां जे काय विचार सुचताहेत त्याप्रमाणं केल्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं. आपल्या हातीं सगळी किल्ली असतां केवळ भयाभयानं आपण आजपर्यंत बिळांत बसलों. माझ्याकडून सगळ्या गोष्टी करून शेवटीं लेकानं मला हांकून दिलं. माझी अप्रतिष्ठा केली, तीही सोसून स्वस्थ बसलों. केवळ जिवाच्या भयानं! पण जो जिवाला भिईल तो जय काय पावेल? हें बीळ आतां सोडलं पाहिजे. आजपर्यंत माघार माघार घेतली ती सोडून दिली पाहिजे. एक तर आतां त्याच्या उरावर जाऊन बसेन; आणि त्याच्यापासून यथेच्छ एखाद्या इनामदाराला शोभेल अशा तऱ्हेनं राहण्याची तजवीज करून घेईन. नाहीं तर त्याला मी आपल्याबरोबर धुळीला मिळवून टाकीन. आतां त्याला लिहिणार हें शेवटलं पत्र. या पत्रांत एकदां कायती शेवटली पराकाष्ठा करून पाहणार. जर तो जागा झाला, त्याचे डोळे उघडले, तर ठीक. नाहीं तर मग पुढें जें काय होईल तें होईल. लेकानं माझ्याकडून काम करून घेतलं, त्या वेळीं मला काय थापा दिल्या, काय लाडीगोडी दाखविली, काय आशा दाखविल्या. आणखी पुढं वेळ आली तेव्हां मग लाथा मारून बायकोच्या भावाच्या काकाच्या मामास माझ्या डोक्यावर आणून बसविलं. हेतु काय तर आमच्यापासून काम समजवून घेऊन आह्माला पुरी लाथ मारावी. तो माझ्यापासला अस्सल कागद जर का त्याच्या हातीं लागता, तर नुसती मला लाथ मारूनच स्वारी स्वस्थ बसतीना. पण माझं पक्कं नशीब म्हणूनच तो त्याच्या हातीं लागला नाहीं.—लागला नाहीं हेंच खास! कारण लागला असता तर तो रंग कांहीं निराळाच खास दिसला असता. एक परी आमचंही नशीब फुटकं, कीं तो......" पण तितक्यांत त्या गृहस्थास आपल्या पत्राची आठवण झाली. आणि " तसल्या विचारांत कांहीं अर्थ नाहीं. जें काय आतां आहे तेवढ्यांतच

आपल्याला आपला बस बसवून पुढचा कार्यभाग सिद्धीस नेला पाहिजे. तो कागद गेला नाहीं खास. तो तर पुनः हस्तगत करून घेऊंच. निदान तो आपल्या जवळच आहे असं त्यास भासवून त्याच्या उरावर जाऊन बसणार. " असे पुनः आपल्याशींच उद्गार काढून त्यानें तें पत्र पुढें लिहिण्यास सुरुवात केली. सुमारें तीन एक तास तो पत्र लिहीत होता पत्र लिहून तें पुन्हां वाचून पाकिटांत घातलें. नंतर पुनः काढलें. पुनः एकदां वाचलें. ठीक आहे अशाबद्दल मनाची खात्री झाली, तेव्हां स्वारींनीं तें नेऊन पोस्टांत टाकिलें. त्या खेडेगांवांतून चिंतोपंतदादांच्या झणझणपुरास किंवा सुपरखाबादेस पत्र जाण्यास किती तरी दिवस लागत असत. आणि वाचकांनीं तर्क केलाच असेल कीं, हें पत्र, नांवानें ज्याची व वाचकांची ओळख आहे, अद्यापि प्रत्यक्ष नाहीं, अशाच त्या व्यक्तीनें चिंतोपंतदादास पाठविलेलें होतें. गुंडोपंत व रंगोपंत यांचें द्वंद्व युद्ध सुरू होऊन कांहीं कारणांनीं गुंडोपंतास हार खावी लागली. प्रत्यक्ष रंगोपंताच्या मार्गाआड येतां आलें नाहीं आणि त्यामुळें रंगोपंत मोठ्या खुषींत होते. त्याचप्रमाणें त्यांचीं खुषीचीं व आबादीआबादीचीं पत्रें जाऊन तिकडे चिंतोपंतदादा आणि त्यांच्या पत्नी यांचींही मनें सुप्रसन्न झालीं होतीं." आमच्या रंगूस तिथें आणलं म्हणूनच त्यानं गुंडोपंताची रग जिरवून त्याला तोंड लपवून बसण्याला लाविलं. नाहीं तर त्याच्या त्या पत्रांच्या उच्छादाला घाबरून जाऊन आपण करून घेत होतां वाटोळं ! एवढ्याकरितां माझ्या शहाणपणानं वागत जा असं मी सांगत असतें ती. " अशा तऱ्हेचे ठसकेदार उद्गार ऐकून चिंतोपंतास मोठा आनंद वाटूं लागला होता. बरेच दिवसांत गुंडोपंताकडून पत्रही गेलें नव्हतें. त्यामुळें त्या सर्व गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभवही येत होता.

परंतु पशूला त्याप्रमाणें मनुष्यालाही अतिशय चिडविलें किंवा " आतां प्राणावर बेतली, सुटण्याला मार्ग नाहीं असें दिसलें, तर हातून होईल तें करून मग तरी प्राण द्यावा. " असें वाटूं लागतें. गुंडोपंताची स्थिति तशाच प्रकारची झाली होती. इतके दिवस पड खाण्यास पूर्वीचा त्याचा जो कांहीं विवक्षित उष्मा होता तो नाहींसा झाला हेंच कारण होय. पंचतंत्रांतील उंदराच्या बिळांतला वित्तोष्मा नाहींसा झाल्याबरोबर भिक्षूच्या शिंक्यावर उडी मारण्याची त्याची शक्ति जशी गेली, तशीच गुंडोपंताचा पहिला तो उष्मा नाहींसा झाल्याबरोबर त्याची चिंतोपंतावर हल्ला करून आपण म्हणूं त्याप्रमाणें त्यास करण्यास लावण्याची उमेद नाहींशी झाली. तो उष्मा आपल्यापासून नाहींसा होऊन चिंतोपंतास लाभला अशी त्याची समजूत झाली होती. आणि म्हणूनच त्यानें पड खाली व थोडासा अज्ञातवास स्वीकारला. त्या अज्ञातवासांत त्या उष्म्याचा परत लाभ होण्यासाठीं त्यानें खटपट चालविली. तो परत लाभ कांहीं झाला नाहीं, परंतु एवढी मात्र त्याची खात्री झाली कीं त्याचा लाभ आपल्या शत्रूसही झालला नाहीं. त्याला तेवढेंच पुरे होतें. त्यानें लागलींच वर सांगितल्याप्रमाणें आपल्या पूर्वींच्या हल्ल्यास सुरुवात केली.

त्यानें आपल्याकडून पत्र अशा जोरानें लिहिलें होतें, कीं तें पत्र वाचल्याबरोबर चिंतोपंत आपल्यास तावडतोब " झाली ती चूक झाली, मी कांहीं तरी तुझ्या म्हणण्याप्रमाणें आतां नजवीज

करितों, " असेंच लिहील, असें त्यास वाटत होतें. यामुळें तो दिवस घटका मोजून पत्राच्या उत्तराची वाट पहात होता. आपल्या मनांत नानाप्रकाराचे बेत करीत होता. जितके दिवसांत पत्र यावयाचें तितके दिवस गेले, परंतु पत्र हातीं आलें नाहीं. आपली दिवसाची मोजणी चुकली असेल असें समजून त्यानें आणखी एक-दोन दिवस वाट पहाण्याचा बेत केला. दोन दिवसांनीं त्याच्या अजमासाप्रमाणें खरो-खरीच पत्राचें उत्तर आलें. आणि आश्चर्य हें कीं—पण त्याला तें आश्चर्य वाटलें नाहीं—त्यास ज्या तऱ्हेचें उत्तर येईल असें वाटत होतें, त्याच तऱ्हेचें उत्तर आलें. त्यानें लिहिलेलें पत्र पोंचल्याबरोबर दोन दिवस-पर्यंत चिंतोपंताचे घरीं एकसारखें वाग्युद्ध चाललें होतें. चिंतोपंत तें पत्र वाचतांच फार घाबरून गेला आणि अगदीं सचिंत झाला. त्याला कांहीं काम सुचेना. त्याची उदासीनता पाहून त्याच्या प्रिय पत्नीनें अर्थातच त्याबद्दल विचारपूस केली. आलेलें पत्र सांगूं कीं नको, सांगूं कीं नको, सांगितलें असतां ही त्याचें उत्तर धुडकावणी-चेंच लिहा, तसेंच लिहिलें पाहिजे, असें म्हणून कदाचित् अधिकच चिथावणीचें काम करून ठेवील, त्यापेक्षां सांगूं नये तें चांगलें. पण जें काय करावयाचें असेल तें आपण आपलें पत्र लिहून करून टाकलें व पाठीमागून इला कळलें, म्हणजे मग त्यासारखी फजिती कोणतीच नाहीं, असें वाटणाऱ्या चिंतोपंतानें "कांहीं नाहीं, कांहीं नाहीं " असें करीत आपल्या बाय-कोस सरते शेवटीं तें सांगितलेंच. आणि सांगितल्यावर अर्थातच त्याच्या पहिल्या अजमासाप्रमाणें सर्व कांहीं झालें. चिंतोपंतानें सुचविलें कीं, त्या माणसास आपल्या हातून जाऊं देऊं नये. आपण त्याला धुडकावतों खरे, परंतु कोण्या वेळेस नरडें दाबील याचा मुळींच नेम नाहीं. सरस्वतीबाई कसली वस्ताद ! ती म्हणूं लागली, " तुमच्या तुमच्या म्हण-ण्याप्रमाणं जर आजपर्यंत करूं दिलं असतं तर एव्हांना तुमचं आन् माझं दोघांचंही नरडं दाबून केव्हांच त्यानं सगळं गिळं-कृत करून टाकलं असतं. पण मी देत्यें आहें त्याला गिळंकृत करूं ! तें नाहीं. मी ह्मणतें असं त्याला लिहा, कीं म्हणावं, तुला जें काय करायचं असेल तें करून घे. आम्ही कांहीं तुला भीत नाहीं. सग-ळाच पोंचटपणा उपयोगी नाहीं. कांहीं-तरी दम धरला पाहिजे. " चिंतोपंत त्यावर तिला म्हणाले, " तूं म्हणतेस तें सगळं खरं, पण आजचं पत्र अगदीं निक-राचं आहे. तूं वाचलंस म्हणजे तुझं तुलाच समजेल. " सरस्वतीबाई ताबड-तोब म्हणाल्या, " निकराचं असो कीं बिकराचं असो. अशीं कितीक निकराचीं पत्रं मला लिहितां येतील. मला अगदीं वाचायला नको. सगळं कांहीं त्यांतलं समजून आलं आहे. " चिंतोपंत पुनः तिला आग्रहपूर्वक म्हणाले, " नव्हे. नव्हे. तूं तें पत्र वाच. तूं वाचीपर्यंत मी उत्तर लिहिणार नाहीं. " सरस्वतीबाई म्हणाल्या, " तें तर सगळ्यांत उत्तम. पत्राचं उत्तर लिहूं नये तेंच चांगलं. पक्कं दुर्लक्ष्य करणं ह्मणजे पत्राचं उत्तर न लिहिण्यानंच खरं खरं होतं. " असा वाद चालतां चालतां शेवटीं सरस्वती-बाईनें तें पत्र सबंद वाचून ऐकलें, आणि चमत्कार हा, कीं त्यांचा पहिला जो आवेश होता तो कमी झाला. त्या पत्रांत गुंडोपंतानें घातलेला धाक आणि त्या धाकाप्रमाणें वर्तन केल्यानंतर जी काय चिंतोपंताची अवस्था होईल त्या अव-

स्थेचें वर्णन इतकें भयंकर केलें होतें, कीं धाडसी सरस्वतीबाईचेंही अंतःकरण किंचित् चरकलें आणि ती त्या रात्रभर एकसारखी त्याबद्दल विचारच करीत राहिली. दुसरे दिवशीं त्या पत्राचें उत्तर काय लिहावयाचें याबद्दल तिचा विचार कायम ठरला. नवऱ्याचें व तिचें बोलणें झालें आणि तिनें असें सुचविलें, कीं या पत्राचें उत्तर अशा अशा तऱ्हेनें लिहा. रंगूला तर आतां तिकडल्या व्यवस्थेवरून दूर करतां येत नाहीं. याला त्याच्या हाताखालीं तूं काम कर, असें सांगितलें तर हा ऐकणार नाहीं. यदाकदाचित् त्यानें ऐकलें तर रंगूचें व त्याचें पटणें अगदीं अशक्य. अशा स्थितींत उत्तम युक्ति ह्मटली ह्मणजे ही कीं, त्याला, " तूं इथें येत असलास तर ये; इथें आल्याबरोबर घरांतील सर्व व्यवस्था तुजकडे देतों; आणखी हें संस्थान आहे, चार दोन महिन्यांत खासगीकडे अगर दुसऱ्या कोणत्या खात्यांत तुला लावून देतों; एकदां लागलास म्हणजे जन्माचं कल्याण होऊन जाणार आहे, " असें लिहावें. असें लिहिलें कीं, तो आशेनें येथें येईल. येथें आला ह्मणजे...परंतु ह्मणजे त्यापुढें सरस्वतीबाईनीं काय ह्मटलें तें आतांच सांगण्याची अवश्यकता नाहीं. दोघां नवराबायकोंस तो विचार पसंत पडला व त्याच विचाराबरहुकूम पत्र लिहिलें गेलें. एक दोन दिवस विचारांत गेल्याकारणानेंच पत्राचें उत्तर वेळेवर गुंडोपंतांस पोंचलें नाहीं.

गुंडोपंतांनीं पत्र वाचतांच त्यांस आपली गोळी तर लागली असें वाटलें. कारण पत्र बरेंच गौरवपूर्वक लिहिलें होतें. वर दिलेला मजकूर केवळ त्यांतील आशय मात्र. तो असा खुलवून लिहिला होता, कीं गुंडोपंत जर गुंडोपंत नसता तर तो खास असें समजता, कीं चिंतोपंत आतां सर्वथा आपल्या हातीं आला. पण गुंडोपंताच्या वयास, नानाप्रकारचीं कामें करतां करतां कितीएक पावसाळे—हिंवाळे निघून गेले होते. त्याची सगळी इच्छा ही कीं, इकडच्या इकडे जी काय दामोदरपंताची इस्टेट वगैरे आहे तिची वहिवाट आपल्या हातून व्हावी. तिकडे आपण जाऊन घरांतल्या भाजीपाल्याची आण ने करण्यांत आनंदीआनंद मानावा यांत मोठासा लभ्यांश नाहीं किंवा चिंतोपंतानें खाजगींतल्या जागेची आशा दाखविली आहे तींतही कांहीं मोठासा अर्थ नव्हे, असें त्यांच्या मनास वाटलें. यामुळें आपण दुसरें पत्र लिहून पुनः त्यांस खडकवावें कीं काय याचा त्यांनीं विचार चालविला. तोही कमी कारस्थानी पुरुष नव्हे. संथपणानें सर्व गोष्टींचा विचार करून त्यानें त्यांची ती देणगी कबूल करण्याचा विचार केला व आपण तिकडे येण्यास नाखुष नाहीं. ज्याच्याजवळ सर्व मुख्य आयुष्य घालविलें त्याच्या मुलाजवळच सर्व दिवसही काढावे, यांतच आपल्याला आनंद आहे; परंतु इतके दिवस आपल्या घराण्यांत इमानें-इतबारें नोकरी करून शेवटीं आपण अगदींच धुडकावून देऊं लागलां, तेव्हां थोडेंसें उग्र स्वरूप धरावें लागलें. मला ह्मणजे अमुकच नोकरी पाहिजे असें मुळींच नाहीं. आपल्या तेथें बोलाविलंत यांतच विशेष आनंद आहे. अस्तु. येथल्या येथेंच असतों म्हणजे सर्व सुव्यवस्था लागली असती. मुलेंबाळें घेऊन तिकडे यावयाला नको होतें. पण आपण सर्वथा आश्रय दिल्यावर त्याची काळजी मला कशाला ? हें पत्र चिंतोपंतास पावतांच आणि तें चिंतोपंतानें व सरूबाईनीं उभ-

यतांनीं वाचतांच त्यांच्या मनास परम संतोष झाला. सरूबाईनीं तर लागलीच, "कां? मीं म्हटल्याप्रमाणें झालं कीं नाहीं? ही आशा दाखवितांच स्वारी खुलली कीं नाहीं? युक्ति कुणाची?" इतकें म्हणन ती निघून गेली.

# प्रकरण ३४ व.

## आतां दुसरा मार्ग नाहीं!

आईचें हृदय म्हणजे काय चीज आहे? त्या हृदयाला सर्व कांहीं उमगतें, सर्व कांहीं समजतें. राधाबाईनें सीतारामास येतांना पाहिलें मात्र, त्याच्या चेहऱ्यावर तिची नजर गेली मात्र आणि कांहीं तरी विलक्षण प्रकार घडला आहे, मुलाच्या मनास उद्विग्नता आणणारा असा कांहीं प्रकार खचित् झाला आहे, असें तिला एकदम वाटलें. राधाबाई मोठी विदुषी नव्हती. पण ती आपल्या पुत्रावर अपत्यांवर निःसीम प्रेम करणारी आई होती. तिचें चित्तसर्वस्व आपल्या अपत्यांच्या ठिकाणीं गढून गेलेलें असे. तिला त्यांच्या मनांत, चर्येत वगैरे होणारे सर्व विकार तात्काळ कळत असत. किंबहुना अहोरात्र तिला केवळ आपल्या अपत्यांचा निजध्यास असे. वेड्यानें नानाप्रकारचे हातवारे करीत सांगितलेली ती हकीकत तिनें ऐकून घेतली खरी, परंतु सीताराम आल्या वेळेपासून तिचें चित्त त्याच्या चर्येकडे लागलें होतें. दोनदां, तीनदां त्या वेड्यानें पुनः तीच हकीकत सांगितल्यानंतर व ती हकीकत ऐकन सीतारामाच्य चर्येवर कांहीं तरी विलक्षण फरक होत आहेत, हें पाहिल्यावर तिचें औत्सुक्य जास्तच वाढलें, व तिनें हलकेच—अगदीं मृदुपणानें—त्या वेड्यास "बरं तर, आतां पुरें. मग काय तें सांग. मग पुनः मी तुला विचारीन. जा आतां तिकडे घरांत आजी काय करिते आहे पाहून ये." वेडा लागलीच गेला. "तूं गेला होतास तिकडे विशेष कांहीं झालं काय?" असें विचारण्याची राधाबाईस फार उत्कंठा झाली होती; परंतु तितक्यांत, आणखी कांहीं वेळ जाऊं देऊन जेवणेंखाणें झाल्यानंतर विचारलें तर बरें, असें तिचें तिलाच वाटून तिनें त्यास, 'कांहीं तरी विशेष झालं आहे तें मला दिसत आहे, पण आतां आपण घटकाभरानें त्याबद्दल बोलूं, असें म्हणून त्यास बोलण्याची फुरसतच ठेविली नाहीं.

पण असला आळ कधीं स्वप्नांतही आपल्यावर येईल असें त्यास वाटलें नव्हतें. असला आळ आल्यानंतर स्वस्थपणें जेवणखाण सुचणें शक्य कोठलें? पण आई

सांगेल त्यांव्यतिरिक्त वागणें त्याच्या स्वभावास अगदीं अज्ञात. एक क्षणभर, अगदीं एकच क्षण " मला कांहीं नको. जेवण नको, खाण नको. काय करायचं जेवणं ? " असल्या तऱ्हेचे त्रासातिरस्काराचे उद्गार काढून कपाळाला आंठ्या घालून कोठें तरी स्वस्थ जाऊन बसावें कोणाशीं बोलूं नये, असा विचार त्याच्या मनांत आला; परंतु तो मनांत आला नाहीं तोंच क्षणार्धांत त्याला, " पण छे ! आपल्या आईला काय वाटेल ? आपण अशा तऱ्हेनं वागलों तर ती काय ह्मणेल ? आपण जेवलों नाहीं तर ती कशी जेवील ? " असे विचार मनांत येऊन त्या वयानें धाकट्या परंतु विचारानें वृद्ध अशा मुलानें आत्मसंयमन केलें; मुकाट्यानें आईनें सांगितल्याप्रमाणें जेवणखाण आटोपलें आणि तो आपल्या वाचावयाच्या खोलींत स्वस्थ जाऊन पडला. थोडा वेळ झाला न ।ही तोंच त्याची आई त्याचेजवळ ग.ली आणि हलकेच त्याच्या डोक्यावर तिनें हात ठेवून, " तूं असं कां करतोस ? तुझ्या मनाला दुःख होण्याजोगी कोणती गोष्ट झाली ? " असें विचारलें. हा प्रश्न विचारतांना तिचा स्वतःचा कंठ अत्यंत सद्गदित झालेला होता आणि तिचा तो प्रश्न ऐकल्याबरोबर रडण्याचा उमाळा आंतल्या आंत दाबून ठेवणें अशक्य झाल्यामुळें सीताराम ओक्साबोक्शीं रडूं लागला. हें पाहतांच तिलाही तिचे अश्रु आवरेनात. कांहीं तरी बोलावें आणि त्याचें समाधान करावें असें तिला अत्यंत वाटे; परंतु तोंडांतून एक शब्दही उच्चारवेना. सीताराम तिच्या हातावर डोकें टेंकून फारच हृदयद्रावकपणें रडत होता. फेअरब्रेनसाहेबांच्या समोर असल्या वेळेपासून आतांपर्यंत जितक्या जोरानें त्यानें आपले अश्रु, त्यानें आपले हुंदके दाबदाबून ठेविले होते, तितक्या जोरानें ते आतां उसळून बाहेर पडले. राधाबाईस एक तर बोलवेना आणि दुसरें, तिनें असा विचार केला, कीं या वेळीं क्षणमात्र आपण न बोलावें तेंच चांगलें. पाण्याचा ओव ओसरल्यानंतर मगच बंधारा घालण्याचा यत्न केला असतांना तो सिद्धीला जातो. आई व दादा आंत रडत आहेत, हें पाहातांच इतर मुलें अगदीं चपापून दूर दूर राहून हलके हलके कानोसा घेऊं लागलीं.

थोडा वेळ गेला. राधाबाईस बोलण्यास हा अवसर चांगला आहे असें वाटलें आणि तिनें त्याप्रमाणें पुनः एकदां " तुझ्या एवढ्या या दुःखाचं कारण तरी काय ? " असें विचारलें. त्याबरोबर " आई, देव आपल्या बऱ्यावर नाहीं. भल्या तऱ्हेनं वागेल, सरळपणानं राहील त्याला तो कधीं यश देत नाहीं," असें सीताराम बोलला.

परमेश्वराच्यासंबंधानें असले कुविचार व दुरुद्गार सीतारामाच्या तोंडून निघाल्याची ही पहिलीच वेळ होय. राधाबाई ही मोठी विदुषी नव्हती. तिनें मोठमोठाल्या धर्मपुस्तकांचें अध्ययन केलेलें नव्हतें. इतर चार स्त्रियांप्रमाणें तीही धर्मभोळी, देवावर पक्की श्रद्धा ठेवणारी अशी होती. ' इतर चार स्त्रिया ' हे शब्द या ठिकाणीं निरर्थक होत. कारण इतर चार स्त्रियांपेक्षां तिची परमेश्वराच्या ठिकाणची श्रद्धा विशेष जागृत होती. जें काय या जगांत वाईट होतें तें आपल्याच पूर्वकर्माचें फळ. परंतु तें फळ भोगावितांनाही परमेश्वर त्याच्यापासून पुढें आपलें बरें होईल, अशीच तजवीज ठेवीत असतो, ही तिची पूर्ण श्रद्धा. परमेश्वर जें काय

करतो, तें तितक्या वेळेपुरतें जरी आप-ल्यास वाटलें, तरी वस्तुतः तें तसें नव्हतें, ही बुद्धि तिच्या मनांत सदैव जागृत असून तशीच बुद्धि आपल्या मुलांचें ठिकाणीं निपजावी अशाबद्दल तिचा नेहमीं प्रयत्न चाललेला असे. सीतारामाचे तोंडून वर सांगितलेले हे अश्रद्धेचे उद्गार निघालेले ऐकून तिनें त्यास चट्कन् निषेधलें आणि ती त्यास ह्मणाली " छत् ! छत् ! हें असलं बोलूं नये. परमेश्वराच्या मनांत काय आहे आणखी काय नाहीं हें तुला काय समजणार ? मनाला वाईट वाटण्याजोगं कांहीं झालं तर त्याच्यावर जास्ती श्रद्धा, आपला सर्व भार त्याच्यावर टाकून उद्योग करावा, कीं असले हे भलतेच उद्गार काढावे ? आपल्यावर एका मागून एक संकटें येत आहेत, गोष्ट अगदीं खरी, पण तीं संकटें येण्याला आपण तसेच त्याचे अपराध केले नसतील ह्मणून कशावरून ? काय झालं मला सांग. असे वेड्यासारखे विचार मनांत सुद्धां आणूं नकोस. "

क्षणमात्र सीताराम कांहींही बोलला नाहीं. त्यास " परमेश्वरानें आपल्यावर असा प्रसंग काय ह्मणून आणावा ? आपण खरोखर तसा प्रसंग आणून घेण्यास केलं तरी काय ? " हें त्यास कांहींसुद्धां उम-जेना. " आपला वडील भाऊ ज्यानें सर्वस्वी आपल्याला बुडविलें, आपल्या आईच्या अब्रूवर सुद्धां ज्यानें उठण्यास कमी केलें नाहीं, त्याची मात्र भरभराट व्हावी, त्याला कोठें संस्थानांत मोठ-मोठाल्या जागा मिळाव्या, संपत्तीनेंही त्यास अधिकाधिकच हात द्यावा, आणि आपल्या आईनें कधीं कोणास कठोर शब्दानें दुखविलेंही नाहीं किंवा कधीं कोणाचें समजून उमजून किंवा न समज-तांही नुकसान केलें नाहीं, कधीं कोणा-बद्दल वाईट बुद्धि धरली नाहीं, तिजवर असल्या तऱ्हेचे भयंकर प्रसंग ओढवावे, तिला दारिद्र्यानें गांजावें आणि तशाही स्थितींत सुखासमाधानानें आमच्या जिवा-वर ती ओली कोरडी भाकर खाऊन दिवस कंठीत असतां माझ्यासारख्या अभा-ग्यावर असले हिडिस आरोप यावेत—असे आरोप कीं त्यांतून पार पडून आपला भलेपणा लोकांच्या नजरेस आणणें सुद्धां मोठें मुष्किलीचें काम व्हावें, हा परमे-श्वराच्या घरचा न्याय ह्मणावा तरी कसा ? " असे विचार त्याच्या मनांत सकाळपासून अनेक वेळां उभे राहिले आणि शेवटीं आईनें प्रश्न विचारतांच ते बाहेरही पडले. काय प्रसंग झाला आणि मुलाचें चित्त इतकें उद्विग्न कां झालें, याचें अद्यापि तिला कांहींच अनुमान करतां येईना आणि पुनः पुनः मुलास विचारावें तर तो अगदीं बिथरल्यासारखा दिसला. पुनः तिनें थोडा वेळ जाऊं दिला आणि मग हलकेच ती त्याला म्हणते, " पण तूं झालं काय तें मला मुळींच सांगितलं नाहींस. असं कां ? " सीताराम कांहीं वेळ थांबला आणि नंतर त्यानें हलके हलके फेअरब्रेनसाहेबांच्या घरीं झालेली सर्व गोष्ट तिला सांगितली. तिनें शांतपणें सर्व ऐकून घेतलें आणि तिलाही ती हकीकत ऐकून अतिशय आश्चर्य वाटलें. आपण करावयाला गेलों काय आणि हें तिसरेंच त्यांतून उपस्थित झालें काय असें मनांत आलें आणि ती त्यासंबंधानें किती वेळ तरी विचार करीत होती. " आपल्या मुलावर अशा तऱ्हेचा विल-क्षण आरोप यावा आणि त्यांतून बाहेर निघण्याचा मार्ग कांहीं एक दिसूं नये, हें किती चमत्कारिक ! साहेबानं तरी विचार

न करतां त्यांच्यावर एवढा गहजब काय ह्मणून करावा ? त्यानं असं कुकर्म केलं असेल असं वाटण्याला इतकं कारण तरी काय झालं असावं ? नोट चोरीला गेली आणि हा तिथें होता एवढ्याचवरून इतक्या स्पष्टपणें त्याच्यावर आळ घेऊन त्याची इतकी नालस्ती तरी कां करावी ?" असे अनेक प्रश्न तिच्या मनांत उभे राहिले. फेअरब्रेनसाहेबांस संशय घेण्यास कारणें काय काय झालीं तीं सर्व तिला कोठें ठाऊक झालीं होतीं ? साहेबांची नोट शिपायानेंच खास नेली, असें असून ती आपल्या पोरानें नेली असें त्यास कां वाटावें? आपल्या पोरापेक्षां शिपायावर त्याचा जास्त विश्वास असावा काय ? इतका आपल्या मुलावर गैरविश्वास काय म्हणून व्हावा ? असेही प्रश्न तिच्या मनांत आले. नोटींचा कांहीं घोंटाळा झाला आणि तो या विलक्षण आरोपास कारण झाला हें तिच्या मनांत मुळींच आलें नाहीं. कसें येणार ? प्रत्यक्ष सीतारामासही तें एक अद्यापि गूढच होतें. आपण पुढें केलेली नोट पाहातांच साहेबानें इतकें त्वेषानें कां उठावें ? आणि त्वेषानें कां बोलावें ? नोटीकडे पाहून ' हेंच तें कारण ! ' असे शब्द कां उच्चारावे ? एकंदरींत नोट त्यांनीं स्वतःच आपल्यास आपल्या पत्रांत घालून पाठविली असतां आतां त्या नोटीवरून इतकें कां संतापावें ? या कशाचाही त्यास पुरतेपणीं उलगडा होईना. मग त्याच्या आईस तरी तो कसा व्हावा ? तिचा विचार एक. " साहेबानं केवळ अविचार करून आपल्या पोरावर तोहमत घेतली. चौकशी करावयाची ती केली नाहीं. आपल्या या आरोपानं पोराचं काय नुकसान होईल त्याचा त्यानं विचार केला नाहीं. एकंदरींत झाली ही गोष्ट केवळ त्याच्या अविचारानंच झाली. परंतु याला आतां इलाज काय ? फेअरब्रेनसाहेब त्याच्यावर जो लोभ करीत होते, तो जरी नाहींसा झाला तरी तितकें नुकसान नाहीं. त्याच्यावर जो आरोप आला आहे हा आरोप साफ नाहींसा झाला पाहिजे. तो कसा होणार ? तो काढून टाकण्यास युक्ति काय ? केवळ आपण ' नाहीं ' म्हणून साहेबाचं मन पुनः शुद्ध होणार नाहीं. " इत्यादि विचार त्या साध्वीच्या मनांत एकसारखे घोळत होते आणि तो गरीब मुलगाही स्वस्थपणें झाल्या गोष्टीबद्दल विचार करीत होता. विश्वनाथपंतास ही गोष्ट सांगावी कीं नाहीं ? त्याची सल्ला आपल्यास कशी मिळेल ? त्यांना ही गोष्ट सांगितली असतां काय वाटेल ? वगैरे विचारही त्याच्या मनांत आलेच आणि स्वाभाविकच ही गोष्ट कोणाजवळ बोलूं नये असें त्यांस वाटलें, पण जर बोलूं नये तर तिचा प्रतिकार कसा करावा ? इतक्यांत त्याच्या मनांत एकदम एक विशेष प्रकारचा विचार आला. त्यानें आपल्या आईकडे पाहिलें आणि तिला ह्मणतो, " आई, जी नोट मूळ माझ्या पत्रांत होती ती नोट मीं त्यांना नेऊन दिलेली होती. त्या पोरांनीं मला मध्यें अडवून भास्करभाऊनं तो लखोटा फोडून आपल्याजवळ दोन दिवस ठेविला होता. त्या वेळीं नोटीच्या बाबतींत कांहींना कांहीं तरी घोंटाळा झाला. मीं आतां आलों तेव्हां आपला हा गोंदू हातवारे करून काय सांगत होता ? कुठल्या नोटीची गोष्ट सांगत होता. रंगूकाका भास्करभाऊला कां मारीत होता, म्हणून म्हणत होती. शिपायाचं नांव मध्यें कसलं काढीत होता. तिथें कांहीं तरी घोंटाळा झाला खास. तें काय तें जर कळलं, तर या गोष्टीचा

तेव्हांच निकाल होईल. तो जें सांगत होता त्यांत कांहींना कांहीं तरी तथ्य असलं पाहिजे यांत कांहीं शंका नाहीं. कोणा शिपायानं साहेबांची नोट चोरून रंगोपंताकडे आणून ठेविली नसेलना ? आणखी ती त्या भास्कराच्या हाताला लागून त्यानं नोटीची अदलाबदल केली नसेलना ? ”

जों जों हे प्रश्न तो विचारूं लागला, तों तों त्यांच्या समर्पकपणाबद्दल व संभवनीयतेबद्दल त्यास अधिकाधिक खात्री वाटूं लागली. होतां होतां आपला तर्क खरा असला पाहिजे अशाबद्दल त्याच्या मनास खात्री वाटूं लागली; परंतु त्या गोष्टीचा निकाल व्हावा कसा ? तो होण्यास मार्ग काय ? त्यांच्या घरची इत्थंभूत बातमी लागावी कशी ? आणि ती जर न लागली, तर आपल्या मनांत जें आहे तें आपल्यास बाहेर बोलून तरी कसें दाखवितां यावें ? आणि बोलूनच दाखवितां येईना तर आपला निरपराधीपणा सिद्ध तरी कसा करतां यावा ?

असे एकामागून एक कित्येक विचार त्याच्या मनांत आले. आपली आई कांहींना कांहीं तरी आपल्यास विचार सुचवील असें वाटून तिच्याकडे वळून ह्मणतो, “ आई, मी ह्मणतों हीच गोष्ट खरी.त्या भास्करभाऊकडूनच हा नोटींचा घोंटाळा कांहीं तरी झाला असावा. नाहीं तर साहेबांना त्या नोटीबद्दल शंका कशी यावी ? जी त्यांची नोट चोरीस गेली ती नोट आपल्या हातीं येऊन आपण अजाणपणानें परत केली. अशी कांहीं तरी विलक्षण शंका घेण्याला जागा असल्याखेरीज साहेबही इतक्या बेतावर येणार नाहींत. आपल्या पत्रांत असलेली नोट आपण परत न करतां चोरीची नोट आपल्या हातून परत केली गेली, तेव्हां साहजिकच त्यांना शंका आली असेल खरी, कीं चोरीस गेलेली नोटही यानंच चोरली आणखी ती चुकून लक्ष्यांत न राहून आपल्याकडे परत दिली. नाहीं तर चोरीस गेलेली नोट याच्या हातीं यावी कशी ? दुसऱ्या कोणीं जर चोरली तर तिचा थांग लागूं नये. याच्या हातीं कशी लागावी ? बरोबर ! साहेबांच्या मनांत असेच सगळे विचार आले असले पाहिजेत. शिवाय नोट चोरीला गेली तेव्हां मी तेथें होतों. बस्स ! आई, आतां दुसरा मार्ग नाहीं. ती चोरीची नोट आपल्या हातीं कशी आली याचा तलास लाविला पाहिजे. तो लागला कीं, आरोपांतून मी मुक्त झालोंच. त्यांत शंका नाहीं. मला तर आणखी अशी खात्री वाटते कीं, पगार आणून देणारा शिपाई चोर असावा. शाबास. या आपल्या—आपण त्याला वेडगळ समजतोंना ? पण त्याच्या बोलण्याचाच उपयोग होणार.—आई, मी त्याला बोलावतों. त्याच्यापासून सगळी गोष्ट पुनः ऐकून घे तूं. आणखी मनाची जर खात्री झाली, तर मी बेलाशक आपल्या तर्काचें पत्र साहेबांस लिहून शिपायाबद्दलचा आपला वहीम त्याला कळवतों. दुसरा मार्ग काय ? रंगूकाकाकडे जाऊन तिथें चौकशी करून थोडीच माहिती लागणार आहे ? जें आपल्याला पक्कं वाटेल तें सरळपणानं कळवणं एवढंच आतां आपल्या हातीं आहे. साहेबांचा लोभ गेल्याचं मला कांहीं सुद्धां वाटत नाहीं. प्रत्यक्ष बाबासुद्धां सोडून गेले तरी चालायचं तसं देवाच्या दयेनं चाललं आहे. पण असला आरोप ! ”

# प्रकरण ३५ वें.

## निराकरण.

या नवीन उदय पावलेल्या किरणांनीं सीतारामाचें मुख सतेज दिसूं लागलें. जों जों त्यासंबंधानें अधिकाधिक विचार त्याचे मनांत येऊं लागले, तों तों त्यास अधिकाधिकच खात्री वाटूं लागली. त्यानें गोंदूस हांका मारल्या. आणि पुन: एकदां त्याला, "तूं आज कोठें गेला होतास ? काय पाहिलेंस ?" असे प्रश्न केले. मग काय विचारतां ? त्या वेड्यास अत्यानंद होऊन त्यानें आपली हकीकत जितक्या उत्साहानें सांगवेल तितक्या उत्साहानें सांगण्यास प्रारंभ केला आणि पहिल्यापेक्षांही नानाप्रकारांनीं हातवारे करून एकंदर हकीकत वारंवार तेंच तें बोलून सांगितली. सीताराम सूक्ष्म दृष्टीनें त्यांतून आपल्यास उपयोगी असें काय काय आहे तें सर्व लक्ष्यपूर्वक मनांत घेत होता. एक दोन गोष्टी या वेळीं त्यानें अधिक सांगितल्या. त्या प्रथमत: सकाळीं त्याच्या सांगण्यांत आल्या नव्हत्या. जणूं काय दादाला हकीकत सांगण्याचे वेळीं ती आठवून सांगतां येईल तितकी सांगितली पाहिजे, असें पक्कें मनाला वाटून तो आठवण करकरून त्यास सांगत होता. सगळ्यांत बहार त्यानें केली, ती प्रथमत: रंगूकाकाच्या मारण्याच्या आविर्भावाची ! मग पंड्याजींनीं चपराक मारिली असतां घाबरून जाऊन रडूं लागलेल्या भामट्या भाऊची, मध्यें मध्यें 'शिपाई नोट चोलला' हीं अक्षरें- हीं कित्येक वेळां वारंवार वारंवार त्याचे तोंडीं आलींच. सीताराम एकंदर सर्व मन:पूर्वक ऐकून घेतो आहे आणि हंसतो आहे, हें पाहतांच त्यास अधिकच उत्तेजन आलें. जी गोष्ट दादास आवडते ती करण्याविषयीं स्वारीस नेहमींच स्फुरण चढावयाचें आणि एक वेळ राधाबाईनें सांगितलेल्या कामाचा अव्हेर होईल, परंतु दादांनीं सांगितलेल्या कामाचा अव्हेर कधींच होणें नाहीं. सीतारामाची आतां पक्की खात्री झाली. त्यांत त्याच्या मनास तरी शंका राहिली नाहीं. आणि एकवार जी आपली खात्री झाली, तिजविषयीं स्पष्टपणें फेअरब्रेनसाहेबांस लिहून कळवावें असा त्याच्या मनाचा निश्चय झाला.

परंतु आपल्यास शंका आली आहे, त्यापेक्षां अधिक कांहीं तरी खात्री होण्याजोगा पुरावा मिळाल्यास पाहावा. दोन तीन दिवस मुकाट्यानें वाट पाहावी, एकदम कांहीं तरी लिहिल्यास व तें शेवटीं खरें न ठरल्यास आणखी तिसरें कांहीं तरी होणार असें वाटून त्यानें तीन चार दिवस वाट पाहाण्याचा विचार केला. जास्त कांहीं माहिती मिळेल ही उगीच आशा होती. प्रत्यक्ष त्या घरीं जाणें तर आपल्यास शक्य नाहीं. मग जाऊन

विचारणें कोठलें ? पण न जाणों, शाळेंत किंवा कोठें तरी कांहीं तरी कांहीं गोष्टी कानांवर आल्या तर संभव आहे, असें म्हणून त्यानें दोन तीन दिवस थांबण्याचा बेत कायम केला. सोमवारचे दिवशीं त्याच्या आशेप्रमाणें त्यास कांहींच कळलें नाहीं व मंगळवारच्या दिवशींही तसेंच झालें. पण बुधवारीं अचानक त्यास एक भांडण ऐकण्यास सांपडलें. भास्करभाऊ दोन दिवस शाळेंत आला नव्हता. तिसरे दिवशीं बुधवारीं आला आणि पंड्याजींचीही तेच दिवशीं शाळेंत येण्याची पाळी आली. भास्करभाऊनें जो दोन दिवसांपूर्वी मार खाल्ला होता त्या मारानें बिचाऱ्याची खोडकीच जिरली होती. एक दोन ठिकाणीं त्यास खोंकाही पडलेल्या होत्या. त्या खोंकांस लाजूनच त्यानें शाळेंत न जाणें केलें होतें. दोन दिवस साधलें, कारण शाळेच्या वेळापूर्वीं रंगूकाका बाहेर जात असत आणि संध्याकाळीं पुष्कळ उशीर झाला तरी येत नसत. एदुलजी पारशाशीं त्यांचें काम असे. परंतु तिसरे दिवशीं भास्करभाऊंची दोन दिवसांची बुटिस त्यांच्या कानांवर गेली आणि पुनः भास्करभाऊंची पांचावर धारण बसण्यासारखी स्थिति झाली. कां कीं, 'चोऱ्या करूनच्या करून पुन्हां शाळेंत जात नाहीं, हरामखोर !' असें दरडावून रंगूकाकांनीं उग्र स्वरूप धरिलें. त्याबरोबर स्वारीनें दप्तर खाकेंत मारून यःपलायनच केलें. त्या खोंका स्पष्टपणें दिसतच होत्या. त्या खोंका मुलांस दिसतील आणि तीं मुलें मग त्यांबद्दल आपल्यास विचारूं लागतील तर त्यांस काय उत्तरें द्यावीं, या विचारांत स्वारी होती. एखाद्या मोठ्या माणसानें चोपल्याचें कधीं इतकें वाईट वाटत नाहीं, इतकें एखाद्या लंगोटी सोबत्यानें त्याचें कारण विचारलें असतां होतें. चोप खाण्याचा अपमान कांहींच नाहीं, पण तो चोप कां खाल्ला हें दुसऱ्याला—त्यांतून आपल्या बरोबरीच्याला-कळलें असतां जो अपमान वाटतो तो कांहीं विलक्षणच ! अशी स्थिति लहानपणींच काय, सर्वपणीं असते. असो; वर सांगितल्याप्रमाणें भास्करभाऊंची स्वारी काळजींत असतां, ज्याच्या कानावर थोडीशी कुणकुण आली होती, अशा एका मुलाचें लक्ष्य त्या खोंकांकडे जाऊन त्यानें " अरे बाप रे, भास्कर, तुला कुठं रे लागलं एवढं? पडलास वाटतं कुठं ? " असें लबाडीनें विचारलें एखादा भुकेलेला कोल्हा भक्ष्य शोधण्याच्या गडबडींत असतां एखादी कोंबडी नजरेस पडली ह्मणजे जशी त्याची स्थिति होते, तशीच खोंकांबद्दल विचारणाऱ्या मुलास सांगण्याजोगें कारण शोधणाऱ्या त्या भास्कराची स्थिति झाली होती. " पडलास वाटतं कुठं ? " हे शब्द कानांवर पडले मात्र आणि एकदम त्यानें त्यावर झडप मारून, " हो बाबा ! आमच्या मागल्या माडींतल्या जिन्याच्या वरच्या पायरीवर जो परवां घसरलों एकाएकीं आंगठा मुडपून, तो धडपडत धडपडत अगदीं खालच्या दगडाच्या दोन पायऱ्यांवर जाऊन हापटलों. डोक्याला दोन ठिकाणीं लागलं. मान लचकली होती. पाय मुडपला होता. गुडघ्याच्या या नळ्या फुटल्या होत्या. आतां खपल्या धरल्या आहेत..... " ही सर्व बाढालाखोची चालली असतां पंड्याजी जवळच होते, त्यांना भास्करभाऊ वारंवार वारंवार डोळ्यांनीं खुणा करून विनवीत होते कीं, आपण कृपा करून या बाबतींत आतां बोलूं नये. पण पंड्याजी—त्याच्याशीं आतां अबोला धरलेला—ते अशा वेळीं

ऐकतात ? प्रथम निमुटपणें त्याला काय सांगायचें तें सांगितलं आणि मग जें त्यानें तोंड सोडलं आहे ह्मणतां, त्याला कांहीं सुमारच नाहीं. " अरे चोरा, भामट्या, चोऱ्या करण्याबद्दल, दरवडे घालण्याबद्दल फटके खाऊनच्या खाऊन पुनः असल्या बढाया मारतोस का ? तुझी साऱ्या शाळेंत लेंका धिंड काढली पाहिजे तेव्हां तुला समजेल काय आहे तें ! हरामखोर आणखी माझं नांव घेत होता ! परवां काकाच्या देखत जशी बत्तिशी तडतडावली तशी तडतडावतों पुनः आतां. " पुनः त्याचें मानगूट धरून त्यानें त्याला उभें केलें. इतक्यांत त्यांच्या स्वतःच्या वर्गातल्याच नव्हे, तर इतर कित्येक वर्गांतल्याही कित्येक मुलांची गर्दी जमली. शाळा सुरू होण्यास अद्यापि थोडा अवकाश होता. मुलांना काय, कोठें कांहीं ' फुर्र ' झालें कीं ' टुर्र ' करण्यास ते नेहमीं एका पायावर तयार असतात. त्यातून या वेळीं मोठी आश्चर्याची गोष्ट ही होती कीं, पंड्याजी आणि भास्करभाऊ जे केवळ शाळेंत एकमेकांस पदार्थ आणि छायेप्रमाणें, ते मारामारी करण्यास सिद्ध झाले आहेत; जे पंड्याजी भास्करभाऊचा कैवार घेऊन वाटेल त्या गड्याशीं मारामारी करण्यास सिद्ध होत, ते आज त्याचेंच मानगूट धरून त्याला शिव्या देत होते. जों जों मुलें जमूं लागलीं, तों तों त्यांस तर चेव आला. ते मार हातवारे करून मुलांना मोठमोठ्यानें सांगूं लागले. " पहारे ! हा भामट्या दरवडेखोर पहा ! याला पैशा दोन पैशाच्या आणि रुपया आठ आण्यांच्या चोऱ्या पुरेनाशा झाल्या. हा आतां पन्नपन्नासाच्या नोटा चोरूं लागला आहे. परवां, त्या बिचाऱ्या सीतारामाच्या पत्रांतली नोट चोरून यानं आपल्या काकाच्या तोंडाला काळोखी फांसली. आणखी परवां काकाजवळ कोणी शिपायानं ठेवायला म्हणून आणून दिलेली पन्नासाची नोट चोरून हरामखोर माझ्यावर आळ घालायला पहात होता. " हे शेवटले शब्द पंड्याजींनीं दांतओंठ खाऊन उच्चारले आणि मानगूट धरलेली बेचक अशा तऱ्हेनें दाबली, कीं भास्करभाऊंचे डोळे पांढरे होण्याची अवस्था झाली. या घोळक्यांत साहजिकपणें सीतारामही होता; व त्याच्या कानीं ते सर्व शब्द पडले. एका अर्थीं त्यास फार आनंद झाला. परंतु भास्करभाऊची ती स्थिति पाहून मनास वाईटही वाटलें. पंड्याजीची चर्पटपंजरी चाललीच होती. " या नोटा मिळवून त्यांचा संभाळ करण्यासाठीं आमच्या भास्करभाऊंना किती तरी संकटं सोसावीं लागलीं आणखी लढाया माराव्या लागल्या. हें पहा ! किती ठिकाणीं तरी त्यांस केवढाले वार सोसावे लागले आहेत ! " असें म्हणून त्यानें त्याच्या खोंकांचें सगळ्या मुलांस प्रदर्शन केलें; आणि भडाभडा त्याच्या दोन चार तोंडांत भडकावून मुलांस हुर्यो करण्यास लावून त्यास सोडून दिलें. आपला परमस्नेही उलटला असतां काय अवस्था होते, याचें हें उत्कृष्ट उदाहरण त्या भास्करभाऊच्या अनुभवास आलें. त्याची काय अवस्था झाली असेल याचें वर्णन करण्याची आतां जरूरी राहिली नाहीं. पंड्याजीचें पारडें आतां फिरलें. तो भास्करभाऊचा अतिशय तिरस्कार करूं लागला, आणि त्याच मानानें सीतारामाविषयीं त्याचा आदर वाढला.

तीन दिवस थांबल्याचें सीतारामास फळ मिळालें. वेड्या गोंदूच्या हकीकतीवरून केलेल्या तर्काप्रमाणें सर्व गोष्टी हुबेहूब घडल्या असल्याबद्दल त्याच्या मनाची खात्री झाली; आणि शाळेंतून सुटतांच त्यानें आपले आईस शाळेंत झालेली सर्व हकीकत सांगितली. आईला अर्थातच फार बरें वाटलें. फेअरब्रेनसाहेबांस स्पष्टपणें सर्व खुशालाचें पत्र पाठविण्याचा निश्चय झाला. त्यांत बऱ्यांत बरें हें झालें कीं, फेअरब्रेनसाहेबांस वाइल्डसाहेबांचे घरीं सांगितल्याप्रमाणें सिस्टर च्यारिटीनेंही राधाबाईंचे घरीं येऊन त्या बाबतींत विचारपूस केली. सिस्टर च्यारिटीस पाहतांक्षणींच राधाबाईस केवढा दुःखाचा उमाळा आला असेल व त्यावरून सिस्टर च्यारिटीनें तिचें कसें सांत्वन केलें असेल, हें आतां येथें सांगण्याची अवश्यकता नाहीं. सिस्टर च्यारिटी ज्या तपासासाठीं आली होती, त्याबद्दल बोलणें होऊन तिला सर्व हकीकत कळतांच फार आनंद झाला. सीतारामाच्या हातून असला नीच अपराध घडला असेल, हें तिला स्वप्नांतसुद्धां खरें वाटलें नव्हतें, आणि आपल्या वाटण्याप्रमाणेंच वस्तुस्थिति आहे हें पहातांच तिच्या मनाची वृत्ति फार उल्लसित झाली. पत्र लिहिण्यापूर्वीं मला उद्यां येऊन भेटण्यास सीतारामास सांगावें, मी सांगेन तसेंच त्यानें पत्र लिहावें, असा निरोप राधाबाईजवळ सांगून सिस्टर च्यारिटी तेथून गेली. शनवारीं तिच्या निरोपाप्रमाणें सीताराम तिच्याकडे गेला आणि तिनें सांगितल्याप्रमाणें पत्र लिहिलें. तें पत्र सिस्टर च्यारिटीनें आपल्याजवळ घेऊन आणखी त्याबरोबर एक पत्र लिहून फेअरब्रेनसाहेबांकडे लखोटा रवाना केला.

तीं पत्रें फेअरब्रेनसाहेबांस वज्रघाताप्रमाणें परंतु आनंदकारक अशीं झालीं. त्यांच्या मनांत नसतांही निवृत्ति झाली, व मग त्यांचें मन त्या निवृत्तीमुळें आनंदित व झाल्या अविचारामुळें अनुतप्त झालें.

# प्रकरण ३६ वें.

## खूपखाबादस.

चिंतोपंतदादा बुलिस्नीकसाहेबांचे केवळ गळ्यांतील ताईत अशी जिकडे तिकडे समजूत होऊन गेली होती. आठ चार दिवस झाले नाहींत, तों चिंतोपंताची स्वारी साहेबमजकुरांचा कॅम्प असेल तेथें हटकून जावयाची. अद्यापि संस्थानांत त्यांचा पाय पक्कासा शिरला होता, असें नाहीं. बुलिस्नीकसाहेबांच्या जोरावर त्यास संस्थानांत प्रवेश मिळाला होता. या संस्थानांतून, संस्थानांतला मूळचा रहिवासी इसम नाहीं असा नोकर आला आणि तो रेसिडेंटसाहेबांच्या अगर पर-

प्रांतस्थ कामगाराच्या वशिल्यानें आलेला असला, ह्मणजे हा कोणी तरी बातम्या काढून चहाड्या करण्यासाठीं इसम आणलेला आहे अशी नेहमीं संस्थानांतील लोकांची समजूत होत असते; आणि ही केवळ निरर्थकच असते असें नाहीं. त्यांतून असा एखादा माणूस खाजगीमध्यें अगर संस्थानाच्या अधिपतीच्या नजीक राहील अशा बेतानें त्याची योजना झाली. व खुद्द संस्थानिकास तो इसम नको असें ह्मणण्याची ताकद नसली, म्हणजे एक संस्थानचे बारा वाजले असें तरी समजावें, किंवा संस्थानच्या खजिन्याचें तळपट उडून तो दुसऱ्या कोठें तरी गेला असें समजावें, अशी आपली येथील लोकांची समजूत होती. आमच्या संस्थानांत योग्य व बुद्धिमान् माणसें असून मोठमोठ्या अंमलदारीच्या व जबाबदारीच्या जाग्यांवर त्यांच्या नेमणुका न होतां अगदीं दूर अशा प्रांतांतून माणूस आणून आपल्या उरावर कां बसविला जावा. या गूढ कोड्याचा लोकांस उलगडा होत नाहीं. त्यांतही आमच्या चिंतोपंतांसारखा माणूस घुसडविला असतां लोकांस दुसरी कांहीं शंकाच येत नाहीं. याचें हजार वेळां साहेबांकडे जाणें; जेथें आपलें कांहीं काम नाहीं अशा ठिकाणीं नको नको असें लोकांस झालें असतांही यानें बळेंच आपलें नाक खुपसणें; नेहमीं "कायहो, अमुक गोष्टीचं काय झालं ? अमुक इसम कोठं गेला ? अमक्या प्रकरणाची व्यवस्था कशी काय झाली ?" अशा प्रत्यक्ष किंवा परोक्ष रीतीनें चौकशा करीत असणें; आणि त्याही चौकशा फार बारकाईनें करून नेहमीं बातम्या काढण्याच्या पाळथीवर असणें, इत्यादि गोष्टी असलेल्या व्यक्तीविषयीं संशय घेण्यास सबळ कारणें होत, यांत शंका नाहीं. असले लोक म्हणजे चाणक्यनीतिरूप इमारत उठविण्यास लागणाऱ्या मजूरदारांपैकींच होत. असो.

या संस्थानांत चिंतोपंतांचा पाय शिरकला, इतकेंच नव्हे तर त्याच्या पत्नीच्या इच्छेप्रमाणें त्याची एकंदर व्यवस्थाही लागली. परंतु संस्थानांतील मूळच्या लोकांपैकीं एकही माणूस त्याच्याशीं बऱ्या तऱ्हेनें वागत नव्हता. पण थोरांचें पाठबळ असलें ह्मणजे मग काय, लुंग्यासुंग्या लोकांस कोण भीक घालतो ? ही गोष्ट मनांतली झाली. परंतु बाह्यतः चिंतोपंतानें तसें वर्तन कधींही केलें नाहीं. त्यानें कधीं कोणास आपण तुच्छ मानतों असें दाखविलें नाहीं. नेहमीं लहानापासून मोठ्यापर्यंत संस्थानांतील मंडळीस त्यानें फार अदबीनें वागवावें. कोणी कसाही येवो, 'आपण' 'आप' इत्यादि शब्दांखेरीज त्यानें कोणास संबोधिलें नाहीं. ज्याच्या त्याच्या पोटांत शिरून व आपण अगदीं नम्रता धारण करून त्यानें आपली वर्तणूक ठेविली. या वर्तणुकीचा त्यास कोणच्या तऱ्हेनें उपयोग झाला हें आतांच सांगतां येत नाहीं. वाचकांस पुढें कळेल. सध्या इतर संबंधांत थोडीशी हकीकत देतों.

खूपखाबाद हें संस्थानाचें मुख्य ठाणें होय. नबाबाची राजधानीच ती. उत्तरहिंदुस्थानांतील सर्व शहरांप्रमाणें हें शहर चांगलें शोभिवंत होतें. राजरस्ते मोठमोठाले असून सोंगट्यांच्या पटाप्रमाणें पसरलेले होते. नबाबास जनानखान्याबाहेर कांहीं पाहण्यास फारसा अवकाश सांपडत नसे ही गोष्ट खरी, तरी पण शहराची व्यवस्था अमुक एक प्रकारची असावी असें एक वेळ त्यांच्या डोक्यानें घेतल्याकारणानें लोकांचें थोडेंबहुत नुकसान झालें

तरी शहराच्या मुख्य भागाची दुरुस्ती त्यांनीं आपल्या लहरीप्रमाणें करून घेतली. मग त्यांत कोणाचें काय नुकसान झालें, कोणावर कसा जुलूम झाला, कोणाचीं घरें पाडावीं लागलीं, इत्यादि गोष्टींचा अर्थात् विचार झाला नाहीं. मनांत आणलेलें कार्य पार पाडावयाचें, एवढाच काय तो विचार. त्याकरितां साधनें कोणतीं योजावयाचीं आणि तीं योजल्यापासून कोणाला काय त्रास होईल, अशाबद्दल विचार करणाऱ्या संस्थानिकांपैकीं नबाबसाहेब नव्हते. मनांत आणलेली गोष्ट मनाप्रमाणें झाली, एवढें दृष्टीसमोर आलें म्हणजे मागें पलीकडे पहाण्याची त्यांस फुरसतही नव्हती आणि इच्छाही नव्हती. कोणतीही गोष्ट करायला निघा, लोक कधीं आपखुषीनें होय म्हणून मदतीस यायचे नाहींतच, त्यांना कोणतीही चांगली गोष्ट करण्यास प्रत्यक्ष तऱ्हेनें झीज सोसण्याची इच्छा नसते; एवढ्यासाठीं आपण होतां होईल तों त्यांच्या गाऱ्हाण्यांकडे लक्ष्य देऊं नये, असें, ते ज्या गोऱ्या मास्तरापाशीं शिकले त्यांनीं कधींकाळीं केलेलें विधान, यांनीं आपल्या डोक्यांत ठसवून ठेविलें होतें. तें विधान कोणत्या बाबतींत उपयोगांत आणावयाचें आणि कोणत्या बाबतींत आणावयाचें नाहीं, याचा विचार स्वतः करण्याची त्यांच्या डोक्यांत ताकद नव्हती आणि त्यांच्या मास्तरानें सांगितलें असलें तरी तें आठवण्याइतका स्मृतींतही जोर नव्हता. लोकांच्या गाऱ्हाण्यांकडे दुर्लक्ष्य करीत असावें एवढेंच काय तें त्यांच्या डोक्यांत शिल्लक राहिलें. असो. कसेंही जरी झालें असलें, तरी आज खूपखाबाद पाहण्यास जाणारास तेवढा राजवाड्यासमोरील चौफेर भाग पाहून आनंद होत असे. नबाबसाहेबांस तर त्याचा एवढा अभिमान असे कीं, ते आपल्या देखत दुसऱ्या कोणत्याही शहाराची तारीफ करूं देत नसत. त्यांची स्थिति बहुशः कूपमंडूकवत् असल्यामुळें जयपूर, दिल्ली, लखनौ वगैरे शहरांचें तर काय, परंतु लंडन, पारिस वगैरे शहरांचें नांव निघालें तरी सुद्धां नबाबसाहेब ‘ आपल्या या खूपखाबादेसारखीं तीं शहरें आहेत काय ? ’ असा प्रश्न करीत असत. कसेंही असो. साधारणतः तें शहर बरें होतें एवढी गोष्ट खरी. शहाराच्या सभोंवतालीं बागा वगैरे होत्या. राजवाडा फार भव्य होता, आणि जनानखान्यांत—पण जनानखान्यांत कोणाचा कधीं पायही शिरकावयाचा नाहीं त्याबद्दल काय सांगावयाचें आहे !—जो काय अंधार असावयाचा तो तेथेंही होता. मग आंत आपणास दिसणार काय ? संस्थानांत तट व पक्ष असावयाचे. त्यांचीही खूपखाबादेस उणीव होती असें नाहीं. एवढ्याशा संस्थानांत जितके म्हणून तट व पक्ष मातील तितके त्यांत होते; आणि असें असल्याखेरीज संस्थान नष्टदेशाला जावें कसें ? केवळ बाहेरच तट होते असें नाहीं. जनानखान्यांतही अतोनात तट होते. या तटांमुळें चिंतोपंतांसारख्यांची स्थिति मोठी बिकट व्हावी. परंतु ती सुबट होण्यास हे तटच उलटे फार उपयोगी पडले. चिंतोपंत कोणाही एकाच्या तटाकडे वळला नाहीं. तो ज्या तटाच्या माणसाकडे जाईल, त्याच्याजवळ इतर सर्वांच्या विरुद्ध बोलून किंबहुना कांहीं कांहीं चुगल्या करण्याजोग्या असल्यास त्याही करून आपण ऐकणाराच्याच पक्षाचे आहों, आणि त्याचें हित पहावें एवढ्याच हेतूनें इतरांकडे जाऊन त्यांच्या बातम्या काढून आणून आपल्यास सांगत असतों, असें ज्याला त्याला चिंतोपंतानें भासवावें,

आणि पुष्कळ वेळां फारच गुप्त म्हणून बातम्या खरोखरीच एकमेकांच्या एकमेकांस सांगितल्याकारणानें त्या लोकांस त्याच्या आपल्याकडे असणाऱ्या ओढ्याबद्दल खात्री वाटत असे. ही तटांतटांतली मौज झाली. परंतु रेसिडेन्सींतल्या बातम्या काढून आणून आपल्याला कळव्याव्या आणि संस्थानचें कांहीं अहित होत असलें तर वेळींच तें जाणून घेऊन उपाययोजनेला आपणास फुरसत द्यावी, एवढ्यासाठीं मी वारंवार रेसिडेन्सींत जात असतों व बुलिस्नीकसाहेबांस भेटत असतों. असें त्यानें नबाबास व दिवाणास सांगावें. एखादे वेळ तो गुप्त बातमी ह्मणून आणी, आणि सांगे व ती खरोखरीच पुढें खरी ठरे, यामुळें तिकडेही त्याचें बस्तान बसण्याचा संभव दिसूं लागला होता. इतकें सर्व जरी होतें, तरी या प्रकरणाच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें अजूनही त्याच्याविषयीं जिकडे तिकडे संशय व गैरविश्वास होता, असा गैरविश्वास असण्याचें कारण प्रथमतः सांगितलेंच आहे. आणि असा गैरविश्वास आपल्याविषयीं आहे हें चिंतोपंत जाणून नव्हते असें नाहीं. जाणून तर होतेच. पण मी जर पक्का दक्षिणेंतील ब्राह्मण असेन, तर हे सर्व संशय नाहींसे होतील असें करून त्यांचा पूर्ण विश्वास बसवून घेईन, तरच नांवाचा चिंतोपंत खरा, असें आपल्याशींच म्हणे आणि नेहमीं नेहमीं हें साधण्यास काय काय खटपट करावी, इकडे त्याचें कावेबाज डोकें गुंतलेलें असे. आणि त्याची दुष्ट कावेबाज बायको त्यास या सर्व कामीं मसलतीनें व कृतीनेंही मदत करीत असे. तिनें जनानखान्यांत शिरकाव होण्यासाठीं अतोनात खटपट चालविली. परंतु जनानखान्यांतील मंडळी दरबारी मंडळीपेक्षांही अधिक संशयखोर असल्यामुळें त्यांनीं तिचा शिरकाव कित्येक दिवसपर्यंत तरी होऊं दिला नाहीं. आणि जों जों असा शिरकाव होणें फार दुरापास्त आहे असें सरस्वतीबाईस दिसून आलें, तों तों जनानखान्यांत जाऊन काय आहे तें एकदां पहाण्याविषयीं तिची उत्कंठा अधिकाधिकच वाढावत चालली. चिंतोपंताचीही अतोनात इच्छा कीं, आपल्यास जनानखान्यांतील उठाठेवी कळण्यास मार्ग नाहीं, तो मार्ग आपली पत्नी आपल्यास खास काढून देईल. तिनें मनांत आणल्यास ती खरोखरीच तेथल्या मंडळींना आपलेंसें करून घेतल्याखेरीज सोडणार नाहीं. एक वेळां तिचा प्रवेश झाला ह्मणजे ती त्यांस अतोनात आवडेशी होईल, आणि मग ती मंडळी वारंवार आपण होऊन तिला बोलावून नेतील, आणि असा जाण्याचा तिचा परिपाठ पडला ह्मणजे थोडेच दिवसांत तिला कांहीं बातम्या काढून आणून आपणास सांगतां येतील. अशा कांहीं बातम्या काढल्याखेरीज आणि त्या वेळोवेळीं जिकडल्या तिकडे पोंचविल्याखेरीज आपल्याला जें पाहिजे आहे तें होणें शक्य नाहीं. ही त्याची व त्याच्या प्रिय पत्नीची पक्की खात्री आणि त्या खात्रीप्रमाणेंच त्यास थोडथोडा अनुभवही येत चालला होता. बुलिस्नीकसाहेबांकडे जेव्हां जेव्हां म्हणून जावें, तेव्हां तेव्हां त्यांनीं कांहीं तरी विशेष बातम्या सांग ह्मणून त्यास ह्मणावयाचेंच. आणि त्यानें कांहीं सांगितलें तरी, " यांत काय अर्थ आहे ? जर चांगल्याशा विशेष बातम्या तूं सांगत नाहींस, तुला काढतां येत नाहींत तर तुला इथें नौकरी दिल्याचा ब्रिटिश सरकारला तुझा उपयोग काय ? तूं काय असा मोठा कारस्थानी पुरुष म्हणून तुला

इथं आणलं ? काय जें संस्थानांत घडत असेल तें इथं येऊन सांगत जा. तें महत्त्वाचं आहे कीं नाहीं, याबद्दल तुला विचार करायला नको. लोकांत संस्थानिकाविषयीं काय मत आहे हें जाणल्याखेरीज लोकांच्या कल्याणाविषयीं काळजी तरी आह्मीं कशी वहा ी ? सर्व बातम्या पाहिजेत, त्या संस्थानाचं नुकसान करण्याकरितां आम्हांला नकोत. संस्थानाचं नुकसान काय म्हणून करायचं ? संस्थान घशांत घालण्याची ब्रिटिश सरकारची इच्छा नाहीं. तशी इच्छा झाली तर सरकारला किती वेळ लागणार आहे ! एक हुकूम लिहिण्याचा अवकाश ! पण तशी इच्छा नाहींच. लोकांची समजूत खोटी आहे. सगळ्या गोष्टी समजलेल्या असाव्या. काय चाललं आहे काय नाहीं ध्यानांत असावं, इतकाच हेतु. एवढ्याकरितां तुला तीनतीनदां सांगतों. " असें म्हणून साहेब कानउघाडणी करीत असत. त्यामुळें तर त्यास अधिकाधिकच वाईट वाटे, कीं प्रत्येक वेळीं कांहींना कांहीं तरी सबब सांगून वेळ मारून न्यावी लागते. होतां होतां सरूबाईचा पाय जनानखान्यांत एके दिवशीं शिरकला. तो शिरकल्यावरही मुख्य व थोरल्या नबाबीणसाहेबांची गांठ पडण्यास बरेच दिवस लागले; परंतु पाय शिरकल्यामुळें तेवढाच आनंद मानण्यास त्या नवराबायकोंस कारण झालें. आज नाहीं उद्यां, आतां इच्छेप्रमाणें सर्व कांहीं साधेल याबद्दल त्यांच्या मनास आशा वाटूं लागली आणि बुलिस्नीकसाहेबांकडे पुनः जाण्याचा प्रसंग आला, तेव्हां विजयी चर्येनें आपल्या बायकोचा शेवटीं शिरकाव झाला असें साहेबांस सांगितलें. ' आतां हलके हलके बातम्या काढण्यास मुळींच हरकत नाहीं आणि पुनः बातमी नाहीं असं आपल्या तोंडून बोलून घेण्याचा प्रसंगही पण येऊं देत नाहीं ' अशी त्यानें फुशारकी मारली. साहेबांचें त्याला नेहमीं नेहमीं बजावणें एवढेंच असे कीं, " अमुक गोष्ट महत्वाची आहे कीं नाहीं, आणि अमुक सांगूं कीं नको, याचा विचार तुह्मी करीत जाऊं नका. जें काय कानीं येईल किंवा कोठं पडेल तें सगळं मला बिनदिक्कत येऊन सांगत जा. हें सांगूं कीं नको ? याचा त्यांना काय उपयोग ? हा विचार तुह्मी करूं नका. साहेब आपला करून घेतील. " अशी एकंदर चिंतोपंताची हालहवाल होती. त्यांत गुंडोपंत आल्यानें तर त्याच्या आनंदाला, विशेषतः सरूबाईच्या आनंदाला, पारावारच नाहींसा झाला. कारण गुंडोपंतास फसवून इथें आणण्यास आपली कारवाई कारण झाली, हा तिचा पक्का समज. इकडे गुंडोपंतही आपल्याच आनंदांत होता. तो आपल्या मनांत ह्मणत होता, कीं आपणही या मंडळीस खूप ठकविलें आणि याच्याहीपेक्षां किती तरी ठकवावयाचें आहे ! तो इथें आल्यापासून इतक्या अदबीनें व गरिबीनें वागूं लागला, कीं जणूं काय मागल्या सर्व गोष्टींबद्दल त्यास अतोनात पश्चात्ताप झाला असून आतां यजमानाची सेवा इमानेंइतबारें कोणत्याही तऱ्हेचा स्वार्थ किंवा दुष्ट हेतु मनांत न धरतां करावयाची ! त्याचें असें वर्तन पाहिल्यावर सरस्वतीबाईनींही त्यास तशाच तऱ्हेनें वागविण्याचा क्रम सुरू केला. घरांत करावयाची कोणतीही गोष्ट त्याच्या संमतीवांचून होत नसे. कोणीकडून तरी ती याच्या व हा त्यांच्या परस्पर परस्परांच्या डोळ्यांत धूळ घालीत आहोंत अशा समजुतींत स्वस्थ होतीं. या एकंदर फसवराज्यांत पुढें कसे काय प्रसंग झाले ते आतां वाचकांचे नजरेपुढें हलके येतील.

# प्रकरण ३७ वें.

## एक काळजी.

दामोदरपंत वारल्या दिवसापासून राधाबाईवर आतांपर्यंत अनेक प्रसंग आले, ते सर्व वाचकांच्या पुढें आतांपर्यंत मांडलेच. दामोदरपंताचा मृत्यु, त्यानंतर तिच्या सापत्न पुत्रानें तिजवर आणलेलें काहूर, त्या काहुरांतून कशी बशी ती बाहेर पडते तों बापाचा मृत्यु आणि आईला क्रोधातिरेकानें लागलेलें थोडेंसें वेड, पुढें एका पोराला विलक्षण तऱ्हेनें आलेला मृत्यु आणि त्यामुळें अतिरेकास गेलेलें आईचें वेड, त्याचप्रमाणें पुढें पोरावर आलेला विनाकारण आरोप, इत्यादि गोष्टींनीं, आणि या सगळ्यांत तिच्या सोंवळें न होण्याबद्दल रिकामटेंकड्या लोकांनीं तिची चालविलेली अद्वातद्वा निंदा, इत्यादि गोष्टींच्या योगानें राधाबाईच्या शरीराची व मनाची काय स्थिति झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. ज्याप्रमाणें ऐनतुफानांत अफाट दर्यावर सांपडलेलें जहाज एखाद्या प्रचंड लाटेच्या तडाख्यांत सांपडून उंच गेलें ह्मणजे आंतील उतारूंस आतां आपलीं पुरीं शंभर वर्षें भरलीं असें वाटावें आणि ती लाट फुटून तें तारूं एकदम खालीं आलें म्हणजे पुनः त्यांतून सुटलों, पण आतां तळ पाहिल्याखेरीज राहत नाहीं, असें वाटून तिकडूनही हताश व्हावें, त्याचप्रमाणें राधाबाईची दरदिवशीं स्थिति होत होती. सुख हा केवळ तिला शब्द मात्र होता. त्याच्या अर्थाचा अनुभव आतां या जन्मांत आपल्यास घेतां येईल असें तिला कधींही वाटलें नाहीं. तथापि ती मोठी धीराची होय. तिनें आपल्या त्या निराशेस कधीं आपले मनावर राज्य करूं दिलें नाहीं. तिला श्रीमंतीपासून एकदम दारिद्र्यावस्थेला आल्याचें कांहींही वाटलें नाहीं. जें काय वाटलें असेल तें पहिल्या प्रथम वाटलें असेल तेवढेंच. परंतु एक वेळा आलेल्या भोगास पूर्णपणें सादर झाल्यानंतर पुनः त्याबद्दल असंतोष वाटून घेऊन मनास दुःख करणारी ती स्त्री नव्हती. पण कांहीं काळज्या अशा असतात कीं, त्या तात्पुरत्या तरी मनास उद्विग्न केल्याखेरीज राहात नाहींत. यापैकीं एक काळजी आतां तिच्या मनांत उपस्थित झाली. ती काळजी पोरीचें लग्न ही होय. नवऱ्याच्या हयातींत तिच्या उड्या केवढाल्या होत्या! त्याबद्दल आतां विशेष वर्णन केलें पाहिजे असें नाहीं. कोणी तरी मोठा थोरला जहागिरदार गांठून त्याच्या घरीं मुलगी द्यावयाची ही महत्वाकांक्षा; परंतु आतां अर्थात्च तें सर्व स्वप्नवत् झालें. तें सर्व जसें स्वप्नवत् झालें त्याचप्रमाणें इतर कित्येक गोष्टीही स्वप्नवत् झाल्या. त्यास काय इलाज होता? सध्या तिला काळजी एवढीच होती कीं,

थोड्या थोडक्यांत योग्य असें स्थळ मिळून पोरीचें लग्न कसें उरकतां येईल ? लग्नास अधिकउणा खर्च तर शक्यच नव्हता. जेमतेम पोरगी सुस्थळीं पडली ह्मणजे मिळविलें, असें तिला वाटूं लागलें होतें. आज नाहीं उद्यां पोरीचें लग्न आतां केलेंच पाहिजे, फार दिवस ठेवणें शक्य नाहीं, हें तिचें तिला दिसत होतें. आणि जों जों दिवस लोटत चालले, तों तों तिला त्यासंबंधानें अधिकाधिक काळजी वाटूं लागली. पण नुसती काळजी वाटून उपयोग काय ? ती काळजी दूर करण्यास मार्ग कसा सांपडावा ? कोणा तरी बिजवराच्या गळ्यांत बांधली तर जमण्याजोगें होतें. परंतु तो विचार तिच्या मनांत येईना. त्या विचारांचा तिला मनापासून तिटकारा होता. आणि सीतारामाचें व तिचें त्यासंबंधानें बोलणें झालें म्हणजे तोही त्या विचारासंबंधानें आपला तिटकारा स्पष्टपणें बोलून दाखवीत असे. ‘ पैशाकडे किंवा दुसऱ्या कशाकडे पाहून बिजवराशीं वारीचं लग्न करून देण्यापेक्षां एखाद्या हुशार अशा माधुकऱ्यास दिलेली काय वाईट ? ’ असे उद्गार त्याच्या तोंडून एकवार निघाले होते. राधाबाईस सुद्धां एखादे वेळीं तसेंच वाटे. परंतु तसें वाटणें आणि त्या वाटण्याप्रमाणें करणें, यांत किती अंतर आहे ! वाड्यांतील कोणी बाई सहज बसण्यास आली असतां मुलीकडे पाहिलें म्हणजे, “ इचं आतां लग्न नाहीं का करायचं ? ” असें म्हणे व “ हो करायचं ! एखादा चांगलासा नवरा असला तर सांगा, ” असें राधाबाईनें उत्तर दिलें ह्मणजे त्या बाईनें बिजवराचें स्थळ सांगावें; आणि तें ऐकतांच “ प्रथम वर असला तर सांगा ” असें म्हटलें किंवा नाक मुरडलें, तर त्या बाबांनीं लागलींच गालांतल्या गालांत तिरस्कारयुक्त हंसून “ बिजवर असला म्हणून काय झालं ? कांहीं संसार होत नाहीं कीं काय ? तुमचा नाहीं का झाला ? तुमचं तर तिजवरचं प्रकरण, ” असें म्हणून तिच्याकडे चेष्टेनें पहावें. अशा वेळीं ती बिचारी कांहीं एक बोलत नसे. “ तें सगळं खरं, पण आपल्याकडून होतां होईल तों बरंसं स्थळ पहावं. नाहीं तर मग व्हायचं तें होतंच आहे, ” असें म्हणून ती गप्प बसत असे. पण खरोखरी ज्याला मागें पुढें कांहीं नाहीं, अशा एखाद्या कावळ्याच्या गळ्यांत पोरगी बांधावी असेंही तिच्या मनांत येत नसे. “ एखाद्या अति दरिद्री परंतु प्रथम वर अशा मुलाच्या गळ्यांत पोरगी बांधावी आणि कित्येक दिवसपर्यंत तिच्यासंबंधाची काळजी आपणच वहात रहावें; तो मुलगा खरोखरी पुढें दीर्घायु होऊन चांगल्या स्थितीला आला तर ठीक. तो दीर्घायु न झाला तर त्या दुःखाला पारावारच नाहीं. दीर्घायु झाला पण फाजील निघाला तरी तिकडूनही वाईटच. जन्मभर दुःखास कारण होणार. ” असे अनेक विचार तिच्या चित्तांत एकसारखे येत असत. त्यांतल्या त्यांत विश्वनाथपंतासारखा एखादा गृहस्थ सहजी “ तुह्मी लग्न तरी कशाला करितां ? ” असें ह्मणे, पण हा विचार केवळ ऐकण्यास देखील योग्य नव्हे. विश्वनाथपंतासारखा आपला हितकर्ता बोलतो म्हणूनच तो ऐकून घ्यावयाचा. त्याबद्दल अधिकउणें न बोलतां हंसण्यावारी वेळ मारून न्यावयाची, असें ती करीत असे. यापलीकडे तिनें काय करावें ? पण अहोरात्र तिला पोरीच्या विवाहाची चिंता असे त्यांत कोठें स्थळाचा शोध करूं गेलें तर लोकांनीं तिच्या सुधारकपणाबद्दल तिची निंदा करावी. तें ऐक तिच्या मार्गांत

मोठेंच विघ्न होतें. पण इतक्याही यांतून आपले दिवस निभावून जातील अशी एक तिच्या मनांत दृढ श्रद्धा होती; आणि त्या श्रद्धेमुळेंच तिच्या हातून आजपर्यंत अनेक प्रसंग निवटून गेले व अनेक प्रसंगांतून ती उत्तम प्रकारानें पार पडली. परंतु आजपर्यंतचे सर्व प्रसंग एका दृष्टीनें काय ते तिच्या एकटीपुरतेच होते, असा तिचा समज होता. आणि हा प्रसंग आपल्या जीवाचा जी केवळ तुकडाच अशी जी आपली मुलगी त्या मुलीच्या निरंतरच्या कल्याणाचा होय. तव्हां या प्रसंगांतून आपण पार पडूं कीं आपल्यामुळें तिचें कांहीं अकल्याण होईल, कांहींच समजत नाहीं. हा विचार अहोरात्र तिच्या मनास दुःख देत होता. पोरीचें अकल्याण होऊं नये ही गोष्ट पहिली. परंतु ती साधावी कशी, ही मोठी तिला काळजी पडली. मुलाच्या शिक्षणासंबंधानें आतां तिला काळजी नव्हती. एक तर पोरगा चांगला शहाणा निघाला. त्यास सर्व गोष्टी कळून चुकल्या असून त्याच्या शिक्षणाचा भारही फेअरब्रेनसाहेबांसारख्या सत्पुरुषानें आपल्या अंगावर घेतला होता. तो पुढें सरसावल्यानंतर अर्थातच मागल्या मुलांचीही मुळींच काळजी नको. परंतु वारीच्या लग्नाची काळजी अवश्य केली पाहिजे असें होतें. पण नुसती काळजी करून आपण काय करणार ? ती काळजी निवारण कशी व्हावी ? स्थळें पहाण्यास लागावें तर त्यांत अनेक अडचणी येऊं लागल्या. कोणा पोक्त मनुष्याचा मुळींच आधार नाहीं, पैशाचा आधार नाहीं किंवा दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा आधार नाहीं. सीतारामाचें कांहीं दिवसपर्यंत असें बोलणें चाललें होतें कीं, गरीब मुलगा पाहून वारीचें लग्न करावें. मुलगी तर आतां बरीच मोठी झाली, गळ्याशीं लागण्यास आली असेंच जरी केवळ नाहीं, तरी एक वर्षाच्या वर आतां अविवाहित ठेवणें इष्ट नव्हतें. होतां होतां एके दिवशीं सीतारामानें हलकेंच आईस आपला मनोदय सुचविला. आपल्या वर्गांत प्रभाकर नांवाचा एक मुलगा आहे, त्याचा वडील भाऊ कॉलेजांत शिकत असतो. त्याची घरची अत्यंत गरिबी आहे, घरांत त्याच्या आईखेरीज दुसरें कोणीही नाहीं. जशी आपली स्थिति तशीच त्याची स्थिति आहे. मुलगा हुशार असल्यामुळें कांहीं स्कॉलरशिप वगैरे मिळवून आपला कॉलेजचा खर्च कसा तरी चालवितो; व आई कांहीं मोलमजुरी करून व थोडीबहुत पुंजी आहे तिच्या आधारानें धाकट्या मुलाचें व आपलें कसें तरी चालविते, त्या मुलाला वारीला दिली असतां हरकत नाहीं. ज्या ज्या वेळीं वारीच्या लग्नाची गोष्ट निघाली, त्या त्या वेळीं ही आपल्या मनांतील गोष्ट आईस सांगावी असें कित्येक वेळां सीतारामाच्या मनांत आलें. पण आपण लहान मुलानें एकदम असें कसें बोलावें, किंवा असें कसें सुचवावें असें त्याच्या मनांत येऊन तो बोलत नसे. बिजवरास आपली बहीण दिली जावी हें तर त्यास मुळींही आवडत नव्हतें हें वर सांगितलेंच. परंतु त्याच्या लहान बुद्धीस सर्व गोष्टींचा पोंच कोठला ? आपण श्रीमंत नाहीं, आपलेजवळ हुंडापांडा देण्यास पैसे नाहींत, तेव्हां हुंडापांडा घेणार नाहीं अशाच कोणाशीं तरी गांठ घालावी, असें त्याच्या मनांत आलें. आईनें त्याचें बोलणें ऐकून घेतलें. तिला त्याबद्दल एक प्रकारानें कौतुक वाटलें. परंतु तिला त्या सर्व गोष्टींविषयीं किती तरी तऱ्हांनीं विचार करतां येत होता. शेवटीं कांहीं तरी आपल्यास असेंच करावें

लागणार हें तीं जाणत नव्हती असें नाहीं. परंतु एकदम कोणी तरी दरिद्री गांठून त्याचे गळ्यांत पोटची पोर बांधावी हें तिच्या मनांत येणार कसें ? अलीकडे अलीकडे तिला रात्रंदिवस त्याच गोष्टीची काळजी लागून राहिली होती. या पोरीचें एकदां लग्न झालें ह्मणजे मग आपल्यास कोणचीही काळजी राहिली नाहीं. मग मुलांचें जसें तसें व्हायचें तें होईलच. बायकाबायकांत तिनें अनेक स्थळांचा शोध केलाच. परंतु बिजवराखेरीज मनाजोगें स्थळ एकही कानीं आलें नाहीं. आणि ज्या त्या बायकांचा आग्रह पोरगी बिजवराला देण्याला हरकत नाहीं असाच पडे. प्रथमवर कांहीं मिळालें, त्यांच्या हुंड्यांच्या बाबतींत फार मोठमोठ्या उड्या; त्यांचा विचार करणें सुद्धां अगदीं अप्रयोजकच, आणि बिजवर सुचविले जात तेही केवळ नांवाचे बिजवर होते असें नाहीं; यामुळें राधाबाईचे मनांत दरिद्री पण पोरीच्या वयास अनुरूप असाच वर पाहून तिला देणें योग्य वाटूं लागलें आणि त्या विचारास अनुसरून सीतारामाच्या स्नेह्याच्या भावाविषयीं तिच्या मनांत विचार येऊं लागला. मनुष्य निराश झालें ह्मणजे त्यास अखेरीस सगळ्यांत कमी त्रासाची जी गोष्ट असेल ती पतकरण्याची बुद्धि होऊं लागते. खरोखर तिच्या मनांत तर इतक्या दरिद्री मुलास मुलगी द्यावी असें मुळींच येत नव्हतें. पण गत्यंतर नाहीं. असा तिचा प्रतिक्षण समज होत चालला आणि नाहीं नाहीं ह्मणतां ह्मणतां तिनें त्या स्थळाविषयीं हलके हलके शोध चालविला. या शोधांत केवळ मुलाला अनुकूल अशा फार गोष्टी तिच्या ऐकिवांत आल्या. यामुळें दिवसानुदिवस त्या मुलाला मुलगी देण्यास कांहीं हरकत नाहीं अशा बुद्धीनें उचल घेतली. एकदां एखादी गोष्ट तशा प्रकारानें मनांत भरत चालली आणि त्या दृष्टीनें मनुष्य पाहूं लागलें, ह्मणजे मग त्या दृष्टीस अनुकूल अशाच गोष्टी मनुष्याच्या नजरेंत भरत जातात. हीच स्थिति राधाबाईची झाली. नसेनात कां पैसे ? नसले ह्मणून काय झालें ? मुलगा चांगला आहे तर तो आपलें नशीब लवकरच काढील. प्रत्येक बाबतींत तशा तऱ्हेनें विचार करूं लागलें तर कधींच कांहीं अगदीं आपल्या मनाजोगें असें आपल्याला करितां येणार नाहीं.त्यापेक्षां आपल्या सध्याच्या स्थितीला योग्य असा संबंध करावा हें चांगलें ! झालें ! तिच्या मनाची तसा संबंध करण्याबद्दल तयारी झाली. मग त्या दृष्टीनें तिनें मुलाचा शोध चालविला. होतां होतां सीतारामानें सुचविलेलें स्थळच तिला पसंत वाटूं लागलें. दारिद्र्य हा कांहीं दोष नव्हे आणि या दोषासाठीं आपण असें हातचें स्थळ घालवूं नये, हा विचार तिनें कायम केला व थोडेच दिवसांत त्यासंबंधाचा अधिकउणा विचार करून तिचा तर, त्या बाईनें व मुलानें पतकरल्यास, पोरगी तेथें द्यावयाची असा निश्चय झाला. कर्मधर्मसंयोगानें दुसऱ्या पक्षाकडून तिला रुकार मिळण्यास फारसा अवधि लागला नाहीं. आणि योग्य दिवस येतांच इतके दिवस लागलेल्या त्याही एका काळजीचें निवारण झालें.

# प्रकरण ३८ वें.

## बाबू महाशय.

जी जागा हा दख्खनचा भुरट्या चोर आला नसता तर खास आपणास मिळाली असती, ती त्याच्या येण्यामुळें आपणास मिळाली नाहीं, ही गोष्ट मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय यांच्या मनांतून कांहीं केल्या गेली नाहीं. आपली हक्काची जागा असून केवळ या भुरट्या भामट्यानें मधेंच साहेबांची हांजी हांजी करून मिळविली, याबद्दलचा राग त्यांच्या मनांतून गेला नव्हता; आणि बाबूमहाशय यांचे मनात एकदां असा राग पक्केपणीं बाणून गेला असला, म्हणजे मग तो कोण्या वेळीं कोणत्या रूपानें बाहेर पडेल याचा नेम नव्हता. आपली हक्काची जागा या भुरट्यानें उपटून घेतली याबद्दल याची चांगली खात्री करून टाकिली पाहिजे, कीं पुनः दक्षिणचीं माकडें इकडे येतील कीं नाहीं ! हा विचार बाबूमहाशयांच्या डोक्यांत एकसारखा घोळत होता. पहिला त्यांचा विचार असा कीं, गुलामाकडून कांहीं महत्वाचे कागद आले कीं, ते साहेबांपुढें मांडूंच नयेत आणि कांहीं तरी त्याच्याबद्दल साहेबांच्या कानीं भलभलतेंच घालून ठेवावें. परंतु तें साधण्याचा कांहीं संभव दिसेना. त्याचेकडून विशेष महत्वाचे कागद टपालांतून कधींच येत नसत. चार आठ दिवसांनीं त्याची स्वतःची फेरी साहेबांकडे होऊन त्या भेटींत जें काय सांगावयाचें असेल तें तो सांगत असे. यामुळें महाशयांस साहेबांचे मनांत त्याच्याविषयीं वांकडें भरवून देण्याची आपली इच्छा तृप्त करून घेतां येईना. पण एक मार्ग खुंटला म्हणून निराश होण्याची बाबूमहाशयांस संवय नव्हती. दुसरा कांहींना कांहीं तरी मार्ग शोधून काढून या गुलामाची खोडकी आपण जिरवूंच जिरवूं अशी त्यांची उमेद होती. चिंतोपंत येथें आला असतां साहेबांशीं काय गोष्टी बोलतो हें जाणणें पहिलें कर्तव्य असें बाबूमहाशयांनीं आपल्या मनास सांगितलें. हें जर वारंवार आपल्यास कळत गेलें, तर आपला इष्ट हेतु साधण्यास फारशी अडचणी येणार नाहींत, किंबहुना तो हेतु लौकर साधतां येईल, असें त्यांच्या मनास वाटूं लागलें. परंतु हें घडावें कसें ? हें घडण्यास दोन मार्गः—एक चिंतोपंत आला असतां कांहीं तरी काम काढून बळेंच त्या खोलींत जाऊन, किंवा जाण्याच्या आधीं दाराशीं कान लावून काय कानीं पडेल तेवढें ऐकून घेणें, किंवा आंत गेल्यावर पहिल्या सपाट्यास जें काय कानीं पडेल त्यावर तर्क बांधणें, आणि त्या तर्काचा मग आपल्यास वाटेल तसा उपयोग करून घेणें. परंतु बाबूमहाशयांस एवढें पक्कें ठाऊक होतें कीं, आपलें शरीर दाराच्या

आडून कान लावून ऐकत उभें राहून कोणी येतेंसें वाटल्यास तेव्हांच तेथून काढून नेतां येईल इतकें चंचल नाहीं. एखादे वेळीं जर का साहेबमजकूर संशयानें किंवा सहज दाराशीं आले, तर आपल्यास निसटून जाणें शक्य नाहीं. मग आपल्या समयसूचकतेवरच आपल्या संरक्षणाची गोष्ट अवलंबून राहणार आहे. तें नंदिकेश्वरासारखें शरीर आणि त्याच्या यजमानाच्या पुत्रासारखें तुंदिल उदर यांची तशा वेळीं काय अवस्था होईल, हें बाबूसाहेबांच्या मनांत उभें राहून त्यांना आणखी एखादी युक्ति सुचली तर पहावी व ती सुचेपर्यंत आपण आपल्या समयसूचकतेवरच विश्वास ठेवून कामास लागावें असा विचार केला. हा गुलाम दख्खनचा वानर ज्या बातम्या येऊन कळवतो त्या फोडल्या तरच आपले पुढले सर्व बेत सिद्धीस जाणार आहेत अशी त्यांच्या मनाची पक्की खात्री होती. आणि "Nothing venture nothing gain" या बाबूसाहेबांच्या आवडत्या म्हणीप्रमाणें त्यांनीं आपलें तें तुंदिल उदर धोक्यांत घालण्याचा विचार केला. शिवाय अलीकडे अलीकडे बुलिस्नीकसाहेबांकडून बाबूमहाशयांस बऱ्याच कामांत थपडा मिळाल्याकारणानें साहेबांवरही त्यांचा घुस्सा झाला होता. या साहेबांच्या कारकीर्दींत आतां आपल्यास बढती मिळणें शक्य नाहीं अशी त्यांच्या मनाची खात्री होत चालली होती; अर्थातच त्यामुळें त्यांस ब्रिटिश सरकारच्याविषयीं थोडासा तिरस्कार आणि स्वदेशाविषयीं व स्वदेशी संस्थांविषयीं अलोट प्रेम लोटलें होतें. आपणांस होत असलेला अनर्थापात अन्याय त्याच्या नजरेस फार ठळकपणें येऊं लागला. देशाभिमानाचें आणि देशप्रीतीचें वारें तर इतकें संचरलें कीं, बुलिस्नीकसाहेबांनीं एक थप्पड दिली असतां त्या वेळीं जरी बाबूमहाशय हंसण्यावारी घालवीत, तरी फुटबॉलमध्यें घातलेल्या फुंकराप्रमाणें त्यांच्या अंगी संचरलेल्या देशाभिमान व देशप्रेम वाऱ्याचा सांठा वाढत चालला. बुलिस्नीकसाहेब एखादे दिवशीं गोडसे बोलले किंवा एखाद्या ठिकाणच्या जागेवर नेमणूक करण्याची त्यांनीं आशा दाखविली, कीं ते दिवशीं मुलांच्या खेळांतील पिंगाणी वाजवीत, त्यांच्या अंगचें तें वारें थोडें ओसरल्याचा भास होत असे. परंतु असे आशेचे व गोड बोलण्याचे प्रसंग फारच क्वचित् येत असल्यामुळें त्या वाऱ्याचें वादळ होण्याचाच जास्त संभव होता. हा संचरलेला वारा जर कोण्या तरी मार्गानें बाहेर न पडला, तर बाबूमहाशयांची स्थिति कांहीं ठिकाणावर राहणार नाहीं, अशी बाबूंच्या मित्रमंडळींस फार भीति पडत चालली होती. तेव्हां तो वारा ओसरण्यासाठीं कांहींना कांहीं तरी उपाययोजना प्रत्येकजण सुचवीतच असे. परंतु स्वतः बाबूमहाशयांसच फार उत्तम प्रकारचा उपाय सुचला. तो काय व त्याची योजना त्यांनीं कशी केली, त्या योजनेपासून पुढें फलप्राप्ति कशी काय झाली, इत्यादि गोष्टी वाचकांस आपोआप कळतील, येथें मुद्दाम सांगण्याची जरूरी नाहीं. चिंतोपंत बुलिस्नीकसाहेबांकडे येऊन काय सांगत असतो हें जाणणें त्या उपायांच्या अंगभूत होतें, ही बाबूमहाशयांची खात्री तें जर आपणास कळलें नाहीं, तर आपले उपाय तरी व्यर्थ होतां उपयोगी नाहीं. तेव्हां आपलें उदर, दुसरी कांहीं युक्ति सुचेपर्यंत धोक्यांत घालावयाचें असा पक्का विचार बाबूमहाशयांनीं केला. चिंतोपंताजवळ लाडीगोडी करून

बातमी काढणें कांहीं शक्य नाहीं, हें स्वारी पुरतेपणीं जाणून होती. तथापि तो मार्ग अगदीं त्याज्य, त्याच्याबद्दल अगदीं निराशा होऊं द्यावी, असें बाबूंस मुळींच वाटत नव्हतें. आपण आपल्याकडून होतील तितके मार्ग उपयोगाला आणून पहावे, त्यांतून जे कामीं पडतील तें पडतीलच; कांहीं नाहीं पडले तरी वाहवा. यत्न करणें आपलें काम. असा पोक्त विचार करून बाबूसाहेबांनीं, चिंतोपंताजवळ पहिल्याप्रमाणें कुर्यानें न वागतां किंवा त्याच्या इंग्रजी भाषेच्या ज्ञानाचा उपहास न करितां, " सुसरीबाई, तुझी पाठ मऊ" हा न्याय अवलंबून त्याच्या पोटांत शिरण्याचा विचार केला आणि दुसऱ्याच खेपेस चिंतोपंतदादा साहेबांकडे आले असतां त्यांच्याशीं गोड गोड बोलून त्यांस आपली " वाडी " आपल्या आगमनानें सुशोभित करण्याविषयीं त्यांनीं विनंति केली. हा बाबूसाहेबांच्या वर्तनांत दिसून येणारा नवीन फरक पाहून चिंतोपंतास पहिल्या प्रथम अर्थातच आश्चर्य वाटलें; परंतु आपल्याप्रमाणेंच हाही प्राणी आहे, आपण साहेबांकडे वारंवार येतों, आपल्यावर साहेबांची मर्जी आहे, तेव्हां आपली मर्जी संपादावी एवढ्याच हेतूनें बिचारा आपल्यास मान देऊं लागला आहे, कीं कधीं एखादे वेळीं आपण त्याच्याविषयीं साहेबांजवळ चांगला शब्द बोलावा, यापलीकडे याचा कांहीं कावा असेल असें चिंतोपंताच्या लक्ष्यांत आलें नाहीं. बाबूसाहेबांचा मानसन्मान तर दिवसानुदिवस वाढतच चालला. साहेबांकडे चिंतोपंताची स्वारी आली, कीं बाबूसाहेबांचें आपल्या घरीं येण्याबद्दलचें आग्रहपूर्वक आमंत्रण ठेवलेलेंच आणि घटका घटका, दोन दोन घटका, नानाप्रकारचें संभाषण चालावयाचें. त्यांत बुलिस्नीकसाहेबांचा स्तुतिपाठ रगड असावयाचा आणि संस्थानांतील लोकांची निंदा ओतप्रोत सुरू असावयाची; " काय हीं आपलीं संस्थानें ! इंग्रज सरकार खालसा करून तेथें इंग्रजी अंमल सुरू करील तर प्रजेला फार सुख होईल " असले उद्गार भरपूर असावयाचे. हेतु हा कीं, चिंतोपंतदादा बोलण्याच्या भरांत संस्थानांतील कांहीं वेड्यावांकड्या गोष्टी किंवा साहेब त्यांचे जवळ बोलल्यापैकीं एखादी गोष्ट सहज बोलून जातील; आणि त्या हेतूप्रमाणें एखादे वेळ बाबूमहाशयांचें काम साधेही. चिंतोपंत सहज एखादी गोष्ट अशी बोलून जाई कीं, बाबूमहाशय चटकन् ती आपल्या विस्तृत उदरांत सांठवून ठेवीत आणि इतकें केल्यासारखा कांहीं तरी लाभ झाला म्हणून आनंद मानीत. तथापि अशा तुकड्याताकड्यावर समाधान मानण्याइतकी बाबूमहाशयांची अल्पसंतुष्टता नव्हती. त्यांस चांगलीच माहिती जितकी मिळेल तितकी पाहिजे होती. पण बाबूसाहेब एवढ्यातेवढ्यानें निराश होणारे नव्हते. आज नाहीं उद्यां आपण आपल्यास काय पाहिजे तें मिळवूं अशी त्यांस पक्की उमेद होती.

एके दिवशीं खूपखाबादेस कांहीं विशेष प्रकार झाला असावा आणि तोही इतक्या महत्वाचा कीं, आदले दिवशीं चिंतोपंत येऊन गेला असतांही, पुन: दुसरे दिवशीं साहेबांस येऊन भेटून तो प्रकार सांगण्याची त्यास अवश्यकता वाटली. काल चिंतोपंत आला असतां आज पुन: आला आहे, तेव्हां कांहींना कांहीं तरी फारच महत्वाची गोष्ट घडली असावी आणि ती सांगण्यासाठीं तो येथें आला असावा, असें बाबूमहाशयांनीं तेव्हांच

ताडलें, आणि आज आपल्या उदरास धोक्यांत घालून कांहीं फलप्राप्ति झाली तर पहाण्याचा त्यांनीं कृतनिश्चय केला. चिंतोपंतदादास साहेबांनीं आपल्या खोलींत नेऊन दार लावतांच बाबू मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय आपल्या खांकेंत एक कागदांचें पुडकें मारून त्या दारापाशीं आले. प्रथमतः त्यांनीं इकडे तिकडे साशंक मुद्रेनें पाहिलें, कीं आपण काय करतों हें मडमसाहेब किंवा हॅरीबाबा अथवा जिजबेलबाबा पहाण्यास कोठें आसपास आहेत कीं काय ? आसपास कोणी दिसत नाहीं असें मनास वाटतांच स्वारींनीं आपलें शरीर वांकविलें. एका हातानें आपली ती दाढी धरली व दाराच्या किल्लीच्या भोंकांतून प्रथमतः कांहीं दिसल्यास पहावें असा विचार मनांत आणून भोंकास डोळा दिला. नंतर पुनः स्वारी ताठ झाली. पुनः एकदां साशंक मुद्रेनें इकडे तिकडे पाहिलें; कोणी नाहीं अशी खात्री होतांच त्यांनीं आपला कान त्या छिद्राला लावून काय ऐकावयास सांपडेल तेवढें तनमन लावून ऐकण्यास सुरुवात केली. कान आंतील भाषणाकडे व डोळे आजूबाजूला कोणी येतें जातें कीं काय, आपली कर्तबगारी कोणी पहातें कीं काय, इकडे लक्ष्य लावून होते. बाबूमहाशयांचें नशीब मोठें जोरावर असावें असें दिसलें.कोणीही त्यांची ती शिताफी पहाण्यास त्यावेळीं हजर नव्हतें. बाबूमहाशयांस संथपणें काय ऐकावयास सांपडलें तें ऐकतां आलें. त्यांस मोठी भीति होती ती मडमसाहेबांची होय. परंतु त्यांच्या सुदैवानें मडमसाहेब त्यावेळीं कोठें बाहेर गेल्या होत्या व जिजबेल आणि हॅरी यांस आईच्या खोलींत वाटेल तसा गोंधळ घालण्याची संधि मिळाल्यामुळें तीं दोघें तेथील व्यवस्थेची अधिक सुव्यवस्था करून ठेवण्यांत गढून गेलीं होतीं. त्यामुळें महाशयांस वर सांगितल्याप्रमाणें संथपणें आपला कान त्या किल्ली घालण्याच्या छिद्रास चिकटवून ठेविल्याप्रमाणें ठेवितां आला. इतका वेळ वांकून उभें राहण्याची स्वारीस कधींच संवय नसल्यामुळें व खालच्या पृथ्वीचें यांच्या जड पोटास नैसर्गिक नियमाप्रमाणें अधिक आकर्षण लागल्यामुळें त्यांच्या शरीरास पुष्कळ रग लागली; परंतु आज जें काय कानीं पडत होतें तें फार महत्त्वाचें असल्यामुळें ह्मणा, किंवा तें ऐकण्यास फार कठीण जात होतें ह्मणून ह्मणा, बाबूसाहेबांनीं ती तितकीही रग पुरतेपणीं सहन केली. कुंथण्यापर्यंत पाळी आली तरी त्यांनीं आपला दीर्घोद्योग सोडिला नाहीं. त्यांच्या चर्येवर क्षणोक्षणीं नानाप्रकारच्या विकारांच्या छाया दिसत होत्या; यांवरून त्यांस कांहीं तरी फार महत्त्वाचें ऐकण्यास सांपडत असावें, असें स्पष्ट दिसलें. इतकेंच नव्हे तर आजपर्यंत आपण वाट पाहिल्याचें सार्थक झालें, असें वाटून जसा त्यांचा चेहरा व्हावा तसाही तो झालेला दिसला. त्यांचा कान कांहीं केल्या तेथून निघेना. ते तेथल्या तेथेंच माना डोलवीत आणि आपल्याशींच मनांतल्या मनांत हंसत. नंतर मोठ्या गंभीरपणानें एक डोळा मिचकावून आपल्या त्या विशाल तोंडावरून हात फिरवीत फिरवीत दाढीचे सगळे केंस धरून त्यांना गोंजारीत गोंजारीत त्यांच्या टोंकापर्यंत हात आणून सोडीत व नंतर पुन्हा पहिल्याप्रमाणेंच कपाळापासून हात फिरविण्यास सुरुवात करीत. एक कान मात्र आणि त्याच्याबरोबरच मन आंतील संभाषणाकडे होतीं. त्यांस त्यांनीं क्षणमात्र चळूं दिलीं नाहींत.कोणी आल्याचा भास झालाच तर त्यांनीं चटकन् उभें रहावें आणि

जणूं काय नुकतेच ते ऑफिसांतून येऊन साहेबांची गांठ घेण्यासाठीं दार ठोठावण्याच्या विचारांत आहेत असें वाटावें. ज्याच्या चांगुलपणाविषयीं संशय आहे, असें काम आपण करीत असलों, म्हणजे कोणी पाहील कीं काय, पाहिलें असेल कीं काय, अशा शंका किती वेळां तरी आपल्यास येत असतात ! मग हे तर बोलून चालून आपण बरें काम करीत नाहीं असें बाबूमहाशयांस पक्केपणीं वाटत होतें. तरी पण त्यांचा हेतु यत्किंचित्‌सुद्धां वावगा नव्हता अशी त्यांच्या मनाची पक्की खात्री होती. आपलें स्वतःचें हित साधण्याची त्यांना मुळींच इच्छा नव्हती किंवा आशाही नव्हती. त्यांचें सर्व चित्त केवळ देशहित साधण्याकडे गुंतलेलें असल्यामुळें देशभक्तीच्या वाऱ्यानें त्यांचें मस्तक अगदीं फिरवून टाकिलें होतें. त्या वेळीं इंग्रजसरकाराच्या अन्यायीपणाबद्दल त्यांच्या मनाची इतकी खात्री होऊन गेली होती कीं, प्रत्यक्ष बुलिस्नीकसाहेबांनीं बाहेर येऊन लत्ताप्रहार करून चाकरीवरून दूर केलें असतें तर त्यांनीं चाकरीची मुळींच पर्वा केली नसती. शेवटीं शेवटीं त्यांच्या कानीं ज्या कांहीं गोष्टी आल्या त्या तर कानीं पडतांक्षणींच देशभक्ति अतोनात उचंबळली आणि एतद्देशीय संस्थानांबद्दलचें प्रेम अतिरेकास चढून इंग्रजसरकारच्या राज्यास त्यांनीं आपल्या देशभाषेंत चार पांच शिव्यासुद्धां हांडसल्या. बाबूमहाशयांच्या कानांवर त्यांचें स्वतःचें नांव पडून त्यांस साहेब कोठें तरी सैतानाच्या राज्यांत—खुद्द राजधानीलाच—पाठवून देऊं असें म्हणत असतांना त्यांना ऐकूं आलें. इतकेंच नव्हे तर, " त्या माणसास कमी पगारावर कोठें तरी एखादे दिवशीं संतापून मी घातलें नाहीं म्हणजे त्यांचें मोठें नशीब !" असे उद्गार साहेबांच्या तोंडून ऐकिल्याचाही बाबूसाहेबांस भास झाला. मग इंग्रजसरकाराविषयीं तिरस्कार आणि स्वदेशाविषयींची भक्ति हीं अलोट व्हावीं यांत नवल काय ? " चोरून आडून ऐकणारास स्वतःविषयीं चांगलें असें कधीं ऐकूं यावयाचें नाहीं, " असें म्हणतात तें खोटें नव्हे; परंतु बाबूमहाशयांस स्वतःविषयीं अश्लाघ्य उद्गार ऐकूं आल्याचें मुळींच वाईट वाटलें नाहीं. उलट त्यांच्या मनाचा असा आतां दृढनिश्चय झाला कीं, ज्या उपायाची योजना करण्याचें आजपर्यंत आपण केवळ, आज नाहीं उद्यां इंग्रज लोक चांगले होतील व संस्थानांत योग्य न्याय मिळेल, अशा आशेवर लांबणीवर टाकिलें होतें, ती योजना अगदीं विलंब न करितां आतां अमलांत आणावयाची.

या निश्चयाच्या धुंदींतच बाबूमहाशय दारापाशीं ताठ उभे होते. साहेब व चिंतोपंत आपलें बोलणें संपवून केव्हां दाराजवळ आले हें त्यांस समजलेंसुद्धां नाहीं. दार हलकेच उघडून बुलिस्नीकसाहेब पहिल्या प्रथम पुढें आले आणि त्यांस पाहतांच बाबूसाहेबांची जी त्रेधा उडाली, ती त्यांची त्यांसच ठाऊक ! आतां आपल्यास सरकारी चाकरीची नसणारी पर्वा दाखविण्याचा व आपलें उदर संभाळण्याचा प्रसंग खास येतो असें त्यांस वाटलें.

---

# प्रकरण ३९ वें.

## ठकास महाठक.

आतां आपली देशभक्ति दाखविण्याचा किंवा सरकारी चाकरी करण्याबद्दलचा तिट्कारा प्रकट करण्याचा प्रसंग आपणांवर येतो—खास येतो—हें पाहून बाबूसाहेबांस खेद झाला कीं हर्ष झाला हें सांगणें मोठें कठिण आहे. त्यांच्या चेहऱ्यावरून तर या वेळीं ते निव्वळ भेदरून गेले असावे असें दिसलें. मग साहेबांनीं लाथ मारल्याबरोबर चाकरीवरही लाथ मारण्याचा निश्चय त्यांचे मनांत चालला होता, कीं साहेबांचे पाय धरण्याचा विचार मनांत शिरकत होता, हेंही सांगणें फार दुरापास्त आहे. पण त्यांच्या हजारों युक्त्यांपैकीं एखादी युक्ति उपयोगांत आणण्याची समयसूचकता त्यांचे मदतीस त्या वेळेस आली आणि निदान त्यांच्या मतें तरी साहेबांस आपला कावा कळला नसून आपलें काम उरकलें असें त्यांस वाटलें. क्षणमात्र वावरण्याची स्थिति राहते न राहते तोंच त्यांनीं आपल्या कांखेंतील कागद पुढें करून,

"Sir, your most respected and highly revered Honor, very important papers from the Most High Government of India just to hand by the second delivery of the postal organization, have brought me up from the office inspite of the most private and most confidential tete-a-tete your honor was condescending to hold with my intimate and most valued friend and the most faithful of the native servants of Her Imperial Majesty the Queen Empress of this vast Peninsula of India, I mean Mr. Chintopant Esqr." *

बुलिस्नीकसाहेबांस संताप येण्याला जर कांहीं कारण कमी असलें, तर या चव्हाटानें तें ताबडतोब दिलें असें ह्मणण्यास मुळींच हरकत नाहीं. बाबूसाहेबांची समयसूचकता त्यांचे मदतीस येऊन उभी

* साहेब, अत्यंत सन्मान्य व आदरित साहेब, अतिशय उच्च अशा हिंदुस्थानसरकाराकडून फारच महत्वाचे जे कागद पोस्टल व्यवस्थेच्या दुसऱ्या बटवड्याबरोबर आले, त्यांनीं, आपली स्वारी, माझे परम व मूल्यवान् मित्र आणि या हिंदुस्थानच्या द्वीपकल्पाच्या ज्या वैभवशाली चक्रवर्तिनी महाराणी-साहेब त्यांचे अत्यंत एकनिष्ठ असे नौकर जे मि० चिंतोपंत, त्यांच्याशीं फार खासगी व गोपनीय असें भाषण करण्याइतकी आपण लीनता दाखवीत आहां, हें जाणनही मला हापिसांतून येथें आणिलें.

राहिली खरी, त्यांनीं काखेंत आणलेलें पुढकें पुढें केलें खरें, परंतु आपल्या आवरशक्तीचाही या वेळीं जर ते उपयोग करते व आपल्या जिव्हेस आंवरून धरते, तर फार चांगलें झालें असतें. थोडक्यांत बोलून त्यांचें काम झालें नसतें असें नाहीं. परंतु जिव्हेनें त्यांस संभाळण्याचें नाकारलेंसें दिसलें. हें जरी खरें होतें, तरी त्यांचें नशीब बलवत्तर यांतही शंका नाहीं. साहेबांचा संताप इतक्या अतिरेकास गेलेला दिसला कीं, त्यांच्या तोंडून शब्दसुद्धां बाहेर पडेना.फक्त "यू सुवर ! हापिसमे जाके एकदम बैठो" असें म्हणून त्यांनीं बाबूंस जोरानें ढकलून दिलें. 'जिवावरलं सध्यां तरी निदान शेंपटावरच गेलं' असें बाबूमहाशयांस वाटून त्यांनीं तावडतोब तेथून 'पःपलायते' केलें. मात्र तोंडानें "Sir, your Honor, very most important papers, immediate and prompt attention very indispensibly necessary............thrust my presence............" असे शब्द पुटपुटल्याखेरीज त्यांचें तेथून प्रयाण झालें नाहीं, परंतु ऑफिसांत येऊन शेवटीं जेव्हां स्वारी बसली तेव्हां आपलें आतां पुढें काय होणार,याचा विचार करण्यास स्वारीस सवड सांपडली. आपल्या आड्डून ऐकण्याच्याबद्दलचा संशय साहेबाला खचित आला असावा, हें तर त्यांस कळून चुकलें. परंतु साहेबांनीं आंत असतांना काढलेल्या उद्गारांप्रमाणें खरोखरीच आपली रवानगी साहेब करतात कीं काय, अशी शंका त्यांस आल्याखेरीज राहिली नाहीं. प्रसंग आलाच तर चाकरीवर लाथ मारण्याची त्यांची तयारी होतीच. परंतु होतां होईल तों तसा प्रसंग येऊं नये याविषयीं त्यांची आतुरता कमी नव्हती. तिकडे बंगल्यांत काय झालें त्याविषयीं ऑफिसांतील मंडळीस कांहींएक कळूं नये हीही एक उत्कंट इच्छा बाबूसाहेबांच्या हृदयांत जागृत नव्हती असें नाहीं निदान आपल्यास जो धक्का बसला तो तरी कोणास कळूं नये अशी त्यांची इच्छा होती. पण बंगल्याच्या माळ्यानें तो प्रसंग पाहिला, हेंही त्यांच्या लक्ष्यांत आलें नव्हतें असें नाहीं. तो माळी आतां बहुतकरून झालेला सर्व प्रकार इतर नोकरांस सांगेल व इतर नोकरांकडून हापिसांतील लोकांस कळेल आणि आजपर्यंत साहेबांच्या मर्जीबरहुकूम आपण वागतों त्यामुळें आपणावर त्यांचा लोभ फार, असें ज्यास त्यास आपण भासवीत आलों त्या सगळ्यावर अगदीं पाणी पडेल, असें त्यांच्या मनास पक्कें वाटून चुकलें. तथापि अंगावर प्रसंग आला नसतांना कित्येकांच्या अंगीं जो ताठा व कुर्रा असतो तो बाबूमहाशयांच्या अंगीं उणा होता असें नाहीं. ते आपल्याशीं नानाप्रकारचे विचार करूं लागले. साहेबांनीं आपल्यास एकीकडे नेऊन आपल्यास काय बोलावयाचें तें जर ते बोलले तर तो भाग निराळा, परंतु हापिसांत येऊन जर त्यांनीं अद्वातद्वा बोलून आपली विटंबना चालविली, तर आपण कधींही ती सहन करून घेणार नाहीं, साफ उत्तरें देऊन त्यांचा उद्धटपणा व अन्यायीपणा व पक्षपात हीं सारीं आपल्या चतुरस्र भाषणाच्या जोरानें उघडकीस आणून त्यांची खोडकी जिरवून टाकूं, अशा प्रकारचे बेत त्यांनीं मनांत चालविले आणि क्षणोक्षणीं आतां साहेब येतील, इतक्यांत येतील, अशी उत्कंठेनें अपेक्षा करीत व कोणी पट्टेवाल्यानें अगर हाताखालच्या कारकुनानें कांहीं प्रश्न विचारल्यास तो समजून न घेतां रोजच्यापेक्षां

अधिकच तुसडेपणाचीं त्यांनीं उत्तरें दिलीं. चपराशी लोकांनीं आपापसांत फिदी फिदी हंसून आपल्या भाषेंत बाबूसाहेबांची टवाळकी करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. आज साहेबांकडून कांहीं तरी खरपूस अशी पाठवणी बोळावणी झाली असावी असा त्या चाणाक्ष लोकांनीं तर्क केला. त्यांत आणखी माळीदादांनीं बातमी पसरण्यास कमी खटपट केली असें नाहीं. हां हां ह्मणतां बाबूमहाशयांस मिळालेल्या धक्क्याची हकीकत कोणासही कळूं नये अशी जी त्यांची बुद्धि होती ती सफल न होतां सर्वत्र झाली. परंतु तेदिवशीं साहेब हापिसांत आले नाहींत किंवा त्यांनीं बाबूमहाशयांसआपलेक बंगल्यावर कागद घेऊन बोलाविलेंही नाहीं. एका अर्थीं हें बरें झालें असें बाबूसाहेबांस वाटत होतें, तरी दुसऱ्या अर्थीं त्यांची अशीही इच्छा होती कीं, एकवार साहेबांची व आपली मुलाखत व्हावी ह्मणजे साहेबांचे मनांत आपल्याविषयीं कितपत वैषम्य आलें आहे हें तरी नीटपणें समजून येईल. पण तसें कांहींएक झालें नाहीं. अतिशय उच्च अशा हिंदुस्थानसरकाराकडून फार महत्त्वाचे कागद आले आहेत आणि त्यांचा निकाल ताबडतोब केला पाहिजे असें आपण सांगितलें असतांही कागदासंबंधीं अद्यापि चौकशी झाली नाहीं याबद्दलच्या आश्चर्यांतच बाबूंची स्वारी गुंग झाली होती. जितका वेळ जाईल तितका एका अर्थीं आपल्या हिताचाच, कारण साहेबांच्या तब्यतीचा गरमपणा वेळ जाईल तसा कमी होईल आणि आपल्यास चाकरीवर लाथ मारण्याइतक्या पाणीदारपणाचें प्रदर्शन करण्याची अवश्यकता पडणार नाहीं, इत्यादि समाधानकारक विचारही त्याचे मनांत आले. हापिसाची वेळ भरतांच बाबूमहाशय एका क्षणाचाही विलंब न करतां ते दिवशीं हापिसांतून " वाडी " कडे प्रियपत्नी शरतसुंदरी हिचें दर्शन घेण्यास व फुशारकीच्या चार दोन गोष्टी जास्त बोलण्यास निघून गेली. परम मूल्यवान् मित्र चिंतोपंत यांची गांठ घेण्यास सवड झाली नाहीं याबद्दल त्यांस फारच वाईट वाटलें. परंतु इलाज नव्हता, अशी समजूत करून ते स्वस्थ बसले. आज त्यांची गांठ पडणें फारच अवश्यक व महत्वाचें होतें. तेव्हां माझ्या " वाडींत " आपल्या चरणाची धूळ झाडल्याखेरीज आपण जाऊं नये अशी प्रार्थना करावयास सुद्धां त्यांस अवकाश मिळाला नाहीं, त्यापुढें त्यांचा इलाज नव्हता. पण वर एक दोन वेळ सांगितलेंच आहे कीं, बाबूसाहेबांचें नशीब मोठें बलवत्तर होतें. चिंतोपंतास भेटण्याची त्यांची उत्कंठा अगदीं अनाठायीं जाऊं नये असेंच त्यांच्या नशिबीं होतें, यामुळें चिंतोपंतासही त्या दिवशीं कांहीं कामानिमित्त बाबूमहाशयांची खासगत गांठ घेणें जरूर वाटल ही गांठ घेणें हापिसांत इष्ट नसल्यामुळें स्वारींनीं रेसिडेन्सींत दुसऱ्या एका स्नेह्याकडे मुक्काम केला व बाबूसाहेब घरीं केव्हां येतात याची वाट पहात ते बसले होते. बाबूसाहेब येतांच त्यांच्या आगमनाची वर्दी येऊन कळविण्यास मुद्दाम बसविलेल्या इसमानें येऊन कळवितांच चिंतोपंताची स्वारी बाबूमहाशयांकडे येऊन थडकली. बाबूसाहेबांच्या आनंदास तर पारावारच नाहींसा झाला. ज्याची आपण इच्छा करावी, परंतु तें प्राप्त होण्याबद्दल निराशा असावी आणि तेंच अचानक प्राप्त व्हावें, यासारखें सुदैव आणखी कोणतें असावयाचें ? एकंदरींत आजचा दिवस आपल्यास वाटल्याप्रमाणें दुर्दैवाचा नसून सुदैवाचाच ह्मटला पाहिजे असें बाबूमहाशयांस वाटूं लागलें. ज्या

गोष्टी ऐकावयास सांपडतील असें स्वप्नांतरींही वाटलें नव्हतें त्या गोष्टी ऐकावयास सांपडल्या; तसेंच आपले साहेब संतापून जाऊन आतां काय करतील याचा नेम नाहीं असें वाटलें असतां तसें कांहीं एक झालें नाहीं आणि परम मित्र चिंतोपंत यांची गांठ पडावी अशी इच्छा, परंतु पडण्याची निराशा असतां तोही सुप्रसंग आला, आणखी सुदैव सुदैव तें काय? आपल्याबद्दल साहेब काय बोलत होते हें जाणण्याची आणि दुसरेंही कांहीं जें पुरतेपणीं आपणांस ऐकूं आलें नाहीं तें जाणण्याची बाबूंस फार इच्छा होती व हिंदुस्थानसरकाराकडून जे कागदपत्र आले आहेत ते कशाबद्दल आहेत हें कांहीं विवक्षित कारणामुळें समजून घेण्याची इच्छा चिंतोपंतास असल्यामुळें दोघांसही इष्ट असा संयोग जुळला. मग काय विचारतां? परस्परांच्या औपचारिक भाषणास सुरुवात झाली. औपचारिक भाषण होतां होतां चिंतोपंतांनीं सहजगत्या म्हणून प्रश्न केला. "एवढे आज जरूरीचे काय कागद आले होते? कांहीं आमच्या खूपखाबादेसंबंधानं असले तर उगच असूं या कानावर पडलेलं. किती केलं तरी आपली संस्थानं आहेत. होतां होईल तों साधेल ती लटपट करून तीं अस्तित्वांत रहातील असं करणं आपलं पक्कं कर्तव्य आहे. किती केलं तरी तुह्मी काय अन् आह्मी काय, हिंदु रक्तमांसाचे. तेव्हां अभिमान बाळगून या गोऱ्यांची लटपट कमी होईल तितकी करावी हें आपलं कर्तव्य आहे. याविषयीं तुमचा आमचा मतभेद नाहींच मुळीं. मग!"

"तुह्मी म्हणतां तें अगदीं बरोबर आहे. मतभेद अशा बाबतींत असणार कसा? संस्थानिक किती जरी वेडेवांकडे वागले, तरी संस्थानांतल्या संस्थानांत वागतील, उधळपट्टी करायची ती तिथल्या तिथेंच करतील, लोकांचा छळ केला तर तेच त्यांचे उद्यां हित पाहतील." दोघांनींही एकदम माना डोलविल्या. "बराबर! बराबर!" असे उद्गार दोघांच्याही तोंडून एकदम निघाले आणि चिंतोपंत लागलीच म्हणतो, "खूपखाबादेसंबंधानं जर कांहीं अधिकउणा पत्रव्यवहार असला तर सुचवीत जा. मला कुठून बातम्या कळतात हें फुटेल असं स्वप्नांतसुद्धां आणूं नका. मान कापली तरी सुद्धां कधीं माझेकडून बातमी फुटायची नाहीं."

"मला त्याबद्दल मुळींच शंका नाहीं. तुह्मीं सांगितलेली गोष्ट मीं आणि मीं सांगितलेली तुह्मीं जर फोडली तर जगांत कोणाजवळ कधीं गुप्त ह्मणून कांहीं रहाणार नाहीं, असंच मी समजतों. कागदपत्रांत खूपखाबादेबद्दल बिलकुल कांहीं नाहीं. दुसऱ्या कांहीं संस्थानांबद्दल आहे, परंतु त्याची आपल्याला मुळींच जरूरी नाहीं. तेव्हां सरकारी गुप्त गोष्ट फोडल्याचा तरी चार्ज घ्या कशाला? खूपखाबादेबद्दल कांहीं कधीं आलं तर मी आपल्याला कळवीन; त्याबद्दल शंकाच नको. पण आज साहेब आणखी तुह्मी बराच वेळपर्यंत इतकं काय बोलत होतां? कांहीं आह्मांला दोन शब्द कळूं द्या."

"मी आतां तुह्मांला जर सांगितलं, तर बाबूसाहेब, तुम्हांला खोटं वाटेल, पण खरोखरी इतका वेळ आमचं त्याचं बोलणं झालं त्यांत एकसुद्धां महत्त्वाची गोष्ट नव्हती. उगीच सटरफटर खरबट नेहमीं साहेब विचारीत असतात, आणि मी वाटेल तसं सांगत असतों. कांहीं होय म्हणावं, कांहीं नाहीं म्हणावं. ज्याच्या-

पासून कांहीं कुणाचं नफानुकसान होणार नाहीं अशा थापा माराव्या. एवंच, कसा तरी त्यांचा आपल्यावरला विश्वास कायम ठेवण्याची खटपट करावी आणि आपली त्यांच्या ठिकाणीं पूर्ण निष्ठा आहे, असं त्यांना भासवीत असावं. आमच्या वडिलांचा आणखी त्यांचा मोठा ऋणानुबंध होता. त्यामुळं त्यांचा आपला माझ्यावरही लोभ आहे. मग त्या लोभाचा फायदा कां करून घेऊं नये ? एवढ्याकरितां मी वारंवार येऊन भेट घेत असतों. काढली तर एखादी नाजूक बातमी त्यांच्याचकडून काढतों. त्यांनीं किती ही प्रश्न विचारिले तरी ताकास तूर लागूं देत नाहीं."

बाबूमहाशय आपल्याशींच म्हणतात, " अरे, हा दक्षिणचा हुप्प्या मोठा वस्ताद तर खरा. पण याच्याही शेंडीला गांठ देईन तर मी नांवाचा मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय ! हरामखोरानं इतक्या गोष्टी साहेबांस सांगितल्या, आणखी मला म्हणतो मी एक अक्षर देखील साहेबांच्या कानीं पडूं देत नाहीं. बरं आहे. आतां प्रसंग आलाच आहे. जर ना उलथाच्या पालथा करीन तर नांवच बदलीन बच्चाजी ! " नंतर मोठ्यानें म्हणतो, " हें तर आपण फारच उत्तम करतां ! पण कधींमधीं एखाद दुसरी खरी, आणखी त्यांना बरी वाटणारी बातमी झोंकून देण्याला कमी करूं नये. कधींच कांहीं जर तुमच्याकडून कळलं नाहीं तर तुमच्यावर खप्पा मर्जी होईल. "

" बाबूसाहेब, आपण म्हणतां ती गोष्ट खरी. पण मी अशा विचाराचा माणूस आहें कीं, मर्जी खप्पा झाली तरी पत्करली. पण ज्या संस्थानचं अन्न खातों त्याला अहितकारक असा एक शब्द सुद्धां तिकडचा इकडे येऊन सांगूं नये. " बाबू महाशय मनांतल्या मनांत हंसले आणि थोडा वेळ कांहींच न बोलतां मग ह्मणतात, " आपला विचार अगदीं बरोबर आहे. मीं सांगितली ही गोष्ट केवळ पॉलिसीची ह्मणून सांगितली. दुसरं कांहीं नाहीं. " बाबूमहाशयांनीं जाणलें कीं, ठकास महाठक अशी ही गांठ पडली आहे. याच्यापासून आपल्याला कांहीं निष्पन्न होईलसें तर दिसत नाहीं. पण कांहींतरी निष्पन्न होईल या आशेनें आपण जर यास कांहीं सांगितलें, तरी सुद्धां विपरीत प्रकार होण्याचा संभव आहे. बाबूसाहेब सगळीकडे जाऊन बातम्या कळवितो असा समज साहेबांच्याजवळ करून देण्यास हा लेकाचा कमी करणार नाहीं. न जाणों, साहेबांच्या संमतीनेंच गुलामाचा आपल्यापासून कांहींतरी काढण्यास आज आला असेल ! नाहीं कशावरून ? पुढें देशभक्तीवर दोघांचींही थोडींबहुत व्याख्यानें झालीं. संस्थानें अस्तित्वांत राहिलीं पाहिजेत अशाबद्दलची कळकळ दोघांनींही परस्परांस दाखविली, परंतु एकाचाही हेतू पूर्ण न होतां एकमेकांपासून दोघांसही दूर जावें लागलें.

दुसरे दिवशीं रात्रीं बाबूमहाशय रेसिडेन्सीच्या ठिकाणापासून सुमारें दहा पंधरा मेलांवर असणाऱ्या एका टपालांत कांहींतरी बंगाली पत्ता लिहिलेलें टाकून आले.

---

# प्रकरण ४० वें.

## मुत्सद्दी कोण ?

मागील प्रकरणीं सांगितलेल्या गोष्टी खूपस्माबादेस व रेसिडेंटसाहेबांच्या घरीं घडून सुमारें पंधरा दिवस झाले. चिंतो-पंताचे रेसिडेन्सींत इतके दिवसांत किती हेलपाटे झाले असतील यास गणतीच नाहीं. आणि जितक्या वेळां ते हेलपाटे झाले, तितक्या वेळां साहेबांची व त्यांची खासगत मुलाखत चालली असतां तेथें काय भाषणें चाललीं आहेत याची माहिती करून घेण्यासाठीं बाबूमहाशयांनीं आपलेकडून पराकाष्ठा केली. ज्या त्यांच्या पहिल्या युक्तीमुळें त्यांस ' आपलं आतां जिवावर आलं होतं ' असें वाटलें होतें, ती युक्ति कर-ण्यास त्यांचें मन पहिल्या खेपेस जरी कचरलें, तरी अखेरीस त्यांच्या मनाची अशीच खात्री झाली कीं, आपले मनास त्या वेळीं वाटलेली भीति केवळ निरर्थक होय. जर तींत कांहीं अर्थ असता, तर साहेब कांहीं इतका वेळ स्वस्थ बसतेना; त्यांनीं आपल्यास केव्हांच वाटेस लावून दिलें असतें. किंबहुना आपल्यावर काय तोहमत आणली असती आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. पण ज्या अर्थीं तसें कांहींएक झालें नाहीं, त्या अर्थीं साहेबांस आपल्याबद्दल आपण ह्मणतों तसा संशयच आलेला नाहीं. वस्तुस्थिति काय होती ही परमेश्वरास ठाऊक. पण सध्यां बाबूसाहेबांस मात्र हवेंत किल्ले बांध-ण्यास हवीतशी सामग्री आणि संधि सांप-डली. साहेब हल्लीं एकसारखे कांहींतरी लिहिण्यांत, तारा करण्यांत वगैरे गुंतलेले असत. जें काय ते लिहीत तें बार करण्या-साठीं किंवा नक्कल करण्यासाठीं कधींही ऑफिसमध्यें येत नसे, ही गोष्ट मात्र बाबूंस फार वैषम्याची वाटली. आप-ल्यावर साहेबांचा मुळींच विश्वास नाहीं, चिंतोपंतावर विश्वास अधिक; चिंतोपंताचे वारंवार हेलपाटे होतात ते केवळ यांतील गुप्त कागदांच्या नकला करण्यासाठीं होत असावेत; साहेब कांहीं आपणच प्रत्येक कागदाची नक्कल करून ठेवीत नसतील खास. कारण इतकी कर्तव्यतत्परता साहे-बांचे अंगीं नाहीं. साहेब ऐषआरामांत मात्र गढलेले असावयाचे. असा बाबूमहाश-यांचा आजपर्यंतचा अनुभव-निदान अशी त्यांची समजूत तरी होती. या दक्षिणच्या माकडानें आपल्यास सपशेल धक्का मारून बाहेर घालवून साहेबांच्या मर्जींतलें वि-शिष्ट स्थान बळकावून टाकिलें. आतां कांहींतरी अशीच युक्ति केली पाहिजे कीं, आपल्यास जरी पूर्वस्थान मिळालें नाहीं, तरी या गुलामास तें मिळूं द्याव-याचें नाहीं आणि होतां होईल तों त्याची नाचक्की होईल असें करावयाचें. या गेल्या पंधरा दिवसांत बाबूमहाशयांनींही आपल्या

मायभाषेंत कोणासतरी थोडीं थोडकीं पत्रें लिहिलीं असें नाहीं. पत्रांची संख्याच अधिक होती असें नाहीं, तर दूर पत्राचा विस्तारही भला थोरला असे. मग इकडल्या या चाकरीची क्षणभंगुरता मनांत येऊन व देशभक्तीचें वारें अधिक संचरून ते आपल्या जन्मदेशीं पोटाचा स्वतंत्र उद्योग लाभवून देशजननीची सेवा करतां येईल कीं नाहीं हें पाहत होते कीं काय न कळे. पण ते येणाऱ्या पत्रांविषयीं फार उत्सुक असत. कित्येक वेळचीं पत्रें त्यांनीं नजीकच्या पोस्टांत न टाकतां दूरच्या पोस्टांत नेऊन टाकिलीं. तींही टाकण्यास दुसऱ्या कोणास कधीं सांगितलें नाहीं. मागील प्रकरणीं सांगितलेंच आहे कीं, चिंतोपंत व बाबूमहाशय एकमेकांपासून बातम्या काढण्यासाठीं एकमेकांच्या मुलाखती घेत, पण कोणीच कोणाची डाळ शिजूं देत नसे. जो तो अशा व्यवस्थेनें बोले कीं, आपलें तर कांहीं कळूं नये, पण दुसऱ्याचें काय असेल नसेल तें काढून घेण्याची अतोनात खटपट करावी. बाबूमहाशयास बातमी काढून घेण्याची इच्छा कां, त्याचप्रमाणें चिंतोपंतासही कां, हें आजच वाचकांस सांगण्याची अवश्यकता नाहीं. साहेबांशीं एक दोन दिवसाआड पांचपांच तास चारचार तास मुलाखत होत असतां त्यांच्या यःकश्चित् हेड क्लार्कापासून चिंतोपंतास बातम्या त्या काय कळणार ? आणि तो बिचारा अधिक तें काय सांगणार ? असो.

याप्रमाणें या दोघांची परस्पर खटपट चालली असतां एके दिवशीं चिंतोपंत आपले घरीं कांहीं फार महत्त्वाच्या गोष्टींचा विचार करीत बसला होता. आतांशा कामाच्या अतिरेकामुळें रंगोपंताकडील हालहवालीसंबंधानें येणारीं पत्रें आपलेकडे न घेतां वरील अक्षर पाहतांच त्यांनीं आपल्या पत्नीकडे रवाना करावीं असा प्रकार चालला असे. खासगी संबंधांत पत्रव्यवहार करण्यास किंवा पैशाच्या बाबतींत हिशेबठिशेब पाहण्यास त्यांस फुरसत नाहींशी झाली होती व त्याप्रमाणें त्यांनीं थोड्या दिवसांपूर्वीं आपले बायकोस बोलूनही दाखविलें होतें. रंगोपंताचें एक भलें थोरलें पत्र नानाप्रकारच्या हकीकतींनीं भरलेलें असें आलें होतें. तें फोडून पाहतांच पांच चार बंद भरले आहेत, आणि काय काय गोष्टी तरी आंत लिहिल्या आहेत असें चिंतोपंतांनीं पाहिलें. त्यांस ते दिवशीं रेसिडेन्सींत साहेबांची गांठ घेण्यास जावयाचें होतें. अर्थातच त्यांनीं तें पत्र आपल्या राणीसरकारचे अंगावर फेंकून " यांत काय आहे तें पाहून योग्य तें उत्तर लिहा " असें सांगितलें आणि स्वारी तेथून चालती झाली. परत आल्यानंतर रात्रीं जेवणेंखाणें झाल्यावर सरस्वतीबाईनें त्या पत्रांतील मजकूर समजावून सांगण्यास आरंभ केला असतां चिंतोपंत लागलीच ह्मणतातः " आतां हें पहा, या सगळ्या गोष्टी तुमच्यावरच सोंपवून दिल्या आहेत. जे काय पैसे मिळतील ते आणून आपलेकडे देत जाऊं मिळवून आणण्याचं काम आमचं आणि त्याची व्यवस्था लावण्याचं काम आपलं. निदान सध्यां या बाबतींत मन घालण्यास मला फुरसत नाहीं. वेळ अशी विलक्षण आहे कीं, या वेळीं जागती बुद्धि ठेविली, डोळे उघडे ठेवून कुठें काय चाललं आहे हें पहात राहिलें, तर कोट कल्याण करून घेतां येणार आहे. तेव्हां आह्मांला तें करून घेण्याकरितां तुह्मीं मोकळं सोडावं हें चांगलं. तिकडला आणि इथला

दोन्ही कारभार तुमचे तुम्ही पहा. मी एका उत्तरानं सुद्धां तुम्हांला विचारणार नाहीं. आणि विचारायचं कोणाला ? तुम्हांला? ज्या गोष्टी मला समजायच्या नाहींत, आणखी समजतही नाहींत, अशा गोष्टी आपल्याला चक्क समजतात. मलाच एखाद्या गोष्टींत अडचण पडली तर आपली मदत घ्यावी लागणार......"

" पुरे मेलं. इतकं चढवून कांहीं द्यायला नको मला. आपल्याला फुरसत नसली तर मी सगळा कारभार करीन, अन् करीतच आलें आहे. आजपर्यंत कुठं काय पाहिलं आहे, तर आतांच पुढं पाहणं होणार आहे ? पण आपलं जो काय मजकूर होईल तो पुरुषांच्या कानीं घातलेला बरा. आज फुरसत नसली तर फुरसत होईल त्या वेळीं सांगेन. पण आतांशा इतकी फुरसत नसल्याला एवढं कारण तरी काय आहे ! इतके साहेबांकडून निरोप, बोलावणीं येतात तरी कसलीं ? मी आज बरेच दिवस पाहतें आहें. पांच सात वेळां काय आहे काय नाहीं याची चौकशीसुद्धां केली. पण मला कांहीं अजून सांगायचं झालं नाहीं. इथें आल्यापासून चांगलाच मुत्सद्दीपणा अंगीं आला म्हणायचा, कीं मला सुद्धां कांहीं कळू द्यायचं नाहीं ! "

" एकदां आतां सांगितलंना कीं या बाहेरल्या गोष्टींत आमची आम्हांला मोकळीक असूं दे ? आणखी घरांतल्यान् तिकडल्या ज्या गोष्टी आहेत त्या आपल्या तुमच्या तुम्हीं पाहून घ्या. मग आतां आमच्या गोष्टींची विचारपूस कां ? आम्ही तुमच्या गोष्टींची विचारपूस करणार नाहीं असं मघाशींच सांगितलं आहे, मग आतां कां ? "

" आपण जरी घरच्या कामाबद्दलच्या विचारपुशीचा राजीनामा दिला असला, तरी मी कांहीं दुसऱ्या कशाच्या बाबतींत बोलणार नाहीं असा राजीनामा दिलेला नाहीं. मी वाटेल त्या गोष्टींत विचारावंसं वाटलं, कीं विचारणारच मुळीं. मोठी महत्त्वाची गोष्ट असली, तर मला सांगितल्या विचारल्याखेरीज आपण ती करूंच नये. कित्येकदां आजपर्यंत असा अनुभव नाहीं का आला, कीं आपल्याला सुमार राहिला नाहीं, भलत्याचं भलतंच कांहीं तरी करण्याच्या बेतांत आलां, आणखी मी जर त्या वेळीं बोललें नसतें, तर कांहींतरी तिरपागडं होऊन बसलं असतं ? जें असल्या गोष्टींत तेंच या मुत्सद्दीपणाच्या गोष्टींतयू होणार नाहीं म्हणून काय सांगावं ? "

" मग आतां आपलीच आमच्या जागीं नेमणूक करून घेण्याबद्दल एखादा अर्ज द्यावा पाठवून ! आणखी आम्ही राजीनामा देतों. "

"राजीनामा कशाला द्यायला पाहिजे ? आपली नेमणूक हीच माझी नेमणूक. माझी नेमणूक निराळी कशाला व्हायला पाहिजे?"

" माझी नेमणूक झाली त्या हुकुमाच्या कागदांत कुठं आपलं नांव नाहीं दिसत ? "

" नांव नकोच दिसायला. आपली नेमणूक झाली ती कुणामुळं झाली ? मी जर पाठीस लागलें नसतें, ' ' अमुक असं लिहा, ' ' तमक्याला भेटायला जा, ' ' तमक्याची गांठ घ्या, ' हें जर मी कानीं कपाळीं ओरडलें नसतें, तर आज हीं बोलणीं बोलायला आपण कांहीं इथं आलां नसतां. खुशाल त्या भिकार घरांत रिकामटेकडे माशा मारीत बसलां असतां. या सगळ्या उलाढाली आतां होताहेत

आणखी एवढा मोठेपणा मिळतो आहे तो कुणामुळं, याचा विचार केला म्हणजे मग नाहीं अशीं हीं टाकून टाकूनचीं बोलणीं सुचायचीं. ”

“ तर, तर ! जें काय एकंदर आह्मीं आजपर्यंत केलं तें सारं आपल्यामुळें. आह्मांला अक्कल—ज्ञान कांहीं नाहीं. आपल्या वडिलांनीं आपली ही देणगी देऊन आह्माला उपकारलं नसतं, तर आमची मोठी त्रेधा होती ह्मणायची ! ”

“ आणखी किती जरी उपरोधिक बोलण्याचा आव घातला तरी मी साफ ह्मणतें कीं, हो, हो, त्रेधाच होती. एखादं बावळं रत्न पडलं असतं, ह्मणजे मग त्या भावंडांनीं, आणखी त्या माईसाहेबांनीं, आणखी त्यांच्या वडिलांनीं चांगला डोक्यावरून हात फिरवून आपल्याला जर मुलंबाळं सांभाळण्याला लावलं नसतं, तर काय म्हणाल तें मी ऐकेन. एका फुटक्या कवडीची सुद्धां मालकी आपल्याकडे राहिली नसती. इतकी मी एकसारखी कानींकपाळीं ओरडत होतें, तरी हातचे दहा पांच हजारांचे दागदागिने गेलेच किनई ! इतका सगळा सावधपणा करूनच्या करून पुनः आणखी मलाच उपरोधिक बोलणीं ? येवढं तें पाहिजे कशाला ? आजपासून मी कोणच्याही बाबतींत एक अवाक्षर बोलेन तर अगदीं शपथ जा ! मेलं माझं तरी मेलीचं एवढं कां कपाळ दुखतं ? आतां पुन्हा ह्मणून एक अक्षर बोलायची नाहीं, बघा. मी जर युक्ति सुचविली नसती, आणखी माझ्या म्हणण्याप्रमाणें सगळं कांहीं करायला लावलं नसतं, तर आज हा गुंड्या कोणत्या थराला नेता याची कांहीं तरी कल्पना ? ‘ बायकांचा जल्म म्हणजे मेला अगदीं व्यर्थ ’ असं म्हणतात तें खोटं कां ? त्यांनीं कितीही शहाणपणाचं काम केलेलं असो त्याचं यश कांहीं त्यांना कधीं मिळायचं नाहीं. मी ह्मणतें, मेलं लौकिकांत यश मिळायचं असो, पण घरांतल्या घरांत तरी तें मिळावं कीं नाहीं ? पण छे ! तें सुद्धां आमच्या कपाळीं नाहीं. नाहीं तर नाहीं. आतां मी बोलतें आहें कशाला ? एक एकदां माणसाला ठोकर लागत असते. ”

हें शेवटलें बोलणें होत असतां सरूबाईची चर्या फारच उग्र झाली होती, आणि डोळ्यांतून, कांहीं रागानें व कांहीं खेदानें, गंगायमुनांचा उद्भव होतो कीं काय असें दिसूं लागलें. त्याबरोबर चिंतोपंतांची स्वारी अगदीं द्रवून जाऊन एकदम म्हणते, “ अरेरे ! ! इथपर्यंत का मजल आली ? आपण आतां कशाच्या बाबतींत बोलणार नाहीं ? मग महाराणीसरकारचं राज्य चालावं तरी कसं ? ” चिंतोपंतांनीं सरूबाईचा राग विझावा म्हणून आपल्याकडून हा विनोद केला; हेतु हा कीं, आपल्या पत्नीच्या क्रोधाग्नीवर पाणी पडावें, पण बिचाऱ्यानें पाणी ह्मणून जें टाकिलें तें तेल झालें आणि एकदम जो त्यापासून भडका उडाला त्या भडक्यानें आपली राख होऊन जाते कीं काय असें त्यास वाटलें.

“ हो ! हो ! राणीसरकारच्या राज्याची कशाला गोष्ट पाहिजे ? मी बायको ह्मणून मला अशा गोष्टी सांगतां कीं काय ? मी मुळींसुद्धां ऐकून घ्यायची नाहीं. जा. तुह्मींन् तुमचं तें पोर अन् घरदार संभाळा. मी ही चाललें आपल्या माहेरीं. उद्यां सकाळीं जर इथें पांस घेईन तर अगदीं शपथ. इतकीं बोलणीं बोलायला आणखी ऐकून घ्यायला मीं असं केलं तरी काय ? येऊन जाऊन कधींकधीं काय चाललंय् काय

नाहीं याची चौकशी करितें इतकंचना ? ती करितें ती आपल्याच हितासाठीं करितें. कांहीं माझं कां त्यांत हित आहे ? काय चमत्कार पहा ! ह्मणे राणीसरकारचं राज्य कसं चालेल ? मी एक नसलें तरी आपण तर आहांतना ? आपण चालवा. आतांशा जरा मी पाहतेंच आहें, मला कसं टाकून टाकून बोलणं होतं तें. पण मी म्हणतें कीं असेल उगीच थट्टेचं ! पण छेः ! जों जों दुर्लक्ष्य करावं तों तों अधिकच. " आतां मात्र गंगायमुना अनावर झाल्या.

# प्रकरण ४१ वें.

## सरस्वतीबाईंची महत्वाकांक्षा.

वस्तुस्थिति सांगावयाची म्हटली म्हणजे सरस्वतीबाईच्या " कानींकपाळीं ओरडण्याचें " च फळ [illegible] उ[illegible] होता. परंतु मनुष्याची स्थिति अशी आहे कीं, त्यास आपण केलेल्या कार्याबद्दलचेंच यश घेऊन समाधान मानून राहवत नाहीं. दुसऱ्यानेंही केलेल्या कार्यांतील यशाचा होतां होईल तों मुख्यांश नाहीं तरी गौणांश प्रत्यक्षरीत्या किंवा परोक्षरीत्या आपणाकडे ओढावयास सांपडल्यास पहावा. न जाणों, सरूबाईंनीं म्हटल्याप्रमाणें कदाचित् " बायकांनीं कितीही शहाणपणाचें काम केलेलें असो, त्याचें यश कांहीं त्यांना कधीं मिळायचें नाहीं " हेंही खरें असेल ! असो.

प्रत्यक्ष गंगायमुनाच प्रावृट्काळीं अनावर होऊन सोसाट्यानें वाहूं लागल्यानंतर त्यांच्या तडाक्यांत सांपडलेला कोण इसम त्यांतून सुटण्यासाठीं जिवापाड श्रम करणार नाहीं ? चिंतोपंतानें पाहिलें कीं, विनोद होतां होतां गोष्टी वेगळ्याच थरावर गेल्या. लागलीच त्यानें मोर्चा बदलला.

" ह्मणजे थट्टेचं नाहीं असं का आपल्याला वाटलं ! वाहवा ! तूं इतकी आपल्याला मुत्सद्दी ह्मणवतेस, आणखी खरोखर थट्टेच्या पलीकडे माझ्या बोलण्यांत दुसरं कांहीं सुद्धां नाहीं, इतकं तुझ्या लक्ष्यांत आलं नाहीं ? खरोखर सांगतों केवळ तुझं मन पहावं—बरं तूं काय ह्मणतेस, नाहीं तर आजपर्यंत अमुक एक गोष्ट ह्मणजे मीं तुझ्यापासून लपवून ठेवलेली तुला आठवते आहे का ? या राजकीय गोष्टी आहेत, जरा नाजूक. तेव्हां जितक्या इकडे तिकडे न होतील तितक्या बऱ्या ! "

बिचाऱ्या चिंतोपंतास बुलिस्नीकसाहेबांजवळ बोलण्याचालण्याचें काय धोरण असेल तें असो, परंतु सरस्वतीबाईच्या जवळ बोलतांना कांहीं धोरण राहत नसे. बिचाऱ्याच्या शब्दांची निवड इतकी

कांहीं विलक्षण होत असे कीं, त्याच्या मनांत जो अर्थ असेल त्याहून अगदीं विपरीत असाच अर्थ त्या शब्दांनीं सरस्वतीबाईच्या मनावर बिंबवावा आणि असें झालें ह्मणजे त्या बिचाऱ्याच्या स्थितींत आजन्महीं आपण जाऊं नये असेंच प्रत्येकाला वाटेल, अशी त्याची स्थिति होत असे, हें सांगावयास नकोच. वरील भाषणांत त्या बिचाऱ्याच्या मनांतून खरोखर अगदीं दीनपणा स्वीकारून व माफी मागून झाल्या गोष्टीवर सारवण घालावयाचें होतें. त्यानें आपल्याकडून शब्दांची निवड केली ती तशाच हेतूनें केली होती. परंतु एखाद्या अवसानघातक्याप्रमाणें बिचाऱ्याची स्थिति झाली. पहिल्यानें प्रारंभ ठीक झाला. मध्येंही अवसान वावगें नव्हतें. परंतु शेवटच्या शब्दांनीं त्या सगळ्यावर बोळा फिरला.

"हो ! हो ! ! तर मला कळलं कीं, तें सगळ्या जगभर होतं ! मला कांहीं दुसरा उद्योग आहे का ? कांहीं शहाणपणा आहे का ? कांहीं अक्कल आहे का ? कांहीं नाहीं ! आपल्यापासून एखादी गुप्त गोष्ट कळेल केव्हां, आणखी ती जाऊन सगळ्या गांवभर एकदां सांगेन केव्हां, या निजध्यासांत मी असतें. ह्मणूनच सांगतेंना कीं, मी आपली एकदांची इथून जातें. माझा कांटा निघाला ह्मणजे मग तुमचं चांगलं चालूं द्या !"

"तूं जाऊन गांवभर सांगशील असं का मीं ह्मटलं ? मला इतकं नाहीं का ठाऊक ? मीं म्हटलं त्याचा अर्थ नाहीं तुला कळला."

"मग 'या गोष्टी राजकीय आहेत.' तेव्हां जितक्या इकडे तिकडे न होतील तितक्या बऱ्या, ' याचा अर्थ काय ? मी बोळ्यानें दूध पितें आहें असा का आपला समज ? मला सांगितलं म्हणजे इकडे तिकडे झालं असंच किनई ? अहो, जें मनांत होतं तें एकदम बाहेर पडलं. आतां किती जरी कळाकुसलाई आणखी मालमखलाशीं केली, तरी मी कांहीं फसायची नाहीं."

चिंतोपंताला खरोखर त्यावर कांहीं उत्तर सुचेना. त्यानें आपल्याकडून, "तसं कांहीं नाहीं. माझा अर्थ कांहीं तसा नाहीं मीं आपलं म्हटलं——तें कांहीं निराळंच. मनांत होतं तें——तें कांहीं निराळंच !" असे तुटक तुटक उद्गार काढून आपला खरा अर्थ काय होता तें समजावून देण्याची खटपट केली. परंतु व्यर्थ. जितका आधींच्या त्या बोलण्याचा परिणाम व्हावयाचा तितका झालाच. जितका वेळ रागांत, संतापांत प्रत्यक्ष आपल्याला आणि अप्रत्यक्ष दुसऱ्याला नानाप्रकारच्या शिव्या व शाप देण्यांत, हातपाय आपटण्यांत आणि एकंदरींत चामुंडेचा हा दुसरा अवतारच आज आपल्यासाठीं अवतीर्ण झाला आहे असें बिचाऱ्या चिंतोपंतास वाटविण्यांत जितकें ह्मणून कौशल्य योजितां येईल, तितकें सरस्वतीबाईनें योजून शेवटीं त्या बिचाऱ्यास अगदीं शरण येण्यास लाविलें. कोणतीही गोष्ट कितीही कमीअधिक गुप्त व महत्त्वाची असो, ती तुला तात्काळ कळविल्याखेरीज मी राहणार नाहीं, अशी त्रिवार शपथ वाहून नाकदुऱ्या काढीपर्यंत स्थिति आली. त्याही स्थितींतून बिचारा चिंतोपंत बिनतक्रार बाहेर पडला. इतकें झालें तेव्हां सरस्वतीबाईचा अंतरात्मा शांत झाला. आणि मग थोडा वेळ होय नाहीं होतां होतां एकदां पूर्ण प्रसन्नतेचें पुढील उत्तर चिंतोपंतास ऐकावयास सांपडलें.

" अहो ! तुम्हांला मोठेपणा मिळावा, तुमची बढती व्हावी, तुमचा बडेजाव व्हावा, एवढ्याचकरितां माझा जीव तळ-मळतो. माझं स्वतःचं काय त्यांत जास्त कमती होणार आहे ? देवाच्या दयेनं जितका मामंजींनीं ठेविलेला पैसा आपण हाताखालीं घातला आहे, तितकाच घेऊन स्वस्थ बसायचं म्हटलं तर काय होणार नाहीं, होईलच ? पण मोठा नांवलौकिक मिळायचा तो कोठून मिळायला ! तो मिळायचा म्हटला म्हणजे त्याच्याकरितां या असल्या उलाढाली केल्याच पाहिजेत. त्याखेरीज कधीं मी ह्मणतें तसा मोठेपणा लाभायचा नाहीं. मला तर बाई असल्या उलाढाली करण्याची भारी हौस ! पण काय करूं ! देवानं मला बायको केली ! आणखी...आणखी...ज्यांच्या पदरीं बांधली ते हे तुह्मी असे ! माझं तुम्ही ऐकाल तरच तुम्ही म्हणतां तसं कोट-कल्याण होईल. आपलं मी इथें एवढं तेवढं सुचवतें तेवढ्यावरून तुम्हीच आपलं मला न विचारतां वाटेल तें कराल, तर अगदीं खचित् सांगतें कुठें तरी फसाल. आणखी भलतंच कांहीं तरी करून ठेवाल. मला सगळं सांगत जा. मी सगळ्या गोष्टींत कांहींना कांहीं तरी तुम्हांला चांगलं सुचवीन, असं कीं तें ऐकण्याबरोबर तुमचं तुम्हांला खरं वाटेल. इतकंच नाहीं, पण त्याचा अनुभवसुद्धां येईल, अन् मग तुम्हीच माझी तारीफ कराल. अहो, राज्याबिज्यांच्या उला-ढालींत सुद्धां बायकांच्या शिवाय खरं जर ह्मटलं तर चालत नाहीं. मला कांहीं तुमचा इतिहास का फितिहास तो माहीत नाहीं. पण त्यांत देखील पुष्कळ उलाढाली बायकांनींच केल्या असतील असं मला वाटतं. एक लिहिणारानं त्यांचीं नांवं लिहिलीं नाहींत म्हणून काय झालं ? लिहिणाऱ्या बायका असत्या तर त्यांचीं नांवं आलींच असतीं. मोठेपणाची इच्छा तुमच्या-पेक्षां आम्हांला कमी आहे असं समजूं नका. मला तर तुम्ही जितकं वर चढाल तितकं चढल्याखेरीज राहूंच नये असं वाटतं. पण तुमच्या मनांत तें माझ्याइतकं भरेल तेव्हां खरं ! "

सरस्वतीबाईचें म्हणणें अगदीं अक्षरशः खरें होतें. तिची महत्त्वाकांक्षा किती अनावर होती याची पुरी कल्पना तिची तिला सुद्धां नसेल. ती जर पुरुष असती आणि तिला तशा संधि मिळाल्या असत्या तर तिनें हां हां म्हणतां अनेक उलाढाली केल्या असत्या. कित्येक राजांच्या घरांत प्रवेश करून कित्येक राजांच्या आपल्या स्वतःच्या घराप्रमाणेंच उलथापालथी केल्या असत्या. संस्थानें, राज्यें इत्यादिकांची ऐकीव माहिती तिला तिच्या सासऱ्याच्या अमदानीपासून ऐकून ऐकून ठाऊक होतीच. शिवाय तिला एक वेळां कोणीं असेंही सांगितलें होतें कीं, तुझ्या माहेर घराण्यांत मूळापासूनच राज्यसंस्थानांत मुत्सद्दीगिरीचीं कामें केलेले पुरुष होऊन गेले. तिची मोठी इच्छा कीं, हिंदुस्थानां-तल्या मोठ्या थोरल्या संस्थानांत केव्हां-तरी आपल्या नवऱ्यास दिवाणागिरी मि-ळावी आणि तशी दिवाणागिरी मिळाली म्हणजे आपणही मोठेपणास चढूं. ही तिची फार मोठी महत्वाकांक्षा होती. आजपर्यंतच्या एकंदर तिच्या चरित्रावरून वाचकांस दिसून आलेंच असेल, कीं पैसा आणि महत्त्व या दोन गोष्टींखेरीज जगांत तिचें दुसऱ्या कशावरही प्रेम नव्हतें व दुस-ऱ्या कशाबद्दल तिला महत्त्व वाटत असेल असें तिच्या वर्तनावरून कोणास दिसलेंही नाहीं. पैसा हें महत्त्व मिळविण्यासाठीं एक

मोठें थोरलें साधन होय, आणि त्या साधनाचा वाटेल तसा उपयोग करून महत्त्व संपादावें, येथपर्यंत तिचें मन तयार झालें होतें कीं नाहीं, याबद्दल मात्र शंका घेण्यास जागा होती. मोठेपणा आणि पैसा या दोहोंपैकीं तिच्या दृष्टीनें कोणती गोष्ट साध्य आणि कोणती गोष्ट साधन हें समजणें फार कठिण होतें. पैशासाठीं ती कोठपर्यंत काय करील याचा अल्पसा अंश वाचकांस कळलाच आहे. अल्पसा असें ह्मणण्याचें कारण पुढें लौकरच येणारे कित्येक भाग मागल्या सर्व भागांस अगदीं दूर काळोखांत सारण्याजोगे आहेत. पैशासाठीं महत्त्वाची रक्षा करून घेईल, कीं महत्त्वासाठीं पैशाची रांगोळी झाली तरी पर्वा करणार नाहीं, हें आजपर्यंतच्या तिच्या वर्तनावरून कोणासही सांगतां आलें नसतें. न जाणों, प्रसंगानुसार दोहोंच्या आशेचें दोहोंची रांगोळी करून घेण्यास ती मागेंपुढें पहाणार नाहीं. परंतु वाचकांस तिचें एकंदर चरित्र बघण्यास सांपडावयाचें आहे. तेव्हां तिच्या स्वभावाचें शब्दचित्र चितारीत बसण्यांत कांहीं विशेष तात्पर्य नाहीं.

चिंतोपंतानें प्रसन्नता झाली असें पाहून "हो हो, मला काय ठाऊक नाहीं कीं काय ? आपल्याला खरोखर जास्ती कळतं आहे असं वाटलं नसतं, तर मी तरी ज्या त्या गोष्टींत आपल्या सांगण्याप्रमाणं वागलों असतों कसा ?" इत्यादि उद्गार काढून मर्जी अधिक खुष करण्याचा अधिक प्रयत्न केला. त्यांत त्यास यश कितपत आलें हें सांगवत नाहीं. मात्र, "वागाल तर सगळ्यांचं कल्याण होईल," एवढेंच उत्तर मिळालें. नंतर आणखीही अशाच प्रकारचें बराच वेळ बोलणें होऊन चिंतोपंतांनीं शेवटीं आज गेल्या कांहीं दिवसांत कोणत्या उलाढालींत साहेब आपली सल्लामसलत घेत आहेत आणि त्यांस आपला उपयोग किती होत आहे वगैरे गोष्टी समग्रपणें निवेदन केल्या; इतकेंच नव्हे, तर एकंदर स्थिति कोणच्या परिणामावर आणण्याचा आपला घाट चालला आहे हेंही सर्व त्यानें तिला सांगितलें. सरस्वतीबाईकडून एक दोन वेळ शाबासकी व दहापांच वेळ "असं नाहीं. तें असं सांगायला पाहिजे होतं. तसं सांगितलं असतं म्हणजे चांगलं झालं असतं. बरं असो, झालं तें झालं, आतां पुढें तरी असं करावं." अशा तऱ्हेचे उद्गार मिळाले व नंतर पुढें कसकशा तऱ्हेनें कसकसा व्यूह रचला जावा तेंही सांगण्यांत आलें. हें सर्व कांहीं बोलणें अगदीं केवळ आपापसांतच चाललें आहे अशी दोघांही बोलणारांची समजूत होती. आतां हा सर्व व्यूह मनाप्रमाणें बनला म्हणजे सगळें कांहीं आपल्या मताप्रमाणें झालेंच असें वाटून व झाल्या गोष्टींपैकीं एकही गोष्ट कोठें फुटतां कामा नये, अशाबद्दल एकमेकांनीं एकमेकांस बजावून सांगून निद्रासुखाचा अनुभव घेण्याचा उपक्रम केला.

पण अरेरे ! सर्वच गोष्टी मनुष्याच्या मनाप्रमाणें होत नाहींत. सर्वच गोष्टी तो समजतो तशा नसतात. या महत्वाकांक्षी दंपत्याचें एकंदर संभाषण ऐकून अखेरीस मान तुकावून अर्थपूर्णरीतीनें आपल्याशींच स्मित करणारा असा कोणी तेथें होता.

---

# प्रकरण ४२ वें.

## राधाबाई.

कित्येक माणसांचें सुख म्हणजे प्रत्यक्ष दुःख नव्हे इतकेंच होय. राधाबाईची स्थिति अशा माणसांपैकीं होती हें उघड आहे. तिनें आपल्या मनांतून कितीही विवेक केला, पाठीमागल्या गोष्टी मनांतसुद्धां येऊं द्यावयाच्या नाहींत असा निश्चय केला किंवा आपली मागली स्थिति कायम असती, तर आजला आपल्यास व आपल्या मुलांस अमुक एक प्रकारचे दिवस असते, अमुक एक प्रकारचीं संकटें भोगावीं लागलीं नसतीं, अमुक अमुक बाबतींत अडचणी उत्पन्न झाल्या त्या झाल्या नसत्या, इत्यादि गोष्टी मनांत येऊंच द्यावयाच्या नाहींत, असें तिनें आपल्या मनांत किती वेळां ठरवून ते सर्व विचार दूर सारले असले, तरी ते मनांत आल्यावांचून राहणें मुळींही शक्य नव्हतें. राधाबाई मनुष्य होती. देवता नव्हे. ज्या ज्या वेळीं मुलांनीं एखादी गोष्ट मागावी आणि ती देण्याचें आपल्यास आज सामर्थ्य नाहीं असें तिच्या मनांत यावें, त्या त्या वेळीं वर सांगितलेले सर्व विचार तिच्या मनांत येत. पूर्वापर स्थितीचा विरोध पूर्णपणें तिच्या मनांत उभा राही. अमुक झालें नसतें, तर आज अशी दैना आपल्या पोरांस भोगावी लागली नसती, असा विचार तिच्या मनांत आल्यावांचून राहत नसे. परंतु हे विचार मनांत येऊन केवळ हताश होऊन ती कधीं स्वस्थ बसत नसे किंवा आपल्या शहाणपणानें, देववेल तितकें पोरांस सुख देण्याच्या आड हे विचार ती येऊं देत नसे. इतर स्त्रियांप्रमाणें "भल्यांनो, तुमच्या दुर्दैवाचींच हीं फळं होत. नशीब चागलं असतं तर अमुक झालं नसतं, तमुक झालं नसतं, " अशा तऱ्हेचे उद्गार चुकूनसुद्धां तिच्या तोंडून कधीं निघाले नाहींत. ती मुलांच्या देखत तरी निदान अशाच तऱ्हेनें वागत असे कीं, जणूं काय जन्मापासून ती याच स्थितींत वाढलेली असावी. तिनें आपले दागदागिने काय होते ते विश्वनाथपंतांच्या सल्ल्यानें हळूहळू मोडून व त्यांचे रोख रुपये करून बरेंचसें व्याज येईल व मूळ रकमेस धोका बसणार नाहीं अशा रीतीनें गुंतवून टाकिले होते. कधीं कोणापासून एक पै किंवा एक चिमूटभर मीठपीठही उसनें मागून आणण्याचा प्रसंग येऊं नये अशाबद्दल ती अतिशय काळजी बाळगीत असे; आपली दैना कोणास केव्हांही दिसून येऊं नये याबद्दल ती फार खबरदारी घेत असे. लोकनिंदेनें तिला अजीबाद सोडलें होतें असें मुळींच नाहीं. परंतु आपल्याकडून होतां होईल तों तीस कारण मिळूं नये अशाबद्दल जितकी म्हणून काळजी घेणें शक्य तितकी ती घेत असे; आणि इतकीही काळजी घेतल्यानंतर कोणी कांहीं नालस्तीचें बोलल्याबद्दल कानीं

आलें, तर 'कोणाला काय बोलायचें तें ते खुशाल बोलोत,' असें म्हणून ती आपल्या मनाचें समाधान करून घेत असे. तिच्या दुर्दैवानें आज ही स्थिति तिजवर येऊन गुदरली. अशा स्थितींत राहणारास जशा तऱ्हेचें शिक्षण व अनुभव हीं पाहिजे होतीं, तशा तऱ्हेचीं तिला कधींच मिळालेलीं नव्हतीं. यामुळें आपल्या हस्तकौशल्यानें किंवा श्रमांनीं कांहीं द्रव्य मिळवून संसाराला लावतां येईल अशा प्रकारची तिची स्थिति नव्हती. बापाचे घरीं असतां बहुतेक लाडांतच दिवस गेले आणि पुढें लग्न झालें तें कसें व लग्नामुळें ती कोणत्या स्थितीस एकदम गेली हें वाचकांस माहीत आहेच. तेव्हां इतर कांहीं बायकांप्रमाणें कोठें शिवणकाम, कोठें विणकाम, वगैरे करून व तें विकून तिनें आपल्या संसारांत भर घातली नाहीं असें सांगितलें, तर त्याबद्दल तिला वाचक नांवें ठेवणार नाहींत अशी आशा आहे. तेवढें एक वर्ज करून मुलबाळांच्या शिक्षणाविषयीं व वर्तनीविषयीं जितकी म्हणून काळजी घेणें शक्य, तितकी घेतल्याखेरीज ती कधींही राहिली नाहीं. मुलें घराच्या बाहेर गेलीं असतां परत आल्यानंतर त्यांनीं बाहेर काय काय केलें, ती कोठें कोठें गेलीं, कोणाकोणाशीं काय काय बोललीं वगैरे गोष्टींविषयीं विचारपूस करण्याची जरूर सुद्धां राहूं नये अशा प्रकारचें शिक्षण मुलांस तिच्याकडून दिलें जात असे. मुलें क्षणमात्र कां बाहेर जाईनात, बाहेर जें काय झालें असेल, जें काय कोणी त्यांना बोललें असेल किंवा तीं कोणास बोललीं असतील या सर्वांचा पाढा आईजवळ वाचल्याखेरीज रहावयाचींच नाहींत. थोरल्या मुलापासून हें वळण असल्यामुळें तें सहजच लहान मुलांस लागलें. संध्याकाळीं शाळा सुटतांच सीताराम घरीं यावयाचा आणि लागलीच जेवणें व्हावयाचीं. त्या वेळीं शाळेंत किंवा इतर कोठें जें काय झालें असेल तें सर्व त्यानें आपल्या मायाळू आईस सांगून टाकावयाचें. अमुक गोष्टींत तिला काय समजणार आणि तमुक गोष्ट तिला काय सांगावयाची, असले फाजील शहाणपणाचे विचार त्याच्या मनांत कधींही आले नाहींत. एखाद्या प्रश्नाचें उत्तर बरोबर देतां आलें नाहीं म्हणून मास्तरांनीं शिक्षा केली असली किंवा ते कांहीं बोलले असले, तरी तें आईला सांगण्याची त्यास लाज वाटत नसे. किंवा आईनेंही त्यानें कांहीं सांगितलें तें मन लावून कधीं ऐकिलें नाहीं असेंही कधीं झालें नाहीं. मुलें शाळेंत गेलीं असतां घरांत दुपारीं ज्या कांहीं गोष्टी झाल्या असतील, किंवा ज्या कामांत आपण वेळ घालविला असेल त्या सगळ्यांची हकीकत तिनेंही मुलांस साद्यंतपणें सांगावयाचीच. जेवण झाल्यानंतर आईचें काम होईपर्यंतही सीतारामानें तेथल्या तेथेंच घोंटाळत असून आईस मदत करावयाची, किंवा निदान तिला कंटाळा येऊं नये म्हणून इकडल्या तिकडल्या गोष्टी सांगावयाच्या. या गोष्टींत कधीं दुसऱ्याची निंदा किंवा तशाच प्रकारचा दुसरा कांहीं मजकूर कधीं येत नसे. रंगोपंत व चिंतोपंत आणि त्यांची मंडळी यांचें नांवसुद्धां त्यांच्या बोलण्यांत कधीं निघत नसे. राधाबाई तें मुद्दामच टाळी, आणि तें नांव काढणें म्हणजे विनाकारण आईला मागल्या गोष्टींची आठवण करून देणें होय, असा विचार करून सीतारामही कधीं त्यासंबंधाचा उल्लेख करीत नसे. मागल्या त्या पत्राची हकीकत घडल्या दिवसापासून सीतारामास त्याच्या शत्रू-

कडून त्रास पोहोंचला नाहीं—परंतु हें अक्षरशः खरें नव्हे; कारण भास्करभाऊ पहिल्या प्रथम लाचारीनें जरी गप्प बसला होता, तरी पुढें तो आपल्या पूर्वस्थितीवर आला. घरांत त्याची नाचक्की झाली, त्यामुळें चार सहा दिवस तो काय तोंड लपवून इकडे तिकडे करीत राहिला तेवढेंच. आठ चार दिवस गेल्यानंतर 'ये रे माझ्या मागल्या' ही स्थिति पूर्णपणें परत आली व त्यानें आपल्याकडून सीतारामास बारीकसारीक गोष्टींत त्रास देण्यास सुरुवात केली. परंतु इसापनीतींतील मुरकुटाच्या बसण्यानें बैलास ज्याप्रमाणें मुळींच त्रास वाटला नाहीं, त्याप्रमाणेंच सीतारामाची स्थिति होती. त्यानें त्याच्या त्या त्रासाला मुळींच जुमानलें नाहीं. पंड्याजींनीं मात्र आतां सीतारामास कधीं त्रास दिला नाहीं, भास्करभाऊची मात्र जुळेल तेथें राळ उडविण्याचा सपाटा चालविला होता. परंतु थोड्याच दिवसांत पंड्याजींच्या घरच्या मंडळींना त्यांनीं शाळेंत जाण्यापेक्षां दुसरा कांहीं तरी धंदा करणें त्यास सुखावह होणार आहे असें पाहून शाळेस रजा देण्यास लाविलें, त्यामुळें भास्करभाऊच्या पाठीमागला एक त्रास चुकला. तो त्रास चुकल्या दिवसापासून सीतारामाच्या पाठीमागें या स्वारीचा त्रास अधिक अधिकच वाढत चालला. नाहीं नाहीं तें बोलावें, खोटेंनाटें सांगावें; रंगोपंताच्या मूर्खपणामुळें भलत्यासलत्या गोष्टी घरांत या पोरट्याच्या देखत भाषणांत येत असत, त्या ऐकून यानें शाळेंत मुलांच्या देखत कांहीं तरी बडबडावें, असा प्रकार चालला होता. परंतु सीतारामानें तिकडे अणुमात्र लक्ष्य दिलें नाहीं, किंवा आपल्यास अशा तऱ्हेचा त्रास होत असतो असें त्यानें आपल्या आईस कधींही दर्शविलें नाहीं. दुर्लक्ष्य करण्यांतच शहाणपणा आहे हें तो जाणून होता. त्याबद्दल मास्तराकडे त्यानें अणुमात्र कुरकुर नेली असती तरीसुद्धां तो सर्व प्रकार बंद झाला असता, परंतु तसें सुद्धां त्यानें केलें नाहीं. आपल्या सहनशीलतेनें त्याची त्यालाच लाज वाटून जेव्हां तो गप्प बसेल तेव्हां बसो, हा विचार त्यानें आपल्या मनांत केला. एकंदरींत सर्व प्रकार ठीक चालला होता. आजपर्यंत झालें तितकेंच दुःख. आतां यापुढें मिळालें तर सुख मिळणार, नाहीं तर आहे हीच स्थिति तरी खचित् कायम राहणार असें सर्वांच्या मनास वाटून तेवढ्यांतच समाधान वाटत होतें.

होतां होतां सुमारें एक वर्ष गेलें. या वर्षांत राधाबाईच्या स्थितींत विशेषसा फरक पडला नाहीं. सीतारामाचा अभ्यास पहिल्या परीक्षेपर्यंत आला. त्याच्या अभ्यासाबद्दल किंवा वर्तणुकीबद्दल शिक्षकांची कधीं तक्रार नव्हती. इतकेंच नव्हे, तर उलट हा मुलगा शाळेस चांगलें यश देणार आणि नांव मिळविणार असें सर्व मास्तरांस खरोखर वाटत असे. हेडमास्तरांनीं त्याच्या कांहीं विषयांची विशेष काळजी घेण्याबद्दल त्या त्या विषयांच्या मास्तरांस सांगितलें. हेतु हा कीं, परीक्षेंत सर्व विषयांत त्यास चांगले मार्क मिळून त्याचा नंबर खूप वर यावा आणि शाळेस यश मिळावें. त्याच्या शिक्षणाच्या कामीं आपलेकडून मदत व्हावी म्हणून फेअरबेनसाहेब तर नेहमींच उत्सुक असत. त्यास वारंवार बोलावून नेऊन लागणारीं पुस्तकें देत, कांहीं इंग्रजी शिकवीत, आणि आपलेजवळ कांहींही मागण्यास त्यानें संकोच करूं नये अशाबद्दल त्यास

बारंवार सांगत असत. आपण याच्या एका भावाच्या मृत्यूस कारण झालों व केवळ अविचारानें याला स्वतःस फार अन्यायानें वागविलें, ही गोष्ट त्यांस बारंवार खात असे. त्याची हुशारी पाहून त्यांचे मनांत वारंवार असें येई कीं, या पोरास हिंदुस्थानांत फार दिवस न ठेवितां इंग्लंडांतील युनिव्हर्सिटींत शिकण्यास अगर सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा देण्यास पाठवावें. अशा तऱ्हेनें पाठविल्यास खर्चाचें खरें चीज हा करील याबद्दल शंका नाहीं. खर्च आपण करूं आणि यास पाठवूं असें बारंवार त्यांच्या मनांत येत असे व एकदां दोनदां "तुझी अशी सोय केली तर तूं जाशील काय ? तुझी आई तुला पाठवील काय ?" असेंही हंसत हंसत त्यांनीं सीतारामास विचारलें होतें. परंतु त्याबद्दल शांतपणें विचार करण्याचें कधींच कोणाच्या मनांत आलें नव्हतें. परीक्षेपर्यंत मजल येऊन पोहोंचल्यानंतर अर्थातच फेअरब्रेनसाहेबांच्या मनांत तो विचार बारंवार येऊं लागला. त्याची आई त्यास बहुतकरून पाठविणार नाहीं. येथल्या येथेंच काय होईल तें करावें असें ह्मणत राहील. आपला मुलगा इतक्या लहानपणीं कोठें तरी परक्या देशांत लावून देणें हें हिंदु आईच्या हातून होणें शक्य नाहीं असें त्यांस वाटत असे. परंतु पुन्हां पुन्हां असें वाटे कीं, जर या पोराचा भाग्योदय खरोखर चांगल्या प्रकारें करावयाचा, तर त्यास इंग्लंड देशांत पाठवूनच होणार आहे. येथें बी. ए. होऊन वकिली किंवा डॉक्टरी करण्यास लावण्यापेक्षां आपल्या इच्छेप्रमाणें सिव्हिल सर्व्हिसमध्यें पास होऊन आणण्यांतच विशेष आहे, आणि हा पोरगा तसें यश देणाराही आहे. असा विचार अनेक वेळां मनांत आल्यानंतर त्यांनीं एकदां सहजीं आपल्या बापास व लंडनमधील इंडिया ऑफिसांत असणाऱ्या एका स्नेह्यासही पत्र पाठवून या बाबतींत काय योजना करतां येईल व इतका लहान मुलगा आपल्यासारख्या परक्या देशांत आला असतां त्यास घरची आठवण न होतां काळजीपूर्वक सर्व व्यवस्था होऊन अभ्यास संपवून तो परत येईल अशी तजवीज काय करतां येईल इत्यादि गोष्टी विचारल्या होत्या. दोहोंचींही उत्तरें आलीं ती फारच उत्तेजनपर अशीं आलीं. वडिलांनीं तर लिहिलें कीं, आपला एक स्नेही लंडनपासून फार जवळ राहतो. त्याचे घरांत त्या मुलाची राहण्याची व्यवस्था करून तो अशा मुलास ठेवण्यास कबूल आहे. इंडिया ऑफिसमधील स्नेहीगृहस्थानेंही त्याचप्रमाणें लिहिलें. मुलाची व्यवस्था उत्तम प्रकारें राहील. अशी व्यवस्था सहज करतां येईल. आणि चांगल्या नामांकित शिक्षकाच्या जवळ त्यास ठेवून त्याच्या अभ्यासाचीही व्यवस्था सुयंत्रपणें करण्यास अडचण पडणार नाहीं. अशीं उत्तरें आल्यानंतर फेअरब्रेनसाहेबांस विशेषच वाटूं लागलें कीं, कसेंही करून त्यास इंग्लंडास पाठवून शिक्षण देऊन आणल्याचें श्रेय आपण घ्यावेंच. इतकें सगळें मुकाट्यानें केल्यानंतर एके दिवशीं सीतारामास त्यांनीं मुद्दाम पत्र पाठवून बोलावून नेलें व आपला विचार त्यास कळविला. वर एकदां सांगितलेंच आहे कीं, या बाबतींत मागेंही एक दोन वेळ फेअरब्रेनसाहेबांनीं त्याच्याजवळ गोष्ट काढली होती. परंतु ती गोष्ट काढली त्या वेळीं सीतारामानें विशेषसा विचार केला नाहीं, व साहेब काय बोलले तें त्यानें आईस सांगितलें, तेव्हां ती तर नुसती

हसली व त्यासंबंधाचा विचार पुनः त्यांच्या मनांत कधींही आला नाहीं. आज साहेबांनीं तो प्रश्न फारच गंभीरपणें केला. व " तुझ्याकडून तयारी असल्यास या बाबतींत सर्व व्यवस्था चांगल्या तऱ्हेनें लागणार आहे. तूं आपल्या आईचा विचार घे आणि मला काय तें कळव. " ' परीक्षा झाल्यानंतर काय तें पाहूं. ' अशा अर्थाचे एकदोन शब्द सीतारामानें उच्चारले. तेव्हां फेअरब्रेनसाहेबांनीं त्यास ह्मटलें: " या बोलण्यांत तात्पर्यार्थ नाहीं. जो काय विचार करायचा तो आतांच केला तर फायदेशीर होणार आहे. " एवढें सगळें बोलणें होऊन साहेबांनीं आपल्या मनांत ही गोष्ट किती दिवसांपासून कशी भरली आहे हें अगदीं मन मोकळें करून त्यास सांगितलें. तेव्हां आपल्यासही तो बेत खरोखर मनापासून पसंत आहे, परंतु आई त्या गोष्टीला कबूल होणार नाहीं. ती कबूल झाली नाहीं तर कोणतीही गोष्ट करणें आपल्यास शक्य नाहीं असें त्यानें साहेबांस सुचविलें. त्यावर त्याचसंबंधानें बराच वेळ बोलणें झालें व साहेबांनीं ज्या ज्या गोष्टी सांगितल्या त्या त्या मनांत पक्केपणीं धरून सीताराम त्या गोष्टींविषयीं विचार करीत करीत घराकडे चालला.

हे दिवस असेच आहेत कीं, साधेल त्यास इंग्लंडयात्रा साधण्याविषयीं उत्सुकता असते. तिकडील उन्नतस्थितीचीं वर्णनें वाचून तरुण अंतःकरणें ती स्थिति प्रत्यक्ष पाहण्याविषयीं साहजिकच उत्सुक होत असतात. सीतारामाचें अंतःकरण यास अपवाद नव्हतें. फेअरब्रेनसाहेबांनीं मनःपूर्वक सर्व गोष्टी सांगितल्यानंतर त्यासही ही संधि वायां न जाईल तर फार बरें असें वाटलें. परंतु त्याचें मन त्यास लागलीच असेंही सांगू लागलें, कीं या बाबतींत आपण आईची परवानगी मागणें ह्मणजे सुद्धां मोठें कठिण आहे. आपण सगळ्यांत वडील, आपल्यावर तिची सर्व भिस्त, आपण दूर जाण्याविषयीं परवानगी मागूं लागलों, तर ती देणें तिला फारच कठिण जाणार आहे. एवढा विचार त्याच्या मनांत आला नाहीं असें नाहीं; आजपर्यंत जीं जीं तिकडलीं वर्णनें त्यानें ऐकिलीं किंवा वाचलीं होतीं, तीं सर्व त्याला आठवून त्यांचा विचार व त्या वर्णित गोष्टी आपल्यास खरोखर पहावयास सांपडतील काय, असा प्रश्न त्याच्या मनांत वारंवार आल्याखेरीज राहिला नाहीं. किंबहुना त्या विचारांत तो अगदीं गर्क होऊनही गेला होता. हें सर्व अगदीं साहजिक होय, असें कोण ह्मणणार नाहीं ? सद्यःस्थिति—सांप्रतच्या तरुणांच्या मनाची सद्यःस्थिति—ज्यांस ज्यांस म्हणून पूर्णपणें कल्पनेनें जाणतां येईल, ते ते सीतारामाच्या मनाची स्थिति जशी वर वर्णिली आहे तशी होणें अगदीं साहजिकच आहे असें ह्मटल्याखेरीज राहणार नाहींत.

# प्रकरण ४३ वें.

## सीताराम.

परंतु सीताराम केवळ तेवढ्या उत्सुकतेनें बहकून जाणारा मुलगा नव्हता. आई हें त्याचें दैवत होतें. आज फेअरब्रेनसाहेबांनीं आपल्यापुढें मांडलेला विचार आईला कळविला, ह्मणजे तिला काय वाटेल ? तिचें मत काय पडेल ? ती या आपल्या जाण्यास अनुमोदन देईल काय ? इत्यादि विचार त्याच्या मनांत आल्याखेरीज राहिले नाहींत. एवढेच विचार त्याच्या मनांत येऊन राहिले असें नाहीं. आईला या संबंधांत अनुमोदन दे असें ह्मणावें कीं नाहीं हा विचार सुद्धां त्याच्या मनांत आला. आपलें बरें व्हावें, आपल्यास नेहमीं नेहमीं वाईट वाटून आपल्या अभ्यासांत वगैरे व्यत्यय येऊं नये, एवढ्याकरितां आपली आई आपलें दुःख किती आंवरून धरीत असते; मागल्या गोष्टी होतां होईल तों आपल्या देखत निघूं नयेत आणि त्याचें स्मरण होऊन आपल्या मनाला व्यग्रता येऊं नये म्हणून ती किती जपत असते; मन दुःखानें अतिशय व्यापलेलें असतां—क्षणापूर्वीं तिचें तें दीन मुख दुःखमय अशा अंतःस्थ विचारांनीं फारच दीन झालें असतांही—आपल्यास पाहिल्याबरोबर त्यावर स्मित आणण्याचा तिचा किती प्रयत्न चालतो इत्यादि गोष्टी सीतारामाच्या तीक्ष्ण दृष्टीस दिसत नसत असें नाहीं. जे दिवशीं आपले वडील वारले, विशेषतः जे दिवशीं वडिलांचें घर सोडावें लागलें आणि त्याहूनही विशेषतः जे दिवशीं त्या अत्यंत दारुण अशा कागदांतील तो अत्यंत दारुण असा मजकूर तिच्या कानीं पडला ते दिवशीं तिचें दुःख जितकें असह्य होतें, ते दिवशीं त्या दुःखानें जी तिची दुरवस्था केली, तितकेंच तें आज होतें, आणि तीच दुरवस्था आजही कायम होती, असें त्यास पक्कें वाटत होतें. इतकेंच नव्हे, तर केव्हां केव्हां “ त्या कागदाचा खोटेपणा मी ठरवीन तरच या आईच्या उदरीं आल्याचं सार्थक होईल, ” असें अलीकडे अलीकडे तो आपल्याशीं ह्मणत असे. तो पूर्वींपासून फार चाणाक्ष, त्यास सर्व गोष्टी तांत्रिकपणें तरी समजलेल्या होत्या; परंतु अलीकडे अलीकडे त्या गोष्टी त्याच्या पूर्णपणें लक्ष्यांत येऊन त्यांबद्दल केव्हां केव्हां फार वाईट वाटे. आपल्याप्रमाणें खरोखर कोणाचीही कधीं स्थिति झाली नसेल असें त्यास वारंवार वाटे. सावत्रभावांनीं सावत्र भावंडांस व त्यांच्या आईस छळल्याची आणि त्यांचा सत्यनाश करण्याचा प्रयत्न केल्याचीं अनेक उदाहरणें घडत असतील, किंबहुना घडलेलीं त्याच्या ऐकिवांत आलींही होतीं. मनुष्यावर स्वतःवर जें दुःख कोसळलें असेल, तशाच दुःखानें गांजलेल्या लोकांच्या

हकीकती त्यास किती तरी ऐकूं येतात, परंतु त्या सर्व हकीकतींपेक्षांही आपली हकीकत अत्यंत विलक्षण, अत्यंत दुश्चित्र असें त्यास वाटत असतें. वडिलांचें मृत्युपत्र म्हणून जो कागद पुढें आलेला होता, त्यासारखा नीच कागद आजपर्यंत कोणत्याही नीच मनुष्याच्या हातून नीचतम अशा लेखणीनें लिहिला गेला असेल हें संभवनीयच नाहीं, असें त्यास पक्कें वाटे. आपल्याला जर इतकें वाटत आहे, तर आपल्या आईला अहोरात्र किती वाईट वाटत असेल, असें त्यास वारंवार वाटे. प्रत्येक क्षण, प्रत्येक घटका, प्रत्येक प्रहर जो ती आपल्या एकट्याशींच घालवीत असेल, त्या त्या क्षणीं, त्या त्या घटकेंत व त्या त्या प्रहरांत तिचें मन दुःखानें किती व्याप्त होत असेल याची कल्पनासुद्धां आपणास होणें नाहीं असें त्यास वाटे. जो काळ आपल्या व आपल्या भावंडांच्या समवेत जातो, तोच तेवढा तिचा सुखाचा काळ. असे विचार त्याच्या त्या अद्यापि कोमल अशा अंतःकरणांत येत असत. आणि त्यामुळेंच आईपासून दूर जाण्याचा विचार कधींही त्याच्या मनांत येत नसे. आधीं श्रीमंती असून एकदम दारिद्र्य येणें याचें त्यास किंवा तीस मोठेंसें कांहीं वाटत नसे. आपल्या वडील भावानें केवळ अतिलोभानें आपल्यास सर्वथा दारिद्र्यांत ढकलून दिलें, याबद्दलही कांहीं त्यास विशेष वाटलें नाहीं. परंतु तसें ढकलून देण्यास त्यानें जो मार्ग काढला, त्या मार्गाची आठवण होतांच त्याच्या अंगावर शहारे येत. आईच्या आणि सीतारामाच्या दोघांच्याही मनांत या सर्व गोष्टी येत. आईला असें वाटे कीं, पोरगा अजून फार लहान आहे, त्याला या गोष्टी आपल्या इतक्या तीक्ष्णतेनें दुःख देत नसतील, आणि म्हणून आपण त्याबद्दल बोलून प्रत्यक्षपणें किंवा उदासीन व दुर्मुख राहून अप्रत्यक्षपणें आठवण किंवा समजूत करून देऊं नये. इकडे सीतारामही असाच विचार करी, कीं आपण त्याबद्दल बोलून आईच्या अल्पशा सुखाच्या काळांत वोटाळा घालूं नये. हे सर्व विचार आजही त्याच्या मनांत आले.

फेअरब्रेनसाहेबांनीं आणलेली संधि वायां जाऊं देऊं नये; असा अघटित योग पुनः कधीं येणार नाहीं; आज साहेब जें काय खर्च करतील, तें पाहिजे तर पुढें आपण फेडावें, पण आज त्याचा उपयोग करून घ्यावा, असें त्यास तर फार उत्कंठेनें वाटत होतें. परंतु ज्या आपल्या आईची स्थिति अशी आहे, त्या आईस अशा स्थितींत एकटी सोडून जावें काय ? गेलों तर तिला काय वाटेल ? तिची स्थिति काय होईल ? इत्यादि गोष्टीही त्याच्या मनांत आल्यावांचून राहिल्या नाहींत. इंग्लंडला जाण्याचा अघटित योग आला असतां, त्याबद्दल आनंद, उत्सुकता कोणत्या तरुणास आज वाटत नाहीं ? त्या आनंदानें व उत्सुकतेनें इतर सर्व बारीकसारीक विचारांना विस्मरणमार्गाला जावें लागतें हें कोण नाहीं ह्मणेल ? परंतु सीतारामाची स्थिति तशी नव्हती. त्याजवर अकालींच अपूर्व व अघटित प्रसंग गुदरल्यामुळें त्याचें मन आणि त्याच्याच वयाच्या इतर तरुणांचीं मनें यांत फार अंतर पडलें होतें. आपल्या आईला एकटें टाकून जाणें आपल्यास श्रेयस्कर होणार नाहीं असें त्याच्या मनास वारंवार वाटलें. आणि असें वाटल्यामुळें घरीं येऊन पोहोंचेपर्यंत त्याच्या उत्सुकतेचा पहिला जोर थोडासा कमी झाला. यास कांहीं उपाय निघणार नाहीं काय,

असें त्याच्या मनांत येतच होतें. एक वेळ वाटे, कीं आतांच आईच्याजवळ गोष्ट काढावी तरी कशाला ? साहेबांचें ह्मणणें काय आहे हें उगीच सहज बोलतां बोलतां नुसतें सुचवून ठेवावें म्हणजे झालें. पुढें परीक्षा झाली म्हणजे मग पाहतां येईल काय करावयाचें,काय बोलावयाचें तें! परंतु परीक्षेच्या निकालाबद्दल इतकें घोटाळ्यांत पडणें किंवा त्याबद्दल संशय येणें हें बरें नाहीं असें साहेबांनीं केव्हांच सांगितलें होतें. त्यांचे मनांतून सर्व व्यवस्था नीट-पणें लावावयाची असल्यामुळें, जितक्या लवकर सीतारामाचा निश्चय कळून येईल तितका तो बरा असें त्यांचें ह्मणणें होतें. परीक्षेचा निकाल कसा होईल याबद्दल त्यांस शंका नव्हती. हा पोरगा नापास होणारच नाहीं असें त्यांस खात्रीनें वाटत होतें; इतकेंच नव्हे, तर इंग्लंडमध्यें गेल्या-नंतर योग्य व्यवस्था लागली असतां तो नांव केल्याखेरीज राहणार नाहीं अशी त्यांची खात्री होती. फेअरब्रेन कित्येक आंग्लो-इंडियनांप्रमाणें मत्सरी नव्हते. हिंदी लोक म्हणजे कुचकामाचे, त्यांच्या हातून चांगलें म्हणून कधीं कांहीं व्हावयाचें नाहीं, असें त्यांस वाटत नसे. त्यांचे अंगीं पुष्कळ गुण आहेत; ते गुण उपयोगांत येतील अशा संधि आल्या, तर हटकून त्यांचे अंगीं अवगुण आहेत ते अगदीं " वज्र-लेपो भविष्यति " असे आहेत असें नाहीं, ते कालांतरानें व सन्मार्ग दिसल्यानें जाणार आहेत असा त्यांचा विश्वास होता. आपल्या लोकांच्या हातीं या देशाचीं राज्यसूत्रें परमेश्वरानें 'ठेवा' म्हणून दिलीं आहेत. पुढें कालांतरानें यांचें डोकें वर व्हावयाचें आहे आणि तें होण्यास आमचें राज्य केवळ साधन होय, अशा मताचे जे कांहीं इंग्रज धर्मात्मे ईश्वरी कृपेनें आपल्याकडे येतात, त्यांपैकीं तो होता हें आज वाचकांस नव्यानें सांगाव-यास नको. योग्य दिशा लागल्यास बुद्धीनें व कर्तृत्वानें यांचेच हातून महत्कृत्यें होणें अगदीं शक्य आहे आणि ती शक्यता या लोकांच्या प्रत्ययास आणून दिल्या-खेरीज त्यांची त्यांस आपली स्वतःची ओळख पटणार नाहीं असें त्यास वाटे. तो स्वतः आजमितीस फार मोठा अधि-कारी नव्हता किंवा फारसे पैसेही त्याजजवळ नव्हते. परंतु जो काय अधिकार होता, त्याचा उपयोग त्यानें नेहमीं अगदीं योग्यपणें व नम्रपणें करावा आणि लोकांचा परिचय करून घेण्याविषयीं मोठी आतु-रता बाळगावी, त्यांची स्थिति समजावून घेण्यासाठीं झटावें, अशा विचारांत व कृतींत तो नेहमीं असे. " असा क्रम तूं चालविलास, तर तुझी बढती होणार नाहीं; वरच्या अधिकाऱ्यांच्या कलाप्रमाणें वर्तन ठेविलें, तर हां हां ह्मणतां एकाव-रल्या एक पायऱ्या चढून जाण्याचा संभव फार; हिंदु लोक त्यांची कींव करण्याच्या योग्यतेचे नाहींत, " इत्यादि इत्यादि उपदेश त्यांस एकदांच करून त्यांचे स्नेही थांबले होते असें नाहीं; परंतु त्या उपदेशा-च्या श्रवणानें त्यांच्या मुखावर तुच्छतेचें स्मित आणण्यापलीकडे कधींच कांहीं परि-णाम झाला नाहीं. फेअरब्रेनसाहेबांच्या अनु-भवानें त्यांचीं मतें दृढ केलीं आणि त्यांत सीतारामाच्या कुटुंबाची आपल्या हातून हानि झाल्याचें स्मरण त्यांस वारंवार दुःख देई, यामुळें त्यांना अगदीं मनापासून असें वाटत होतें कीं, आपण या मुलास हातीं धरल्यानें खरोखर त्याचें कल्याण होणार आहे व हिंदुस्थानचा पैसा आपण उपभोगतों त्याची कांहीं तरी फेड केल्या-खेरीज घडणार आहे.

पण ज्याप्रमाणें सीतारामास, त्याच-प्रमाणें साहेबांसही शंका होती कीं, इतक्या अल्पवयांत आपल्या पोरास त्याची आई आपल्यापासून इतक्या दूर परकी देशांत पाठविण्यास व चार वर्षें राहूं देण्यास अनुमोदन देईल काय ? आपल्या लोकांत व हिंदु लोकांत अपत्यप्रेमासंबंधानें हें एक मोठें अंतर आहे, हें ते जाणून होते. आणि हें फाजील अपत्यप्रेम तरुण मंडळीच्या मानसिक व सात्विक नाशास कारण होत आहे हेंही पण त्यांस समजत असे; व म्हणूनही त्यांस असें वाटे कीं, या पोरानें अवश्य जावें. तो व्यवस्थेनें राहील, वावग्या मार्गास लागणार नाहीं, याच वयांत तेथें राहिल्यानें त्यास आपल्या लोकांचे गुणावगुण चांगल्या प्रकारें समजून त्यांचें कार्यकर्तृत्व याच्या अंगीं उतरेल. आपण त्यास चांगल्या माणसांच्या देखरेखीखालीं ठेवल्यानें त्याचे विचार व आचार यांवर फार इष्ट असे परिणाम होतील. एकंदरींत त्यानें जाणें सर्वथा फायदेशीर होणार आहे. पण—पण आईला सोडून तो जाईल काय ? आणि आई त्याला जाऊं देईल काय ? हा विचार त्यांसही थोडासा नाउमेद करी.

सीताराम घरापर्यंत येऊन पोहोंचेपर्यंत त्याच्या मनांत जाण्याची उत्सुकता व आईला सोडून जाण्याची अनिष्टता या दोहोंसंबंधाच्या विचारांनीं आळीपाळीनें साम्राज्य केलें. त्याची महत्त्वाकांक्षा थोडी थोडकी होती असें नाहीं. परंतु मातृभक्ति सर्वांहून अधिक होती. आईजवळ यथासांग सर्व हकीकत सांगण्याचा तर त्यानें निश्चय केला. आजच बोलून काय करावयाचें आहे, हा विचार एकवार आला होता त्यास त्यानें दूर सारलें. विचार करावयाचा, तर आपला ताबडतोब करावा आणि एकदां आपलें मन व साहेबांचें म्हणणें काय तें सांगावें हेंच उचित. शिवाय आठचार दिवसांत साहेब आपल्यास पुनः बोलावून " काय विचार झाला ? " म्हणून विचारणार. तेव्हां त्यांस उत्तर दिलें पाहिजे. आज नाहीं आणखी महिन्या दीड महिन्यांत तो विचार करावा लागणार असें त्याचें मनही त्यास सांगतच होतें. इतरांच्या देखत कधीं अविनयानें त्यानें आपण परीक्षेंत पास होणारच असे खात्रीचे उद्गार काढले नाहींत, परंतु त्यामुळें आत्मविश्वास त्याचे ठिकाणीं नव्हता असें म्हणणें रास्त नव्हे. आपण पास खचित होऊं असें त्याचें मन त्यास सांगत होतें. पास होण्यास लागण्याइतकें ज्ञान आपणास आहे व तितका अभ्यास आपले हातून मनापासून झाला आहे असें त्याचें त्यास ठाऊक नसणें शक्य तरी कसें असणार ? आणि जर पास होणार हें तो जाणून होता, तर मग पुढला विचार आज करण्यास हरकतही नव्हती हें उघडच आहे.

अशा विचारांत तो घरीं आला, आणि आई काय करीत आहे, कोठें आहे, याच्या तपासास लागणार, तों वेडा अगदीं धापा टाकीत पुढें येऊन म्हणतो, " दादा ! दादा ! तिक्के कोन आला ! हः हः हः तिक्के कोन आला—दोंदू तिक्के —तिक्के—तिक्के गेला—अन् कोन बघतला ! तोय्—तोय्—तोय—केला—दोंदूला मालाला आला—पन् दोंदू—हं—सूं—पलाला—हं—सूं—पलाला—दादा तिक्के कोन आला ! तिक्के —त्या तिक्के—त्या—दादा ! दादा ! दादा !.

सीतारामाचें मन या वेळीं दुसऱ्या विचारांनीं व्यग्र होतें, तरी पण त्या

वेड्याचें तें बोलणें ऐकून तो त्याच्याशीं बोलण्यासाठीं थांबला. वेड्याची तर तेंच तेंच पुनः पुनः बोलण्याची अगदीं गर्दी उडाली. त्याच्या बोलण्याचा अर्थ सीतारामाच्या मनांत उतरेना. कोठें तरी कोणी आला असून हा तेथें गेला असतां याचे अंगावर कोणी येऊन हा पळाला एवढेंच त्याच्या ध्यानांत आलें. आणि लागलीच बळेंच हंसत हंसत तो त्यास म्हणतो, " तूं कशाला गेला होतास ? तुझ्या अंगावर कोणी आलं तर ? "

" कशाला देला ? दोंदू कशाला देला—दोंदू जाएल—हं दोंदू जाएल. जाएलच. दोंदू—दोंदू तिक्के जाएलच. तें दोंदूचा बल नाहीं ? दोंदू जाएल. पन् दादा तिक्के कोन आला ? कोन आला ? झोता कोन आला ? " असें वेड्याचें चऱ्हाट चाललें आणि त्याचें एकदां चऱ्हाट सुरू झालें, ह्मणजे मग कांहीं दुसऱ्या कोणाची मधें बोलण्याची सोय नसावयाची. जितक्या वेळां तो सांगेल तितक्या वेळां सांगितल्याखेरीज आणि दुसऱ्याकडून ऐकविल्याखेरीज रहावयाचाच नाहीं; इतकेंच नव्हे, तर आपण काय सांगतों हें पूर्णपणें आपल्या श्रोत्यांच्या मनांत उतरलें अशी त्याची खात्री होईपर्यंत त्याचा बोलण्याचा नुसता तडाखा चालावयाचा. हा नेहमींचा क्रम असल्यामुळें त्याचें बोलणें मंडळीच्या अंगवळणींच पडलें होतें. वेडा मोठमोठ्यानें कोणाशीं काय बोलतो आहे असें वाटून राधाबाईही तेथें आल्या. त्यांस त्या वेड्याची भाषा आणि त्याचा आशय जितका चांगला समजत असे, तितका दुसऱ्यास समजत नसे. सीताराम बाहेर गेल्यानंतर थोड्याच वेळानें वेडाही बाहेर गेला होता, आणि सीताराम आला तेव्हांच तो धापा टाकीत कोठून तरी धांवत आला होता. राधाबाई तेथें येण्याबरोबर वेड्यानें पुनः आपलें पुराण सुरू केलें. पहिल्यापासून तों अखेरपर्यंत एकदां आवृत्ति झाल्यावर दुसरी, दुसरी झाल्यावर तिसरी, असा क्रम सुरू झाला. आणि पांच सहा आवृत्ति झाल्यावर त्यानें जरा मधें उसंत खाल्ली, तेव्हां राधाबाई सीतारामास म्हणते, " त्या घरीं गेला असेल आणखी तिथें कोणी तरी नवं येऊन कांहीं तरी झालं आहे असं दिसतं. तिथें जाण्याचा त्याचा नाद कांहीं अजून सुटत नाहीं. "

" हं. छमजलं—तिक्के—हं. तेंच. कोन आला ? झोता आला. मला माला—दोंदू—सूं—हूं—सूं—पलाला. झोता आला बाय्यो—झोता बाय्यो आला ! "

झाली. पुनः सुरुवातच झाली. मग काय विचारतां ? त्यानें पुनःपुनः वर दिलेलें आपलें बोलणें बोलण्याचा सपाटा चालविला. त्या घरीं कोणी तरी आलें आहे, आणि आतांच्या त्याच्या बोलण्यावरून चिंतोपंतच असावा असें त्यांस दिसून आलें. परंतु चिंतोपंत आला असेल असें वाटण्यास कांहीं सुद्धां कारण नव्हतें. चिंतोपंताचा व यांचा अखेरचा निकाल होऊन गेल्यानंतर त्याच्यासंबंधाची चौकशी यांनीं कधींसुद्धां केली नाहीं; इतकेंच नव्हे, तर होतां होईल तों एकमेकांदेखतां त्याचें किंवा त्याच्यासंबंधाचें नांव सुद्धां काढूं नये अशाबद्दल मायलेकरें फार खबरदारी घेत असत. येऊन जाऊन वेडा मात्र कोणाचें न ऐकतां आठचार दिवसांनीं तिकडे त्या घरीं जावयाचाच. एखादा सृष्टीचा नियम ढळला असता, पण त्याचा नियम कधीं ढळत नसे. त्यास राधाबाईनें किती वेळां तरी सांगितलें, की तूं तिकडे जाऊं नको, एखादे दिवशीं तुला

माराव्याला सुद्धां कोणी कमी करणार नाहीं. पण मागें सांगितलेंच आहे कीं, त्याचें तेंच आपलें खरें असे. कसाना कसा तरी केव्हांना केव्हां तरी डोळा चुकवून तो आपला तिकडे जावयाचाच.आणि कांहींना कांहीं तरी येऊन सांगत बसावयाचा. त्याच्याकडे कधीं कोणी लक्ष्य देत नसे. पण आजच्या त्याच्या बोलण्याकडे लक्ष्य जाण्याजोगेंच त्याचें भाषण होतें. "बाय्यो" "बाय्यो" या शब्दाचा अर्थ तरी काय ? असा साहजिक प्रश्न त्यांचे मनांत नसतांही उभा राहिला. आणि जों जों चिंतोपंताचें नांव त्याच्या कानीं पडे, तों तों "नाहीं—नाहीं" "बाय्यो" "बाय्यो" "तूंतो तूंतो" असें तो ह्मणे "व मला माला—माला" अन् "दोंदू पलाला" असें पुनःपुनः सांगे. राधाबाईनें शेवटीं त्यास दाबलें कीं "आतां पुरे झालं तुझं "बाय्यो" "बाय्यो !" पण तो हिरमुसल्याप्रमाणें होऊन पुनः केविलवाण्या शब्दांनीं तेंच सांगूं लागला.

# प्रकरण ४४ वें.

## हें काय ?

वेड्याचें ह्मणणें काय आहे हें समजणें फार कठिण होतें आणि तें समजेपर्यंत त्याचा तर नाद सुटणें फारच कठिण होतें. ज्या कोणा व्यक्तीस त्यानें त्या आपल्या मूळच्या घरांत पाहिलें होतें, त्या व्यक्तीचें नांव श्रोतेमंडळीच्या तोंडून निघेपर्यंत त्याचें मुळीं समाधानच होणारें नव्हतें. त्याच्या समाधानाकरितां सीताराम व राधाबाई यांनीं एकामागून एक सर्व शक्य नांवें तेवढीं घेतलीं, तरी त्याचें आपलें "नै नै—हं हं—अंहं—तुंतो—तुंतो—" असें चाललेंच होतें. आपल्याकडून तो हातवारे करून आपलें म्हणणें समजावें म्हणून नानाप्रकारांनीं कांहीं कांहीं सांगतच होता. सीताराम आपल्या मनांतील सर्व गोष्टी सांगण्यासाठीं आतुर झाला होता,परंतु वेड्याच्या या मध्येंच उपस्थित झालेल्या विचित्र कथानकामुळें त्याची ती आतुरता थोडीशी कमी झाली. आंतांच आईला सांगण्यापेक्षां रात्रीं सर्व मंडळी निजल्यानंतर सांगितलें असतां आपल्यास बोलण्यास शांतताही मिळेल आणि आईलाही स्वस्थपणें ऐकण्यास वेळ मिळेल, असा विचार त्याच्या मनांत येऊन, तेवढाच वेळ गेला असें वाटूनच काय त्यास अप्रत्यक्षपणें बरें वाटलें. एखादी गोष्ट मनाला आवडूनही ती न आवडल्याप्रमाणें होतें, हा विरोधाभास प्रत्येकाच्या अनुभवास येत असेल, आलाच असला पाहिजे. जी गोष्ट सांगावयाची होती ती गोष्ट सीतारामास

अगदीं इष्ट होती, परंतु आपल्या आईस ती तितकी इष्ट वाटणार नाहीं, तेव्हां ती तिला कळविणें जितकें दूर लोटतां येईल तितकें लोटावें असेंही पण त्यास वाटत असलें पाहिजे. त्याला पक्कें ठाऊक होतें, कीं आतां नाहीं मग, सकाळीं नाहीं संध्याकाळीं, दुपारीं नाहीं रात्रीं, आज नाहीं उद्यां, ती कळवून जुळल्यास तिचा रुकार मिळविणें; अगर न जुळल्यास निदान आपला नाद सोडून, पुनः त्या गोष्टीचा विचार सुद्धां मनांत आणण्यास नको असा निश्चयात्मक निकाल लावून घेणें, हें ठीक होणार आहे. असें होतें तर त्यांतल्या त्यांत तो निकालाचा काळ क्षणोक्षणानें दूर लोटावा असें त्यास त्याच्या स्वतःच्या मनांत नसतांही वाटत होतें. मनुष्यस्वभावाची मौज ही आहे कीं, अगदीं अपरिहार्य व अवश्य कर्तव्य असें जरी कार्य असलें, तरी त्यापासून इष्टोत्पत्ति होईलच असें खात्रीनें वाटण्यास कारणें नसलीं किंवा इष्टलाभ होण्याचा संभव फार कमी दिसला, तर होतां होई तों तें कार्य करण्याचा प्रसंग लोटवेल तितका दूर लोटावा. सीतारामाची प्रवृत्ति पहिल्या तडाख्यास अशी नव्हती. प्रथम त्याला एकदां सोक्ष कीं मोक्ष काय तें करून घ्यावें असेंच वाटत होतें. परंतु मध्यंतरीं हा वेड्याचा गोंधळ उत्पन्न होतांच संध्याकाळपर्यंत लोटण्याची बुद्धि झाली. आणि त्या वेड्याजवळ त्यानें त्याचें काय म्हणणें आहे तें समजावून घेण्यासाठीं जी काय पराकाष्ठा करावयाची ती केली. पण त्या पराकाष्ठेनेंही त्यास यश आलें नाहीं. शेवटीं त्याच्यापासून त्याचें म्हणणें समजावून घेण्याचा प्रयत्न सोडून देऊन नुसतें ‘ हूं ’ ‘ हूं ’ करीत तो ऐकत होता. बराच वेळ झाला आपण आपलें म्हणणें काय तें समजावून देण्याचा जो प्रयत्न केला तो कांहीं सफल होत नाहीं असें पाहून तोही बिचारा कंटाळला आणि शेवटीं तोंड हिरमुसलें करून तेथून दुसरीकडे निघून गेला. परंतु फार वेळ त्याच्यानें तसें राहववतें थोडेंच. वारंवार वारंवार तो उसळी मारून येऊन आपल्याकडूनच आपलें म्हणणें अधिकाधिक सुगम करण्याचा प्रयत्न करी; पण व्यर्थ. मायलेंकरांनींही पुष्कळ प्रकारांनीं त्याच्या त्या बोलण्याच्या अर्थाबद्दल तर्क चालविले होते, तरी कांहीं उपयोग नाहीं. अशा तऱ्हेनें बराच वेळ गेला.

ऐनसंध्याकाळ झाली, अगदीं करकरीत तिनीसांजा. थोडथोडा अंधार पडत चालला होता. इतक्यांत कोणी गृहस्थ सीतारामाच्या अगदीं पुढल्या दारांत उभा राहून “ सीताराम घरांत आहे काय ?” म्हणून विचारीत होता. ज्यांस तो विचारीत होता, तो सीतारामाचा धाकटा भाऊ त्यानें चटकन् “ हो हो, दादा आहे. घरांत ! ” असें म्हटलें. त्याबरोबर तो गृहस्थ त्यास म्हणतो, “ जा तर मग त्याला म्हणावें, तुला दाराच्या बाहेर कोणी तरी बोलावतें आहे. ” मुलाल काय ? मुलगा हां हां म्हणतां धांवत जाऊन त्यानें आपल्या दादास सांगितलें. तें ऐकतांच प्रथमतः दादास असें वाटलें कीं, आपल्या घरीं कोणी तरी आपला सोबती शाळेंतल्या संबंधानें आला असेल; परंतु सोबती येण्याची ही वेळ नाहीं. मग कोण असेल तें असेल. पहावें एकदां कोण आहे तो ! असा विचार करून तो झटकन् उठून बाहेर आला. दारापर्यंत गेला आणि पहातो तों दाराबाहेर उभी असलेली व्यक्ति शाळेंतला कोणी सोबती नसून कोणी तरी मोठा गृहस्थ आहे.

अंधार बराच पडला असल्यामुळें त्या गृहस्थाचा चेहरा स्पष्टपणें दिसत नव्हता. केवळ चेहेऱ्याच्या बाह्य रेषेवरून सीतारामास हा अमुक गृहस्थ असावा अशाबद्दल शंका आली. परंतु ती केवळ शंकाच होती. त्यास खात्रीनें कांहींच ह्मणतां येईना. क्षणमात्र तो त्याच्याकडे पाहून लागलीच म्हणतो " कोण ? सीतारामाला कोण विचारीत होतं ? तुम्हीच ? "

" हो, सीतारामबापू ते तुम्हीच का ? अरे वा मीं ओळखलंच नाहीं पहिल्यानं तुह्माला. पण तुम्ही इतके मोठे झालांत हें एक बरंच झालं."

इतकें बोलून गृहस्थ थांबला व आपल्या बोलण्याचा या मुलाच्या मनावर काय परिणाम झाला हें पाहण्याकरितां काय तो किंचित् खालीं वांकून सीतारामाच्या चेहऱ्याकडे अगदीं टेहळून पाहूं लागला. न जाणों कदाचित् हा सीतारामच कीं दुसरा कोणी आहे हेंही खात्रीनें पाहून घेण्याची त्याची इच्छा असेल. क्षणमात्र टेहळणें झाल्यानंतर स्वारी लागलीच ह्मणते, " सीतारामबापू, तुह्मी बरेच जाणते झालेले दिसतां ! हें एक ठीकच झालं. मी काय सांगायच्या हेतूनं आलों आहें तें तुम्हांला नीट समजेल कीं नाहीं याचा मला संशयच वाटत होता. पण तो आतां तुह्माला पाहिल्यावर दूर झाला. मला तुमच्याशीं अगदीं एकीकडे कांहीं बोलायचं आहे. अगदीं एकीकडे बरं का ! दुसरं कोणी नाहीं उपयोगी तिथं." सीतारामानें तो आवाज ओळखला, निदान खात्रीनें ओळखला अशी त्याला शंका आली. शंकाच आली म्हणावयाची, कारण खात्रीनें ओळखलाच असें म्हणण्याइतका त्यानें तो ओळखणें शक्य नव्हतें. त्या गृहस्थाचें तें गूढ भाषण ऐकून त्यास आश्चर्य वाटलें. आपल्याजवळ इतकें याचें काय काम आहे ? जो हा असावा असें आपणास वाटतें तोच जर असेल, तर त्यानें असें लपून हलकेच बोलण्याचें कारण नाहीं. सरळपणानें आईकडे येऊन आईला भेटून काय सांगावयाचें तें सांगावें. जर तो नसला, तर मग विशेषच आश्चर्याची गोष्ट. आपल्याला अगदीं एकीकडे नेऊन हा काय सांगणार ? आपल्याशीं याचें असें हितगुज काय असणार ! तो असा विचार करीत असतां तो गृहस्थ म्हणतो, " काय ? मी म्हणतों तें आलं का ध्यानांत ? बापू, मी कोण तें तुमच्या लक्षांत आलं नाहीं ? "

" हो, आलेसं वाटतं. पण आज इतके दिवसांनीं, अशा वेळीं..... "

" तें काय, तें इथें बोलून नाहीं उपयोगी. कुठें एकीकडे जागा असली

" माझ्याशीं बोलण्यापेक्षां आईशींच कां नाहीं बोलत ? "

" आईसाहेबांशीं ? हो, वेळ आली, तर त्यांच्याशींही बोलेन. पण तुह्मी मोठे झालां आहां, तेव्हां तुमच्याशींच आधीं बोललों तर बरं. तुह्मांला समजेल, नाहीं असं नाहीं. आणखी तुम्हांला समजण्याजोगं तुमचं वय आतां झालं असल्यावर त्यांच्याशीं अशा गोष्टी बोलण्यांत काय अर्थ आहे ? अशा गोष्टी त्यांच्या कानावर जितक्या न जातील तितक्या बऱ्या ! "

" म्हणजे ? अशा काय गोष्टी आहेत कीं, ज्या आईच्या नकळत तुम्हीं मला सांगाव्यात ? अशा कांहीं गोष्टी असल्या, तर मला मुळीं ऐकायलाच नकोत. "

" नकोतच म्हटलं, तर आमचा इलाज नाहीं. पण ऐकून घेतल्यावर त्यांबद्दल वाईट वाटायचं नाहीं. आईसाहेबांच्या कानावर घालण्याला माझी मुळींच हरकत नाहीं. पण......"

इतकें बोलून तो आणखी म्हणतो, " बापू, मला तुमच्या सध्याच्या स्थितीबद्दल फार वाईट वाटलं, म्हणून तर मी आलों आहे. कुठें तरी एकीकडे जागा असली तर सांगा मला. नसली तर माझ्याबरोबर चला. मी तुम्हांला एक पांच मिनिटांत एका ठिकाणीं घेऊन जातों. तिथें आपण अर्धा पाऊण तास बोलूं, बसूं, आणखी मग पाहिजे तर निघून या. मग पाहिजे तर मी काय सांगेन तें आईसाहेबांना सांगून त्यांचा विचार घ्या. चला. "

" आत्तां ? इतक्या रात्रीं ? ती तर गोष्ट कधीं सुद्धां माझ्या हातून व्हायची नाहीं. जा तुम्ही, इतक्या रात्रीं तुमच्याबरोबर कुठें तरी जायचं ? "

" कां ? काय हरकत आहे ? मी कांहीं कुठें मारायला नाहीं नेत तुम्हाला; घाबरूं नका. "

" मारायला न्या कीं नका नेऊं. मी कांहीं इतक्या रात्रीं येणार नाहीं. "

" बरं, हरकत नाहीं. उद्यां दिवसा याल ? मी सांगतों त्या खुणेवर दिवसा या. "

" उद्यां दिवसा ? केव्हां ? उद्यां शाळा आहे. शाळा सोडून येणार कसा ? "

" घटकाभर उशीर झाला शाळेंत, म्हणून काय हरकत आहे ? "

" तुम्हांला नसेल हरकत. पण मला आहे. "

" तरी हरकत नाहीं. मधली सुट्टी एक तासाची असतेना ? त्या वेळीं या. मी सांगतों तें ठिकाण तुमच्या शाळेपासून जवळ आहे. मी अगदीं पक्की खूण सांगून ठेवतों. "

सीताराम थोडासा विचारांत गढला. काय करावें ? होय म्हणावें ? काय झालें त्याला ? काय सांगावयाचें आहे तें ऐकून घेतलें तर ? इतक्या उत्कंठेनें तो सांगता आहे, तर ऐकून घेतलें म्हणून काय झालें? सुमारें दोन मिनिटें तो असा तटस्थपणें उभा राहिला आणि त्याच्या मनाचा निश्चय झाला. म्हणावें होय; आणि त्यानें "ठीक आहे. पण मला शाळेंत परत जाण्याला क्षणाचा सुद्धां उशीर होतां उपयोगी नाहीं. मी अगदीं अर्धाच तास बसेन, अधिक बसणार नाहीं. कबूल असेल तर येईन. " असें म्हटलें.

"कबूल कबूल." तो गृहस्थ किंचित् हंसत हंसत म्हणतो, " अर्धा तास सुद्धां नको. पण एक गोष्ट आणखी आपण कबूल करावी. ती ही कीं, मी असा असा आलों होतों, हें, उद्यां माझं काय सांगायचं आहे तें सांगून होईपर्यंत त्यांना सांगूं नये. मला तुम्ही ओळखलं असलं तरी बोलूं नका. नसलं पुरतं ओळखलं, तरी नुसतं असा असा कोणी आला होता आणखी असं असं म्हणत होता इतकं सुद्धां सांगूं नका. दुसरं कांहीं नाहीं. "

" तें माझ्या हातून कालत्रयींसुद्धां होणार नाहीं. मी आतां इथून आंत गेल्याबरोबर तें सगळं सांगणार. तुम्हांला एवढी चोरी कां ? "

" तसंच कांहीं कारण आहे. आजची वेळ तुम्ही माझं ऐका. जर आईसाहेबांला सांगितलंत, तर त्यांना सगळ्या मागल्या

गोष्टी आठवतील. ज्या गोष्टी आठवायला नकोत त्या त्यांच्यापुढें उभ्या राहतील. आणखी मग त्यांच्या दुःखाला पारावार नाहींसा होईल. इतकं करायला खरोखर कांहीं तरी कारण ? कांहीं सुद्धां नाहीं. उद्यां संध्याकाळीं तुम्ही बेलाशक सांगा !"

"हं ? आणखी आतां कोण होतं, काय होतं असं तिनं विचारलं तर काय सांगूं ?"

"कांहीं तरी सांगून वेळ मारून न्या. त्यांत काय मोठंसं ?"

"जा तुह्मी. मी उद्यां येणार नाहीं. तुह्मी काय सांगणार तें मला ऐकायला नको. आजपर्यंत जी गोष्ट मीं कधीं केली नाहीं, ती गोष्ट आतां करायची ? आईला खोटं सांगायचं ? आणखी तें कां ? तर तुम्ही कांहीं उद्यां सांगणार आहां म्हणून ?"

"नुसतं मी कांहीं सांगणार आहें ह्मणून नव्हे. मी सांगणार आहें तें त्यांच्या कानावर घालण्याजोगं नाहीं म्हणून. तुह्मी आतां समजण्याच्या वयांत आलां म्हणून तुमच्याचजवळ सांगायचं. तुमच्या फायद्याचं आहे. तोटच्याचं नाहीं. शेवटीं त्यांच्या कानावर गेल्यावर त्यासुद्धां ठीकच म्हणतील. पण आज त्यांच्या कानावर नको. मी आलों होतों असं तरी निदान नको. तें कळलं तर मला भेटायची सुद्धां तुम्हांला परवानगी देणार नाहींत."

"असं असेल, तर मग मी सांगणारच. आईनं परवानगी दिली, तरच मी येईन. नाहीं तर येणार नाहीं. मला कांहीं तुमचं ऐकायला नको."

"पहा. तुमचा अतिशय अतिशय फायदा आहे. त्यांत माझं कांहीं म्हणणं नाहीं. उद्यां मी सांगणार आहें तें ऐकून घेईपर्यंत सांगूं नका. मग खुशाल सांगा. पहा !"

"तें कांहीं नाहीं. तिनं विचारल्यावर मला सांगणं भागच आहे."

"बरं, विचारलंच नाहीं तर ? मग आपण होऊन तरी सांगूं नका. काय करावं ? माझा खरोखर तुमच्यासाठीं तिळतिळ जीव तुटतो आहे. पहा, करा एवढं कबूल !"

ह्या गूढ गृहस्थानें पुनःपुनः विनविल्यामुळें शेवटीं त्याच्या कोमळ अंतःकरणाचा निश्चय किंचित् ढळला. "आईनं विचारलं नाहीं, तर मी आपण होऊन सांगणार नाहीं," असें त्यानें कबूल केलें. इतकें कबूल करणें सुद्धां त्या बिचाऱ्याच्या अगदीं जीवावर आलें. परंतु त्या गृहस्थाच्या अत्याग्रहामुळें व आपण जें काय सांगणार आहों त्याचें महत्व क्षणोक्षणीं त्यानें अधिकाधिक भासविल्यामुळें तितकें त्यानें कबूल केलें. दुसरें असें कीं, इतका वेळ आपण बाहेर आहोंत, तेव्हां बहुतकरून आईला कळल्याखेरीज राहणार नाहीं आणि तिनें विचारलें म्हणजे मग आपल्याला या गृहस्थाला आतां दिलेलें वचन पाळण्याची कष्टदायक गोष्ट करणेंही अवश्य होणार नाहीं. असें त्याच्या मनांत आलें. त्याचें मन फार कोंवळें; आणि आजपर्यंत जाणूनबुजून आईपासून कोणतीही गोष्ट चोरून ठेवण्याचा त्याला प्रसंग आला नव्हता. यापूर्वीं असा प्रसंग एकच वेळा आला होता, परंतु तो फार निराळ्या प्रकारचा होता. त्यांत कांहीं गूढ किंवा मनाला भयंकर असें वाटण्याजोगें नव्हतें. आतांचा प्रसंग तसा नव्हता. आपण जावयाचें कबूल केलें, परंतु त्यापासून बरें होणार नाहीं असें त्याचें मन त्यास सांगत होतें.

# प्रकरण ४५ वें.

## त्या गृहस्थानें काय सांगितलें ?



परंतु ज्याप्रमाणें कांहीं निरुपद्रवी व गरीब जनावरांवर सापाच्या दृष्टीची मोहनी पडते, त्याप्रमाणेंच क्वचित् या गूढ गृहस्थाच्या दृष्टीची व बोलण्याची मोहनी सीतारामावर पडली असेल; त्याच्यापासून आपल्याला जरूर अशी कांहीं माहिती मिळेल, ती आपण टाकूं नये, असाही त्याचा समज त्याच्या मनास न कळत झाला असेल. पुष्कळ वेळा असें होतें. आपल्यास समजून येत नाहीं. त्यानें "मीं आपण होऊन आईला घडलेला वृत्तांत सांगणार नाहीं" असें कबूल केलें आणि तसें वचन दिल्याबद्दल वाईट वाटून तो घरांत परत गेला. कर्मधर्मसंयोगानें आईनें त्यास बाहेर इतका वेळ काय करीत होतास, कोण आलें होतें, वगैरे कांहीं विचारलें नाहीं. कोणी त्याचा शाळेंतील सोबती आला असेल असेंच तिला वाटलें. शिवाय कामाच्या, जेवणाखाणाच्या गर्दीमुळें तिला त्या बाबतीचा विचार मनांत येण्यास सवडच झाली नाहीं. सीतारामास, ती आतां विचारील, मग विचारील असें एक दोन वेळ वाटलें, परंतु तसें कांहीं झालें नाहीं. रात्रीं निजते वेळीं फुरसत होऊन मग विचारील अशी मनाची समजूत होऊन तो स्वस्थ बसला. परंतु तसेंही कांहीं झालें नाहीं. जी गोष्ट दोनप्रहरपासून सांगूं सांगूं म्हणून तो ह्मणत होता, तीही स्वस्थपणें सांगतां येई इतकें त्याचें मन स्वस्थ नव्हतें तो विचार करीत होता. हा गृहस्थ आपल्याला काय सांगणार ? आपण तें ऐकण्यासाठीं जरूर जरूर आलेंच पाहिजे, अशाबद्दल त्याच्या एवढ्या विनवण्या तरी कां चालल्या होत्या ? आज इतके दिवसांत हा कोठेंही न दिसून आजच एकाएकीं अशा चमत्कारिक रीतीनें कां आला ? आला तो तडक आईकडे येऊन तिच्याशीं न बोलतां आपल्याशींच बोलण्याची, जी हकीकत सांगावयाची ती आपल्यालाच सांगण्याची, एवढी आतुरता त्याला कां ? आईशीं तो बोलत नसे असें थोडेंच होतें ! आईला कळविण्याजोग्या नाहींत अशा गोष्टी तर कांहीं त्याच्या सांगण्यांत येणार नसतील ? इत्यादि विचार अनेक प्रकारांनीं त्याच्या कोंवळ्या मेंदूस एकसारखे त्रास देत होते. त्यास कांहीं वाचन सुचेना. विलायतेला जाण्याच्या संधीबद्दलचा गूढ आनंद अगदीं कोणीकडच्या कोणीकडे जाऊन या वेळीं त्याचें कच्चें अननुभवी मन अगदीं त्रस्त झालें होतें. आजपर्यंत त्यास दुःख व कष्ट देणारे असे अनुभव आले नाहींत असें नाहीं. उलट त्या तसल्या अनुभवांनींच तो आपल्या समान वयाच्या मुलांपेक्षां फार शहाणा झाला होता. परंतु त्या सर्व अनुभवांपासून होणाऱ्या दुःखाला त्याची आई वांटेकरी होती हें

त्यास मोठें समाधान होतें, यामुळें त्यास व्हावयाचा तितका त्रास झाला नाहीं. आजची स्थिति तशी नव्हती. आपल्या या कष्टप्रद विचारांची ती वांटेकरी नाहीं हें एका दृष्टीनें बरेंच असें आतां त्याला वाटूं लागलें. आणि वरील विचारांनीं भरल्या मनानं बरीच रात्र उलटल्यानंतर, " एका अर्थी त्यानं काय सांगावयाचें तें आईला न सांगतां आपल्यालाच आधीं सांगण्याचा आग्रह धरला, हें फार चांगलं झालं " असेंच त्याला वाटूं लागलें. न जाणों आईच्याजवळ काढण्याजोगी नाहीं अशीच हकीकत तो सांगणार नसेल कशावरून ? मोठी सुदैवाची गोष्ट कीं, हा विचार त्याच्या मनांत आला त्याच्यायोगानें त्याचें मन बरेंच शांत झालें आणि उरल्या रात्रभर त्यास थोडीशी झोंप लागली.

दुसरे दिवशीं नेमल्या वेळीं त्या गृहस्थानें त्यास गांठून एकीकडे एका घरांत नेलें. आणि पहिला प्रश्न " आईसाहेबांनीं तुम्हांला विचारलं कीं काय ? मीं तुम्हांला भेटून कांहीं सांगणार हें तुम्हीं त्यांच्या कानावर घातलं कीं काय ? " असा केला. तसा कांहीं प्रकार झाला नसल्यामुळें अर्थातच " नाहीं; तसं कांहीं झालं नाहीं " असें सीतारामानें उत्तर दिलें. त्याबरोबर त्या गृहस्थाच्या चेहऱ्यावर समाधानाची छाया दिसूं लागली. त्याला जें पाहिजे होतें तें तेंच होतें. सीतारामास आतां त्या गृहस्थाचा चेहरा पूर्णपणें दिसला आणि तो जो गृहस्थ असावा अशी त्याची बहुतेक खात्री झाली होती ती आतां पूर्णपणें झाली. थोडा वेळ दोघेही स्तब्ध होते. नंतर सीताराम एकदम त्यास म्हणतो, " काय बोलायचं असेल, तें ताबडतोब सांगा. सुट्टीचा तास संपण्यापूर्वीं मला शाळेंत गेलं पाहिजे. "

" सांगतों, सांगतों; " तो गृहस्थ लागलीच म्हणतो: " इतकी अगदीं उतावळी कां ? बापू, तुम्हाला पाहिलं काल, तेव्हांपासून माझ्या पोटांत फार तोडूं लागलं आहे. आजपर्यंत ज्या गोष्टी झाल्या गेल्या, त्यांबद्दल फार वाईट वाटूं लागलं आहे. पण आम्ही ताबेदार नौकर. आमच्या हातीं कोणाचं बरं किंवा वाईट करायचं काय आहे ? सोन्यासारखीं तुम्ही माणसं, आणखी तुम्हांला का तशा त्या भिकारड्या घरांत रहाण्याची पाळी आणावी ? पहिल्या दिवसापासून ही गोष्ट माझ्या मनाला लागून राहिली. पण आमच्या सारख्याच्या मनाला जरी गोष्टी लागून राहिल्या तरी आम्ही काय करणार ? आपल्याशींच उसासे टाकीत आणखी ' हें कांहीं चांगलं नाहीं. इतक्या थराला चिंतोपंतांनीं गोष्टी जाऊं द्यायच्या नव्हत्या. ' असं म्हणत स्वस्थ बसणार ! याच्यापलीकडे आम्ही काय करणार ? मालक ते पडले. त्यांच्या हातीं सगळी मालमत्ता, सगळे कागदपत्र त्यांच्या स्वाधीन झालेले. ते म्हणतील ती पूर्वदिशा, ते करतील तेंच योग्य. ते फर्मावितील तो हुकूम. ते सांगतील तें काम आणखी देतील ते दाम. "

इतकें बोलून त्यानें लांबच लांब असा उसासा टाकला व जणूं काय आपल्या बोलण्याचा काय परिणाम झाला हें पाहण्यासाठींच त्यानें आपली तीक्ष्ण दृष्टि सीतारामाच्या चेहऱ्याकडे लाविली.

सीतारामास या प्रस्तावनेपासून पुढें काय येणार याचा जरी बोध झाला नाहीं, तरी त्याचें बोलणें ऐकण्याची उत्कंठा वाटूं लागली. आतांपर्यंतच्या त्या बोलण्यामुळें त्यास मागल्या गोष्टींचें स्मरण

होऊन अर्थातच किंचित् वाईट वाटलें, पण तो स्तब्धच होता. काय बोलावें तें त्यास मुळीं सुचेना. तो गृहस्थ लागलीच पुढें ह्मणाला, " बापू, आतां तुह्मांला या गोष्टी चांगल्या समजूं लागल्या असतील, आणखी त्यामुळें वाईट वाटत असेल, नाहीं ? "

सीताराम लागलीच कावराबावरा होऊन त्यास उत्तर करतो, " वाईट ? आह्मांला मुळींच कांहीं वाटत नाहीं. वाईट काय त्यांत वाटायचं आहे ? आह्मी चांगल्या समाधानांत राहतों बोआ. आह्मांला कांहीं वाईट वाटत नाहीं. ज्याचं नशीब त्याच्या बरोबर. इंग्लंडांत नाहीं सगळी मालमत्ता थोरल्या मुलाला मिळून धाकट्यांना स्वतःच्या जोरावरच आपला उदरनिर्वाह करावा लागतो ? झालं तर मग ! हेंच का काय तें बोलायला तुह्मीं मला एवढा कालपासून आग्रह केलात ? "

" नाहीं. नाहीं. तुह्मी समाधानांत आहांत हें बरोबरच आहे. तुह्मी तरी काय कमी आहां ? पण चिंतोपंतदादांनीं अशा प्रकारानं वागणूक केली नसती, तर आज तुह्मी कसे असतां ? कशाची तरी तुह्मांला दुधात असती का ? तुमच्यावर त्यांनीं प्रसंगच तसा आणला आहे तेव्हां तुह्मी असे रहातां आहां, पण—"

" पण काय ? मला कोणी राजा करून टाकलं असतं तर मी कसा असतों ? कोणी बादशहा केलं असतं तर कसा असतों ? या प्रश्नांत अर्थ काय आहे ? आम्ही आहोंत ते कांहीं वावगे नाहींत. मी आतां जातों...... "

" बापू, बापू, तुमचीं हीं बोलणीं ऐकलीं, आणखी एकंदर तुमच्यावरला प्रसंग मनांत आणला, ह्मणजे खरोखर तुमच्या मातुःश्रींची फार धन्यता वाटते. त्या श्रीमंतीच्या सुखांत होत्या तेव्हां कांहीं यांच्यावर असा प्रसंग येईल असं कधीं कोणाच्या स्वप्नांत सुद्धां आलं नाहीं. आणखी असा प्रसंग आला, तर या अशा विलक्षण गंभीरपणानं, धिम्मेपणानं वागतील अशी कल्पनासुद्धां होणं शक्य नव्हतं. पण मी इथें येऊन ज्या गोष्टी ऐकल्या, त्यांच्यावरून असं वाटतं कीं, केवळ सीता, दमयंती, सावित्रीसारख्या वागताहेत, आणखी तुमच्या या उत्तरांनीं न् बोलण्यांनीं तर माझ्या मनाची अगदीं खात्रीच झाली. आणखी अशा साध्वीबद्दल असा प्रकार चिंतोपंतदादांनीं आणखी सरस्वतीबाईंनीं करावा ? छे. त्यापेक्षां...... "

" माझी सुट्टीची वेळ संपत आली बोआ. मी आतां जातों. " असें ह्मणून सीताराम जाऊं लागला, परंतु त्या गृहस्थानें त्यास हातानें धरून म्हटलें, " बापू, जाऊं नकाहो, किती वर्षांनीं तुह्मांला मी आतां पुनः पाहतों आहें, आणखी तुम्ही ' जाऊं ' ' जाऊं ' काय लाविलं आहे ? मी त्यांची नोकरी करतों, म्हणून माझ्यावर तुमचा राग का काय ? आम्हांला नोकरांना काय ? सांगतील ती नोकरी करणं भाग आहे. पण बापू, तुमचं चालतं कसं मला सांगा. मी खरोखर चांगल्या बुद्धीनें आलों आहें. आणखी तुम्हांला पाहिल्यापासून तर मला असं वाटायला लागलं आहे कीं, याचं अन्न आपण खाऊन आणखी याच्या हिताची गोष्ट आपल्या हातून कांहीं होऊं नये हें अगदीं सुद्धां चांगलं नाहीं. एकदां मी चिंतोपंतदादांना या बाबतींत बोललों, नाहीं असं नाहीं, पण माझ्यासारख्या दीडदमडीच्या कारकुनानं यजमानांना अशा

नाजूक बाबतींत बोलायचं ह्मणजे काय ? त्यांनीं केलं तें आम्हांला बरं का वाटतं ? मुळींच नाहीं. पण करणार काय ? आम्ही बोललों, आणखी त्यांनीं आम्हांला, "या बाबतींत किंवा दुसऱ्या असल्या बाबतींत जर तुम्ही तोंड घालाल, तर तुमची चाकरी आम्हांला नको. पिढीजाद् नोकर झाले म्हणून त्यांना ज्यांत त्यांत तोंड घालायची खोड उपयोगाची नाहीं. चला !" असं म्हणून धुडकावून दिलं. काय राहिली आमची शोभा ? तोंडांत मारल्याप्रमाणं आम्ही बसलों कीं नाहीं गप्प ! बरं, पण बापू, तुमचं हल्लीं चालतं कसं कांहीं तुम्हीं सांगितलं नाहीं ? एवढा मात्र खर्च—हो खर्च कांहीं कमी नसेल इतक्या मंडळीचा—म्हणून विचारतों. जुनीं माणसं भेटलीं म्हणजे सगळं विचारून घ्यावंसं वाटतं, व्यवस्था गरिबीची कां होईना, पण नीट असली तर ऐकून आम्हांला समाधान आहे. तो गोंदू तुमच्याकडेच असतोना ? मला कोणीं सांगितलं कीं आजोळीं असतो—"

गोंदूचें नांव निघतांच सीतारामाच्या मनांत एका गोष्टीविषयीं एकदम उजेड पडल्याप्रमाणें झालें. गोंदूनें आदले दिवशींच कोणी आला आला म्हणून आक्रोश करून सांगितलें, ती स्वारी हीच असें त्यास एकदम वाटलें. परंतु त्याची ओळख न देतां सीताराम त्यास एकदम म्हणतो, "मला कांहीं बोआ त्या घरांतल्या गोष्टी ठाऊक नाहींत. आमचं जितकं चालायचं तितकं चाललं आहे. कांहीं आम्हांला कमी नाहीं. मी आतां मॅट्रिक्युलेशनला यंदा जाणार यावरून पहा. आतां मी आणखी एक मिनिटभरसुद्धां थांबणार नाहीं."

"जाल हो !" तो गृहस्थ लोचटपणें त्याचा हात घट्ट धरून म्हणतो: 'जेवढे दागिने हातीं सांपडले तेवढ्यावरच आजपर्यंतचा संसार चालला आहे तुमचा म्हणतां ? बाईसाहेब इतक्या काटकसरीनं वागतील हें संभवनीय सुद्धां वाटलं नसतं. त्यांचा काय खर्चिक स्वभाव ! दागिन्यांचं काय केलं ? मोडून नगद करून ब्यांकेंत टाकून त्या रकमेच्या व्याजावर भागतं ? दागिने दागिने तरी कांहीं असे फारसे नाहींत तुमच्या हातीं लागले मला वाटतं. पण तेवढे दागिने सुद्धां कांहीं पचूं नयेत अशी अजून त्या दोघां नवराबायकोंची इच्छा आहे. मी आपलं हें उगीच बोलतों आहें हो. नाहीं तर तुम्ही कुठें तरी बोलाल आणखी त्यांच्या कानावर जाऊन उगीच माझी गरिबाची मधल्यामध्यें त्रेधा उडायची; नेहमीं नेहमीं त्या दागिन्यांची गोष्ट निघते, म्हणून आपलं विचारलं, कीं असे दागिने तरी किती आहेत तुमच्या हातीं लागलेले ? "

"मला कांहीं ठाऊक नाहीं. गुंडोपंत, तुम्हीं मला विनाकारण इथें आणून माझा वेळ घालवितां आहां. मी तुमच्या आग्रहावरून इथें आलों, हाच आधीं अतिशय मूर्खपणा केला आहे म्हणायचा. चला जाऊं द्या मला ! माझी शाळेची खोटी होते कीं नाहीं ? तुमचा मोठाच चमत्कार आहे बोआ ! एक तर तुमचं या असल्या चौकशीवांचून अडलं नाहीं, आणखी दुसरं तुह्मांला चौकशीच करायची, तर एवढा द्राविडी प्राणायाम काय म्हणून केलात ? आईची तुमची ओळख नाहीं असं नाहीं. तिच्याकडे जा आणखी काय तें विचारा. मला जाऊं द्या. "

" जा तुह्मी, पण मला तुह्मांला सांगायचं आहे तें अजून राहिलेंच आहे. इकडे पहा. माझ्या मनांतून तुह्मांला मदत

करायची आहे. आणखी ती करतां येईल असं मला वाटतं आहे. तुम्ही आतां मोठे झालां आहां. काय सबबींवर तुम्हांला घरांतून काढून लावून सगळी मालमत्ता त्यांनीं गिळंकृत केली याची कांहीं तरी माहिती तुम्हांला असेलच ! ती सबब तुम्हांला तेव्हां समजणं कांहीं शक्य नव्हतं, पण आतां तिचं काय गूढ आहे, तें चांगलं समजूं लागलं असेल. म्हणून विचारतों. तेव्हां तुमचं वयच् तितकं नव्हतं. तेव्हां कोणी तुमच्या-जवळ बोललंच नसेल. पण आतां सांगा. माझ्याजवळ मन मोकळं करून बोलायला तुम्हांला कांहीं हरकत नाहीं म्हणून विचारतों. सांगा. ''

"मला कांहीं ठाऊक नाहीं." सीताराम तिरस्कारानें म्हणाला.

"पहा, आईसाहेबांकडे जाऊन या गोष्टी बोलणं मला शक्य नाहीं म्हणून इतका द्राविडी प्राणायाम करून तुम्हांला विचारतों आहे. आईसाहेबांकडे जाऊन विचारायचं असतं, तर याच्यापूर्वींच नसतं का कधीं विचारलं ? इतकीं वर्षं कशाला जाऊं दिलीं असतीं ? तुम्ही जरा समजूतदार झालां म्हणजे तुमच्या-कडे येऊन या सगळ्या गोष्टी सांगा-यच्या आणखी काय करतां येईल तें करायचं म्हणून मी थांबलों होतों. आई-साहेबांच्याकडे जाऊन त्यांना सगळी हकीकत सांगून उपयोग तर कांहीं झाला नसता, उलट त्यांना विलक्षण दुःख दिल्याचं श्रेय पदरीं आलं असतं; त्यांना दुसरीं दुःखं काय कमी होतीं ? इतक्या उप्पर तुम्ही इतक्या वयाचे समजूतदार असे झाल्यावरही आईकडे जायला सांगत असलां तर जाईन. कारण मला कांहीं बोआ तुमची ही स्थिति पाहवत नाहीं. आणखी ही स्थिति त्या बिचारीवर कां ? तर निरपराधी, साध्वी म्हणून ! चमत्कार आहे कीं नाहीं ? अहो, तुम्ही आतां मी सांगेन त्याप्रमाणें वागाल, तर सगळी इस्टेट तुमच्या हातीं परत येईल. आज जी त्या रंग्याच्या तावडींत सांपडून निवळ चोरापोरीं जाते आहे त्याचा अर्थ काय ? बोला, तुम्हांला सगळ्या गोष्टी ठाऊक आहेत का ? काय त्यांनीं सबब लाविली, तुमच्या आजोबांना कसं फसविलं, त्यांच्या मनाला त्यामुळं केवढा धक्का बसला, आणखी त्यामुळंच त्यांचा अंत कसा झाला, हें कांहीं तुम्हांला ठाऊक आहे का ? नसलं तर मी सांगतों. त्या वेळची गोष्ट निराळी होती. आज तुम्हांला अगदीं उलगडून सांगितली तरी कांहीं हरकत नाहीं. बोला, सांगूं ? आईसाहेबांच्या जवळ बोलायच्या गोष्टी नाहींत म्हणून तुमच्याजवळ बोलायच्या आणखी कांहीं पुढं करायचं तें तुमच्याच हातून करायचं."

सीताराम आतां मोठ्या बुचकळ्यांत पडला. आईजवळ जाऊन या असल्या गोष्टी कोणीही बोलणें मुळींच इष्ट नव्हतें. त्याला त्या पूर्वसंकेताबद्दलचे त्याचे संशय होतेच. पूर्णपणें माहिती अशी नव्हती. फक्त संशय होते. कांहीं तरी अगदीं बिलक्षण व अकथनीय किंबहुना अवि-चारणीय असें त्या वृत्तांतांत आहे, हेंही त्याच्या मनास ठाऊक होतें. त्या प्रसंगा-विषयींचें बोलणें मुद्दाम होऊन कधींच कोणी काढलें नाहीं. परंतु चुकून एखादे वेळीं निघालें तर आई किती कष्टी होत असे हें त्यानें अनेकवार पाहिलें होतें. विश्वनाथपंतही त्या बाबतींत कधीं बोलत नसत, हें त्यानें पुष्कळ वेळां निरखिलें होतें. दोन चार वेळां त्यांच्या एका दोघां स्नेह्यांनीं सीतारामाच्या देखत, "या मुलाच्या बापांनी

इतकी संपत्ति असतां याची अशी स्थिति कां? आणखी याचे बंधु तर नुसते तींत लोळताहेत असं कां? तुम्ही वकील, याच्यावर इतका लोभ करतां असं असून वांटणीची फिर्याद वगैरे कां लावीत नाहीं?'' असे प्रश्न केले; तेव्हां त्यासंबंधानें उडवाउडवीचीं उत्तरें देऊन त्यांनीं विषय बदलला, हेंही त्यानें पाहिलें होतें. आजोबा हयात असतांना, मुलाच्या देखत काय बोलावें आणि काय बोलूं नये याचें त्यांस भान न राहून त्यांच्या तोंडूनही कांहीं विलक्षण उद्गार निघाले होते. त्याचप्रमाणें कांहीं एका विवक्षित कागदाबद्दलची भानगड त्याच्या कानीं आलेली त्यास स्मरत होती व तो कागद ओझरता असा त्यास वाचण्यासही सांपडला होता. अशी एकंदर स्थिति असल्यामुळें त्यास त्या बाबतींत पुष्कळ गोष्टी संशयितपणें ठाऊक होत्या. आज या वेळीं आपण नुसती होकारार्थी मान हलविल्यास काय प्रकरण आहे तें पक्केपणीं समजणार आहे असें त्यास वाटलें आणि शाळेंत परत जाण्याविषयींची त्याची आतुरता क्षणमात्र दूर झाली. आपण 'सांगा' असें म्हणावें कीं 'नको, मला जितकं ठाऊक असायला पाहिजे तितकं ठाऊक आहे. अधिक ऐकण्याची इच्छाच नाहीं' असें म्हणावें, हा त्यास मोठा प्रश्न पडला. "आपल्याला सद्यःस्थिति प्राप्त होण्याला काय काय कारणं झालीं, आपल्या आईच्या संबंधानें...... (पुढील विचार मनांत येण्याबरोबर त्याच्या अंगावर शहारे येत. आणि तो ते विचार मनांतून घालविण्यासाठीं दुसराच कांहीं तरी विषय मनांत येईल असें करी.) आज त्या सर्व गोष्टींचा पूर्ण खुलासा होईल असें त्यास दिसून आलें आणि शाळेचा तास बुडाला तरी बुडवून तो खुलासा एकदां करून घ्यावा अशी मोहबुद्धि त्यास झाली. तो किती वेळ तरी स्तब्ध झाला. त्याला इस्टेट परत येण्याची आशा अणुमात्र उपजली नाहीं. त्याला इस्टेटीची दिक्कत वाटत नव्हती. पण त्या इस्टेटीच्या बाबतींत कांहीं तरी असें गूढ आहे तें आपणास एकदां समजलें तर बाकी नाहीं. आतां अशा गोष्टी आपण समजावून घ्याव्याच अशी बुद्धि त्यास झाली. मनाची पुष्कळ धडपड झाली आणि शेवटीं तो आपल्या जिज्ञासेच्या जाळ्यांत पुरा सांपडून त्यानें होकारार्थीच मान हलविली.

"तुम्हांला काय काय माहिती आहे तें मला सांगा म्हणजे मी तुम्हांला सांगतों" असें त्या गृहस्थानें संतुष्ट चर्येनें म्हटलें. सीताराम कांहीं वेळ अगदीं स्तब्ध होता. परंतु शेवटीं त्यानें नाइलाजानें म्हटलें, "मला तशी कच्ची हकीकत कांहीं ठाऊक नाहीं."

"मी सांगतों" गुंडोपंत उल्हासानें म्हणाला. आणि त्यानें सुरुवात केली.

परंतु ती सर्व हकीकत येथें सांगत नाहीं. गुंडोपंतानें ती इत्थंभूत म्हणून सांगितली, परंतु ती "इत्थंभूत" नव्हती इतकेंच येथें सांगतों.

ती ऐकतांना सीताराम एखाद्या संगमरवरी पुतळ्याप्रमाणें तटस्थ होता. परंतु शेवटीं शेवटीं त्याची अशी अवस्था झाली, कीं त्यास जागचें उठवेना. तो काळाठिक्कर पडला. त्याच्या मनांत कोणकोणत्या विकारांचें तुमुल युद्ध झालें असेल बरें?

मानवीस्वभाव इतका नीच असेल अशी कल्पना आजपर्यंत त्याच्या कोंवळ्या मनास कधींच झाली नव्हती.

गुंडोपंताच्या चर्येवर संतोषवृत्ति चमकूं लागली.

गुंडोपंतानें ते दिवशीं फार दुष्टपणाचें कृत्य केलें, परंतु त्याच्या हातून दुसरें कोणतें कृत्य घडणार होतें ? आजपर्यंत कोणतीं सुष्ट कृत्यें घडलीं होतीं, तर एवढेंच दुष्ट कृत्य झालें ह्मणावयाचें ? परंतु आज त्यानें जी "इत्थंभूत हकीकत" म्हणून त्या कोंवळ्या, अननुभवी, मातृभक्त मुलाजवळ सांगितली, तिचा परिणाम काय होणार हें तो काय जाणून नव्हता ? होताच ! त्यानें मुद्दामच तें सर्व सांगितलें. सीतारामाचें मन करपून जावें हाच त्याचा हेतु होता. तो आज दोन दिवस त्याच्या पाठीस लागून " हकीकत सांगतों, हकीकत सांगतों, " म्हणत होता, त्यांतला हेतुच तो. किंबहुना तो खूपखानादेखून निघून आला त्यांत जे काय हेतु होते, त्यांतला हाही एक हेतु होता. आपण सांगितलेल्या हकीकतीनें जो इष्ट तो परिणाम घडला, असें पाहातांच त्यास मोठा संतोष झाला. आणि जसा एखादा बोका एखाद्या पुष्ट उंदरावर फार वेळ टपून बसून शेवटीं त्याला धरतो आणि तसा धरल्यावर मग आपण मिळविलेल्या जयाचें दृष्टिसुख घेण्याकरितांच काय तीन तीनदां उलथापालथा करून त्याच्याकडे पहातो, त्यास पुनः तोंडांत धरतो, आणि त्याचे जितके हाल होतील तितके करण्यांतच त्यास फार आनंद होतो, त्याप्रमाणेंच गुंडोपंताची स्थिति झाली असावीशी दिसली. त्याच्या चर्येवर संतोष व सिद्धि यांनीं येणारें स्मित नाचूं लागलें होतें आणि त्याच्या चेहऱ्यावर जितका संतोष दिसत होता तितकेंच दुःख, तितकाच संताप, तितकाच खेद त्या कोंवळ्या पोराच्या तोंडावर दिसत होता. त्याचे ओंठ थरथरां कांपूं लागले; आजपर्यंतची सर्व टवटवी मावळून गेली. त्याचें अंतःकरण करपून जाऊन, जळून जाऊन वाळलेल्या पानाप्रमाणें त्याचा अगदीं चुरा होऊन गेला असावा असें दिसलें. तो पूर्वींचा सीताराम राहिला नाहीं. कांहीं तरी बोलावें अशाबद्दल त्याचा यत्न चाललेला त्याच्या थरथरणाऱ्या ओंठावरून दिसला; परंतु शब्द एकही बाहेर पडला नाहीं. आदले दिवशीं संध्याकाळीं जी त्याची मुखश्री होती, ती आतां पार मावळून गेली. फेअरब्रेनसाहेबानें ज्या गोष्टीची महत्वाकांक्षा त्याच्या मनांत उत्पन्न केली होती, ती पार जाऊन तिच्या ऐवजीं अगदीं अननुभूत असे विचार त्याच्या मनांत उद्भवले. आजपर्यंतचे त्याचे संशय ह्मणजे कांहींच नव्हते. त्या संशयाच्या पलीकडे कांहीं तरी गोष्टी त्याला गुंडोपंतानें सांगितल्या होत्या, हें अगदीं उघड होय. तो फार वेळ तसाच तटस्थ बसला. नंतर इतक्यांत गुंडोपंत त्यास म्हणतो, "बापू, माझी तर अशी पक्की समजूत आहे कीं, हें सर्व खोटें कारस्थान आपल्या बंधूंनीं केवळ द्रव्याच्या लोभानें रचिलेलें आहे. आईसाहेबांसारख्या माउलीच्या हातून असा कांहीं प्रकार खरोखर घडला असेल, आणखी तो—पण तें खोटेंच ! तुम्ही जर या गोष्टीचा पक्का शोध लावाल, तर मी अगदीं खात्रीनें तें सारें खोटें आहे, असें सिद्ध करण्यांत तुम्हांला वाटेल ती मदत करीन. मला तर आतां तुमच्या बंधूंचा आणखी त्यांच्या बायकोचा अतोनात तिट्कारा आला आहे. आजपर्यंत मी स्वस्थ बसलों याच्याबद्दलच मला किती तरी पश्चात्ताप होतो आहे ! पण मलासुद्धां पक्का सुगावा नव्हता, आणखी पक्का सुगावा लागलासा वाटला, पण तो तुमच्याजवळ येऊन

सांगावा कीं नाहीं ? सांगावा तर तो तुम्हांला कळेल कीं नाहीं ? अशा संशयानें मी अगदीं गप्प बसलों. पण आतां गप्प बसण्यांत अगदीं अर्थ नाहीं, तुम्ही बरेच मोठे झालां आहांत, तेव्हां सांगितल्यापासून फायदाच होईल, वावगं होणार नाहीं, असं वाटून मी तुमच्याकडे आलों. तुमच्यापेक्षां आणखी कोणी मोठा पुरुष तुमच्या घरांत असता, तर याच्यापूर्वींच मी हे माझे संशय आणखी त्या संशयांबद्दलचा माझा पुरावा येऊन सांगितला असता. बोला, आतां तुम्ही काय करणार तें ! ''

सीतारामाच्या बिचाऱ्याच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडेना. त्याचें सर्वांग-विशेषतः त्याचे ते आतां अगदीं रक्तहीन झालेले ओंठ थरथरा कांपत होते. त्याच्या मनास तर पक्कें वाटलें कीं, या गुंडोपंतानें सांगितलेल्या हकीकतीचा पुरा तपास लावून आपल्या आईवरला कलंक दूर करणें, हें आपलें पहिलें कर्तव्य होय. परंतु तें आपण कसें करणार ? विश्वनाथपंतांस ही सर्व हकीकत सांगून त्यांची या कामांत सल्ला घ्यावी काय ? त्यांना या बाबतींतिली सर्व माहिती असेल काय ? त्यांचेजवळच तो कागद आहे. त्यांनीं तो अर्थातच वाचला असेल, आणि जर वाचला असेल, तर अर्थातच त्यांना इत्थंभूत बातमी असली पाहिजे. शिवाय आजोबांचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास होता, तेव्हां त्यांनीं या सर्व गोष्टीचा विचार अनेक वेळां त्यांना सांगितलाच असेल. गुंडोपंत जर या कामांत आपल्यास मदत करून पुरावा दाखवीत असेल, तर काय हरकत आहे या कामांत पडण्यास ? ती इस्टेट--तिच्यापैकीं एक-एक सुद्धां पै आपल्याला नको, पण असला आरोप, आणखी तोही प्रत्यक्ष आपल्या बापाच्या...... शिवशिव ! सीतारामाच्या सर्वांगावर शहारे उभे राहिले आणि डोळ्यांत अश्रु उभे राहिले. सरते शेवटीं तो तेथून निघून जाण्यास उठला. कांहीं बोलणें किंवा विचारणें आतां त्याला शक्यच नव्हतें. तो आज पंचवीस वर्षांनीं मोठा झाला. वयानें इतका लहान पण पंचवीस वर्षें जगाच्या अनुभवाचीं गेलीं म्हणजे जितकें मनुष्याचें मन जगाविषयीं विटावें तितकें तें विटल्यासारखें झालें. गुंडोपंत पक्का लुच्चा ! त्यानेंही पाहिलें, कीं आजच्या पुरतें आपलें पुष्कळ काम झालें. आजच आणखी कांहीं बोललें तर सर्वच व्यूह ढांसळायाचा. तेव्हां त्यानें सीतारामास जाण्याला मुळींच हरकत केली नाहीं. फक्त तो एवढेंच म्हणाला, '' तुम्ही जा. पण पुनः केव्हां भेटाल तें मला सांगा. मी आलों आहें कांहीं कामाकरितां. केवळ आठ दिवसांच्या मुदतीनं त्यांनीं मला कांहीं कामासाठीं पाठविलं आहे. ज्या कामाकरितां पाठविलं आहे तें संपतांच मला पुनः खूपखाबादेचा रस्ता सुधारला पाहिजे आहे, म्हणून म्हणतों. आतां दोन दिवस कांहीं मला तुम्हाला भेटायला व्हायचं नाहीं. तेव्हां तेरवां किंवा त्याच्या तेरवां मला कुठें भेटाल तेवढं सांगा म्हणजे ठीक होईल. तुम्ही इथेंच याल, तर मी अगदीं नेमक्या वेळीं इथें येईन. आणखी किती तरी गोष्टी मला तुम्हांला सांगायच्या आहेत, पण सांगितल्या गोष्टींबद्दल कांहीं विचार करायचा असा तुमचा बेत असला तर कांहीं सांगून फायदा, नाहीं तर काय ? जा. आतां कांहीं बोलूं नका. आईसाहेबांच्या जवळ तर कांहीं या गोष्टी तुम्हांला बोलतां येत नाहींत. दुसऱ्या कोणाचा विचार तुम्ही अशा

बाबतींत न घ्याल तर चांगलं. माझ्यावर विश्वास ठेवाल, तर मी तुम्हांला सगळ्या गोष्टींचा चांगला विचार सांगेन. अगदीं सुद्धां संशय धरूं नका. पण या सगळ्या गोष्टी विश्वासानं होत असतात. तो जर नसला, तर मग माझं कांहीं बोलणंच नाहीं."

सीताराम त्याला उत्तर म्हणून कांहीं बोलणार, तोंच गुंडोपंत त्यास म्हणतो, "नका. बापूसाहेब, आतां कांहीं सुद्धां बोलूं नका. विचार करायला फुरसत घेऊन सावकाशीनं मला सांगा. मी आतां कांहीं सुद्धां ऐकत नाहीं. जा आतां. तेरवांच्या दिवशीं, आज आलांत त्याच वेळीं या, मग काय बोलायचं तें आपण बोलूं."

सीतारामही कांहीं विशेष बोलणार होता असें नाहीं. गुंडोपंतानें जाण्याविषयीं आग्रहानेंच नेट लाविला तेव्हां तो मुकाट्यानें चालता झाला. थोड्या वेळानें आपलें कार्य बरेंच साधलें असें मनांत वाटून त्या समाधानांत गर्क होऊन गेलेला गुंडोपंतही तेथून निघाला.

# प्रकरण ४६ वें.

## कांहीं पुढें कांहीं मागें.

गुंडोपंतदादांस खूपखाबादेहून येथें येण्याचें कारण तरी काय झालें हें जाणण्याची उत्कंठा अर्थातच वाचकांस आतां झाली असेल, आणि ती जिज्ञासा तृप्त केली असतां पुढील कथानक ध्यानांत येण्यासही सोपें पडणार आहे, करितां ती हकीकत आधीं सांगून ठेवतों.

चिंतोपंत व सरस्वतीबाई यांचें आपापल्या रंगमहालांत हितगुज झालें व त्यांच्या मतें तें हितगुज जरी केवळ आपापसांत होतें, तरी वस्तुतः तसें नव्हतें हेंही वाचकांच्या लक्षांत असेलच. तें हितगुज झाल्या दिवसापासून चिंतोपंत व सरस्वतीबाई यांचा प्रणयकलह आठपंधरा दिवसांत मुळींच झाला नाहीं. परंतु पंधरा दिवसांनंतर तसा कलह होण्यास एक कारण झालें. चिंतोपंताच्या सर्व इस्टेटीचे मॅनेजर आमच्या वाचकांचे स्नेही रंगोपंत यांचेकडून हजार दोन हजार रुपयांच्या रकमांची नेहमीं मागणी येत असे व त्या मागणीवरून त्यांस नेहमीं रकमा जात असत, वगैरे प्रकार पूर्वी सांगून दिलेलेच आहेत. त्याचप्रमाणें एक मागणी एके दिवशीं आली. या खेपेची मागणी थोडीशी जबर होती. पांच हजार रुपयांची रक्कम फार जरूरीनें पाहिजे असें फार कासाविशीनें लिहिलें होतें. आणि त्या रकमेची अवश्यकता काय, हेंही पण

जितक्या समर्पकपणें लिहितां येईल, तितक्या समर्पकपणें लिहिण्याचा यत्न केला होता. सरस्वतीबाईंना ती अवश्यकता अगदीं समर्पक वाटली, व त्यांचेजवळ तितकी रक्कम शिल्लक असती, तर त्यांनीं चिंतोपंताचा विचार घेण्याची वाट न पाहतां पाठविलीही असती. परंतु तितकी रक्कम मुळींच शिल्लक नव्हती; तीन हजारांची तूट होती. रंगोपंताचें पत्र तर फार निकडीचें, तेव्हां आतां कांहीं तरी लटपट करून पैसे पाठविले हे पाहिजेतच असा त्यांनीं निश्चय केला. इतर बाबतींत कितीही सहजपणें आपण पतिराजावर जय मिळविला, तरी पैशाच्या बाबतींत आपला सर्व शहाणपणा, सर्व कजागपणा, सर्व कावेबाजपणा अगदीं एकवटून हल्ला करावा लागतो, तेव्हां मोठ्या कष्टानें काम साधतें, हा अनुभव नेहमींचा असल्यामुळें व आज रक्कमही फार मोठी आहे, तेव्हां हल्ला करावयाचा तोही जबरदस्त नेटानें करावा लागणार, हा सर्व विचार करून त्यांनीं दारूगोळ्याची तयारी चालविली. वरांत शिल्लक असली, ह्मणजे ती पाठविणें निराळें, आणि शिल्लक नाहीं तर दुसरीकडून आणून ती पाठविणें निराळें. आज दुसरीकडून आणविण्याची पाळी होती, हें एक आणखी त्यांत विशेष. परंतु कांहीं मनुष्यांचें असें असतें, कीं एखादी वस्तु मिळविण्यास अगर एखादें कार्य साधण्यास जितक्या अडचणी असतील, तितका त्यांना अधिक जोर येतो; कारण हजारों अडचणी दूर सारून मिळविलेल्या सरशीपासुन होणारें समाधान सगळ्यापेक्षां अधिक असतें. "आपल्याजवळ रोख शिल्लक कधीं म्हणून ठेवूं नये, गांवीं पाठवून तिकडे इस्टेट घ्यावी यांतच शहाणपणा आहे. संस्थानांतलं जिणं ह्मणजे अळवावरच्या पाण्याच्या थेंबाप्रमाणं आहे. केव्हां कशी झुळूक येऊन तें घळकन् निसटून खलीं खांचेंत पडेल याचा नेम नाहीं," हा उपदेश सरस्वतीबाई नेहमीं आपल्या पतीस करीत आणि दुसरा याहून महत्वाचा उपदेश असा करीत कीं, "वेळ फावेल तेव्हां आपला हात साधून घ्यावा; एकदां हातचं गेल्यावर कधीं काय कुठें मिळणार आहे ?" या नेहमींच्या उपदेशाचा वगैरे आज उपयोग करून वेळ पडली तर गंगायमुनांस आपल्या मदतीस आणून व एखाद्या हडळी—डाखिणीचाही संचार अंगांत करून घेऊन, आपलें ह्मणणें साधावयाचें असा तिनें निश्चय केला होता. असा निश्चय करण्यास आणखी एक कारण असें झालें, कीं पत्र आलें तें गुंडोपंताकडून तिनें वाचविलें असतां गुंडोपंतानें असे उद्गार काढले कीं, "रंगोपंताच्या या लिहिण्यांत कांहीं अर्थ नाहीं; ही रक्कम कांहीं आपण पाठवूं नये. ते ह्मणतात त्या व्यापारांत आपण पडण्याची अगदीं जरूरी नाहीं. पातीदार अगदीं लुच्चा आहे, सपशेल बुडवील. रंगोपंताला कांहीं समजत नाहीं." गुंडोपंतानें रंगोपंताविरुद्ध असे उद्गार काढल्यावर मग निश्चय अगदीं ठाकून ठोकून कायम करण्याला आणखी काय कारण पाहिजे ? गुंडोपंतास, "तुम्हांला या असल्या बाबतींत पडायचं मुळींसुद्धां कारण नाहीं. तुम्हांला काय वाटतं हें मी तुह्मांला विचारायला आलें होतें का ? मग कां तुम्ही असा चोमडेपणा करतां ? तुमचा चोमडेपणा मी कांहीं कधीं सोसून घ्यायची नाहीं. आपला तिकडला भोळा कारभार पडला, तेव्हां तिकडे काय वाटेल तें बोलत जा. मी उद्यांच्या डांकेंत जर नाहीं ही रक्कम

पाठविली, तर माझं नांव सरस्वती नव्हेच मुळीं ! मेल्यांनो, उष्टीं काढणारांनीं उष्टीं काढावीं; दुसऱ्याच्या चौकाशा कशाला ? ' असं करूं नका, आणखी तसं करूं नका, रंगोपंताला समजत नाहीं. ' त्याच्या खेटराची तरी सर तुह्मांला आहे का ? पुनः तुम्ही अशा बाबतींत बोललां तर खबरदार माझ्याजवळ ! " अशी पूजा मिळालीच.

गुंडोपंत इरसाल, तो आणखी एवढेंच ह्मणाला, " मर्जी तुमची ! तुम्ही किती जरी बोललांत तरी हिताची जी गोष्ट असेल, ती सांगणं आमचं काम आहे. तुमचं अन्न खातों आहों. " हें बोलतांना त्याच्या डोळ्यांत जी चमक मारीत होती ती जर कोणी पाहिली असती तर त्याचें मन किती शुद्ध होतें, हें स्पष्टपणें दिसलें असतें. पण संतापानें सरस्वतीबाईचें चित्त ठिकाणावर नाहींसें झालें होतें, अर्थातच गुंडोपंताची अगदीं पक्की फजिती करावयाची, हा हेतु एकंदर कारणांत सामील होऊन तिनें चिंतोपंतांवर पैशासाठीं गहजब केला. प्रणयकलहाचे ऐवजीं ते दिवशीं अगदीं चांगलाच खटका उडाला. सरस्वतीबाई घर सोडून दक्षिणेंत येण्यास निघाली, शेवटीं अगदीं नाइलाज होऊन चिंतोपंतानें ते दिवशीं तीन हजार रुपयांची रक्कम कोठून तरी आणून ( कोठून कशी आणली हें वाचकांस योग्य वेळीं सहज कळेल. ) सखूबाईच्या स्वाधीन केली आणि त्यांनीं प्रतिज्ञा केल्याप्रमाणें दुसरे दिवशीं ती रक्कम रवाना केली. रवाना करतांना अर्थातच गुंडोपंताची न भूतो न भविष्यति निर्भर्त्सना केली. गुंडोपंताचें मन ते दिवशीं किती दुखावलें हें त्याचें त्यासच ठाऊक ! परंतु त्यानें एका अक्षरानेंही तें बाहेर दाखविलें नाहीं. इकडे या रकमेच्या भांडणाचे दिवसापासून चिंतोपंताचें मन मात्र फार विचारव्यापृत झालें. आजपर्यंत किती वेळां तरी केवळ बायकोच्या आग्रहावरून आपण रकमा पाठवीत आलों, परंतु या रकमांचें झालें काय आणि होतें काय, याचा आपण विचार करीत नाहीं. केवळ रंगोपंत पत्रें लिहून कांहीं तरी कळवितो, तेवढ्यावर विश्वास ठेवून आपण बसतों हें बरें नव्हे, असें त्यास वारंवार वाटूं लागलें आणि अशा स्थितींतच गुंडोपंतानें त्याची घराबाहेर दुसरे कोठें गांठ घेऊन "दादासाहेब, मी तर सर्वथा लुच्चा, अशी आपली खात्री झालीच आहे. पण माझ्यानें रहावत नाहीं म्हणून बोलतों. आपण हाडांचीं काडें करून पैसा मिळवून तिकडे पाठवितां त्याचा कांहीं तरी पूसतपास ? " असें ह्मटलें, तेव्हां त्यांच्या संशयास बरेंच पाठबळ आलें. आणि आपल्या बोलण्याचें उदक जर मिळालें, तर त्या संशयाच्या अंकुराची वाढ बरीच होईल, असें वाटल्यावरून गुंडोपंतासही अधिक बोलण्यास व सांगण्यास संधि सांपडली.

" आपल्या पैशाचा खरोखर दुरुपयोग होतो आहे, ते पैसे कांहीं सुरक्षित नाहींत, सगळे व्यापारांत पडलेले नाहींत, कांहीं व्यापारांत पडलेले आहेत; पण ते व्यापार फार धोक्याचे, केवळ जुव्यांत घातल्याप्रमाणें आहेत, " असें कांहीं प्रत्यक्षपणें व कांहीं अप्रत्यक्षपणें सांगून व सुचवून गुंडोपंतांनीं वेळ साधण्याचा प्रयत्न केला. त्याचप्रमाणें कर्जाऊ पैसे फार दिलेले असून, अधिक व्याजाच्या आशेनें ते केवळ जगजाहीर अशा दिवाळखोर लोकांस दिलेले आहेत. ज्याला कोणी बाजारांत एक कवडीसुद्धां उसनी देणार नाहीं

अशा एकदोघां पारशांस दहा दहा पंधरा पंधरा हजारांपर्यंत रकमा दिलेल्या आहेत. तेव्हां याबद्दल जर आह्मी आपल्याला जागं करायचं नाहीं, तर कोणी करायचं? आपला त्यांच्यावर विश्वास आणखी आमच्यावर अगदीं गैरविश्वास. तसंच कांहीं काम असलं घोंटाळ्याचं तर आह्मांला पुढं करायचं, आणखी......पण आतां मागल्या गोष्टी कशाला काढूं? आतां हें अगदीं माझ्यानं पहावेना. धडधडीत डोळ्यांदेखत यजमानांचं अनहित होतं आहे तें पाहवणार कसं? म्हणून बोललों. करायचा असला विचार तर करावा, नाहीं तर चाललं आहे तसं चाललंच आहे. जें होणार त्यापुढं आपला काय इलाज आहे?''असें त्यानें आणखी ठेवून दिलें. इतकें बोललों तरी यजमानसाहेब कांहींच बोलत नाहींत. असें पाहतांच स्वारीला आणखी थोडेंसें अवसान येऊन, त्यानें रंगोपंताच्या शहाणपणाची अगदीं फटफजिती करून त्यास बेअकली म्हटलें. आणखी थोडेंसें बोलून तो लुच्चा असावा, आपलें घर भरतो आहे असेंही सुचविलें. इतकें पचलें, तेव्हां आणखी उत्तेजन येऊन सरस्वतीबाईच्या शहाणपणावर तो उठला; मग मात्र चिंतोपंतानें त्यास चापलें. गुंडोपंतानें आपलें बोलणें अर्थातच तितकेंच ठेवलें. परंतु आपल्या बोलण्याचा कांहींना कांहीं तरी आपल्याला इष्ट असा परिणाम झाला आहे, चिंतोपंतदादा एकटेच असतांना याबद्दल अधिक विचार खास करतील व तसा विचार केला, म्हणजे आपल्या म्हणण्याचा खरेपणा त्यांना अधिकअधिक भासत जाईल, अशी त्याच्या मनाची खात्री झाली. त्या त्याच्या खात्रीप्रमाणें खरोखरीच घडलें. चिंतोपंत सरस्वतीबाईंच्या हातांत अगदीं मेणाच्या बाहुल्याप्रमाणें होता ही गोष्ट खरी, परंतु त्याच्या मनावर राज्य करणारी ती एकटीच स्वामिनी नव्हती. द्रव्यलोभाचा ताबा त्याच्या मनावर कमी नव्हता. त्या रात्रीं चिंतोपंतास, गुंडोपंताच्या बोलण्यानें अगदीं वेडें करून सोडलें. आपल्या बायकोस तिचा रंगोपंत खरोखरी फसवीत असावा, आपण वेळींच सावध व्हावें तें चांगलें, असें त्याच्या मनांत अखेरीस आलें; आणि शेवटीं बायकोच्या नकळत आपण रंगोपंताकडे गेलेल्या पैशाची काय व्यवस्था होते त्याची चौकशी करवावी, असा त्यानें बेत केला. ही चौकशी अगदीं पूर्णपणें करण्यास गुंडोपंताखेरीज दुसरा कोणीही मनुष्य उपयोगी नाहीं. तेव्हां त्यासच मुकाट्यानें तें काम करण्यास पाठवावा. मात्र येथून त्यानें जाण्यास कांहीं दुसराच बहाणा केला पाहिजे. त्याप्रमाणें त्यानें एक फार महत्वाचें काम काढून त्यास लावून दिलें.

गुंडोपंत अशा नाजूक कामगिरीवर दक्षिणेंत आला होता आणि त्यांतल्या त्यांत त्यानें आणखीही एक धोंडा टाकून पाहिला. मनुष्यास आशा सुटली म्हणजे ती किती परमावधीस जाते याचा नेमच नाहीं. रंगोपंताबद्दल आतां आपण लिहूं तें अर्थातच आपल्या यजमानास खरें वाटणार आणि तसें तें खरें वाटत चाललें, म्हणजे आपल्यावर त्याचा पक्का भरंवसा बसणार. असा भरंवसा बसला, तरी जोंपर्यंत ती अवदसा आहे तोंपर्यंत त्याला कायमपणा येणार नाहीं. एवढ्याकरितां कांहीं तरी अशा कचाटींत त्याला आणला पाहिजे, कीं बायकोनें कांहीं जरी केलें, तरी तिच्यापेक्षां आपल्याच तावडींत तो अधिक सांपडलेला असला पाहिजे. आपण असें कांहीं

जाळें पसरलें पाहिजे कीं, त्यांत आपण तर न सांपडतां बाकीचीं हीं सावजें अगदीं बेमालूम सांपडलीं पाहिजेत. चिंतोपंत तर अगदीं पुराच कचाटींत सांपडला पाहिजे. त्याला असें वाटलें पाहिजे, कीं " आपलें नरडें गुंडोपंताच्या पेचकेंत सांपडलें आहे. तो केव्हां पेचक आंवळील आणि नरडें दाबील याचा नेम नाहीं. " असें त्याला एकवार पक्कें कळलें, म्हणजे तो आपली मनधरणी करून राहीलच. आणि त्याचें नरडें इतकें आपल्या सपाट्यांत आहे असें एकदां त्या अवदसेला पक्कें कळलें, तर तीही पण अगदीं मुकाट्यानें चुपित माझ्या आर्जवानें राहील. सीतारामाशीं भाषण करून त्याच्यासुद्धां मनांत आतां घोंटाळा करून ठेविला आहे, त्याचा उपयोग आपल्यास झाल्याखेरीज राहणारच नाहीं. मात्र माझ्या बोलण्याचा तसा उपयोग झाला पाहिजे, तो होईल कीं नाहीं याचीच कधीं कधीं शंका वाटते. मला जसा पाहिजे तसा झाला, तर काय पाहिजे ! तसा इकडून उपयोग व्हावा. हा रंगोपंत तसाच तडाख्यांत सांपडावा. तो सांपडलाच म्हणा आतां. आतां कोठें जातो ! मी अगदीं सगळी चित्तंबातमी काढून टांचून टाकली आहे. जशी एखादी हवेली उडविण्यासाठीं अगदीं चिनचोभाट एखाद्यानें त्या हवेलीखालीं पोखरून तळघर करावें आणि त्या तळघरांत दारूखाना भरपूर भरून ठेवावा, त्याप्रमाणेंच आपण केलें आहे. आतां फक्त मालकाकडे जाऊन त्याला बोलावून आणून प्रत्यक्ष सगळी स्थिति दाखवून " माझ्या सांगण्याप्रमाणें करतोस कीं देऊं शिलगावून ? " असें भिवडवावयाचेंच राहिलें आहे. ' मीं अमुक अमुक चित्तंबातम्या काढल्या आहेत, त्यांचे पुरावे हे असे असे आहेत, चिंतोपंताकडे पाठवूं ? कीं तुमची आमची आपसांत समजूत होण्याचा संभव आहे ? अजून काहीं तुमच्याबद्दल कोणास शंका येत नाहीं. आणि मीं तुमच्या वतीनें लिहिलें तर मुळींच शंका उरणार नाहीं; इतकेंच नाहीं, पण पहिल्यापेक्षां अधिकाधिक भरंवसा बसणार आहे. कोणती गोष्ट करून घ्यायची हें आतां तुमचें तुमच्यावर अवलंबून आहे. बोला. ' असा चक्क प्रश्न रंगोपंतापुढें मांडला कीं, आणखी माझे ते कागदपत्र तीं टांचणें त्याला दिसलीं कीं, मग तो घाबरून गेल्याखेरीज राहणारच नाहीं.

असा एकंदर गुंडोपंताचा विचारसंघ होता. गुंडोपंत खुपसावादेहून निघाला तो सरूबाईचे संशय जागृत होऊं नयेत, म्हणून अगदींच निराळा बहाणा करून निघाला. तेथें आल्यानंतर रंगोपंतास त्यानें असें सांगितलें कीं, राधाबाईकडल्या दागिन्यांकरितां बाईसाहेबांनीं मला धाडलें आहे. जे दागिने गेले आहेत ते हरतऱ्हा करून माघारी मिळतात कसे—दागिने मिळाले नाहींत, तरी निदान पैसे काढावे आणि ते मी काढीन अशी प्रतिज्ञा करून आलों आहे, आणखी ते मिळतील अशी मला खात्री वाटते आहे. दुसरें कांहीं आपलें काम नाहीं. पण हें काम कळूं द्यावयाचें नाहीं. आणखी मीं तें तुम्हाला सांगितलें असें तुम्ही बाईसाहेबांना कळवूं सुद्धां नका. फक्त मीं असे असे ते दागिने काढण्याच्या खटपटींत आहें असा तुमचा तर्क आहे असें लिहिलें तर ल्याहा, अशी रंगोपंताची त्यानें विनवणी केली. तेथें आल्यापासून रंगोपंताच्या आर्जवानें तो इतका राहिला कीं, कांहीं पुसूं नये.

आपल्या नानाप्रकारच्या हेतूंपैकीं एकही खरोखर कोणास कळूं नये म्हणून जितका कांहीं खटाटोप करावयाचा तितका त्यानें केला. चिंतोपंतानें त्यास एका हेतूनें पाठविलें, तें सरूबाईस ठाऊक नाहीं. रंगोपंताला तिसरेंच सांगितलें. रंगोपंताकडून सरूबाईला निराळेंच भासविलें. सीतारामाजवळ एक बोलणें लाविलें. त्याचा मतलताच विपर्यास करून चिंतोपंतास आतां पत्र लिहिणार होता. सारांश, सर्वतोपरी सगळ्या माणसांच्या शेंड्या आपल्या हातीं सांपडून आणि त्यांना जशा तऱ्हेनें वांकवूं तशा तऱ्हेनें वांकविण्यास सांपडावें म्हणून त्यानें प्रयत्न चालविला आणि त्या प्रयत्नांत त्यास बरीच सिद्धिही प्राप्त झाली. सरूबाईजवळ आपण अशी प्रतिज्ञा करून आलों आहों, दुसऱ्या कामाचा उगीच बहाणा आहे असें भासवून, रंगोपंतास त्यानें आपल्या चलनाबद्दल अगदीं निर्देतच ठेविलें. त्याच्या एकंदर व्यवहाराबद्दल तो फारच बारीक चौकशा करीत होता, तो बाहेर गेला असतां पेटयांस किल्ल्या चालवून त्यानें निरनिराळे कागदपत्र काढून वाचून त्यांच्या नकला करून घेतल्या आणि पै न् पै कशी आली कशी गेली, सट्टे कोणते केले, भक्के कोणते घेतले, याचा सर्व बारीक तपास चालविला. त्याच्या मनाची तर अशी पक्की खात्री झाली कीं, रंगोपंत लुच्चा नाहीं, फसतो आहे, त्याला ज्ञान नाहीं. परंतु तसेंच चिंतोपंतास कळविणें हें त्याचें काम नव्हतें, तें त्याला इष्ट नव्हतें. तो लुच्चा आहे, आपलें स्वतःचें घर भरण्यासाठीं तो सगळ्या तऱ्हा करतो आहे, अमक्या भागींत शिरून बुडालों असें म्हणून दोघांनीं मिळून डल्ला मारावयाचा एवढाच त्याचा हेतु दिसतो आहे, तसा पुरावा आहे असें कांहीं तरी लिहून चिंतोपंताचें मन कलुषित करून द्यावें म्हणजे नवराबायकोंत चांगला तंटा लागेल, आणि तो तंटा लागला म्हणजे एक बहारच होणार आहे. असा अनेकविध विचार करून तो आपलें घोडें पुढें ढकलण्याचें संधान पहात होता. कांहीं दिवस रंगोपंतास झोंपेंत ठेवून सगळ्या माहित्या काढून मग एकदम शेवटीं "तुझें सगळें बिंग कळवतों, नाहीं तर तूं मला आपल्या पोटांत घे," असें धमकावून रंगोपंत जर वळला, तर तेंही त्याला इष्ट होतेंच. तें जर साधलें, तर तेंही साधून द्यावें असा त्याचा हेतु होताच. त्याप्रमाणें त्याची सर्व तयारी झाल्यानंतर एके दिवशीं रंगोपंतास त्यानें एकटें गांठलें आणि एकदम तो त्याला म्हणाला: "रंगोपंत, तुम्ही आपल्याला मोठे पक्के समजतां आणखी मला मागल्या थोड्या अनुभवावरून तसं वाटतही होतं, पण एकंदरींत तुम्ही भोळे. माझ्यासारख्यानं तसं जर मनांत आणलं, तर तुम्हांला हां हां म्हणतां चकवील. आणखी या पंधरावीस दिवसांत मीं तुम्हांला चकविलंच ! काय चकविलं, कसं चकविलं, याचा कांहीं तरी तुम्हांला मागमूस ? बोला होता का मागमूस ? आतां तुम्हांला सोळा आणे खड्डयांत घालायचं म्हटलं तर माझ्या अगदीं हातांत आहे. अगदीं हां हां म्हणतां ! याची कांहीं तुम्हांला कल्पना ? "

रंगोपंत खरोखर अगदीं चकित झाला. त्याला त्या बोलण्याचा यत्किंचित्सुद्धां अर्थ कळला नाहीं. तथापि तो काय एकदम दाद देतो ? तो उलट त्यास म्हणाला, " अहो ! असे तुमच्यासारखे

कितीक मीं वाटेस लाविले आहेत. तुम्ही काय मला चकवितां ! ”

“ रंगोपंत, आतां या बोलण्यांत कांहींसुद्धां जीव नाहीं. मला खरोखर तशी इच्छा नाहीं. म्हणूनच मीं आतां तुम्हाला सगळ्या गोष्टी सांगितल्या आणखी तुह्माला जागें करून तुमचा आमचा विचार भिन्न ठेवायचा नाहीं, म्हणून तर मी इतक्या स्पष्टपणानं तुमच्यापाशीं बोलणार आहें. तुम्हाला चकविलें आहे कीं नाहीं, याचा एकच मासला तुम्हाला दाखवितों. बोला मी इथें आलों कां ? आणखी केलं काय ? याचा कांहीं तरी तुम्हांला मागमूस ? बरं, तो असला, आणखी तो जर तुह्मीं स्पष्ट-पणें मला सांगितलात तर मीं आपलं सगळं म्हणणं अगदीं माघारी घेऊन तुमच्या पायांवर डोकं ठेवून जाईन. नाहीं तर तुह्मीं........ ”

“ अहो मला सगळं ठाऊक आहे, ” रंगोपंत खूप आढ्यतेनें म्हणाला: “अगदीं बित्तंबातमी मला आहे. ”

“ बोला काय आहे ती ! मग मी म्हणेन खरं, नुसत्या झोंकाच्या बोलण्यांत बिलकुल तात्पर्य नाहीं. ”

“ अगदीं सगळं कांहीं मला ठाऊक आहे. तुह्माला सांगून काय करायचं आहे ? वेळ आली म्हणजे सांगेन. ”

“ पुनः तुम्हांला सांगतों कीं, तुम्हाला कांहींसुद्धां ठाऊक नाहीं. अगदीं ठाऊक नाहीं. मीं सांगितलं तेवढ्यावर जाऊन तुह्मीं कांहीं तर्क बांधले असतील; कदाचित् माझ्याबद्दल चौकशा ठेविल्या असतील; पण त्यांच्यापासून कांहीं सुद्धां निष्पन्न झालं नसेल. झालं असतं, तर तुम्हीं मला इतक्या विश्वासानं वागविलं नसतं. ज्या तऱ्हेनं रोज बोलत आलां त्या तऱ्हेनं बोलला नसतां... ”

“ तुम्ही आपले खाना मनांत मांडे ! कोण आड येतो आहे ? खुशाल खा—अगदीं रगडून खा. पण तुम्हाला मी अगदीं पुरा ओळखून आहें. किती ओळखून आहें ह्मणतां ? अगदीं पुरतेपणीं तुम्ही जें काम करायला आलों म्हणून इथें आलांत तें काम मुळींच खरं नव्हे, हें ओळखण्याला का कांहीं अक्कल लागते ? जे दागिने आज इतकीं वर्षं झालीं त्या राधाबाईच्या हातांत गेले आहेत, त्यांचा आज इतकीं वर्षं संसार चाळला, ते दागिने परत आणण्याचा बहाणा करून तुम्ही आलां, तो बहाणा खरा हें मला जर खरं वाटलं असतं, तर माझ्यासारखा बेअकली कोणीच नाहीं ! तो तुमचा बहाणा खरा वाटूनच मी आहें, असं तुम्हांला मीं भासविलं यांतच माझी शिताफी पहा. तुम्ही मनांत समजत असाल कीं, तुम्ही मला पालथा पाडाल, पण अगदीं सपशेल तोंडघशीं पडाल, तुमच्या बोलण्यांतलं मला एक अक्षरसुद्धां खरं वाटलं नाहीं, समजलांत ! तुह्मीं त्या पोराच्या गांठी घेतल्या, त्यांच्याशीं तास तास दोन दोन तास हितगुजं केलीं, हें मला सगळं कळलं आहे. आणखी...... कां ? मीं तुह्मांला चकविलं, का तुम्हीं मला चकविलंत ? बोला, आतां कां स्तब्ध ? ”

गुंडोपंत किंचित् चकित झाला खराच ! परंतु त्यानें तो आपला चकितपणा मोठ्यानें हंसून झांकला आणि त्या हंसण्यांतच तो ह्मणतो, “ ओहो, तें माझं बोलणं तुह्मीं अगदीं अक्षरशः खरं मानलंत असं जर मला वाटलं असतं, इतके भोळवट तुह्मी आहांत असं जर मला वाटलं असतं, तर आज हा तुमच्याशीं बोलण्याचा योग आणलाच नसता ! कारण मग मी असं

समजलों असतों कीं, तुम्हाला एखादी गोष्ट सांगूनसुद्धां समजायची नाहीं. मुळींच नाहीं. इतके भोळसर नाहीं हो तुम्हांला मी समजत. बाकी तें काम ह्मणजे मी करीत नाहीं किंवा मला त्यांत यश येण्याची आशा नाहीं असं मुळींच नाहीं. पण मुख्य काम तें नव्हे हें अगदीं उघड आहे. मी मुख्य काय काम करायला आलों. तें जर सांगाल, तर मग मात्र तुह्मी मला चकविलं, मीं तुह्मांला चकविलं नाहीं, असं समजेन. बोला, ही आतां परीक्षेचीच वेळ आहे. "

" अहो जाहो ! माझी कसली परीक्षा तुह्मी करतां ! मी अशी तुमची सतरादां परीक्षा करीन, जा, तुह्मीं मला चकविलंत असंच समजत रहा. मी तरी तुमचं भुरळ कशाला घालचूं ? " असें ऐटीचें उत्तर रंगोपंतांनीं फेंकून दिलें आणि आढ्यतेनें ते हंसले.

" नव्हे बरं, रंगोपंत, या उत्तरांनीं तुम्हांला कांहीं फायदा व्हायचा नाहीं, जर तुह्मी नीट सलोख्यानं बोलाल तर दोघांचाही फार फायदा होईल. पहा. मी फार बोलत नाहीं. तुमच्या कानांत एक गोष्ट सांगतों. जरा कान इकडे करा. तें ऐकलंत म्हणजे मग याल तुम्ही भानावर. सांगूं ? अगदीं अशी खुणेची गोष्ट सांगतों कीं ती तुम्हांला पटेलच. "

"नको. नको. बिलकुल सांगायला नको. मुळींसुद्धां नको. म्हणे खुणेची गोष्ट सांगतों. आपल्याचपाशीं ठेवा. नाहीं तर मोठ्यानं अगदीं अगदीं दौंडी पिटवून सांगा, कानाचिनांत नको. "

" ठीक आहे. पण महाराज, आपण आज चार दिवस अहोरात्र ज्या काळ-जींत आहांत, ती काळजी कसली, आणखी काय घोरपड आपल्या गळ्यांत आली आहे, तें जर सांगितलं तर ! "

गुंडोपंताचें हें बोलणें चाललें असतां रंगोपंत एकदम चपापला. त्याच्या चेह-ऱ्यावरील आढ्यता व उर्मटपणा बराच मावळला. आणि एकदम " अं ? अं ? तुम्हाला काय माहीत ? " असे शब्द अचानक उच्चारले गेले. पण तितक्यांत तो सांवरला आणि म्हणतो, " तुम्हांला काय माहीत, असं विचारलं तें केवळ तुम्हांला चकविण्यासाठीं हो ! खरोखरी तुम्ही विचारलंत त्याला मुळींसुद्धां कांहीं आधार नाहीं. आपलं कांहीं तरी बोलून तुम्ही मला आतां धरायला पहातां होय ? गुंडोपंत, मी अगदीं पक्का आहे. फसायचा नाहीं, समजलांत ? "

तें ऐकून गुंडोपंत अगदीं पोट धर-धरून हंसला, आणि म्हणतो, " हो हो ! अगदीं पक्के समजलों. तुमचा चेहराच तें सांगतो आहे. आणखी पहिल्या त्या उद्गारांनीं तर फारच उत्कृष्ट सांगितलं. रंगोपंत, या वेळीं त्या संकटांतून वांचवा-यला तुम्हाला माझा जितका उपयोग होईल तितका कोणाचा व्हायचा नाहीं. मी असा कितीक वेळां कितीकांच्या उपयोगी पडलों आहे. मला त्या तुमच्या हल्लींच्या संकटाचीच काय, पण आणखी किती गोष्टींची तरी झाडून माहिती आहे ! आणखी मी मदत करायला तयार आहे, मग कां उगीच मला दूर सारतां ? "

असें ह्मणून तो अगदीं जवळ गेला आणि हलकेच त्याच्या कानांत त्यानें त्यास आणखी कांहीं सांगितलें. तो कानांत कांहीं सांगण्यास येतो आहे असें पाहतांच त्यास झिटकारावें असें रंगोपंताच्या मनांत किती तरी आलें, परंतु हातून तसें झालें नाहीं. त्याच्या मनांत नसतां त्याला तें

ऐकावेंसें वाटलें; आणि ऐकिल्याबरोबर त्याचा चेहरा अगदीं खर्रकन् उतरला, व तो एकदम जागचा उठून गुंडोपंताच्या अंगावर येऊन म्हणतो, " एकूण तुझी इथें माझ्यामागें डिटेक्टिव्ह म्हणून आलां होतां वाटतं ? पण तुमच्या तावडींत मी सांपडायचा नाहीं, समजलांत ? माझं मला सगळं कांहीं समजतं आहे, तुमची मदत मला नको. अशी विश्वास-घात करण्याची डिटेक्टिव्हगिरी कधींपासून पत्करलीत ? "

" यजमानांनीं करायला सांगितल्या दिवसापासून ! " गुंडोपंतानें अतिशय शांतपणें, अगदीं हास्यवदन करून उत्तर दिलें. आणि आपले ते तीक्ष्ण डोळे अगदीं नीटपणें रंगोपंताच्या चेहऱ्याकडे लाविले. जणूं काय त्याच्या मनांत चाल-लेले सर्व विचार एकसारखे त्या आपल्या डोळ्यांनीं तो शोषूनच घेत आहे ! संता-पलेल्या मनुष्याला तो ज्याच्यावर संतापला असेल त्यानें अगदीं शांतपणें आणि हंसून असें उत्तर दिलें, ह्मणजे त्याचा संताप कसा दुणावतो याचा अनुभव आपणांस वारंवार येतो. रंगोपंताला या वेळीं एक तर आपली कोणास कळं नये अशी गोष्ट याला कळली. बाकी कोणासही कळती तरी हरकत नव्हती, याबद्दल अतोनात खेद वाटला, आणि त्याच्या शांतपणाच्या असल्या उत्तरानें अतोनात संताप आला.

" काय ? यजमानांनीं करायला सांगि-तली ? अगदीं अगदीं खोटं. माझ्याबद्दल चिंतोपंत अगदीं कधीं सुद्धां असं कोणाला सांगणार नाहीं. आणखी त्यांतून तुम्हांला तर मुळींच सांगणार नाहीं. त्यांचा माझ्यावर अगदीं अगदीं पुरा पुरा विश्वास आहे. "

" रंगोपंत, " गुंडोपंत अधिकच शांतपणें उत्तर करतो: " कितीक गोष्टी आपल्याला 'अशा आहेत, तशा आहेत ' असं वाटत असतं, परंतु प्रत्येक गोष्ट जशी असते असं वाटतं, तशीच ती असते असं नाहीं. हा अनुभव तुम्हांला नाहीं का ? तुम्हांला पुष्कळ वाटत होतं, कीं मी दुसऱ्याच कांहीं तरी कामाला आलों होतों. पण आतां तुम्हाला समजलं कीं नाहीं मी काय काम करीत होतों तें ? असंच दुसऱ्याही पुष्कळ समजांचं असेल ! "

" बस् बस् ! पुरे तुमचं ब्रह्मज्ञान ! मी तें पुरं जाणून आहें, पण तुह्मीं जरा फाजील लवकर आपल्या अंगावरचं पांघरूण काढलंत. समजलांत ? "

" असं का वाटतं तुह्मांला ? तुमच्या आमच्या वाटण्यांतच काय तो फेर राहिला तर मग ! माझी समजूत अशी आहे, कीं मीं अगदीं वेळेवर तें काढलं. मी आणखी कांहीं गोष्टी तुह्मांला सांगतों, ह्मणजे तुमचं भुरळ जाईल. "

रंगोपंतास नको म्हणून त्यास झाडून टाकण्याची इच्छा होईना. तो अतिशय खिन्न व रुष्ट चेहरा करून गुंडोपंताकडे पहात बसला. गुंडोपंतानें लागलीच आपलें पुराण सुरू केलें. एक एक गोष्ट अशी मेजकी सांगे, कीं रंगोपंत दचकल्या-प्रमाणें करी. नंतर आपण असें दचकल्या-प्रमाणें दाखवितां कामा नये असें त्याच्या मनांत येऊनच काय, तो पुनः अगदीं बेपरवा बसल्याप्रमाणें बसे. शेवटीं जेव्हां अशा कांहीं गोष्टी आल्या, कीं आपलें सर्व इंगित या चांडाळास पुरतेंपणीं ठाऊक आहे असें त्यास पक्कें वाटलें, तेव्हां एक दीर्घसा उसासा टाकून तो स्वस्थ पडला; मात्र अखेरीस तो गुंडोपंताचे

अंगावर उसळून जाऊन म्हणाला: " पुरे. पुरे. तुम्ही इतके कृतघ्न, इतके विश्वासघातकी, इतके चांडाळ आहांत, असं मला आतांपर्यंत ठाऊक नव्हतं. तें आतां समजलं. जा. तुम्हांला काय करायचं असेल तें तुम्ही खुशाल करा. इतकं सगळं तुम्हाला जरी कळलं असलं, तरी मी तुम्हांला मुळींसुद्धां भीत नाहीं. तुमच्या यजमानानं या बातम्या काढण्यास तुम्हांला पाठविलंना ! आधीं आतां रिपोर्ट करा कसा जा ! क्षणाचा सुद्धां उशीर लावूं नका. उठा, मी धावरून जाऊन तुमच्या मुठींत सांपडावा, आणखी मग तुम्ही प्रत्येक खेपेला ' असं कर. नाहीं तर टाकतों तुला मुठींत दाबून ! ' असं म्हणून मला पाहिजे तसं वळवावं, हीच कीं नाहीं तुमची इच्छा? ती इच्छा माझ्याकडून कांहीं कधीं सुद्धां तृप्त व्हायची नाहीं. जा ! "

परंतु रंगोपंताचें हें सांगणें अगदीं वृथा झालें. नाहीं म्हणतां म्हणतां त्यानें गुंडोपंताची ती इच्छा तृप्त केली, कशी, ती पुढें दिसेलच.

# प्रकरण ४७ वें.

## एक दोन जुने स्नेही.

वाचकांचे फार दिवसांचे व त्याचप्रमाणें बुलिस्नीकसाहेबांचेही फार दिवसांचे स्नेही मि० ब्लॅकमेल स्कार्प्यँ—जे एक वेळां वाइल्डसाहेबांचे स्नेही म्हणून आपण पाहिले होते, ते चार दिवस बुलिस्नीकसाहेबांचे घरीं पाहुणचार घेण्यासाठीं आले होते. सुमारें एक महिनाच झाला होता. त्यांनीं आपल्या ' छणछणाबाद डेली क्रॉनिकल ' मध्यें बुलिस्नीकसाहेबांचा अतोनात स्तुतिपाठ गायिला होता. इतका कीं, बुलिस्नीकसाहेबांस, त्यांना एकवार आपलेकडे येऊन भेटावें आणि चार दिवस रहावें अशी विनंति करण्याची उत्कट इच्छा होऊन त्यांनीं आमंत्रण दिलें. मि० ब्लॅकमेल स्कार्प्यँ यांनीं तें फार कष्टानें (?) स्वीकारलें. स्कार्प्यँसाहेबांचे दर वर्षांतले कांहीं महिने आपल्या मोठमोठाल्या ऑफिसर स्नेह्यांच्या घरीं पाहुणचार घेण्यांत जात असत; आणि त्यांना पत्र चालविण्याचे जे विलक्षण श्रम पडत, त्या श्रमाच्या परिहारार्थ असा पाहुणचारांचा उपभोग फार उपयोगी पडत असे, हें सांगणें नकोच. दुसरीकडे कोठें गेलें तर त्यांना संस्थानांतून जाण्यांत ज्या प्रकारचें सुख होत असे तसें सुख कोठेंच होत नसावें आणि यामुळेंच वारंवार स्वारी खूपखाबादेसारख्या संस्थानांतून

जात असे. हीं संस्थानें चांगल्या प्रकारानें चालावीं ही त्यांची इच्छा आणि ती आपली इच्छा तृप्त करण्यासाठीं ते नानाप्रकारचे उपाय योजीत. एखादे वेळेस एखाद्या संस्थानिकास अंजन पाहिजे आहे, त्याखेरीज संस्थान नीट चालावयाचें नाहीं असें त्यांनीं पाहिलें किंवा त्यांचे मनांत आलें, कीं स्वारींनीं एखाद्दुसरा चरचरीत प्यारिग्राफ लिहून प्रसिद्ध केलाच म्हणून समजावें; आणि तो प्यारिग्राफ त्या संस्थानिकाच्या नजरेस आला म्हणजे आपल्या संस्थानची व्यवस्था खरोखर किती उत्तम आहे हें प्रत्यक्ष पाहून जाण्यासाठीं स्काप्यॅसाहेबांस आमंत्रण जावयाचेंच. आतां आमंत्रण कोणाचें स्वीकारावें आणि कोणाचें न स्वीकारावें, याबद्दल योग्य विचार करूनच स्काप्यॅसाहेब स्वीकार किंवा अस्वीकार करीत. संस्थानांत येऊन वस्तुस्थिति पाहण्याचें त्यांस सर्दासर्वदा जुळेच असें नाहीं, परंतु साहेबांकडे संस्थानिकाचा कोणी तरी चांगला मुत्सद्दी जाऊन त्यानें चांगली योग्य समजूत घातली, म्हणजे मूळचा जो प्यारिग्राफ छापला असेल, त्याच्यामुळें होणाऱ्या गैरसमजुती दूर होण्याजोगें विरुद्ध पत्र छापण्याइतकी भलाई केली जात असे. मात्र साहेबांची पक्की समजूत झाली पाहिजे. नुसतें विरुद्ध बाजू दाखविणारें पत्र छापून दिल्यानें ज्यांना समाधान होत नाहीं, त्यांना समाधान देणें म्हणजे स्काप्यॅसाहेबांनीं आणखी एक प्यारिग्राफ लिहून त्या विरुद्ध बाजूकडे आपल्या वाचकांचें लक्ष्य ओढून शेवटीं, " अशी स्थिति खरोखर असेल, आम्हीं प्रथम लिहिली तशी नसेल, तर खरोखर कोणालाही समाधान होणार आहे, " असें एक वाक्य लिहावयाचें. परंतु स्काप्यॅसाहेबांचे हातून असें वाक्य निर्माण करण्याला त्यांची समजूत लेचीपेची पडतां कामा नये, चांगली छणछणीत पडली पाहिजे असे. छणछणावाद डेली क्रॉनिकल म्हणजे फारच वजनदार पत्र होतें. त्याच्यासारखें वजनदार पत्र हिंदुस्थानांत नाहीं म्हटलें तरी चालणार आहे. निदान स्काप्यॅसाहेब आपल्या पत्राच्या जाहिरातींत असें लिहीत. सर्व खात्यांतले उत्तम लोक त्या पत्राचे लेखक व माहिती देणारे असत अशी सर्वत्र समजूत असे. कोणत्याही संबंधांत कांहीं वादविवाद निघाल्यास सरकारला जी बाजू इष्ट असेल किंवा ज्या बाजूनें जाण्याचा सरकारचा कल असेल, त्या बाजूचें यथेष्ट समर्थन केलें जाणारें तें पत्र असल्यामुळें त्याचें सर्व ऑफिसांत फार वजन असे हें सांगणें नकोच.

खुरखाबादेसंबंधानें कांहीं गैरसमज आजमितीस उत्पन्न झाला होता. थोडे दिवसांपूर्वींपासून कलकत्त्याच्या एका नेटिव्ह पत्रांतून संस्थानांवर, संस्थानिकांवर आणि मि. फिलपर्स बुलिस्नीकसाहेबांवर हल्ले चालले होते. हे हल्ले बुलिस्नीकसाहेबांनीं कधींच मनावर घेतले नाहींत. कारण त्यांना या असल्या मुरकुटाच्या दंशानें काय होणार ? परंतु संस्थानिकांनीं तें पहातांच त्यांची अगदीं घाबरगुंडी होऊन जाई व ते लागलीच बुलिस्नीकसाहेबांकडे धांव घेत. बुलिस्नीकसाहेब लागलीच त्यांस आश्वासन देत; धीर देत कीं, असें घाबरूं नका. नेटिव्ह चिंध्यांत कांहीं भरी आलें, तरी त्याची कधीं कोणी दाद घेत नाहीं. इंग्रजी वर्तमानपत्रांत कांहीं न येण्याची, निदान कांहीं आलें तरी त्याचें त्वरित निराकरण करण्याची खबरदारी ठेविली म्हणजे झालें. मुरकुटाच्यांनीं जर बैलासारखे प्राणी त्रासूं लागले तर मग त्यांत

राहिलें काय ? खूपखाबादेच्या नबाबानें " आपल्या संस्थानाविरुद्ध मजकूर कलकत्त्याच्या एका वर्तमानपत्रांत येतो तेव्हां त्याचा बातमीदार कोणी तरी आपल्या संस्थानचा किंवा ज्याला या बाबतींतली माहिती कळण्याचा सहज संभव आहे असा असला पाहिजे " असें सुचविलें. तरी साहेबांनीं तिकडे लक्ष्य दिलें नाहीं आणि तुम्ही देऊं नका असें नबाबास सांगितलें. त्या नटिव्ह पत्रांत संस्थानिकांपेक्षां बुलिस्नीकसाहेबांवरच अधिक ताशेरा झाडलेला होता व त्या वर्तमानपत्राचीच आणखी कांहीं वर्तमानपत्रांनीं री ओढली असल्यामुळें सालअखेरीच्या रिपोर्टाच्या प्रतीच्या स्वीकाराच्या प्रसंगाचा फायदा घेऊन मि. ब्लॅकमेल स्कॉर्प्यें यांनीं आपले परम मित्र मिस्टर फिल्पर्म बुलिस्नीक यांची खूप तरफदारी करून एक लांबलचक लेख लिहिला. या रिपोर्टाचे वेळीं अर्थातच पुष्कळ संस्थानिकांसही शाबासकी अगर गैरशाबासकी देण्याला प्रसंग असतो; तेव्हां रिपोर्ट बाहेर पडण्याच्या संधीस मि. स्कॉर्प्यें यांचेकडे कित्येक संस्थानिकांचे एजंट आपले संस्थानांत पोलिटिकल एजंटांनीं किती सुधारणा केल्या व त्यांचे आपण किती आभारी आहों आणि आपापल्या महाराजांनीं, नबाबसाहेबांनीं, राजेसाहेबांनीं अगर चीफसाहेबांनीं एकंदर सालांत राजनिष्ठेनें राहून प्रजाकल्याण कसें साधलें हें समजावून देण्यास जात असत. ते दिवस स्कॉर्प्येंसाहेबांस फार फार धांदलीचे असल्यामुळें त्यांना कामही फार पडत असे, आणि ते दिवस गेले, एकदां तो सालअखेरीचा लेख लिहून झाला, ह्मणजे स्वारीला चार दिवस विश्रांति घेणें अगदीं जरूर पडे. ती विश्रांति अर्थातच कोठें तरी पाहुणचार घेण्यास गेल्यानेंच मिळणार. एखाद्या संस्थानांत रहात असणाऱ्या आपल्या मित्राच्या घरीं जसे पाहुणचार मिळतील तसे दुसऱ्या कोठें मिळणार ? बुलिस्नीकसाहेब त्यांचे फार मोठे स्नेही आणि त्यांचे घरचा पाहुणचार घेण्यांत त्यांस फार आनंद होत असे. कारण ते संस्थानांत असल्यामुळें कोणत्याही गोष्टीची कधीं वाण म्हणून वाटण्याचा संभवच नसावयाचा. स्वतः बडेसाहेबांस त्यांची जरूरी आहे असें कळतांच त्यास हजारों कोसांवरूनसुद्धां संस्थानिकांनीं आणून हजर केलें जावयाचें. स्कॉर्प्येंसाहेब खूपखाबादेस बुलिस्नीकसाहेबांच्या घरीं पाहुणे आले आहेत, अशी बातमी कळतांच त्या पंचवीस कोसांत असणाऱ्या सगळ्या लहानमोठ्या संस्थानिकांत नुसती धांदल उडून गेली. छणछणाबाद डेली कॉनिकलच्या प्रख्यात एडिटरांची अल्प तरी सेवा आपल्याकडून झाल्यास आपलें हित होईल, असें ज्याला त्याला वाटूं लागून नजरनजराणे तर कितीक गेले. खूपखाबादेच्या नबाबसाहेबांनीं तर एका संबंद माणसास स्कॉर्प्येंसाहेबांच्या तैनातीस दिलें व त्याला अगदीं पूर्ण अधिकार कीं, साहेबांस लागेल तो जिन्नस वाटेल तेथून पाहिजे त्या मार्गानें मिळवून पावता करावा आणि खर्च काय लागेल याचा मुळींच विचार करूं नये. तिजोरीवर वरात गेली, कीं पैसा मिळण्याबद्दल बटहुकूम दिला आहे. स्कॉर्प्येंसाहेब स्नीकसाहेबांचे पाहुणे नव्हेत, संस्थानचे पाहुणे आहेत असें समजावें. आणि ही संस्थानच्या पाहुण्यांची सरबराई करण्याचें काम कोणाकडे होतें ? अशा प्रसंगीं कोणाकडे असणार ? वाचकांनीं ओळखलें नसेल असें थोडेंच आहे. त्यांचे परम मित्र चिंतोपंतदादा यांसच त्या जबाबदारीच्या

कामावर नेमिले होते. बुलिस्नीकसाहेबांशीं ज्यांचें फार रहस्य अशा मुत्सद्दी पुरुषाखेरीज आणखी कोणाची नेमणूक होणार? चिंतोपंतदादा तर ह्या कामगिरीनें इतके आनंदले कीं, आपण डोक्यावर चालतों आहोंत कीं नेहमींप्रमाणें पायांवरच आहों याचें त्यांना मुळींच भान नाहींसें झालें. स्कार्प्यँसाहेबांशीं आतां आपली मैत्री जुळणार आणि अशी मैत्री झाली म्हणजे मग वाटेल तशी आपली शिफारस होणार आणि अतोनात वजनदार अशा इंग्रजी डेली वर्तमानपत्रांत आपली शिफारस आली व वेळोवेळीं आपल्या बढतीला हातभार लागला म्हणजे मग आपली बढती किती लवकर होणार, या आशामय कल्पनांनीं उत्साहित झालेल्या चिंतोपंतदादांनीं आपलें काम किती मेहनतीनें, काळजीनें व मनःपूर्वक केलें असेल याची कांहीं कल्पना कोणास करतां येणार आहे? कोणी कितीही कल्पना केली, तरी ती अपुरीच पडणार! खुद्द खावादिंद्दन स्नीकसाहेबांच्या बंगल्यावर हेलपाटे घालतां घालतां बिचाऱ्याच्या अंगाचा अगदीं टांकानूटांका ढिला झाला. त्याचप्रमाणें मिसेस स्नीकसाहेबांचे हुकूम तर असे सुटावयाला लागले कीं कांहीं शिकस्त! ते हुकूम बजावतां बजावतां अगदी बिचाऱ्याची त्रेधा उडाली. स्कार्प्यँसाहेबांस शिकारीचा नाद असे आणि एक वेळां शिकारीला जावें असें त्यांच्या मनांत आहे असें, " तुमच्या या संस्थानांत चुगल टेंकडीपलीकडे पहाडांत चांगली शिकार आहेना? " अशा केलेल्या प्रश्नावरून 'ता म्हणतां ताकभात' या न्यायानें जाणून चिंतोपंत नबाबसाहेबांच्या कानावर ही गोष्ट घालावयाला धांवतच गेला! हल्लीं अशी स्थिति झाली होती, कीं मध्यरात्रीं नबाबसाहेब आपल्या जनानखान्याच्या अंतस्थ पडद्यांत जरी असले, तरी " चिंतोपंतदादा मुलाखतके वास्ते आये है " असा त्यांचा एक वेळ निरोप आला कीं झालें, स्वारी बाहेर आलीच. तेव्हां स्कार्प्यँसाहेबांच्या शिकारीच्या इच्छेची वर्दी पोंचतांच दुसरे दिवशीं सर्व तयारी करून नबाबसाहेब स्वतः आमंत्रण देण्यास आले. मग काय विचारतां? चिंतोपंताची ते दिवशीं खरोखरीच फार वाखाणणी झाली. शिकारीची व्यवस्थाही फार उत्तम होती. स्कार्प्यँसाहेबांनीं दोन काळवीट व एक डुकर मारल्याचें श्रेय घेतलें; त्यांनीं नबाबसाहेबांची स्तुति केली व नबाबसाहेबांनीं त्यांची स्तुति केली. बुलिस्नीकसाहेबांनीं सर्वांची स्तुति केली आणि सर्वांनीं बुलिस्नीकसाहेबांची स्तुति केली. असा प्रकार होऊन मंडळी परत बंगल्यावर आली. पाहुणचाराचे पहिले दहा बारा दिवस हे असे गेले; आणि मग उरलेले पांच सहा दिवस मात्र कसे घालवावेत याबद्दल साहेबबहादुरांस काळजी वाटूं लागली. परंतु बुलिस्नीकसाहेबांनीं ती काळजी लवकरच निवारण केली.

" आय् से ब्लॅकमेड, आतां या मेजवान्यांचा आणखी शिकारींचा तुला कंटाळा आला असेलना! आतां मी तुला कांहीं मौजपालट करणार आहें. मनुष्यस्वभावाच्या मौजा पहाण्यांत तर तूं अगदीं दंग असतोस, पण त्यांतला तूं एक मासला एका तऱ्हेनें पाहिलास, आतां दुसरा पहा. दुसरा हा पाहिलास म्हणजे तुला अगदीं खूपच मौज वाटेल."

" काय, काय ती मौज, फिल्पर्स? मला या मेजवान्यांचा आणखी खा-

त्यांचा खरोखरीच कंटाळा आला आहे. तो तुझा नबाब, त्याचा हेतु फार चांगला आहे. पण अगदीं मोठा कंटाळवाणा आहे बोआ. A very great bore indeed! And your Chintopant is an ass. मी आपला चार दिवस तुझ्या इथें अगदीं स्वस्थपणानें राहून खरी खरी विश्रांति घ्यायला आलों, तर हा त्रास कोणी सोसावा! भला कल्पनासुद्धां नाहीं बोआ या असल्या त्रासाची! असती तर मी आलोंच नसतों!"

बुलिस्नीकसाहेब डोळे मिचकावीत व लबाडीचें स्मित करून ह्मणतात. "हो, हो, तें माझ्या लक्ष्यांत आलं आहे. गेल्या आठवड्यांत जसा त्रास झाला तसा रोज रोज होईल तर तूं त्याच्याकरितां काय देणार नाहींस? पण तें जाऊं दे. तूं ज्याला आतां गद्धा ह्मणालास, तो नुसता गद्धाच आहे, कीं आणखी कांहीं आहे याची कुठें तुला कल्पना आहे? आय् से, असे गद्धे जर ठिकठिकाणीं नसते तर सगळ्या हिंदुस्थानचा नकाशा तांबड्या रंगांत छापायला आज मिळाला असता कसा? माझा उजवा हात तर आज तो आहे. तूं लवकरच संधि घेऊन त्याची पाठ थोपट. He is really an ass. अगदीं सगळ्या दृष्टीनें तो तसा आहे. त्यानें तुझ्यासाठीं आज दहाबारा दिवस अगदीं गद्ध्याप्रमाणें मेहनत केली का नाहीं? इतक्या मेहनतीला एकदां तरी त्याला "वो ऽ वो ऽ वो ऽ ऽ" करून पाठीवर थापटी मारून खुष कर. पहा तर खरं बरं तो कसा मजेंत येऊन बोलतो तो! आतांपर्यंत त्याचंन् तुझं तसं बोलणंच झालं नाहीं. आतां आला ह्मणजे बघ मौज. माझा पोरगा तर त्याची अशी मौज करतो कीं बा:!"

हें बोलणें चाललें असावयाला आणखी चिंतोपंत बाहेर यायला एकच गांठ पडली. त्याची आतां कशी काय मौज करावयाची तें सर्व यांनीं दोघांनीं ठरविलें. मिसेस् स्नीक तेथें होत्याच. कशी मौज करावयाची तें ठरविल्यानंतर चिंतोपंतदादांस आंत येण्यास परवानगी मिळाली. चिंतोपंत नित्याप्रमाणें अतिशय थाटानें नटलेला असा येऊन, अगदीं लवून सर्वांना मुजरा करून हंसत हंसत सर्वांच्याकडे पाहूं लागला. त्याबरोबर किंचित् गंभीर असा चेहरा करून स्नीकसाहेब त्यास म्हणतात, "वेल् छिंटोफांट, आमचे स्नेही तर अगदीं तुमच्या व्यवस्थेवर नाखुश झाले आहेत..."

"Why Sir? Any thing fell less. Sir? Sir, order, Sir, at once went to execute him, Sir, me carelessness not like, Sir, you never found carelessness in your humble servant, Sir, you give order just now, Sir, I execute him Sir just now. Nababsaheb strictly told, Sir, not to give fall anything less. What my goes Sir? Does anything go? Sir, me Sir."

"हो. हो. सर सर करून काय फायदा? तूं साहेबांची क्षमा माग आधीं! execute him कोणाला म्हणतोस? "Sir, your order, Sir, I execute."

"O! बरं छिंटोफांट, तूं यांची सरबराई तर उत्तम ठेवलीस अशी मी यांची खात्री करून देईन. पण ते म्हणतात, तुला आपण आपल्या हापिसांत घेऊन जाणार वर्तमानपत्र चालवायला पुष्कळ पगार देऊन. तुझी हरकत कांहीं

आहे ? ते म्हणतात आपल्याला हा माणूस पाहिजे. ”

“ नो, सर; तुम्ही आमची उगीच थट्टा करतां, सर. मी कशाला पाहिजे त्यांना ? मी काय तिथें जाऊन करणार ? आमच्या बाबूसाहेबांना घेऊन जा. ते नेहमीं वर्तमानपत्राला लिहित असतात, आणखी त्यांना इंग्रजीची घमेंड पण तशीच आहे ! ”

“ काय ह्मणतोस ? ” बुलिस्नीकसाहेब एकदम त्यास ह्मणतात. “ बाबू वर्तमानपत्राला लिहित असतो ? आणखी इतके दिवस तूं माझ्याजवळ बोलला नाहींस ? ”

“ मला खात्रीनं कळल्याला आठच दिवस झाले. आणखी या आठ दिवसांत फुरसत तरी कुठं झाली ? ”

“ तो लिहीत असतो हें कशावरून ? तुला काय ठाऊक ? बोल. बोल. ”

“ मला लागली बातमी. आज दोन वर्षं त्यांचा क्रम चालला आहे. तो नसता लिहीत, तर मग बारीक सारीक गोष्टी बाहेर जातात कशा ? तोच लिहितो. गेल्या महिन्यांत जे आपल्यावर बंगाली पत्रांतून लेख आले ते कुठून येतात ? ”

“ No, No, It can't be ! ! बाबू कधीं लिहिणार नाहीं. त्याला इतकी अक्कलच नाहीं. तो कोणी तरी तुमच्या दरबारचा माणूस आहे आणखी त्याच्याजवळ तूं गाढवासारखा बोलत असशील.”

“ नाहीं साहेब, माझ्या तोंडून एक गोष्टसुद्धां कधीं बाहेर फुटत नाहीं. अगदीं खचित् सांगतों. मी अगदीं गरीब माणूस साधाभोळा वेडगळ दिसतों खरा, पण कधीं भलत्यासलत्या गोष्टी, आणखी त्या महत्त्वाच्या, घरीं बायकोजवळसुद्धां बोलत नाहीं, तर दुसऱ्या कोणाजवळ बोलतों काय ? काय साहेब, मी इतके दिवस आपल्याजवळ असून आणखी आपण असें ह्मणतां ! ”

“पण मग बाबू तरी लिहितो हें तरी खरं कशावरून ? ”

“ मी त्याबद्दल पुरावा करीन वाटेल तेव्हां. पण माझं नांव नका अं सांगूं त्यांना कधीं त्यांना विचारलंत तर ! ”

“ मी तर त्यांना आतां बोलावून आणून विचारणार आहें. अगदीं तुझ्या समक्ष. त्याच्या देखत आण काय तो पुरावा. ”

“ छे. छे. तसा कसा येतो पुरावा ? अन् असं तोंडावर विचारून काय उपयोग होणार ? त्याला विचारलं, तर तो कबूल होतो का ? मुळींच व्हायचा नाहीं. पुरावा पाहिजे तर माझ्याकडे लागला, मी आणून देतों. मग आपण काय तें करा. ”

“ बरं तुला असा पडद्याच्या आड बसवून ठेवला आणखी त्याला विचारलं अन् तो ह्मणाला, आणखी तुला त्याच्या पुढं आणला, तर कसं होईल ? ”

“ काय व्हायचं आहे ? पण साहेब तो कबूल कसं करणार ? कोणी आपला गुन्हा कबूल करतो काय नाइलाज झाल्याखेरीज ? पण साहेब, लिहितो तोच अगदीं खचित. ”

इतकें बोलणें होतें आहे, तों स्नीकसाहेबांचें टपाल आलें. त्यांत स्कार्प्यँसाहेबांचीं पत्रें व वर्तमानपत्रें होतीं. टपाल पहातांच साहेबांनीं, “ बरं जा आतां, बाहेर जाऊन बस, मी हाक मारीन तेव्हां ये. ” असें म्हटलें.

# प्रकरण ४८ वें.

## दोन माणसांना जवळ आणलें!

चिंतोपंतास बाहेर रवाना केल्यानंतर स्नीकसाहेब आणि स्कार्प्यँसाहेब जे पोट धरधरून खोखो खोखो हंसूं लागले तें कांहीं विचारूंच नका. त्यांचें हंसणें त्यांस आंवरेचना. मध्येंच बुलीस्नीकसाहेब एकदम स्कार्प्यँसाहेबांकडे वळून म्हणतात, "ही एक व्यक्ति पाहिलीत ? हिंदुस्थानच्या नकाशाला तांबडा रंग लावायला हे असले कुंचले वेळोवेळीं निघाले, म्हणूनच तसा रंग लागला. हा माणूस असा आहे, कीं माझी खुशामत करण्याकरितां काय वाटेल तें करील. गोरा अधिकारी ह्मणजे याचा अगदीं बाप. त्यानं हुकूम करण्याचा अवकाश कीं कोणची वाटेल ती गोष्ट झालीच. खूपखाबाद खालसा करण्याला कारण काढायला मला कांहीं तरी प्रयत्न पडायचे आहेत का ? मुळींच नाहीं. हा एक दोन दिवसांनीं एकदां येऊन तिकडे राजधानींत, दरबारांत, आणखी जनान्यांत जें काय घडेल त्याचें सगळें पाढे वाचीत असतो. आज सकाळीं सहा वाजल्यापासून उद्यां सकाळीं सहा वाजेपर्यंत खूपखाबादेंत जें कांहीं घडेल तें महत्वाचं असलं तर घडल्या वेळेपासून अर्ध्या पाऊण तासाच्या आंतसुद्धां केव्हां केव्हां मला कळतं. असे जर लोक दर संस्थानांत आह्मी पैदा केले नाहींत, तर चालणार कसं ? आमच्या चांगल्या नशिबामुळं आम्हांला असल्या लोकांची मुळींच वाण पडत नाहीं. चार सहा महिन्यांनीं यांच्या तोंडावर एक शाबासकीचा, नाहीं-तर बढतीचा तुकडा टाकला, किंवा कांहीं किताबत दिली कीं, झाली यांची तब्यत खूष ! मग यांची नौकरी पाहून घ्यावी."

"फिलपर्स, मला असले हे लोक नव्यानं का दाखवतोस ? तूं चार दिवस माझ्या हापिसांत बसून माझं काम कर, ह्मणजे तुला असे किती किती लोक सांपडतील ! कोणी नेटिव माझ्याकडे आला आहे आणखी दुसऱ्या कोणा तरी मोठ्या माणसाची निंदा केल्याखेरीज राहिला असं कधीं दिसलं नाहीं. असे हे लोक पाहिले म्हणजे मला तर आश्चर्य वाटत नाहीं. आणखी तुझ्या माझ्यांत प्रामाणिकपणानंच बोलायचं, तर अशा लोकांखेरीज तुझं माझं चालायचं कसं ?"

दोघेही जरा थांबले. पुढें बुलिस्नीकसाहेब आपल्या स्नेह्यास म्हणतात, "कां, असं इंग्रजी येत असल्यावर तुमच्या पत्राचा चार्ज यांच्या हवालीं करण्याला कांहीं हरकत आहे ? बोला त्याला मी कितीकदां सांगितलं कीं, तुला इंग्रजी येत नाहीं तर तूं हिंदुस्थानींत बोल; मराठींत बोल म्हणूनही मी त्याला कितीदां सांगितलं पण तो कुठला ऐकायला ? तो इंग्रजींतच बोलायचा. त्याच्या बोलण्याची प्रथम

प्रथम मला आणखी फ्यानीला मोठी गंमत वाटली, पण रोज रोज तेंच तेंच झाल्यावर कंटाळा येतो. असे आपल्या-सारखे कोणी पाहुणे आले कीं त्यांना गमतीनं बोलावून आणून मौज करतों झालं. बाकी या असल्या लोकांचा मना-पासून तिट्कारा येणार नाहीं तर काय होईल ? या निरनिराळ्या संस्थानांतून इतके लोक कारणाकारणानं किंवा कार-णावांचून माझ्याकडे येतात, कीं मला बहुतकरून सगळ्यांची आतां चांगली माहिती झाली आहे. पण तितक्यांत खरोखर सरळ, प्रामाणिक, केवळ संस्था-नाच्या हितासाठीं ह्मणूनच बोलायला आलेला, असा फार विरळा किंबहुना मला तर एकच आढळला. जो येतो, तो आपलं घोडं पुढं ढकलून साध-ल्यास बढती अगर मुबलक पैसा हातीं येईल अशी जागा मिळविण्याच्या हेतूनं येत असतो. जो येतो तो आपल्याखेरीज दुसऱ्या सगळ्यांच्या दुर्गुणांचं वर्णन करीत असतो; त्यांच्याबद्दलच्या चुगल्या सांग-ण्याचं तर त्याला कांहींच वाटत नाहीं. आपल्याखेरीज बाकीचे सारे संस्थानचे हितशत्रु आणि ब्रिटिश राज्याचे कट्टे दुष्मन. बोलणारा मात्र काय तो खरा ब्रिटिश राज्याविषयीं निष्ठा आणि स्वामी-भक्ति बाळगणारा. अशी स्थिति अस-ल्यामुळं प्रत्येक माणसाची काय दानत आहे, त्याचीं काय खेंगटीं आहेत, हें मला सगळं कांहीं कळत असतं. या बातम्या काढण्याबद्दल कधीं कोणाला पगार देऊन ठेवण्याची जरूर पडत नाहीं. येईल त्याचं ह्मणणं ऐकून घ्यावं, आणि ह्याचं त्याला किंवा त्याचं ह्याला कांहीं सांगू नये. सांगितलंच तर अशा बाबतींत मागावं, कीं त्यायोगानं पाणूस त्या दुसऱ्या माणसावर संतापून त्याचीं सगळीं खेंगटीं असतील नसतील तीं सांगेल. असा जर या लोकांचा हा स्वभाव नसता, तर सकाळपासून दुसरे दिवशीं सकाळ-पर्यंत रोज संस्थानांत नबाबसाहेब, कार-भारीसाहेब, अमीरसाहेब, उमरावसाहेब, हेडक्लार्कसाहेब, आणखी इतक्या सर्वांचे जनानें यांची दिनचर्या सूक्ष्मपणानं आम्हांला समजणं शक्यच नव्हतं. पगारी माणसं ठेऊन किंवा अधिकारावर अस-लेल्यांसच गुप्तपणानं आणखी कांहीं पैसे देऊन अशा बातम्या किती मिळणार ! त्यांची गति सगळीकडे कशी होणार ? आणि झाली तरी लोकांना संशय आल्या-खेरीज किती दिवस टिकणार ? चिंतो-पंतासारख्या मनुष्यानं आमची गुप्त काम-गिरी वर्षानुवर्षे करणं शक्यच नाहीं. त्याच्या हातून कांहीं आगळिक झाली तरी आमचा त्याला पाठिंबा असे तोंपर्यंत तें शक्य. त्यांतही आमच्या पाठिंब्याच्या जोरावर त्यानं आपली मुसंडी जिथें तिथें घुसविली तरी त्याच्यापासून झाल्या गोष्टी लपविणं किंवा त्या झाल्या असतील त्याहून अगदीं भिन्न तऱ्हेनं झाल्या असं त्याच्या मनांत भरवणं त्यांना साहजिक होतं. या माण-सांचा उपयोग घरभेदेपणा करण्यास फार चांगला होतो. शिवाय यांच्या बातम्यांचं प्रत्यंतर दुसऱ्यांच्या बोलण्यावरून आणि दुसऱ्यांच्या बोलण्याचं प्रत्यंतर यांच्या बातम्यांवरून सारखं पडताळून पाहिल्या-नंच आपलं काम होतं. या कामगिरी-साठीं तर मी याला पाठिंबा देतों, याच्याशीं फार सलगीनं वागतों, बारीक सारीक गोष्टींत याच्या ह्मणण्याप्रमाणं वागून हा सांगेल तसाच मी नेहमीं वागतों असा लोकांचा समज करून देतों; परंतु या सगळ्याचं इंगित या पाहुण्याच्या लक्षांत

येत नाहीं; हें तर उघडच आहे. पण ज्यांच्या येत असेल असे सुद्धां लोक फारच थोडे आहेत. ''

हें आपल्या मित्रासारख्या ब्रिटिश अधिकाऱ्याच्या पॉलिसीचें धोरण मि. ब्लॅकमेल स्काय्ँ यांस अवगत नव्हतें असें नाहीं; तथापि त्यांच्याच तोंडून त्याचें सविस्तर विवरण होत असतां तें ऐकण्यांत त्यांस फार आनंदच वाटला.

तो त्यास ह्मणाला, '' मित्रा, तूं ह्मणतोस हें अगदीं अक्षरशः खरं आहे. राजकीय कारभारांत ज्यांना अधिकार चालवावयाचा आहे, त्यांना हें असें सुताडें-गोताडें केल्याखेरीज कधींसुद्धां चालणार नाहीं. पॉलिसी पॉलिसी ह्मणजे काय ? आपलं खरं मन काय तें कळूं न देतां, प्रत्यक्ष खोटं बोलण्याचा आरोप येईल असे शब्द न उच्चारतां, आणखी उच्चारलेच तर साफ ' ना ' म्हणून अकांडतांडव करण्याची तयारी ठेवून, काय बोलावयाचं तें खुशाल बोलणं म्हणजेच पॉलिसी ! '' कोणी कांहीं तक्रार आणल्यास चौकशी करण्याचीं आश्वासनं व अभिवचनं देण्यांत कधींच कमी करूं नये. राज्याचा कारभार चालविण्यांत असे प्रकार व्हायचेच आणखी ते झाल्यामुळं जर कांहीं असंतोष होतोसा दिसला, तर आमच्यांतलेच सद्धेतूनं हिंदुस्थानचें कल्याण इच्छिणारे लोक इंग्लंडांत व विशेषतः पार्लमेंटांत बरेच आहेत ! त्यांच्याकडून हिंदुस्थानच्या कारभारावर ज्या खरमरीत टीका तिकडे होतात व पार्लमेंटांत ठराव होतात तेवढ्यांनीं बरेच काम भागतें. इकडले लोक तेवढ्यावरच संतुष्ट होतात. शिवाय इकडेही केवळ हिंदुस्थानच्या कल्याणाकडेच पहाणारे व इंग्लंडच्या नुकसानीला तें कारण झालें तरी तें करावें असें प्रतिपादन करणारे कांहीं लोक आहेतच. ते लोक त्या गोष्टी मुद्दाम करतात असें नाहीं. त्यांची नैसर्गिक समबुद्धीच–जिच्या पायावर खरोखर हें एवढं राज्य आह्मीं उभारलं,–ती स्वभावसिद्ध समबुद्धि त्यांस तसं वागण्यास लावते. पण सगळ्यांनींच ती समबुद्धि राखणं शक्य नाहीं, आणखी इष्टही नाहीं. माझी स्वतःची बुद्धि तितकी सम नाहीं. माझ्या मतं समबुद्धीनं या नेटिवांस वागविणं शक्यही नाहीं व इष्टही नाहीं त्यांची योग्यताच तशी नाहीं. आह्मी त्यांच्याशीं समबुद्धीनं वागावें असं त्यांच्यांत आहे काय ? मला तर बोआ त्यांच्याशीं शेकह्यांडसुद्धां करणं आवडत नाहीं, आणखी मी करीतही नाहीं. त्यांना योग्य तितक्या अंतरावर ठेवणे हेंच अवश्य. कां ? मी ह्मणतों असंच कीं नाहीं ? ''

बुलिस्नीकसाहेबांनीं लागलीच '' होस हो '' ठोकून दिला. त्यांचें मत अक्षरशः तसेंच होतें. दोघांचें याप्रमाणें मतैक्य होतांच बुलिस्नीकसाहेब एकदम म्हणाले, '' परंतु जाऊं द्या. या राजव्यवस्थेच्या मीमांसेचा मला तर अगदीं कंटाळा आहे. मला पक्कं ठाऊक आहे कीं, नेटिवांत सुद्धां कित्येक मोठे हुशार, प्रामाणिक, नेकीचे, सत्यनिष्ठ व स्वामिभक्त मुत्सद्दी आहेत. परंतु जोंपर्यंत तसे लोक आमच्या आढळांत येत नाहींत आणि चिंतोपंत आणि बाबू माशे आमच्या मार्गांत येतात, तोंपर्यंत आम्हालाही आमची सध्यांची पॉलिसी बदलण्याचं कारण नाहीं. त्यांच्यांत तसे चांगले लोक पुष्कळ आहेत अशी आमची खात्री झाली, म्हणजे मग आम्हालाही आपली पॉलिसी बदलण्याला हरकत नाहीं. ''

यावर स्कार्प्यँसाहेबांनीं " होस हो " ठोकून दिला व म्हटलें, " बरें तर आतां पुरेच हा सगळा गंभीर वादविवाद ! —मी जरी तुझ्या उलट कांहीं बोललों नाहीं तरी मी याला वादविवादच म्हणतों.— कारण या शेवटल्या बाबतींत तुझी माझी एकवाक्यता नाहीं. माझ्या मतानं—आणि अनुभवानं म्हटलं तरीही चालेल—चांगला हुशार, सचोटीचा, स्वामिनिष्ठ आणि इंग्रजसरकारावर निष्ठा ठेवणारा असा मुत्सद्दी या नेटिव लोकांत सांपडणं अगदीं अशक्य आहे. "

बुलिस्नीकसाहेब त्यावर हांसत हांसत ह्मणाले, " माझ्या मताप्रमाणं जरी एखादा असलाच, तरी चला आपण त्यास मद्याच्या ग्लासांत आतां बुडवून टाकूं ! "

त्याबरोबर स्कार्प्यँसाहेब फारच मोठमोठ्यानें हांसत हांसत म्हणतात, " छे छे ! आपण तो ग्लास गट्ट करतांना घशांत सुद्धां तो गुलाम कांहीं घोंटाळा करावयाचा ! "

" हो, हो, खरोखरच ! आपण त्यास आपल्या अबकारी पॉलिसीनं बुडविण्यास पहातों आहोंतच, पण तो खरोखरीच त्यांत बुडूं नये म्हणून तडफड करीत राहणार ! "

"असूं द्या, असूं द्या ! आपले कोठें कांहीं इतके लेवेपेचे नाहींत. आपण त्याचंही पचन करून टाकूं " असें म्हणून त्यांनीं आपल्यापुढं आलेल्या उत्कृष्ट मद्याचा परामर्श घेतला. तितक्यांत स्कार्प्यँसाहेब ह्मणतात, " बरं पण, त्या दोन परस्परद्वेष्ट्या सापांची लढाई लावून गम्मत दाखवितांना ? "

" हो, हो. एकदां दाखवावीसं वाटतं, एकदां तसं करावंसं वाटत नाहीं. कारण एकदां समोरासमोर झालं ह्मणजे मग त्यांना हल्लींच्याच स्थितींत ठेवणं फार कष्टाचं काम होणार आहे. ते कदाचित् बिथरतील आणि त्यांना हांकून देण्याची पाळी येईल. सध्या कांहीं कारणामुळें तसं करतां कामां नये, अशी माझी समजूत आहे. केलं तर दुसरीं माणसं मिळणार नाहींत असं नाहीं, मिळतील. पण त्यांना इतका अनुभव घेऊन तीं इतकीं उपयोगीं पडूं लागण्याला बरेच दिवस लागतील. तितके दिवस हिंदुस्थानसरकार व सेक्रेटरी ऑफ स्टेट हे या प्रकरणांत आतां थांबतील असं वाटत नाहीं; पण त्या बाबतींत मी तुला कांहीं सांगत नाहीं. तूं एडिटर आहेस, ' ती बातमी सगळ्यांच्या आधीं आपण फोडूं ? ' असं तुला होऊन जाईल. "

तें ऐकतांच स्कार्प्यँसाहेब आपल्या डोळ्यांतच त्यास म्हणतात, " नको सांगूं. तूं कशाला सांगायला पाहिजेस त्या सर्व हकीकती माझ्या ड्रॉअरमध्यं केव्हांच येऊन पडल्या आहेत; इतकंच नाहीं, पण आज तागाईत घडत आलेल्या सर्व हकीकतींचं पर्यालोचन करून एक आर्टिकलही मीं तयार करून ठेविलं आहे. त्याचप्रमाणं हिंदुस्थानसरकारनं त्या बाबतींत काय मार्ग सुचविला आहे, तोही मला अर्धातच्च कळला आहे. प्रकरण स्टेट सेक्रेटरीकडून आलं किंवा निघणार अशी बातमी आमच्या बातमीदाराच्या तारेनं झळकतांच, साधारणतः आह्मीं आधीं सुचविलेल्या मार्गासच अनुसरून स्टेट सेक्रेटरी फार पोक्त व शहाणपणाचा विचार करूं लागले आहेत, असं लोकांस भासविण्याची संधि घेणार; ती संधि मिळतांच आह्मीं आपलं दुसरं त्या धोरणानं लिहि-

लेलं आर्टिकल प्रसिद्ध करणार ! डिस्पॅच प्रसिद्ध झाला, ह्मणजे लागलीच आमच्या सूचनांचा आणि सरकारी विचारांचा एक कल आहे, याबद्दल आह्मीं आपलेंच अभिनंदन करून घेणार ! त्यांत चूक काय ह्मणून होऊं देऊं ? इतकेंच नव्हे, तर आह्मीं वर्ष दोन वर्षांच्या पूर्वीं अशाच बाबतींत कांहीं सूचनांचें विवरण केलें होतं, परंतु त्यावेळीं सरकारानं तिकडे दुर्लक्ष्य केलं, पण आज त्याच सूचनांतला पोक्त विचार हा डिस्पॅच तयार करते वेळीं स्टेट सेक्रेटरींनीं ध्यानांत आणला असला पाहिजे व तो खास आणला आहे असं आह्मांस वाटतं, आणि त्यामुळं आह्मीं आपलंच स्वाभिमानानं अभिनंदन करतों, असंही पण ठोकून देणार ! आमच्या पेपरच्या पॉलिसीकरितां, त्याचा बडेजाव वाढावा ह्मणून, सत्यासाठीं, असंच आह्मांला करणं विहित वाटतं ! ”

बुलिस्मीक त्यावर हंसत ह्मणतो, “वाः! आज आपण Anglo-Indian Bureaucracy ( अँग्लो-इंडियन अधिकारी मंडळाच्या ) व Journalocracy च्या ( वर्तमानपत्राच्या )—कारण वर्तमानपत्रं म्हणजे The fourth estate of the Realm ( बादशाही अंमलांत चवथा महत्त्वाचा भाग होय. )—पॉलिसीची अंतर्दृष्टीनं मीमांसाच करतों आहोंत ह्मणायचं. आपण आपापसांत बोलूं लागलों ह्मणजे या विषयाबद्दल मन मोकळं करून बोलण्याची भीड तोडवत नाहीं, नव्हे ? पण आतां खरोखरच मला त्या बोलण्याचा वीट आला आहे. तुम्ही आतां लवकर जाणार सचच Let us make these vipers fight with each other and enjoy the fun like Indian conjurer !* मी आपल्या बायकोला व मुलांना प्रेक्षकमंडळी म्हणून बोलावून आणतों. ”

इतकें बोलणें झाल्यानंतर बुलिस्मीकसाहेबांची स्वारी आपल्या मडमसाहेबांस व बाबालोगांस बोलवायास गेली. एक साप, गारोडी महाराजांच्या आज्ञेप्रमाणें खरोखरीच बाहेरच्या बाजूस करंडींत घालून ठेवल्याप्रमाणें बसलेला होता. त्यास जातां जातां हांक मारून, “ तूं त्या पलीकडच्या खोलींत जाऊन बस. बाबू माझे इकडून आंत खोलींत येतांच मी मुद्दाम दार अर्धे किलकिलें ठेवीन, तेथें तूं उभा राहून त्यांचें बोलणें ऐक आणि वेळींच मी अशी टाळी वाजविली ह्मणजे आंत ये ” असें सांगितलें.

चिंतोपंतास तसें होणें नको होतें. परंतु त्याची इच्छा त्या वेळीं बलीयसी नव्हती. साहेबांची इच्छा बलीयसी होती. अर्थात् त्यास तसें वागावें लागलें. साहेबांच्या इच्छेप्रमाणें त्यांची पत्नी व मुलें बैठकखान्यांत गेलीं आणि बाबू महाशयांस हुकूम जाण्याबरोबर तेही आज कांहीं कारणानें उल्हसित होत्साते बैठकखान्यांत आले.

---

* या सापांचें भांडण लावून, गारोडी आपल्या सापांची मजा पहातो तशी आपण मजा पाहूं.

# प्रकरण ४१ वें.

## दोन सापांची लढाई.

आमच्या वाचकांपैकीं कांहींतरी एक जुनी कहाणी ऐकली असेल. द्रव्याच्या राशीवर बसलेल्या एका सापाची आणि एका राजाच्या पोटांत राहिलेल्या दुसऱ्या एका सापाची एके ठिकाणीं भेट झाली असतां दोघांनीं एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढल्या व एकमेकांचा मृत्यु कशांत आहे याचा त्या उखाळ्यापाखाळ्यांत उच्चार केला; यामुळें त्या सर्पग्रस्त राजाच्या पत्नीचा फायदा झाला अशी ती कहाणी आहे. आज मि० फिल्पर्स बुलिस्नीकसाहेबांच्या बैठकखान्यांत याच प्रकारचा एक तमाशा व्हावयाचा होता, हें वाचकांच्या लक्षांत राहिलेंच असेल. एक बंगाली सर्प आणि एक दक्षिणी फुरसें यांची झोंबी लावून बुलिस्नीक गारुडी आपल्या पाहुण्यास, पत्नीस आणि मुलाबाळांस मौज दाखविणार होते. त्या झोंबीची पूर्व तयारी सर्व झालेली मागील प्रकरणीं वाचकांस कळलीच आहे. प्रेक्षक मंडळी सर्व सिद्ध झाली होती. एक साप प्रेक्षकांस एक वेळ दाखवून खोलीच्या बाहेरच्या आडोशास ठेवून दुसऱ्या सापास प्रथमतःच दाखविण्यासाठीं आंत बोलावून आणलें होतें. तो साप ह्मणजे बाबूमहाशय मोठ्या डौलानें आपल्या दाढीवरून हात फिरवीत फिरवीत एकवार इकडे मडमसाहेबांकडे, एकवार तिकडे स्कार्थ्यैसाहेबांकडे, पुनः एकवार आपल्या बुलिस्नीकसाहेबांकडे, नंतर बाबालोगांकडे पाहून सलाम करण्याच्या ऐटीनें मानेला लववून व नंतर पुनः आपल्या साहेबांकडे अदबीनें बघून, आपल्या तुंदिल तनूस मध्यभागीं देववेल तितका बांक देऊन, किंचित् झुलत व डुलत असे उभे राहिले. यावेळीं त्यांच्या त्या पाठीला इतका बांक दिला गेला होता कीं, ह्यारीस त्यांच्या पाठुंगळीस बसून घोडघोडघोड करण्याचा मोह उत्पन्न झाला व नेटिवांच्या संबंधानें असला कांहीं मोह उत्पन्न झाला असतां कधीं तो जेथल्या तेथें दाबून टाकण्याची मुळींच संवय नसल्यामुळें, त्यानें त्या मोहावेशाच्या स्वाधीन आपलें शरीर करून पट्कन् बाबू महाशयांच्या पाठुंगळीस अगदीं मानेच्या जवळ आरोहण केलें व आपली बहीण फयानी ईस, आपलें अनुकरण करण्याबद्दल आग्रह चालविला. ती आपल्या बालकांची लीला पाहून सर्व प्रेक्षकमंडळी कौतुकानें खो खो खो खो करून हांसत राहिली. बाबू महाशयांस मनांतून अतोनात संताप आला; इतका कीं, त्यांच्या मनाची पहिली प्रवृत्ति त्या पोरास खालीं पाडून दोन श्रीमुखांत भडकवाव्या अशीच झाली. परंतु आह्मां दीर्घविचारी नेटिवांप्रमाणें त्यांनीं क्षमा-

जननीचाच त्यावेळीं नेहमींसारखा आश्रय करून, तें सर्व नुसत्या हंसण्यावारी घालविलें. इतकेंच नव्हे, तर " स्टेडी स्टेडी मास्टर ह्यारी ! " असें म्हणून आपली पाठ अधिकच लवविली. ह्यारीच्या वडिलांचें, मातुःश्रीचें व पाहुण्याचें हंसूं कांहीं केल्या आंवरेना, असें पाहून मास्टर ह्यारीस अर्थातच अधिकाधिक उत्तेजन येऊन त्यानें बाबू महाशयांच्या दाढीला हात घालण्यासाठीं हात बाजूस चालविला. बाबू महाशयांच्या अभिमानाचें जर कोणचें स्थान असेल, तर ती त्यांची दाढी होय. बाकी कोणच्याही बाबतींत अपमान झाला असतां त्यांनीं कधीं त्याबद्दल संताप येऊं दिला नसता, परंतु दाढीच्या बाबतींत तें त्यांना अगदीं शक्य नव्हतें. तिचा अपमान झाला असतां तो त्यांस कधीं खपत नसे. ह्यारीचा हात, लगामाच्या ऐवजीं आपल्या दाढीचा उपयोग करण्यासाठीं पुढें सरसावतो आहे असें पाहतांच त्यांनीं एकदम आपल्या पाठीचा वांक नाहींसा करून " Sir, I cannot—I cannot, for the sake of my soul and my country and in the name of self-respect and in the name of justice and fairness and equity put out with such indignity and insult in your very august and self-dignified and exalted presence even though that indignity and that insult emanates and takes rise from no less a person than the first male offspring of your loins. Sir, my august Sir, hath not a Jew eyes &c., Sir ? as Shylock says in Shakespeare's Merchant of Venice, Act third, Scene first, line I cannot remember. We natives, Sir, have we no self-respect, no self-dignity and no self-righteousness ! Plenty of all these things Sir we have, but you must help us to hold them up. Sir—" *

परंतु बाबू महाशयांस पुढें मुळींच बोलवेना. त्यांना खरोखर इतका संताप आला होता कीं, वरील सर्व बोलतांना त्यांच्या तोंडास फेंस आला व त्या सपाट्यांत त्यांनीं पाठ झट्कन् सरळ केल्या कारणानें इकडे ह्यारीही, खालीं पडला होता, त्यास आपला अपमान झालासें वाटून, तो बाबू महाशयांच्या लठ्ठ पोट्ट्यावर सूड घेण्यासाठीं आपल्या बूट घातलेल्या पायांचा प्रयोग करून वर हातांच्या नखांचाही प्रयोग करणार, तोंच बुलिस्नीकसाहेबांसुद्धां हें फार झालें असें वाटून, त्यांनीं लागलीच आपल्या चिरंजीवाचे अंगावर खेंकसून " Get away, you nasty imp " ( चल निघ वात्रट पोरट्या ! ) असें त्यास दरडावलें. त्याबरोबर ह्यारीबाबा तर जागीं आले आणि महाशयांची चित्तवृत्तीही जागेवर येण्याच्या

* " महाराज, महाराज, माझ्या आत्म्याकरितां आणि देशाकरितां, आणि आत्माभिमानाच्या नांवानें, आणि न्याय व समतेच्या नांवानें मी सांगतों कीं, हा अपमान, हा उपमर्द आपल्या चिरंजीवाकडून होत आहे तरी सुद्धां माझ्यानें सहन होत नाहीं. महाराज, शेक्सपियरच्या मर्चंट आफ वेनिस नाटकांत अंक ३ प्र० १ शायलॉक ह्मणतो. "ज्यू लोकांस काय डोळे नाहींत." आह्मां नेटिवांना आत्माभिमान, स्वाभिमान नाहीं काय ? पुष्कळ आहे, पण आपण चालूं द्याल तेव्हां कीं नाहीं ! "

मार्गास लागली. तथापि नेटिवांचा मान साहेबलोक राखीत नाहींत, आपल्या मुलांबाळांकडून त्यांचा अपमान झालेला पाहण्यांत खुशाल मौज मानतात, हें चांगलें नव्हे, अशाबद्दल एक लांबलचक व्याख्यान त्यांनीं दोघांही साहेबांस झोडलेंच. इतकेंच नव्हे, तर तें व्याख्यान झोडपण्याच्या प्रारंभीं व अखेरीस साहेबांस असेंही पण सांगितलें, कीं या सर्व अपमानाच्या गोष्टी मी सोसून घेतों, तें केवळ बुलिस्नीकसाहेबांच्या फार सुशील स्वभावामुळें ! नाहीं तर गव्हर्नर जनरलसाहेब व स्टेटसेक्रेटरीसाहेब व पार्लमेंटसभा किंबहुना प्रत्यक्ष महाराणीसाहेबांसही या बाबतींत अर्ज केल्याखेरीज राहिलों नसतों. हें सर्व बोलणें चाललें असतां बुलिस्नीकसाहेब आपल्या पाहुण्याकडे हलकेंच डोळे मिचकावून पहात आणि हंसत आणि तेही त्याप्रमाणेंच उलट करीत. इतर कोणती वेळ असती तर स्नीकसाहेबांनीं बाबूंस केव्हांच आपलें भाषण कमी करण्यास सांगितलें असतें; परंतु मंडळींना आंत बोलावण्याच्या आधीं ज्या कांहीं पेयाला त्या दोघांनीं आपल्या कोठ्यांत बरीचशी जागा दिली होती, त्यामुळें दोघांवरही निरनिराळे परिणाम झाले होते. स्काप्यँसाहेब किंचित् दुर्मुखून बसले होते. मद्याचा अधिकउणा आदर झाला असतां त्याची मूकवृत्ति बने, त्याप्रमाणें ती बनली होती. स्नीकसाहेबांची वृत्ति तशा स्थितींत जरा रंगेल व हास्यमय बने, यामुळें आज बाबू महाशयांच्या जिव्हेला अनियंत्रित सुटण्यास बराच वाव सांपडला. परंतु सर्व गोष्टींला अंत हा असावयाचाच आणि आपल्या कृत्यांस किंवा बोलण्यास तो अंत आपण स्वतः नाहीं दिला, तरी लोक देणारच. या न्यायास अनुसरूनच बाबू महाशयांच्या बोलण्यास एकदम धक्का बसला. दुर्मुखलेल्या स्काप्यँसाहेबांस ते सर्व बोलणें असह्य होऊन ते एकदम, " शूप राव, यू डेविल ! " असें ओरडले, व महाशयही आणखी " पहा, पहा, या असल्या तुमच्या बोलण्यानें आणि वर्तनानेंच सर्व खराबा होतो. हें तुमचें उदाहरण पाहूनच तुमची पुढची प्रजा आमचा अनादर. ... " इत्यादि थोडक्यांत बोलून गप्प उभे राहिले. कारण स्काप्यँसाहेबांची चर्या जरा त्यांस विलक्षण भेसूर दिसली.—इतकी भेसूर कीं, आतां यावेळीं आपण गप्प बसण्यांतच जास्त शौर्य आहे असें त्यांस वाटलें.

ते थांबतांच रंगेल वृत्तींत अधिकअधिक शिरत चाललेले स्नीकसाहेब बाबू महाशयांस म्हणतात, " Well, बाबू, कांहीं कागदबिगद महत्वाचे आले आहेत ? कांहीं टपाल ? "

" Oh yes, Oh yes, आज तर पुष्कळ आणखी फार महत्वाचं टपाल आहे. पण आपण कांहीं गडबडींत असाल म्हणून मी सगळं इकडे आणलं नाहीं. दोन चार कागद अगदीं जरूरीचे तितकेच आणले आहेत. बाकीचे जाऊन आणूं का ? "

" नको. नको. पण बाबू माझे, Let me first introduce you to my friend Mr. Scapin, the Editor of...... "

" I know, I know, Sir,... मीं त्यांची ख्याति फार ऐकली आहे. ते फार विद्वान्, फार थोर, फार सज्जन, फार न्यायप्रिय, नेटिवांचे कनवाळू असे आहेत. "

असें बाबूसाहेबांनीं म्हणून दुरूनच लवून नमोनमः केलें. जवळ जाऊन शेकह्यांड करण्याची इच्छा त्यांस झाली नाहीं. कारण, एक तर स्कार्प्यँसाहेबांनीं आपला हात पुढें केला नव्हता; आणि दुसरें असें कीं, त्यांच्या मुद्रेवर व दृष्टींत बाबूंना तसें करण्यास कांहीं उमेद यावी असें चिन्ह मुळींच नव्हतें. अर्थातच दूरच्या सलामीवरच बाबूंनीं संतोष मानून घेतला. इतक्यांत बुलिस्नीकसाहेब त्यांस ह्मणतात:—

" बाबू, तुम्ही आज कित्येक वर्षें आपल्याला बढती व्हावी म्हणून धडपड करतां आहां. पण तुमचें कल्याण पहाण्यापेक्षां मी आपली सोय पाहूनच आजपर्यंत तुह्मांला कुठें जाऊं दिलं नाहीं. तरी पण आज आलेला हा योग फार चांगला असल्यामुळं, केवळ माझ्या स्वतःच्या सोयीकडेच दृष्टि देऊन बसतां कामा नये असं वाटतं. तुमचं खरोखर कल्याण होतं आहे, तर कां करूं नये ? आजपर्यंत मी आपला मला असा दुसरा हेडक्लार्क मिळायचा नाहीं म्हणून तुह्मांला सोडलं नाहीं. पण आतां...."

" O Sir, I don't know how adequately and proportionately and ratiocinatively to thank you. माझे कान ऐकताहेत हें खरं काय ? तर मग आजपर्यंत मीं शांतपणे वाट पहात आलों त्याचं सार्थक झालं. I knew I knew Sir—most respected and highly exalted Sir. I knew you would not desert me at all. Sir, the Divanship of what State are you going to honour me your most humble and undignified servant with ! Sir—for it cannot be anything else but a Divanship Sir, I am sure Sir, ..." *

" छे. छे. दिवाणगिरी नाहीं. त्याच्याहीपेक्षां जास्त सुखाची, मानाची आणि श्रेष्ठतेचीजागा आहे. दिवाणगिरी झाली तरी दुसऱ्याची ताबेदारीच कीं नाहीं ? मी म्हणतों यांत अगदीं तुम्ही स्वतंत्र असणार. "

" अशी जागा तरी कोणती " बाबू महाशयांनीं फारच उत्कंठेनें विचारलें आणि बुलिस्नीकसाहेबांच्या चेहेऱ्याकडे एकसारखी टक लाविली. त्यांचा कांहीं तर्क चालेना.

तेव्हां " Guess Babu—you can't मी सांगतों. आमच्या मित्राच्या वर्तमानपत्राच्या असिस्टंट एडिटराची. त्यांना एक नेटिव असिस्टंट पाहिजे आहे आणि मीं तुमची शिफारस त्यांना केली आहे. तुमची हरकत आहे कांहीं ? पगार पुष्कळ चांगला पांचशेंपर्यंत देतील. काम तुह्मांला आवडणारें आणि पुनः स्वतंत्र धंद्याचा स्वतंत्र धंदा ! आणखी काय पाहिजे ? "

' Oh ! lo ! Babu, you an Editor ! ' असें ह्यारी ह्मणाला व बाबूच्या पुढें जाऊन त्यानें आपल्या नाकास आंगठा लावून तीन मधलीं बोटें लववून व करंगळी ताठ करून त्यांस वेडावून दाखविलें, मिसेस बुलिस्नीक फिदीफिदी हंसल्या. फ्यानी

*मला ठाऊक, मला ठाऊक आहे साहेब, कीं, आपण मला कांहीं सोडणार नाहीं आणि विसरणार नाहीं. महाराज ! कोणच्या संस्थानच्या दिवाणगिरीचा मान आपल्या या नम्र दासास देण्याचा आपला मानस आहे ? ही जागा ह्मणजे दिवाणगिरीची नर खास असलीच पाहिजे, माझी अगदीं खात्री !

गद्गदां हंसली. स्काप्यॅसाहेबांच्या चर्येवर उगीच किंचित् स्मित दिसलें. स्नीकसाहेबांचें तोंड तर हास्यमयच झालें होतें. एक बाबू महाशयांस मात्र हंसावें कीं रडावें याबद्दल शंका पडली असावी असें दिसलें. किती वेळा तरी त्यांस आपण काय बोलावें तें सुचेना. शेवटीं पुनः स्नीकसाहेबांनीं त्यांस विचारलें, " काय बाबू, तुह्मांला नाहीं का हें काम आवडत ? अरे, मला तर वाटलें होतें कीं, you would simply jump at the offer ! ( तुह्मी हें ऐकतांच उडी माराल. ) "

" Jump " शब्द ऐकल्याबरोबर फ्यानि एकदम आपल्या बापास ह्मणते, " पण बाबा बाबूंना उडी मारायला कोठें येते ? it would be such fun to see Babu jump with his round ............"

" चूप् चूप् फ्यानी " आपली चिरंजीविनी पुढें काय बोलणार हें पक्कें जाणून साहेबांनीं तिला दाबलें व बाबूंकडे वळून ह्मटलें, " काय, तुह्मी बोलत नाहीं ? "

" आपण माझा विनोद करतां अहां असं वाटून मी गप्प बसलों आहें. साहेबांच्या आफिसांत किती लोक—गोरे लोक —काम करताहेत ! बाकी खरोखर त्यांना नेटिव असिस्टंट पाहिजे असेल, आणखी आपण मला ह्मणत असाल, तर मी जाईन. "

" That's it, पण बाबू तुह्मांला कधीं लिहिण्याचा सराव आहे का ? बाकी सरावाचं काय ? तुम्ही चार दिवसांत छानदार लिहूं लागाल, मी यांना तुमचे नेहमींचे आफिशिअल ड्राफ्ट दाखविले, त्यांवरच ते खुष झाले आहेत. आणखी तुमच्या बोलण्यानें तर खात्रीच झाली असेल. पण आपलं उगीच विचारतों, सराव आहे का म्हणून ? "

" हो. हो. मी नौकरीला लागण्यापूर्वीं कलकत्त्यास एका नेटिव इंग्रजी पत्राचा एडिटर होतों. त्यावेळीं माझीं आर्टिकलें पाहूनच मला नौकरी मिळाली ! "

" ती फार पूर्वींची, मागल्या युगांतली गोष्ट झाली. पण हल्लीं कोणत्या पत्राला कांहीं लिहितां कीं नाहीं ? "

" छे ! मुळींच नाहीं. " बाबूंनीं किंचित् गोंधळून उत्तर दिलें.

" तरी पण—तरी—पण—एखाद् दुसरें आर्टिकल ? "

" उगीच एखाद् वेळ सोशल रिफार्मच्या बाबतींत वर्षांतून एखादें दिखील आतांशा दोन वर्षांत नाहींच ! " बाबू चाचपडत उत्तरले.

" पण, बाबू मीं तर ऐकलं, कीं तुम्ही अजून एका पत्राला बहुतकरून दर आठवड्याला लिहितां ह्मणून ?

"ओ नो.मुळींच नाहीं कोणी तरी माझ्या शत्रूनं कांहीं तरी तुमच्याजवळ येऊन सांगितलं असेल.मी अगदीं निक्षून शपथपुरःसर सांगतों, कीं मी मुळींसुद्धां कोणच्या पत्रास कांहीं लिहीत नाहीं, आम्ही बाबू सरकारी नियमांच्या विरुद्ध वागणूक कधीं करणार नाहीं. मी तर त्यांत कधीं ह्मटल्या कधींही नाहीं."

" तसं असलं तर ठीकच आहे, बाबू, पण आपल्या आफिसांतून बातम्या फुटतात अशी शंका आतांशा यायला कारण झालं आहे कीं नाहीं ? तुमच्या कलकत्त्याच्या एका नेटिव पत्रांत इथल्या बातम्या ज्या तुमच्याखेरीज दुसऱ्या कोणाला कळण्याला मार्गच नाहीं, त्या कशा

जातात ? तुम्ही किंवा तुमच्या हाताखालच्या कारकुनांनीं त्यांना कळविल्याखेरीज जातात ? ''

" सर, मला दुसऱ्याच्या चुगल्या करायची मुळींच इच्छाही नाहीं आणखी त्यामुळें संवयही नाहीं. तुम्ही आतां गोष्ट काढली म्हणूनच बोलण्याचा प्रसंग आला आहे, तेव्हां बोलावेंसें वाटतं--पण नको. आपल्या कानावर जेव्हां येईल तेव्हांच तें यावं. मी बोलून तें आपल्याला कळण्यांत कांहीं तात्पर्य होणार नाहीं. "

" नाहीं, नाहीं. बोला. जिभेवर आलं आहे तें ठेवूं नका. मला तरी असा कोण कृतघ्न, विश्वासघातकी आहे आहे हें कळलंच पाहिजे. त्याखेरीज... बोला. माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे, म्हणूनच मीं तुमच्याजवळ सहज गोष्ट काढली. "

" सर, यांत विनाकारण उगीच दुसऱ्याची चहाडी केल्यासारखं होतं."

" कांहीं नाहीं. मी विचारतों आहें तेव्हां तें सांगण्यांत तुह्मांला कांहीं पाप लागणार नाहीं. "

" सर, मग सांगूंच तर ? सर जिथें आपला फार विश्वास असतो तिथेंच अनेक वेळां दगा होतो. आमच्यांत एक म्हण आहे. विश्वासाचा सगा तोच देतो दगा ! "

" बोला, बोला, स्पष्ट बोला. असं लाक्षणिक नको. "

" सर, मोठें कष्टदायक काम माझ्याकडून आपण करवतां आहां. आणखी मी आपल्या आग्रहापुढं नाइलाज ह्मणूनच तें करतों आहें. सर, Won't you excuse me ? "

" No, no ! Speak out. " स्नीकसाहेब आपल्या पत्नीकडे व मित्रांकडे डोळे मिचकावीत ह्मणाले.

" बरं तर. सांगाच म्हणतां तर सांगतों. आपण दक्षिणेंतून आणलेल्या त्या चिंतोपंतांचं हें काम असावं असं मला वाटतं. आपण म्हणाल, कीं आफिसांतल्या गोष्टी त्याला कशा कळतात ? तर आपणच विश्वासानं त्याच्याजवळ नेहमीं बोलतां, असं तो नेहमीं म्हणत असतो. "

" खरं, पण बाबु, चिंतोपंताच्या सांगण्यांत तर असं येतं, कीं तुम्हीच दर आठवड्याला त्या बंगाली पत्राला मजकूर पाठवतां. "

बाबू उसळले. " He is a base slanderer and scandalmonger, Sir—an arch backbiter, Sir ! " त्यांचा त्वेष त्यांच्या त्या तुंदिलोदरांत अगदीं मावेना आणि डोळ्यांतून तर ठिणग्या उडूं लागून त्या आतां दाढीची होळी करतात कीं काय, असा भास झाला परंतु स्नीकसाहेब अगदीं शांतपणें त्यास म्हणतात, " शिवाय दुसरी गोष्ट अशी कीं, तो दक्षिणी माणूस, त्याला नाहीं येत बंगाली, नाहीं येत धड इंग्रजी, तो अशा भानगडींत पडून त्याला साधणार कसं, अशी साहजिक शंका येते. तुह्मीच पहा ! "

" हो. हो. मग या दक्षिणी लुच्चाची गंमत ती काय ? हीच आहे ! आपण काढली अशी शंका यावी आणि तीमुळं आपल्यावरला संशय कधीं कोणाच्या मनांत पक्का ठसूं नये, म्हणून त्यानं ही युक्तिच केली. तो बडा पाताळयंत्र्या आहे. दक्षिणेंतल्या पत्रांत आपण लिहवलं

तर खास आपल्याबद्दल संशय येईल, तो येऊं नये ह्मणून बंगाली पत्रकारांची ओळख करून त्यांच्या एजंटाला बातम्या देऊन लेख लिहवून पुनःआपण नामानिराळेच, असा हा दक्षिणी कावाच आहे. आपण बहुतकरून सगळ्या गोष्टी त्याच्याजवळ बोलतांच. शिवाय तो माझ्याकडे हापिसांत नेहमीं नेहमीं येऊन कांहीं बातम्या निघाल्या तर काढायचा यत्न करीत असतो; I am a pucca fellow of course! पण कधीं कधीं त्याला आपल्याकडून सगळ्या गोष्टी कळलेल्याच असतात अशा समजुतीवर, आणखी तो त्या माहितीचा काय उपयोग करतो हें ठाऊक नसल्या मुळं बोलून गेलों असेन; तो अशा तऱ्हेनं सगळी माहिती मिळवतो. बंगाली पत्रांत परस्पर प्रसिद्ध करवतो. आलाच कोणावर संशय, तर माझ्यावर यावा ही त्याची इच्छा. Sir, he hates me most cordially सर! त्यांतलं कारण, सर थोड्याच दिवसांपूर्वी कळलं. तो माझा नाश केव्हां करायला सांपडेल तें पहात आहे, सर! त्याची ही शक्कल दिसते आहे, सर!"

"शक्कल कसची? त्याचं तर म्हणणंच आहे कीं तुम्हीच पत्र लिहून आफिसांतल्या गुप्त बातम्या फोडतां......"

"असं असेल तर मी त्याच्यावर फिर्याद करीन. आणखी अब्रूनुकसानी भरून मागेन."

"तो म्हणतो, मी पुरायापत्त्यानिशीं सिद्ध करून देईन."

"करूं द्या सिद्ध! मी तर मग त्याच्या विरुद्ध केवढ्याला तरी अगदीं घाणेरड्या घाणेरड्या गोष्टी सिद्ध करीन, कीं ज्या सिद्ध झाल्या म्हणजे त्याला चांगली सजाच होईल. दक्षिणचं बंदरूं इथें येऊन बंगाली बाबूशीं गमजा करतें आहे काय?"

दक्षिण वांदर बाहेर ऐकतच होतें. त्याच्यानें आतां साहेब खूण करून बोलवीपर्यंत वाट पहावेचना. तें एकदम आंत घुसून त्या बाबूंच्या अंगावर खेंकसून ह्मणतें, "तूं काय समजतो आहेस?"

# प्रकरण ५० वें.

## सरस्वतीबाईची पत.

इकडे गुंडोपंतास जरी रंगोपंतांनीं धुतकारून देण्याचा पुष्कळ आव घातला, तरी कांहीं कांहीं गोष्टी अशा घडल्या कीं, गुंडोपंतांची पायधरणी करून—निदान त्यांचें मन मिळवून वागण्यांतच शहाणपणा आहे, असें त्यास

दिसून येऊं लागलें. रंगोपंताला स्वतःची अक्कल विशेष नव्हती. मात्र सर्व प्रकारच्या व्यापारव्यवहारांत आपणास फार उत्तम प्रकारानें समजतें आणि कोणच्याही कामांत आपली मसलत चांगले चांगले व्यापारीही घेतात, असें वाटत जाऊन तो फुगल्यासारखा झाला होता. गरजू व्यापारी याच्याजवळून रकमा वाटेल तशा मिळतात, हें जाणून वारंवार येऊन याची मनखुळावणी करण्यासाठीं मोठमोठ्या व्यापाराच्या बाबतींतही मसलत विचारीत ही गोष्ट खरी—अगदीं अक्षरशः खरी. परंतु त्या मसलतीप्रमाणें वागण्याचें त्यांच्या कधीं मनांत सुद्धां आलें नाहीं. कारण तसें त्यांनीं केलें असतें, तर त्या व्यापारांत कांहीं किफायत होण्याची आशाच त्यांनीं धरणें शक्य नव्हतें. रंगोपंताची मसलत विचारावयाची ती एवढ्याच करितां कीं, त्यांस मोठेपणा दिल्याखेरीज त्यांचेकडून आपल्या गरजा कशा भागणार ? कांहीं गहाणापाणाची चौकशी न करतां रंगोपंताकडून केवळ हातावर पांच पांच हजारांपर्यंत रकमा कशा मिळणार ? ' अमक्या व्यापारांत अमुक किफायत होणार आहे, त्यांत तशी किफायत होतांच त्यांत तुमची अमुक पाती अगदीं काढून ठेवल्याप्रमाणं आहे असं समजा. आपल्या मसलतीमुळं आणि मदतीमुळं जर आह्मांला किफायत होणार, तर आपल्याला किफायतीचा भाग दिल्याखेरीज आह्मांला तरी गोड वाटणार कसं ? ' अशा तऱ्हेच्या थापा दिल्या व मधूनमधून कांहीं नजरनजराणे दिले ह्मणजे रंगोपंत खुलतो व आपलें काम होतें, असें एकदां पांचचार पातीदारांस बुडव्या व्यापाऱ्यांना पक्कें कळून चुकलें असल्या कारणानें त्यांनीं यांच्या या स्वयंशहाणपणाचा चांगलाच फायदा घेतला. एकदोघां पारशी व्यापाऱ्यांनीं त्यांना पातीदारही केलें. त्यांत पैसा गुंतला.' पैसा रंगोपंताचा—अर्थात् चिंतोपंतांचा—आणि मेहनत मात्र पारशांची, व पैसा गुंतला तोही रंगोपंताच्या स्वतःच्या नांवानें नाहींच, त्या पारशांच्याच नांवानें ! जो व्यापार आरंभला त्यांत भांडवल गुंतलें तें त्यांच्या नांवानें असतें, तर कांहीं तरी असतें. आणि व्यापार उभारला विलायतच्या अनेक जिनसांच्या अडतीचा ! व्यापार वाढत चालला, आणि त्याबरोबर नफ्याची आशाही दाखविण्यांत येऊं लागली. अर्थात् अधिक रकमा घालण्याचा हुरूप रंगोपंतास येऊन चिंतोपंतांकडे पैशाच्या मागण्या जाऊं लागल्या. चिंतोपंतांचे थोडेबहुत डोळे उघडले गेले असल्यामुळें त्यानें गुंडोपंतास चौकशीसाठीं पाठविलें व त्याप्रमाणें गुंडोपंतानें येऊन रंगोपंताच्या विरुद्ध रिपोर्टही केला होता. अर्थात् पैसा तिकडून येणें बंद झालें. तेव्हां गुंडोपंताची कांहीं तरी कृति आपल्यास अडचणींत घालते आहे, हें ध्यानांत येऊन त्याचें मन मिळविल्याखेरीज आपल्याला आतां गत्यंतर नाहीं, हें रंगोपंतानें जाणलें, व हळूहळू आपला ताठा सोडून गुंडोपंताशीं गोडीगुलाबीनें वागण्याचा क्रम त्यानें सुरू केला. शिवाय गुंडोपंताच्या येण्यानें हल्लीं काय नुकसानी होत आहे, व तो कोणत्या व कशा तऱ्हेनें वागत आहे, हें त्यानें सरस्वतीबाईसही गुप्तपणें कळविलें. त्या गुप्त हकीकतींत त्यानें असेंही सरस्वतीबाईस लिहिलें होतें, कीं गुंडोपंत अलीकडे सीतारामास वारंवार भेटत असून तुह्मांस बुडविण्याचा कांहीं तरी कावा त्यानें चालविला आहे. अशी एकंदरींत हकीकत आणि त्यांत गुंडोपंत आपल्या दीराला वारंवार भेटत असतो व कांहीं

कारस्थान करीत आहे असें कानीं जातां-च सरस्वतीबाईच्या जीवाचें संतापानें काय झालें असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. नवऱ्याचें व तिचें रोज भांडण होऊं लागलें. त्यांत आणखी चिंतोपंतास संस्थानांतूनही कांहीं काळजी उत्पन्न होण्याजोगीं प्रकरणें उत्पन्न होऊं लागलीं, त्यामुळें त्याचें मन अलीकडे फारच उद्विग्न होऊं लागलें. प्रथम प्रथम त्याचें मन संस्थानांत लटपट करून स्नीकसाहेबांची मनधरणी करून आपली बढती करून घेण्याला काय काय योजना कराव्या या विचारांत गढून गेलेलें असे व आपला बडेजाव वाढवीत वाढवीत आपण कोणच्या पदवीला किती दिवसांत जाऊं याच्या विचारांत गर्क असे, नसत्या उलाढाली करून तो आपला वेळ घालवीत असे, तें सर्व आतां जाऊन त्यास आतां आपली आपण जागा कशी राखूं व शत्रूंपासून आपला बचाव कसा करून घेऊं, याच गोष्टींचा विचार येऊन पडला. कांहीं गोष्टी अशा घडल्या कीं, बुलिस्नीकसाहेबांच्या आधारावर तरी आपण नेहमीं आपलें संरक्षण करून घेऊं शकूं काय, याचीच त्याला शंका वाटूं लागली. वेळप्रसंग तसा आल्यास स्नीकसाहेब केव्हांच आपल्यास बुटाची ठोकर देऊन दूर सारील. त्याचें आपल्याकडून कांहींसुद्धां वांकडें होणार नाहीं. तो मात्र मनांत आणील तेव्हां आपल्यास चिरडून टाकील, असें त्यास पक्कें दिसून आलें. एका बाबतींत संस्थानांतील एका माणसानें त्याच्याविरुद्ध अर्ज केला असतां स्नीकसाहेबांनीं त्याची किती तासडपट्टी केली तेंही त्याच्या अनुभवास आलें होतें. केवळ तुला गय करतों, नाहीं तर आज तुझी गच्छंतीच आली होती असें त्यांनीं बजावून त्यास सांगितलें, आणि बाबूमहाशयांचें व त्यांचें भांडण झाल्या दिवसापासून बाबूंनीं तर त्यास खालीं पाडण्यासाठीं विडाच उचलला होता असें दिसलें. त्यांनीं संस्थानांतल्या लोकांकडून त्याच्याविरुद्ध अगदीं वरपर्यंत अर्ज करविण्याची नुसती गर्दी उडवून दिली होती. अशा स्थितींत बिचाऱ्याचें मन बायकोच्या मनधरण्या करण्याकडे कसें लागणार ! बायकोची मनधरणी ही सुखस्वास्थ्याच्या वेळेची गोष्ट. ज्यावेळीं सुखस्वास्थ्य नसेल मन अनेक प्रकारच्या काळजांनीं अगदीं वेबतावून गेलेलें असेल, त्यावेळीं त्या मनास शांति देण्याजोगें बायकोचें वर्तन असलें; तिनें त्यावेळीं सुखसमाधानाच्या गोष्टी काढून मनाला अंमळ तरी शांति देण्याचा यत्न केला, तरच ती बायको आणि तरच तो संसार. परंतु सरस्वतीबाई तसें करणारी किंवा करूं शकणारी बायको होती कीं नाहीं, हें वाचकांस सांगावयास नकोच. नवरा त्रासलेला पाहिला कीं तीही त्रासावयाची आणि आपण अमुक करा असें ह्मटलें असतां नवरा तसें करीत नाहीं हें पाहून तर तिनें अकांडतांडवच करावयाचें. रंगोपंताचीं तिला पत्रें येत कीं, कसेंही करून अमुक रक्कम पाठवा. आणि हिनें ती रक्कम पाठविण्याविषयीं त्रास दिला, कीं चिंतोपंत संतापून जायचा. अशा रीतीनें तो संतापला, कीं हिनेंही आकस्ताळेपणा करावयाचा. मग काय विचारतां ? दोघांची खूपच जुंपावयाची. अलीकडे अलीकडे तर दोघांचा सुखसंवाद फारच क्वचित् किंबहुना साधा संवादही फार क्वचित् होत असे. व्हावयाचा संवाद तो त्रासात्राशीचा आणि शिव्यागाळीचा. एके दिवशीं अशी भांडाभांडी चालली असतां एकदम चिंतोपंताच्या तोंडून असे शब्द निघून गेले "अग ××

तुझ्या नादीं आजपर्यंत लागून लागून तर मी या थराला येऊन पोहोंचलों, नाहीं तर सुखांत आपला तिकडे असतों. कोणची वेळ लागली होती तुझ्या जन्माला आणखी आपल्या लग्नाला कांहीं समजत नाहीं.........”

हे शब्द त्याच्या तोंडून निघाले मात्र, ते दिवशीं सरस्वतीबाईनें त्याच्यावर नुसता शिव्यांचा वर्षाव केला. इतका कीं, दुसरा एखादा नवरा असता तर त्यानें तिला खेटरानें बडवून तिचें पुनः मुखावलोकन केलें नसतें. परंतु तो बिचारा गप्प बसला. सरस्वतीबाईनें ते दिवसापासून याची अगदींच रया ठेविली नाहीं. आजपर्यंत जर त्यास अणुरेणु मात्र गृहसौख्य असेल, तर ते दिवसापासून तें अजीबात नाहींसें झालें. आधीं दोन चार दिवसच ती त्याच्याशीं पांच हजार रुपयांची रक्कम रंगोपंताकडे पाठविण्यासाठीं मागत होती. जवळ शिलक नाहीं तर कुठून तरी उसनवार आणा, म्हणून तिनें हट्ट धरला होता. याचें कारण इतकेंच झालें होतें कीं, रंगोपंतानें पुढील मजकुराचें पत्र तिला लिहिलें होतें:—“ गुंडोपंतानें येथें आल्यापासून माझी फार नाचक्की चालविली आहे. जेथें तेथें ‘ चिंतोपंत आतां यास मुळींच विचारीत नाहींत. यानें एक कवडी मागितली तरी यास आतां ते पाठवीत नाहींत. परवांपासून सतरा पत्रें त्यानें पाठविलीं, पण त्याचा जबाब सुद्धां नाहीं. याचा जोर येऊन जाऊन याच्या त्या बहिणीवर परंतु तिला—( ह्मणजे आपल्याला )—चिंतोपंत मुळींसुद्धां विचारीत नाहींत. तिच्या हातीं एक कवडी सुद्धां देत नाहींत’ असं सांगत असतो. काल रोजीं चिंतोपंतानं ( आपल्या बायकोला ) आतां टाकल्याप्रमाणेंच केलं आहे असं एका मोठ्या व्यापाऱ्याच्या दुकानांत मोठ्यानं एका गृहस्थाजवळ त्यानं माझ्या देखत बोलून मला म्हटलं, ‘ आतां चारन् पांच हजार तर राहूं द्या, पण दोन रुपये पत्र लिहून मागवा. मिळाले तर मी आपलं नांव बदलीन नांव ? ’

“ हें ऐकून मला किती संताप आला असेल याची कल्पनासुद्धां आपल्याला होणार नाहीं. अशा वेळीं आपल्याकडून कांहीं तरी बडी रक्कम आली, तरच त्यांच्या तोंडावर जोडे पडणार आहेत. नाहीं तर मला तोंड काढायला जागा नाहीं. आणखी अशा तऱ्हेनं एकदां बाजारांत पत उडाली, तर आरंभलेल्या व्यापारांत काय होईल याचा नेमच नाहीं ! ”

हें पत्र वाचल्यापासून गुंडोपंताबद्दलचा तिचा दीर्घद्वेष किती भडकला ! तिला असें झालें कीं, त्याच्या नरडीचा घोट घ्यावा. परंतु तो हजारों कोसांवर लांब पडल्याकारणानें तें तर कांहीं घडणें शक्यच नव्हतें. तेव्हां दुसरा उपाय त्याच्या तोंडावर जोडे पडतील असें करण्याचा व तो उपाय ह्मणजे ताबडतोब एक भली थोरली रक्कम त्याजकडे रवाना करण्याचा. ती रक्कम काय पाहिजे तें झालें तरी गेली पाहिजे हा तिचा कृतनिश्चय. तेव्हां अशा स्थितींत नवऱ्यानें आपल्या ह्मणण्याप्रमाणें करण्याचें टाकून उलट आपली निर्भर्त्सना केली व आजपर्यंत आपल्या नादीं लागल्याबद्दल पश्चात्ताप दाखविला, हें पाहतांच वर सांगितल्याप्रमाणें तिची स्थिति व्हावी यांत नवल काय ? रंगोपंतानें पत्रांत लिहिल्याप्रमाणें खरोखरीच आतां आपलें आपल्या नवऱ्यावर कांहीं वजन नाहीं असें झालें आहे. त्यां गुंडोपंतानें ह्मटल्याप्रमाणें जर का खरोखरीच या वेळीं रक्कम गेली नाहीं, तर

तो चांडाळ रंगूला छळील आणि आपलें बदनाम करील, यांत अणुमात्र संशय नाहीं, असें तिच्या मनानें घेतलें. अशावेळीं डगमगून उपयोग नाहीं. गुंडोपंतासारख्या भिकारड्याचें बोलणें खरें आणि माझ्यासारखीची घरांत मालकी नाहीं असें लोकांना वाटूं देणें म्हणजे काय ? तें कांहीं नाहीं. जें काय होईल तें होवो, पण ही वेळ साधून त्याचें नाक ठेंचलेंच पाहिजे. रंगूला पांच हजार रुपये पाठविले पाहिजेत. धाडस केल्याखेरीज गत्यंतर नाहीं, असा तिनें निश्चय केला. सरस्वतीबाई कमी धाडसी नव्हती.

# प्रकरण ५१ वें.

## भरलेंसें दिसूं लागलें.

रंगोपंतास पांच हजार रुपये तर पावले. आणि गुंडोपंताची फजिती झाली. इकडे चिंतोपंतांस ती बातमी कळली, तेव्हां त्यांनीं अर्थातच सरस्वतीबाईस ती रक्कम कशी व कोठून दिली अशाबद्दल विचारलें असतां तिनें अर्थातच त्यांस, " मला विचारूं नका, मी सांगत नाहीं " म्हणून उत्तरें दिलीं. नवराबायकोचें अतोनात भांडण झालें; इतकें कीं, सरस्वतीबाई संतापून मी पुण्यास जातें म्हणून फुरगटून बसली. मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे, कीं चिंतोपंतानें आतां आपल्या बायकोची खुशामत करण्याचे दिवस नव्हते. त्याचा त्यासच कांहीं हृद्रोग लागलेला होता. बुलिस्नीकसाहेबांकडलें त्याचें जाणें येणें आतां दिवसानुदिवस कमी होत चाललें होतें; आणि हा केव्हां गेला, तरी त्यास पहिल्याप्रमाणें साहेब भेटत नसत. इतकेंच नव्हे, तर त्याची व बाबू महाशयांची तोंडातोंडी केल्या दिवसापासून त्याच्याविरुद्ध अनेक अर्ज स्नीकसाहेबांकडे होत गेले, त्या अर्जांप्रमाणें आणखी कांहीं अर्ज आल्यास मी तुला क्षमा न करितां चौकशी करून योग्य तो इनसाफ करीन, असें त्यानें बजाविलें. अशा बजावणीनें चिंतोपंतानें जागें व्हावयास पाहिजे होतें; परंतु साहेबांची आपल्यावरली गेलेली मर्जी कोणत्या मार्गानें परत येईल तें शोधण्याकडेच त्याची चित्तवृत्ति लागली. बाबू महाशयांवर आपण जो आरोप केला, तो आरोप शाबीत करून दाखविल्यानें कदाचित् आपल्यावर साहेबांची पूर्वींप्रमाणें मर्जी होईल, असें वाटून त्या कामास त्यानें आरंभ केला होता. बाबू महाशय वर्तमानपत्रांस बातमी देतात हें सिद्ध करून देणें अर्थातच फार दुर्घट होतें; परंतु ज्यांचीं कामें स्नीकसाहेबांचे समोर येत,

अशा गृहस्थांस ऑफिसांतली माहिती व केव्हां केव्हां कागदपत्रही देऊन बाबू पैसे खातात असा अधिक आरोप करून तो सिद्ध करून देण्याच्या खटाटोपास स्वारी लागली होती. ज्याप्रमाणें चिंतोपंत या खटाटोपांत होता, त्याचप्रमाणें बाबू महाशय आपल्या बाजूनें चिंतोपंताच्या गळ्यांत कांहीं तरी मोठी थोरली घोरपड आणावी या खटपटींत होता. जो प्रकार झाला, त्यावरून त्यांनीं तर आपल्या चाकरीवर तिळांजळि दिल्यासारखें केलें होतें; परंतु ज्या सापानें आपल्यास अशा प्रकारें दंश केला, त्या सापाचें डोकें ठेंचल्याखेरीज आपण स्वस्थ बसणें हें अगदीं अयोग्य, असा त्याचा पक्का निश्चय होऊन, जोंपर्यंत आपण आहोंत तोंपर्यंत हा एवढा उद्योग केलाच पाहिजे असें त्यांनीं मनांत योजिलें होतें. आपली चाकरी या दाक्षिणी लुच्चामुळें आपणास नाहींशी होणार हें जाणून त्यांनीं आपली स्वदेशीं कांहीं तरी तजवीज करण्याची—अर्थात् स्वतंत्र धंदा पहाण्याची—व्यवस्था चालू केलीच होती. अशा रीतीनें परस्परांविषयीं परस्परांचे मनांत अत्यंत जोराचें वैमनस्य उत्पन्न होऊन परस्परांविरुद्ध डाव चालले असतां एका कामांत कांहीं कागद बाबू महाशयांनीं पक्षकारांस दाखविल्याचें, इतकेंच नव्हे तर नकला दिल्याचें, चिंतोपंतानें स्नीकसाहेबांस मुद्यानिशीं दाखवून दिलें. मात्र ज्या पक्षकारास ते कागद दिले, त्यास त्या बाबतींत क्षमा मिळेल अशी स्नीकसाहेबांकडून तजवीज करविली. स्नीकसाहेबांनीं तें पाहतांच ताबडतोब विशेष चौकशी न करतां बाबूसाहेबांस सस्पिंड केलें व खटला करण्याचा धाक घातला. सस्पिंड झाल्याचा हुकूम मिळतांच बाबू फारच चिडले आणि त्यांनीं चिंतोपंतास " महिन्या दोन महिन्यांच्या आंत तुझी काय अवस्था करतों, ती पहा ! " म्हणून बजाविलें. परंतु बाबू चाकरीवरून दूर झाल्यावर त्यांच्याच्यानें कांहीं होत नाहीं; त्याचें आपण नाक ठेंचल्यामुळें तो कांहीं तरी बडबड करतो आहे, अशा गुर्मींत व आतां आपल्या सचोटीबद्दल बुलिस्नीकसाहेबांची खात्री झाली आहे अशा आशास्तंभावर पुनः साहेबांची मर्जी संभाळण्याचा त्यांनीं उद्योग आरंभला. साहेबांसही तो अद्यापि अगदीं नकोसा झाला नव्हता. यामुळें व अजून कांहीं प्रकरणांत त्यांच्या बातमीदारांची त्यांस गरज होती, म्हणूनही त्यांनीं त्यास अगदींच फांटा देण्यासारखें आपलें वर्तन ठेविलें नाहीं. त्याच्याविरुद्ध आलेल्या अर्जांवरून जरी त्यांनीं त्यास अनेक वेळां तासडलें, तरी त्यास तोडून टाकला असें वाटण्याला तितकी जागा नव्हती. बाबू महाशय आफिसांतून गेल्या दिवसापासून त्याच्याविरुद्ध आलेल्या अर्जांचें स्वरूप भयंकर करून दाखविणाराही कोणी नसल्यामुळें, त्याचप्रमाणें दिवस गत होत चालल्यामुळें हळूहळू स्वारीस वाटूं लागलें, कीं आपलें बस्तान पुनः पहिल्यासारखें बसणार. आपण आपल्याविरुद्ध उठविलेला शत्रु जागृत आहे, त्यास आपण फार चिडविलें आहे हें त्याच्या लक्ष्यांतून जात चाललें होतें. याला जसा विसर पडत चालला होता, तसा बाबू महाशयांस मात्र पडत नव्हता. त्यांस झालेला त्रास, त्यांचें झालेलें नुकसान त्यांच्या मनांत अगदीं जागृत होतें. शेवटला चाकरीवरून दूर केल्याचा हुकूम आपल्यास केव्हां येईल याचीच ते वाट पहात होते. आतां पुनः ती चाकरी आपल्यास मिळावी अशाबद्दल त्यांची खटपट उगीच बाह-

रून चालली होती. एवढ्याकरितां, कीं आपण कांहीं दुसरीं कुलंगडीं तयार करीत आहोंत असें कोणास वाटूं नये. चाकरी परत मिळण्याची खटपट हा संस्थानांत राहण्यासाठीं बहाणा ह्मणून मात्र त्यांनीं चालविली होती. चाकरी गेल्यामुळें आपण फार लाचार आहों असें पुरतेपणीं दाखविण्यासाठीं व चिंतोपंताच्या डोळ्यांत धूळ टाकण्यासाठीं, थोडे दिवसांनीं बाबू चिंतोपंताच्या घरीं जाऊन त्यांनीं त्यांस फार नम्रपणें नमस्कार करून असेंही ह्मटलें कीं, " मला सस्पिंड करण्यांत आपला कांहीं तरी हात असावा असं त्या झटक्यास वाटून मी आपल्याला दुरुत्तर बोललों ह्याबद्दल क्षमा करावी. तोंडचं अन्न गेल्यामुळं माझ्या तोंडून अक्षरं निघून गेलीं. शोधाअंतीं मला असं कळलं आहे कीं, आपला कांहींच यांत संबंध नाहीं. आपण उलट मला संभाळून घेण्याचा यत्न केला. तर आतां मला शेवटपर्यंत संभाळून घेऊन पुनः चाकरी मिळेल असं करावं. साहेबांवर आपलं फार वजन आहे, आपण युक्तीनं गोष्ट काढून माझी तरफदारी केल्यास सहज काम होणार आहे. निदान या कामांत आतां अधिक कांहीं न होतां मला राजीनामा देऊन अब्रूनिशीं परततां येईल असं तरी करा."

वरील सर्व भाषण बाबूंनीं इतक्या शिफीनें, मवाळीनें व आदबीनें केलें, कीं प्रथम प्रथम जरी चिंतोपंतास हा कांहीं तरी लुच्चेगिरीनें आला आहे. असें वाटलें, तरी पुढें पुढें त्यांच्या त्या ' आदबसे ' बोलण्यानें, बाबूंच्या इच्छेप्रमाणें डोळ्यांत धूळ पडलीसें दिसूं लागलें. निदान आपण बाबूंच्या बोलण्यानें अगदीं सर्व विसरलों असें त्यानें दाखविलें. तो केवळ कच्चा होता असें थोडकेंच आहे. त्यानेंही त्यास गोड गोड " बोलून आपण तुमचं बोलणं मुळींच मनावर घेतलं नाहीं, मनुष्य रागाच्या व खेदाच्या झपाट्यांत असला, ह्मणजे त्याचे तोंडांतून जे उद्गार निघतात, ते मनावर घेण्याजोगे नसतातच. माझ्या हातून जेवढं कांहीं होईल, तेवढं मी करीन त्याबद्दल तुह्मांला शंका नको. " असें अनेक प्रकारांनीं बोलून त्यानें त्यांचें समाधान केलें. होतां होतां बाबू महाशयांनीं संस्थानांतल्याच एका दरकदाराच्या मुलास शिकविण्याचें काम पतकरलें आणि आपल्यास पुनः चाकरी मिळावी म्हणून खटपट करण्याचा बहाणा कायम ठेवून स्वारी तेथेंच राहिली. ती दरकदाराच्या मुलाची शिकवणी, त्यांस तेथेंच शहरांत राहण्यास सबब म्हणून फार उपयोगी पडली. त्यांतल्या त्यांत आणखी मौज ही होती, कीं ज्या दरकदाराच्या मुलास बाबूसाहेब शिकविण्यास राहिले होते, तो दरकदार चिंतोपंतास पाण्यांत पहाणारांपैकींच एक होता.—पण त्या संस्थानांत चिंतोपंतास पाण्यांत पहात नव्हता असा होता कोण ?—जितके म्हणून नबाबाचे जुने सरदार, दरकदार व संस्थानचे जुने पिढीजाद नौकर, तेवढ्या सर्वांस असें वाटत होतें कीं, हा दक्षिणेचा गलीम आला आहे, हा संस्थानचा सत्यनाश करण्यासाठीं आला आहे. हा स्नीकसाहेबांकडे वारंवार जाऊन नबाबाच्या व आपल्या सर्वांच्या चुगल्या सांगतो, अशी सर्वांची पक्की खात्री होती, आणि आपलें संस्थान बुडविण्याला हा एक दिवस कारण होणार, अशीही पण ज्यास त्यास भीति वाटतच होती. बाबू महाशयांनीं या सरदाराकडे जाऊन त्याच्याबद्दल जितकी नालस्ती शक्य तितकी चालविलीच असे,

यामुळें,आणि चिंतोपंतामुळें त्याची बिचाऱ्याची चाकरी गेली यामुळें त्याव्याबद्दल ज्याला त्याला कींव येऊन एकानें त्यास, " ठीक आहे, मी तुम्हाला पन्नास रुपये दरमहा देतों. आमच्या चिरंजिवांना इंग्रजी शिकवीत जा " असें म्हणून ठेवलें. नबाबी दरकदार काय ! मनांत आलें, कीं कर्णाचे अवतार !

चिंतोपंताची बाहेर सफाई सुरू झाली खरी, परंतु घरांत सफाई लवकर होईना. बाहेरची विवंचना बाह्यतः कमी होत चालली, तसतसें त्याचें मन पहिल्याप्रमाणें तितकें आसक्त राहिलें नाहीं. तो बायकोची मनधरणी करूं लागला. थोडे दिवसांपूर्वी पांच हजार रुपये पाठविले ते कोठले असें विचारून बायको नीट उत्तर कधींच देत नसे. आणि याला तर राहून राहून फार आश्चर्य वाटे, कीं बायकोनें रुपये पाठविले कुठले ? त्यावेळीं तितकी रक्कम घरांत तिच्या जवळ शिलक नव्हती हें तर उघडच होतें. आणि शिलक नसतांना रक्कम ज्या अर्थी गेली, त्याअर्थी तिनें ती कोठून तरी उसनवार आणली असली पाहिजे असें त्यानें ताडलें. परंतु सरस्वतीबाई त्यास मुळींच दाद लागूं देईना. यानें नानाप्रकारांनीं विचारलें तरी तिचें उत्तर एकच. " मला ठाऊक नाहीं. मला विचारूं नका. मी सांगणार नाहीं. "

आज नाहीं उद्यां तें बाहेर पडेल ! ज्या कोणापासून तिनें उसने आणले असतील, तो आज नाहीं उद्यां मागण्याला येईलच. अशा समजुतीवर तो राहिला. परंतु मागायला येणाराचें नांव नाहीं. तेव्हां मात्र त्यानें बायकोस वारंवार त्यासंबंधानें विचारण्याचें चालविलें. तरी कांहीं नाहीं. मग त्यानें एके दिवशीं युक्ति केली. एके दिवशीं तो तिला म्हणतो, " जर कोणाचे उसने आणले असले, तर उगीच व्याज भरीत बसण्यापेक्षां ते देऊन टाकावे, तें चांगलें. कोणाचे आणले आहेत तें सांगितलें, तर मी आजच्या आज निकाल करून टाकतों. माझ्याजवळ रक्कम आली आहे ? "

तें ऐकतांच सरस्वतीबाईच्या चेहऱ्यावर जरा आनंदाची कळा आली असें दिसलें. परंतु ती कमी वस्ताद होती असें थोडकेंच होतें ! " द्या तर मग ती इकडे म्हणजे मी ती ज्याची त्याला पोंचवितें. " असें म्हणून ती त्याच्याजवळ रक्कम मागूं लागली. तो म्हणे, मला सावकाराचें नांव सांग, मी पावती करतों. ती म्हणे, मी करीन. शेवटीं त्यानें रक्कम दिली नाहीं, आणि तिनें आपण कोठून आणि कसे रुपये आणले तें त्यास सांगितलें नाहीं. त्यावर चांगले आठ पंधरा दिवस गेले, तरी दोघांपैकीं एकही आपला हेका सोडीना. चिंतोपंत म्हणे, ' जो कोणी कर्जदार असेल, तो आपो आपच मागण्यास येईल.' सरूबाई म्हणत, " बरं कोण तो आला म्हणजे द्या. मला कशाला तीनतीनदां विचारता ? " घरांतील प्रत्येक माणसापाशीं त्यानें बारकाईनें चौकशी केली, परंतु कांहीं पत्ता लागला नाहीं. शेवटीं काय घोटाळा आहे तो खुबीनेंच काढला पाहिजे असें मनांत आणून एके दिवशीं त्यानें "माझं कांहीं चालूं देत नाहींस तर नको बोआ. आमचं राहिलं. तुझी तूं रक्कम आणलीस तशी नेऊन दे.कोणीकडून ज्याची रक्कम आणली असशील त्याची त्याला पोंचली म्हणजे झालं. सध्या आपल्याला दिवस चांगले नाहींत, तेव्हां कोणाचं असं मोठं थोरलं देणं ठेवणं बरं नाहीं. कोणा दुष्मानास तें कळलं, तर विनाकारण एखादं भलतंच

खटलं उपस्थित होऊन नसता त्रास व्हा-यचा. तेव्हां अशा वेळीं आपण होतां होईल तों निर्मळ असावं तें चांगलं. निदान लोकांना आपल्या विरुद्ध कांहीं किटाळ रचायला जागा देतां उपयोगी नाहीं. त्यांतून आणखी तूं ती रक्कम कोणाकडून कशी आणलीस, कांहीं सांगतही नाहींस, तेव्हां त्याच्याबद्दल दुसरी तजवीजही कांहीं करतां येत नाहीं. हरकत नाहीं ही रक्कम घे, आणखी निकाल करून टाक कसा." असें तिला म्हटलें व तिच्या स्वाधीन रकम केली. रकम हातीं मिळतांच आपला विजय झाला असें सरस्वतीबाईला वाटलें, त्यामुळें व दुसऱ्याही कांहीं कारणानें तिला आनंद झाला. इकडे चिंतोपंतानें मनांत अशी कांहीं योजना केली होती, कीं हिच्या हातीं रकम दिल्यापासून हिच्यावर सक्त नजर ठेऊन, ती रकम कोणीकडे जाते हें पहावयाचें. त्याला भीति होती, कीं ती रकम कदाचित् रंगोपंताकडे जाईल. परंतु तशी ती गेल्याचें कांहीं दिसलें नाहीं, तिनें पत्रें टाकण्यास दिलीं, तर तीं आपल्याकडे आल्यावांचून टपालांत जाऊं नयेत अशी त्यानें तजवीज केली होती. तेव्हां टपालानें ती रकम गेली नाहीं किंवा कोठें हुंडीही घेतली गेली नाहीं असें त्यास दिसून आलें. पांचचार दिवसांच्या तिच्या हालचालींत रकमेचा निकाल झाल्याचें कांहींच दिसलें नाहीं. सहावे दिवशीं तिनें "रकम ज्याची त्याला पोंचती होऊन निकाल झाला. आतां कांहीं उरलं नाहीं," असें त्यास सांगितलें. त्यास मोठें आश्चर्य वाटलें. खोटें वाटलें. तिला त्यानें अनेक प्रकारांनीं त्याचा खुलासा विचारला. परंतु उत्तर एक ना दोन. शेवटीं त्यास स्वस्थच बसण्याची पाळी आली. करतो काय?

इकडे रकम हातीं पडल्यापासून पांचसहा दिवस जो उत्साह सरस्वतीबाईस होता, तो दर दिवशीं पुढें कमी कमी होत चालला असें दिसलें. आजपर्यंत ती थोडीशी विवंचनेंत दिसतच असे, परंतु आतां त्या विवंचनेला थोडा निराळा—ती विवंचना अतिरेकानें वाढत गेल्याचा रंग दिसूं लागला. ती दिवसानुदिवस वाळत चालली. कधीं कोठें बाहेर जात नसे. नबाबाच्या जनानखान्यांतून बोलावणें आलें, तरी तिनें कांहीं तरी सबबी काढून टाळावें. गांवांतील मोठमोठ्या गृहस्थांच्या घरून कांहीं कार्यानिमित्त आमंत्रणें आलीं, तरी हिनें जाऊं नये. कोणास आपल्या घरीं बोलवूं नये, असा प्रकार आज बरेच दिवस चालला होता, तो आतां अतिरेकास गेला. चिंतोपंतानें एके दिवशीं "असं कां? तुला कांहीं होतं कीं काय?" म्हणून विचारलें. त्यास सरळ उत्तर आलें नाहीं. "आतांशा तूं आंगाखांद्यावर घालीत नाहींस, पहिली तुझी हौस गेली कुठें," म्हणून त्यानें तिला विचारलें, तरी त्याला उत्तर नाहीं. एकदां तर नबाबाच्या मुलीचें लग्न होतें, तिकडे नजराणा घेऊन जाणें जरूर होतें, असें असतांना ती गेली नाहीं. डोकें दुखतें म्हणून आंथरूण घालून पडली. तेव्हां चिंतोपंतास फार आश्चर्य वाटलें. त्यानें अनेक प्रकारानें तिला प्रश्न विचारले. पण कपाळाला आंठ्या घालून 'मला उगीच कां त्रास देतां'? असें ह्मणण्यापलीकडे अगर तोंडावरून पदर घेऊन दुसऱ्या कुशीस वळण्यापलीकडे उत्तर नाहीं. चिंतोपंतानें घरांत सुद्धां बारकाईनें शोध केला. कुळंबिणी मोलकरणी-

पासून विचारपूस केली, पण त्यास कांहीं सुद्धां समजेना. अशा स्थितींत तो तरी काय करणार ? आज नाहीं उद्यां कळेल, असें ह्मणून स्वस्थ बसला. सरस्वती-बाई मात्र दिवसानुदिवस उदास व कृश होत चालली होती. तिला व्याधि तर कांहींच दिसत नव्हती. परंतु कांहीं तरी जबरदस्त आधीनें गांठलें होतें, हें निः-संशय दिसलें.

इकडे चिंतोपंत या गृहविवंचनेंत होता, तरी त्याच्या बाहेरच्या उलाढाली कांहीं कमी नव्हत्या. त्या होतां होतां बऱ्याच वाढत जाऊन संस्थानांत त्यास शत्रु नाहीं असें घर नाहीं, असें होण्यास फार अवधि उरला नव्हता. त्याला मात्र बिचाऱ्याला स्नीकसाहेबांची कृपा आपल्यावर पूर्ण आहे असें वाटूं लागून तो अधिकाधिक निर्धास्त होत चालला होता. बाबू महा-शयांचें त्याचेकडे येणेंजाणें वाढत्या प्रमा-णावर होतें, यामुळें व त्याच्या अदबीच्या भाषणानें अगदीं भुलून गेल्यानें तो आतां आपल्यासंबंधानें जळत नाहीं असें त्यास वाटूं लागलें होतें. इतकेंच नव्हे तर बाबू आतां त्याची फार खुषामत करीत असत, यामुळें तो अधिक निर्धास्तीनें व्यवहार करूं लागला होता.

असा एकंदर प्रकार चालला असतां, एके दिवशीं भरदोनप्रहरीं चिंतोपंत घाब-ऱ्याघाबऱ्या घरीं आला. त्याचा चेहरा अ-तिशय घाबरलेला होता. घरांत शिरतांच आधीं तो आपल्या बायकोकडे गेला व तिला एकदम म्हणतो, "आजच्या आज रात्रीच्या गाडीनं आपला सगळा ऐवज घेऊन तुला गेलं पाहिजे. बरोबर विश्वासू माणूस देतों. घटकेचा सुद्धां विलंब न करतां आटपाआटपी कर."

"तें कां ?"

"कां तें विचारण्याची सोय नाहीं. आपला हट्ट आतां या वेळीं घेऊन बसूं नको. ऊठ, ऊठ."

"आणखी आतां ? माझ्या दागि-न्यांचं कसं होणार ? ते कसे हातीं लागणार ?"

"ह्मणजे ?" चिंतोपंतास तिच्या बोलण्याचा मुळींच कांहीं अर्थ न समजून त्यानें प्रश्नार्थक आवाजानें म्हटलें.

पण ती अधिक बोलेना. फक्त रडूं लागली.

"म्हणजे ? तूं म्हणतेस तरी काय ?" चिंतोपंत पुनः उद्गारला. "तूं म्हणतेस काय याचा मला अर्थच समजत नाहीं. आजपर्यंत केले एवढे दागिने काय थोडे झाले ? आतां जिवावरती येण्याचा प्रसंग आला, तरी तुला आपले तुझे दागिनेच सुचताहेत, याचा अर्थ काय ? चल ऊठ, तयारी कर. आतां इथें कोण्या वेळीं काय प्रसंग येईल याचा नेम नाहीं. मी सुद्धां तुझ्याचबरोबर जुळलं तर निघून येतों. जें काय आपलं किंमतवान् म्हणून आहे तें सारं—चट सारं—घेऊन चल. ऊठ, ऊठ. नाहीं तर सगळं बुडालं म्हणून समज."

परंतु सरस्वतीबाई कांहीं केल्या उठेना आणि तिच्या तोंडांतून शब्द म्हणून बाहेर पडेना. डोळ्यावाटेचें पाणी कांहीं केल्या थांबेना. चिंतोपंत अतोनात त्रासला. त्याजवर कांहीं तरी आणीबाणीचा प्रसंग आलेला असून अशा वेळीं बायकोनें आ-पल्या ह्मणण्याप्रमाणें मुकाट्यानें करावयाचें सोडून ती नुसती "माझे दागिने ! माझे दागिने !" असें करीत बसली आहे, हें पाहून त्याच्या अंगाचा नुसता तिळ-पापड उडाला.

" अग ऊठ, ऊठ. जळूं देत मरूं देत ते दागिने ! आहेत तेवढे घाल आतां जन्मभर म्हणजे मिळविलेस, " असे तो दांत ओंठ खाऊन ह्मणाला.

" अहो आहेत तेच. आहेत तेच कसे येतात? " इतकेंच विव्हळत रडत ती म्हणाली आणि पुनः मुग्ध बसून थोडया वेळानें आपल्याशींच " हुश्श, आयाइग, कोणीकडून मला बुद्धि सुचली आणखी अशा भानगडींत पडलें " असें विव्हळली व एकसारखी उसासे टाकून रडत होतीच.

चिंतोपंत आधींच गर्दीत, आणखी या तिच्या बोलण्यानें फारच बुचकळ्यांत पडून आतां करावें काय असें त्यास झालें. सरूबाईच्या विव्हळण्याचा व मधून मधून काढल्या जाणाऱ्या उद्गारांचा त्याला कांहीं सुद्धां अर्थ कळेना. नीट विचारलें तर ती धड कांहींच सांगेना. तथापि तिचें म्हणणें काय तें ऐकण्यासाठीं तिच्या विनवण्या करण्याची किंवा इतर कोणत्याही प्रकारानें विलंब करण्याची ती वेळ नसल्यामळें त्यानें " तुझ्याच्यानं होत नसली तयारी, तर मी करतों. मी सगळी बांधाबांधी करतों, परंतु तूं आजच्या आज इथून चालती हो. आण त्या किल्ल्या इकडे " असें म्हणून तिच्या कमरेला लटकणाऱ्या त्या सांखळीच्या किल्ल्या त्यानें हिसकल्या व तिच्या पेटीकडे तो चालला, तेव्हां तर ती अधिकच मोठयानें विव्हळून म्हणते: " अहो, काय त्या किल्ल्या घेऊन करतां? आहे काय त्या पेटींत ? " परंतु चिंतोपंत तितक्यांत पेटीजवळ जाऊन त्यानें पेटी उघडलीही, पण त्यांत काय आहे ? काय शेंपन्नास रुप्याचीं भांडीं दिसलीं तेवढींच. सोन्याचा दागिना म्हणून एकही दिसेना. तें पहातांच तोही दचकला. दुसरी एक पेटी जवळच होती, ती त्यानें उघडून पाहिली, तींत शालजोडया, पैठण्या, कोरीं लुगडीं वगैरे कपडे. सोन्यामोत्यांच्या दागिन्यांचें नांवही नाहीं. मग तर तो फारच दचकला. सरस्वतीबाईंचे आधीं सासऱ्याच्या हयातींत केलेले व स्वतःच्या हयातींत केलेले, मिळून चांगले दहा हजारांचे दागिने होते. त्याचप्रमाणें थोरल्याला व दुसऱ्या धाकटया मुलालाही कांहीं हसळी, गोफ, कडीं वगैरे दागिने केले होते. परंतु त्यांपैकीं कुठें जाळीचे मणी, चंद्रहाराच्या तुटलेल्या टिकल्या, एक दोन पुतळ्या इतक्यांखेरीज पेटींत कांहीं सुद्धां दिसेना. हें गौडबंगाल आहे तरी काय ! त्यानें चटकन बायकोकडे येऊन तिला, ' हें आहे काय ? दागदागिने सोनेंनाणें झालें काय ?' म्हणून जरा कठोर अशा आवाजानें प्रश्न केला. परंतु ' तेंच तर मीं म्हटलं ' असें उद्गारून पुनः नुसतें डोळ्यांतून पाणी काढण्याचें व मुक्याचें व्रत तिनें धरलें. तिच्या तोंडून शब्द निघेना किंवा ती काढीना. कांहीं माणसें अशीं असतात कीं तीं ' यांतून आपण सहज निभावून जाऊं ' अशी हिंमत धरून एखादें साहस करतात पण त्या साहसाचा परिणाम आपण अनुमानतों तसा न झाला, तर आपलें काय होईल याचा विचार त्यांस आधीं मुळींच होत नाहीं. आपण अनुमानल्याप्रमाणेंच त्याचा इष्ट परिणाम होणार, अशी त्यांची फाजील खात्री असते. अर्थातच त्या अनुमानाहून भिन्न असा अनिष्ट परिणाम झाला, ह्मणजे मग त्यांना इतका गर्भगळितपणा येतो, कीं कांहीं विचारूं नये. त्यांचा हातपाय त्यांस उचलेनासा होतो. त्यांच्या डोक्यांत विचार

रहात नाहींत. छातींत धैर्य रहात नाहीं. सगळ्या गात्रांचें बळ नाहींसें होतें, आणि संकटास तोंड देण्याचें सामर्थ्य अणुमात्र उरत नाहीं. सरस्वतीबाई त्याच व्यक्तिवर्गांतली होती. तिला यावेळीं काय बोलावें त सुचेना. यदाकदाचित् सुचलें असलें, तरी तें उच्चारण्याला तोंडांत बळ नव्हतें. आपल्या हातून फार फार मूर्खपणाचें, अजागळपणाचें, सर्वस्वनाशाचें असें कृत्य झालें. आतां आपणास तोंड तरी दाखविण्यास जागा कोठें आहे असें मनांत येऊन कचित् तिचा गोंधळ झाला असावा. किंबहुना त्या कृत्याचा जो परिणाम झाला, असें तिला आतां दिसून आलें, त्या परिणामानें तिचें डोकें बिघडून जाऊन तिला अर्धवट वेड तरी लागलें असावें. त्याखेरीज तिची अवस्था अशी होतीना. ज्या नवऱ्याला तिनें आजपर्यंत कधीं सरळ उत्तर दिलें नव्हतें, प्रत्येक कामीं ज्यावर तिनें आपला शह ठेवून त्याला आपल्या प्रत्येक ह्मणण्याप्रमाणें करण्यास लाविलें, त्यानें यत्किंचित् कांहीं तिच्या मर्जीविरुद्ध केलें तर जी संतापानें लाल होऊन त्याला हवें तसें टाकून बोलण्याला कमी करीत नसे, त्याच नवऱ्याच्या बोलण्याला उत्तरादाखल एक शब्द सुद्धां तिला सुचेना. त्यानें डोळे वटारून पाहिलें असतां ती त्याच्या डोळ्यांस डोळा न देतां खालीं मान घालून एकसारखी अश्रू गाळू लागली. या सगळ्यावरून हें अगदीं उघड दिसलें, कीं आपल्या हातून कांहीं तरी फारच गर्हणीय, कोणीही क्षमा न करण्याजोगा असा गुन्हा झाला आहे, हें तिच्या मनास डांचत होतें. हा गुन्हा कोणाच्या, त्यांतून नवऱ्याच्या तर, दृष्टोत्पत्तीस मुळींच येऊं देणार नाहीं अशी तिची उमेद होती; परंतु ती सर्व उमेद आतां कोणीकडे नाहींशी झाली आतां मान खालीं घालून तोंड लपवून झाली गोष्ट कबूल करण्याखेरीज दुसरा मार्गच उरला नव्हता. चिंतोपंतानें तर अगदीं दांतओंठ खाऊन, “ बोल, बोल दागिन्याचें काय केलंस अवदसे ! ” असें ह्मटलें; आणि तो क्रूरपणानें तिच्या त्या विव्हळ झालेल्या देहाकडे पहात होता. आजपर्यंत त्याच्या तोंडून असले शब्द कधींही निघाले नव्हते. परंत चिंतोपंत कोणत्या प्रकारचा माणूस होता; पैसे ह्मणजे त्याला केवढें दैवत होतें, आणि तो जरी बायकोच्या जरबेखालीं राहून पैशाच्या लोभानें तिचें ऐकून आजपर्यंत हरएक बाबतींत एखाद्या बाईलबुद्ध्याप्रमाणें वागत असे, तरी त्या सगळ्याच्या वर अ[illegible] करून [illegible]गारा असा द्रव्यलोभ त्याच्या मनाचा स्वामी होता, हें त्याच्या अनेक वेळच्या वर्तनांनीं वाचकास दिसलेंच असेल. यावेळीं घरातले दहा पधरा हजाराचे दागिने आपल्या बायकोनें नाहींसे केले असें त्यास दिसतांच त्याचा तो बाइलेपणा अजिबात नाहींसा झाला. बायको किती बोलली तरी ज्यानें कधीं ब्र काढला नाहीं त्यानें आज एकदम तिला ‘ अवदसे ! ’ म्हणून शिवी दिली. इतर कोणत्या प्रसंगीं जर त्याच्या तोंडून असा अपशब्द निघाला असता, तर सरस्वतीबाईनें त्याचें काय केलें असतें, त्याचे किती वाभाडे काढले असते, हें कल्पनेनें सहज समजणार आहे. परंतु आज तिनें एक अवाक्षरसुद्धां उच्चारलें नाहीं. आपले दागिने गेल्याबद्दल तिला दुःख झालें होतें तें निराळेंच; आणि आपण केलेलें कृत्य नवऱ्यास न कळतां

आपल्याला सहज निस्तरतां येईल असें वाटून तिनें आजपर्यंत छपवून ठेवून शेवटीं तें अशा तऱ्हेनें उघडकीला आलें, याबद्दल तिला फार पस्तावा झाला तो निराळाच. आपले दागिने नाहींत, हें कळूं नये ह्मणूनच ही आज कित्येक महिन्यांत कोठें बाहेर गेली नाहीं. प्रत्यक्ष राजवाड्यांत बोलाविलें असतांनाही ती एकवार गेली नाहीं,हें चिंतोपंतास आठवलें. दागिने नसल्यामुळें अर्थातच तिला ओकें ओकें व सुनकें जातां आलें नाहीं. घरांत सुद्धां तिनें कधीं आतांशीं ठळक दागिना अंगावर घातला नाहीं. याचें कारण तरी तेंच. आपल्याशीं इतकी लबाडी केली हें पाहून तर राजश्रीस फारच चीड आली आणि त्यानें " दागिने ? दागिने कुठें आहेत बोल ! " असें एकसारखें विचारण्याचा तडाखा चालविला. ती तर कांहीं बोलेना. त्या दागिन्यांच्या जाण्यानें चिंतोपंत अगदीं नजीकचें संकट—कीं ज्याच्यामुळें तो आपल्या सगळ्या नगद ऐवजासकट बायकोला गांवीं लावून देण्याच्या निश्चयानें एवढा धांवत आला होता, तें संकटसुद्धां बिचारा विसरला. जाण्याच्या गर्दीच्या ऐवजीं दागिने कुठें आहेत,तें सांगण्याचीच गर्दी त्यानें तिच्या भोंवतीं लाविली. त्याला दुसरें कांहीं सुद्धां सुचेना. कसें सुचावें ? ज्याला साधारणतः द्रव्याचा अतिलोभ नाहीं, त्याला देखील असें नुकसान झालें तर कांहीं सुचावयाचें नाहीं. मग हा तर द्रव्यलोभ्यांचा शिरोमणी ! त्यानें नुसती हाय घेतली. " बोल! बोल ! कुणाला दिलेस का काय सगळे घरांतले दागिने ? " त्यानें अत्यंत कठोरवाणीनें दांतओठ खाऊन व तिच्या दंडास जोराचा हिसका देऊन विचारलें.

आतांच्या त्याच्या विचारण्यांत कांहीं तरी भयंकर अर्थ आहे, आपल्या नवऱ्यास कांहीं तरी फार भयंकर संशय आलेला आहे, असें एकदम सरस्वतीबाईंस वाटलें. आणि त्या संशयापर्यंत मजल येऊन पोंचली असें पहातांच तिचेंही पित्त खवळलें. आतां जर स्पष्ट बोललें नाहीं तर भलतेंच कांहीं तरी होईल असें तिला दिसून आलें, आणि ती एकदम म्हणते, " कोणाला द्यायचे आहेत ? अशी मी कोणाला देणारी का बायको आहें ? हीच माझी परीक्षा केलीत ? मी ते...मी ते...गहाण टाकले आणखी... आणखी......आणखी..." पुढें तिच्या तोंडून कांहीं केल्या शब्द निघेनात. परंतु कांहीं तरी सांगण्याचें मनांत होतें खास.

' गहाण टाकले ' हे शब्द ऐकण्याबरोबर चिंतोपंताला तरी काय वाटलें असेल !

" गहाण टाकले ? इतके थोरले दागिने गहाण टाकले ? आणखी मला त्याचा गंध सुद्धां लागूं दिला नाहीं ? छे. मला नाहीं खरं वाटत. कोणाजवळ गहाण टाकले ? काय म्हणून टाकले ? " त्यानें अत्यंत उद्वेगानें तिला विचारलें आणि तिला मारण्यासाठीं हात उगारला.

आपण खरें सांगत असतांही नवरा अजून पूर्वींच्याच संशयांत राहून आपल्यावर हात उगारतो, हें पाहून सरस्वतीबाईंचाही आतांपर्यंत दबून राहिलेला क्रोधाचा व उद्वेगाचा अग्नि एकदम पेट घेऊन उठला. तिला त्याचें तें बोलणें आणि आजपर्यंत ज्याचा अणुरेणुमात्र अनुभव नाहीं, किंबहुना असा अनुभव येणें शक्यसुद्धां वाटलें नाहीं, तो हात उगारून मारण्यास धांवण्याचा अनुभव येतांच तिच्या नैसर्गिक अशा तामसी

वृत्तीनें पेट घेतला. ती आतांपर्यंत अगदीं निचेष्ट झाल्याप्रमाणें बसली होती. तिच्या डोळ्यांतून दुःखाच्या व पश्चात्तापाच्या धारा चालल्या होत्या. तें सर्व आतां एकदम बदललें. ती उठून उभी राहिली. तिच्या डोळ्यांतून पाणी चाललेंच होतें. पण तें आतां क्रोधानें व उद्वेगानें येऊं लागलें. तिणें उग्र स्वरूप आणलें. आपल्या कमरेवर एक हात दिला एक हात पुढें केला आणि म्हटलें:—

" हो, हो. मीं गहाण टाकले. गुलाबचंद रामचंद मारवाडी जवाहिरे आपणाकडे येतात, त्यांच्याकडे गहाण टाकले. आणखी तसं करायला लागायला कारण आपणच. माझ्या रंगूची अब्रु जाऊं लागली ती मला सहन होईना. तुम्हांला ह्मटलें या खेपेला रुपये पाठवा म्हणून; पण तुह्मी त्या गुंड्याच्याच नादीं लागून पाठवाना. रंगूचं मला पत्र आलं, कीं ' मला रुपयांची गरज आहे असं नाहीं, पण गुंड्या बाजारांत माझी आतां इकडे पत नाहीं, मला इकडून एक कवडीसुद्धां मिळायची नाहीं असं सांगत फिरतो आहे, इतकंच नाहीं तर आपली सुद्धां नालस्ती करतो आहे. तर त्याची एकवार फजिती करण्याकरतां ह्मणूनच पांच हजार रुपये पाठवा. ' तुह्मी तर ऐकनात. आणखी मी तर निश्चय केला होता, कीं या खेपेस रुपये पाठवून त्या मेल्या गुंड्याच्या तोंडावर पायपोस पडतील असं करायचं, म्हणून मी मुकाट्यानं गुलाबचंद भाईकडे रुपये मागितले. त्यानं आपल्याजवळ नाहींत, पण आपण कांहीं गहाण ठेवाल तर कुठून आणून देतों म्हणून सांगितलं. मी अटीलाच पेटलें होतें. त्यानं मागितला तितका ऐवज गहाण ह्मणून देऊन, पांच हजार रुपये दिले पाठवून. खरं आहे तें सांगितलें. आतां काय करायचं असेल तें करा. मला वाटलं कीं, पुनः आपल्याजवळ टकळी लावून रुपये घेईन आणखी नेऊन भरून दागिने सोडवून आणीन. मी आपल्याकडून......"

पण तिच्या तोंडून पुढें शब्दच निघेनात. कारण तिच्यासमोर उभा असलेला चिंतोपंत एकाएकीं फेंपरें आल्याप्रमाणें करून एकदम आपलें डोकें धरून खालीं बसला. त्याची कांहीं तरी बोलण्याची खटपट सुरू होती असें दिसलें. तितक्यांतल्या तितक्यांत "आणखी घेतलेस पांच हजार परवां ते ? " इतके शब्द बोबड्या बोबड्याप्रमाणें बाहेर पडलेच. सरस्वतीबाई त्यास धरण्यासांवरण्यासाठीं पुढें झाली, परंतु तितक्यांतल्या तितक्यांत त्यानें तिला झिडकारून दूर सारलें. तेव्हां तीही तशीच रागाच्या झटक्यानें मागें सरून ' नको तर नको ' असें ह्मणाली आणि पुढें म्हणते, " मीं ते परवांचे रुपये त्याच्याजवळ दिले. व्याज अडकवून ठेवलं, आणखी दागिने आणून देऊन व्याज घेऊन जा म्हणून त्याला ह्मटलं. तो होय म्हणून जो गेला, त्यावर कांहीं केल्या तोंडच दाखवीत नाहीं. पंचवीस वेळां परवांपासून त्याला बोलावणं पाठविलं. केव्हां भेटतच नाहीं. केव्हां भेटला तरसंध्याकाळीं येतो ह्मणतो. घटक्याभरानं येतो म्हणतो. अशा मेल्यानं चाळवण्या दाखवायचं आरंभिलं आहे. आतां त्यांत मी इथून गेलें ह्मणजे तो कसचा यतो ? तुह्माला कसचा बधतो ? आतां दागिने कसचे येतात ? असं मला परवांपासूनच वाटायला लागलं होतं. मला काय ठाऊक मेला असा लुच्चा असेल हा ! "

सरस्वतीबाई बोलत असतांना चिंतोपंत बसल्या बसल्याच नुसते उद्वेगाचे सुस्कारे टाकीत होता. आणि त्याच्या त्या कोरड्या पडलेल्या व क्षीण झालेल्या कंठांतून नुसते सुस्कारे निघत होते. दागिने आतां आपल्या दृष्टीस पडत नाहींत आणि शेवटलें पांच हजार रुपयेही पण त्यांच्याच सोबतीला गेले, हें त्यास पक्कें समजलें. आतां जें आपल्यावर संकट आलें आहे, त्यांतून आपण धडच्या शरीरानें निघालों, तरी दागिने मिळणें नाहींत. मग कांहीं अंगावर शेकून त्यांत सांपडलों तर त्यांची आशाच नको. दहा बारा हजारांचे दागिने केवळ आपल्याशीं अटीला पेटून या मूर्ख व हट्टी बायकोनें आपल्याला एक अक्षरसुद्धां न कळवितां पांच हजार रुपयांसाठीं गहाण टाकले; आणि ते गुलाबचंदासारख्या अट्टल लुच्चाच्या मार्फत. आणखी दुसरे पांच हजार रुपये, दागिने दिसावयाच्या आधींच त्याच्या स्वाधीन करून व्याज अडकवून ठेवून त्याची येण्याची वाट पहात बसली! हा सर्व विलक्षण मूर्खपणा पाहून त्या बिचाऱ्यास काय वाटलें असेल बरें! त्याची काय अवस्था झाली असेल याची कल्पना सुद्धां बरोबर रीतीनें होणें अशक्य. आपल्यावर येणाऱ्या संकटाचा सुगावा लागल्यामुळेंच गुलाबचंदानें हें असलें धाडस केलें, किंबहुना आपल्यावर किचाट आणण्यांत त्या गुलामाचा कांहीं तरी हात असला पाहिजे, हें तर त्यास सहज दिसून आलें. तेव्हां तर त्यास अतोनात त्वेष आला. परंतु करतो काय? ज्या स्थितींत तो आतां सांपडला होता, त्या स्थितींत नसता, पूर्वींच्या स्थितींत असता, तर असा विश्वासघात करून आपला सगळा ऐवज गिळंकृत करण्याची गुलाबचंदाची छाती होतीचना! तो अगदीं हांजी हांजी करून अहोरात्र थुंकी झेलणारांतला अगदीं मुख्य. याच्या घरांत एवढेंसें कांहीं काम असलें तर अगदीं पुढें पुढें करून व सरस्वतीबाईपुढें ‘ बाईशाब बाईशाब ’ करून नाचणारा. परंतु आज त्यानें पार दगा दिला. मग करतात काय? चिंतोपंतानें पुष्कळ तडफड केली. सरस्वतीबाईनेंही आतांपर्यंत सडकून बोलण्याचें अवसान आणलें होतें, तें तिचें अवसान आतां ओसरत चाललें. आतां तिची पूर्ववत् स्थिति होत चालली. शेवटीं झाल्या गोष्टीला निदान आतां तरी कांहीं उपाय नाहीं असें दोघांसही दिसून आलें. आहे या संकटांतून निघून गेलें पाहिजे. मग त्या हरामखोराचा समाचार घेतां येईल असें ठरलें. आणि आतां पुढें काय करावयाचें याच्याबद्दल दोघांचाही विचार सुरू झाला. सरस्वतीबाई कांहीं केल्या जाण्यास कबूल होईना. वरून ती ह्मणे, कीं तुम्हांला इथें एकटें संकटांत टाकून मी इथून जाणें मुळींच चांगलें नाहीं आणि मी जाणारही पण नाहीं. हें अर्थात्—किंवा कदाचित् एक कारण तर असेलच. परंतु मुख्य कारण तिला, आपण गेल्यानंतर दागिने मिळावयाचे नाहींत, आपण असलों, तर ते मिळण्याचा संभव तरी आहे, असें वाटत होतें हेंच होय. दागिने गेले. आतां पुनः ते आपल्या दृष्टीस सुद्धां पडावयाचे नाहींत, हा नुसता विचार तिच्या मनांत आला, कीं तिच्या अंगावर शहारे उत्पन्न होत. त्या दागिन्यांवांचून आपण आपले गांवीं जाणें हें एक अशक्यापैकींच होय. किंबहुना दागिन्यांवांचून जगणें तरी आपल्याला आतां शक्य कसें तें समजेना. असा एकंदर पोक्त विचार करून, केवळ दागिन्यांच्या आशेनें ती तेथें राहण्याविषयीं

आग्रह धरून बसली, ती म्हणे, “ जो कांहीं ऐवज उरला आहे तो दुसऱ्या कोणत्या तरी मार्गानें गांवीं पाठवून देऊं. ” तो म्हणे, “ तितकी व्यवस्था करण्याला आतां मुळींच सवड नाहीं. ” त्यानें आपल्याकडून आपल्यावर येणाऱ्या संकटांत सगळ्या वरादाराची जप्ती होईल, झाडे घेतील आणि संस्थान असल्यामुळें काय होईल काय नाहीं याचा नेम नाहीं. एवढ्याकरितां मुकाट्यानें निघून जावें तें चांगलें. हें कांहीं इंग्रजी राज्य नव्हे, तर सर्व कांहीं न्यायानें आणि कायदेशीर तऱ्हेनें होईल. परंतु तिची समजूत पडेना. शेवटीं त्यानें तिला सांगितलें, कीं तूं सगळें गांवीं घेऊन जाऊन तेथून जी मला मदत करशील, तिला मात्र मी मुकेन. यांतून सुटण्याला पैसे लागतील, ते तूं पुरविले पाहिजेत. तिकडे काय व्यवस्था असेल नसेल ती पाहून रोख रुपये बरेच तयार करून ठेविले पाहिजेत. इकडून नसते पैसे पाठवा म्हणून पत्रें पाठवून रुपये येतीलसें वाटत नाहीं. शिवाय तुलाही पकडून विटंबना करण्याचें जर त्यांनीं मनांत घेतलें, तरी सुद्धां सगळें कांहीं शक्य आहे. अशा तऱ्हेनें नानाप्रकारें सांगून त्यानें तिचें मन फिरविलें. तेव्हां तिनें जें काय उरलेंसुरलें होतें तें सारें, आपला चेंडया व चाळ्या, गेल्या दागिन्यांच्यामुळें लागलेली हाय, या चार गोष्टीस घेऊन व संभाळून रहाण्याबद्दल आणि तसेंच कांहीं किचाट येतें असा पक्का सुगावा लागतांच तावडतोब सूं करण्याबद्दल, नवऱ्यास वारंवार वारंवार बजावून सरस्वतीबाई तेथून दक्षिणच्या वाटेस लागल्या. अर्थातच त्यांचें सगळें चित्त त्यांच्या नवऱ्याकडे होतें. परंतु जे दागिने आपल्या मूर्खपणानें घालविले त्यांनींही तिच्या विचारांचा वांटा थोडाथोडका घेतला होता, असें नाहीं. गांवीं आल्यावर आणखी काय काय दृष्टीस पडणार होतें व कामीं येणार होतें, याची विचारीस अनुमात्र कल्पना असती, तर तिच्या विचारांत झाल्या गोष्टीस फारच थोडी जागा मिळाली असती.

# प्रकरण ५२ वें.

## गांवीं आल्यावर.

सरूबाई आपल्या कुकूबाळास घेऊन गांवीं आल्या, त्या अर्थातच. अगदीं अचानक ! त्यांच्या येण्याची गंधवार्तासुद्धां इकडील मंडळीस नाहीं. आणि त्या येऊन पोंचल्यानंतर तर त्यांचा लवाजमा घेताघाताचा असल्यामुळें व त्यांची चित्तवृत्ति फार काळजींत असल्यामुळें कोणासच कांहीं त्यांच्या येण्याचें खरें कारण समजेना. रंगोपंतदादांनीं आपलेकडून एकदां दोनदां तें कारण समजवून

घेण्याचा यत्न केला; परंतु कांहीं नाहीं. आतां बरेच दिवस झाले होते, तेव्हां ह्मटलें एकवार इकडे येऊन जावें आणखी इकडील हालहवाल काय ती विचारावी, पहावी म्हणून आलें. तिकडून सुद्धां आतां लवकरच चार सहा महिन्यांची रजा घेऊन येणें होणार आहे, असें तिनें जुजबी उत्तर दिलें. तथापि अशा अचानक येण्याचें कारण कांहीं तरी निराळें व फार महत्वाचें असलें पाहिजे असें प्रत्येकास वाटूं लागण्याजोगी तिची चर्या असल्यामुळें कोणास तिचें ह्मणणें खरें वाटलें नाहीं. पण निक्षून कोण विचारतो ! एका रंगोपंतदादाखेरीज तें शक्य तरी कोणाला ! परंतु रंगोपंतदादाचीही चर्या तिनें घरांत पाऊल घातल्यापासून अगदीं चमत्कारिक झाली होती. गुंडोपंतास मात्र खरें कारण दुसरेच दिवशीं कळून चुकलें. कां कीं, तो जरी खूपखाचाहेहून निघून आला होता, तरी त्याचे स्नेहीसोबती त्यास चिंतोपंताच्या व त्याच्या कुटुंबाच्या सर्व हालचालींबद्दल वेळोवेळीं लिहीत असत. गुंडोपंत मुद्दाम त्यांस पत्रेंच पाठवून विचारणा करीत असत. आणि त्याला बातमी देणारा एक घरांतलाच कारकून असल्यामुळें तेथें पूं झालें कीं इकडे टूं म्हणून त्यास लागलीच कळे. असा प्रकार असल्यामुळें त्यास दुसरे कीं तिसरेच दिवशीं पत्र आलें. त्यांत चिंतोपंतावर कांहीं किचाट आलें असून त्याच्या हालचालींवर पोलिसचा डोळा आहे असें लिहिलें होतें. आणि सरूबाईच्या दागिन्यांची तर हकीकत त्यानें तेव्हांच अगदीं साग्र इकडे कळविली. ती वाचतांक्षणींच गुंडोपंतास प्रथमतः आधीं पोट धरधरून हंसूं आलें. द्रव्याचा अतिलोभ झाला ह्मणजे अखेर परिणाम हा असा होतो. असें त्यास पक्कें वाटलें आणि चिंतोपंताकडून येणाऱ्या व त्याच्या इस्टेटींतून येथें वसूल होणाऱ्या रकमांची काय स्थिति होते, हें त्यास पक्केपणीं ठाऊक होतेंच. तेव्हां स्वार्थपरतेपलीकडे कधीं कांहीं ज्यास दिसत नसे, त्यासही आपल्या यजमानाबद्दल फार फार वाईट वाटलें. अव्वलपासून अखेरपर्यंत आपल्या यजमानानें व यजमानणीनें कोणत्या प्रकारें नीचपणाचें वर्तन केलें आणि सर्व द्रव्य आपल्या स्वाधीन व्हावें म्हणून कोणकोणते नीच उपाय योजिले या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव व इत्थंभूत माहिती त्यास असल्यामुळें या वेळीं हा घडलेला एकंदर प्रकार पाहून त्याचे मनास किती तरी वाईट वाटलें. गुंडोपंतासारख्या मनुष्याच्या मनाचें व मनोविचाराचें पृथक्करण करून त्यांत तारतम्य करणें, त्यांत सहेतुक, स्वार्थपर असा भाग किती आणि इतर भाग किती हें जाणणें फार कठिण काम होय. कित्येक मनें इतकीं चमत्कारिक असतात, कीं त्यांत अमुक एक विकारांचें सदासर्वदा प्राबल्य असतें असें सांगणें फार अवघड. तीं मनें कोतीं, केवळ स्वार्थी अशीं जरी असलीं तरी त्यांच्या स्वार्थाचें परिमाण फारसें मोठें नसतें. अल्पस्वल्प किफायती झाल्या, ह्मणजे त्यांना ती किफायत करून देणारासाठीं अगदीं जीव कीं प्राण द्यावासा वाटतो. बरें, त्या होऊं नयेत अशाबद्दल कोणाचा तरी यत्न चालला आहे, असें दिसलें आणि त्या यत्नामुळें त्या आपणांस होत नाहींत असें त्यांस दिसून आलें, ह्मणजे त्या व्यक्तीविषयींचा द्वेषही मग फारच कमालीचा असतो. पुनः त्या व्यक्तीनें त्यांस जवळ करून अल्पस्वल्प फायदा करून दिला व जरा गोडीगुलाबीनें वागविलें, कीं

पुनः त्याचें मन जरासें खुलतें. अशा माणसाची स्वार्थपरायणता तितक्याच बेताची, महत्त्वाकांक्षा त्याच मानाची, द्वेष किंवा प्रेमाची अतिशयता असली तरी टिकण्याच्या कालाची अवधिही तितक्यापुरतीच !

गुंडोपंताच्या बातमीदाराचें पत्र त्यास आलें आणि त्यांतील इत्थंभूत मजकूर त्यानें वाचला, तेव्हांच त्यास पहिल्या प्रथम जरी आनंद झाला, भली या अवदसेची फजिती उडाली असें मनांत आलें, तरी कांहीं वेळानें असें वाटलें कीं, त्याच्यावर जर कांहीं तसेंच भयंकर संकट आलें असलें तर आपण या वेळीं तेथें जाऊन त्यास कांहीं मदत करावी. आज आपण त्यांचे पिढीजाद नोकर आहों, तेव्हां या वेळीं उपयोगी पडलों तर कांहीं तरी आपला फायदाच होईल.

असा विचार मनांत येऊन त्यानें सरूबाईची भेट घ्यावी आणि काय खरोखर प्रकार आहे तो कळवून घ्यावा असें मनांत आणलें. परंतु सरूबाईचें व त्याचें अगदीं विळ्याइतकें उजू ! तेव्हां तें कसें साधणार !

इकडे एक दोन दिवस जातांच सरूबाईनें विचार केला कीं, नवऱ्यानें आपल्यास सांगितल्याप्रमाणें जर खरोखरच कांहीं प्रसंग आला, तर आपण त्याकरितां वकिलांस, बॅरिस्टरांस वगैरे खर्च करावी लागेल ती रक्कम जुळवून ठेविली पाहिजे. नाहीं तर आयत्या वेळीं रकमा कोठून येणार ? तें मनांत येतांच सरूबाईनीं एके दिवशीं संध्याकाळीं रंगोपंतास एकीकडे नेऊन काय खरें होतें तें, आणि आतां रोख रुपयांची जरूर लागण्याचा संभव होता तो, सांगितला. मात्र अजून आपल्या मूर्खपणानें आपण किती हजारांचें नुकसान करून बसलों आहोंत तें सांगितलें नाहीं. आपल्याच तोंडानें आपली फजिती कोण सांगणार ? ती त्यास शेवटीं म्हणाली, “ आज इतके दिवस काय व्यापार केलास, काय किफायत केलीस, किती पत मिळविलीस, ती सगळी आतां पाहण्याची वेळ आली आहे. रुपये पाठविण्याबद्दल केव्हां मागणं येईल आणखी केव्हां नाहीं याचा कांहीं नेम नाहीं, म्हणून तुला आपलं आधीं सांगून ठेविलं आहे. ”

“ येऊंद्याहो, ताई, केव्हां वाटेल तेव्हां मागणं आलं, तरी मध्यान्हरात्रीं एक लाख रुपयांपर्यंत मी वाटेल तेव्हां एक घटकेच्या आंत रक्कम जुळवून देईन. अंः ! मीं म्हटलं काय आहे. सुरती नगद पाहिजे असले तर केव्हां वाटतील तेव्हां. पण असं त्यांनीं केलं आहे तरी काय त्यांचशा वर कांहीं किटाट यायला ” रंगोपंतानें अगदीं बेफिकिरीचा आवाज काढून विचारलें त्या वेळीं जर दुसऱ्या कोणी त्याचें बोलणें व तें बोलण्याचा आविर्भाव पाहिला असता, तर त्यास असें वाटलें असतें कीं, हा कोणी तरी फार मोठा धनाढ्य रेडिमनी चोलन असावा. तो तेवढेंच विचारून राहिला नाहीं. तर अमुक अमुक व्यापारांत आपण यंदां अमक्याच्या पातीनें काम केलें, त्यांत किती हजार रुपये नफा झाला आहे, अमक्या जमिनी खंडानें दिल्या, त्यांचा खंड मूळ किती होता, आणि आतां आपण कशा दिल्या आहेत, आणखी त्यांपासून किती जास्त किफायत होणार आहे; अमुक अमुक मोठमोठ्या व्यापाऱ्यांत किती व्याजावर कशा काय रकमा दिल्या आहेत आणि त्यांचें नुसतें व्याज किती झालें आहे; आजपर्यंत नुसतीं घरें किती

गहाण ठेविलीं आहेत, त्यांचेंच नुसतें व्याज किती येणार आहे; कोण व्यापारी आपल्यास किती मानतो, आणि व्यापारी लोकांत आपल्यास किती मान आहे; कोण कोण व्यापारी आपल्यास विचारल्याखेरीज, आपली सल्लामसलत घेतल्याखेरीज, आपल्या दुकानांत काडीसुद्धां इकडची तिकडे करीत नाहींत, याबद्दलच्या आत्ममहत्त्वाच्या इतक्या कांहीं गोष्टी त्यानें अशा कांहीं प्रकारानें सांगितल्या कीं, त्याच्यायोगानें आज दहा-वीस हजार तर काय पण लाख पन्नास हजारांची रक्कम लागली, तरी हां हां म्हणतां गोळा होऊन तेव्हांच काम होईल, अशी सरस्वतीबाईच्या मनाची अगदीं पक्की खात्री झाली. किती वेळ तरी रंगोपंत आजपर्यंत आपण करीत आलेल्या व्यवहाराची महती बिचारा गातच होता. या महतीपैकीं अल्पस्वल्प महती आपल्या कल्पनेंतली आहे असें जरी त्याचें त्यास पक्कें ठाऊक होतें, तरी पण बहुतेक महती अक्षरशः खरी असून आपल्या अनुभवास केव्हां वाटेल तेव्हां येईल इतकेंच नव्हे, तर आपण ती दुसऱ्याच्याही अनुभवास केव्हां लागेल तेव्हां आणून देऊं असें मनानें पक्कें घेतलें. न जाणों, तो ज्या दृष्टीनें सर्व स्थिति पहात होता त्या दृष्टीखेरीज दुसरी दृष्टीच त्यास नसेल. ज्यास स्वतःस कांहीं दिसत नाहीं, तो दुसऱ्याच्या दृष्टीनें पाहूनही आपण पाहिल्याप्रमाणेंच करतो. दुसऱ्यांनीं लबाडीनें आपणास ही दृष्टि दिली असेल, असें त्याच्या स्वप्नींही येत नाहीं.

इकडे गुंडोपंतास त्याच्या त्या बातमीदाराचें पत्र आल्यानंतर सुमारें पांच सहा दिवस झाले नाहींत तोंच खुद्द चिंतोपंताचें एक पत्र आलें. त्यांत असें लिहिलें होतें कीं, " कांहीं राजकीय प्रकरण इथें उपस्थित होऊन चार दिवस मला थोडासा त्रास होईल असें दिसतें. या त्रासांतून मी तेव्हांच सुटून जाईन. परंतु दहा पांच हजार रुपये खर्च करण्याचा प्रसंग येणार आहे. इकडे मजकडे मुळींच शिल्लक नाहीं. सौभाग्यवती इकडून गेली. तिला मीं सांगून ठेविलें आहे. तथापि आणखी तुम्हांसही लिहितों आहें. रंगोपंताचे मागें नेट लावून रकमा जमवून ठेवाव्या व माझ्याकडून मागणं येईल तेवढी रक्कम मी सुचवीन त्याप्रमाणें मजकडे यावी. नाहीं तर सर्वच घोंटाळा होऊन बसणार आहे....."

राजकीय प्रकरण कशा प्रकारचें, कशा बाबतींतलें उपस्थित होणार वगैरे कांहीं एक लिहिलेलें नव्हतें, परंतु चिंतोपंताचीं हजार लफडीं आणि सत्तावीसशें कारस्थानें असल्यामुळें त्यांतून कांहींना कांहीं तरी त्याचे अंगावर येणारच, असें गुंडोपंतास कळून चुकलेलें होतें. पैसे खाण्याचें तर त्यास विलक्षण व्यसन होतें, परंतु संस्थानांतून पैसे खाणें म्हणजे कांहीं विशेष विलक्षण नव्हे, तेव्हां त्याहून कांहीं तरी निराळेंच उपस्थित झालें असावें असें दिसलें. इकडून रकमांची भरती तेव्हांच करतां येईल अशी जशी रंगोबादादांची खात्री होती व लांबलचक गप्पांनीं जशी त्यांनीं सरस्वतीबाईचीही खात्री करून दिली, तशी गुंडोपंताची मुळींच खात्री नव्हती, आणि रंगोपंतांनीं कितीही बाता दिल्या तरी ती झाली नसती. उलट त्याची अशी खात्री होती कीं, चिंतोपंताचे रुपये त्यास आतां कधींही दृष्टीस पडणार नाहींत. आणि रुपये जर नाहींत तर संस्थानांतलें किचाट केव्हां कसें अंगावर शेकेल याचा मुळींच नेम नाहीं.

गुंडोपंतास पत्र आलें आणि त्याची अशी खात्री होती तरी पण आपल्या धन्यासाठीं कांहींना कांहीं तरी केलें पाहिजे, व आतां तावडतोब कारण पडणार म्हणून रंगोपंताचे पाठीस लागून रकमा जुळवावयाच्या हेंच पहिलें काम होय. तें करावयाचें असा त्यानें बेत करून व त्याचे मनांत एकदां सरस्वतीबाईचीही भेट घ्यावयाची होती, म्हणून तो त्यांचे घरीं गेला. रंगोपंतास त्यानें आपल्याला पत्र आल्याचें कळविलें. परंतु आतां सरस्वतीबाई आल्यापासून रंगोपंत नुसता घोड्यावर ! गुंडोपंतास चिंतोपंतांनीं पत्र लिहिलें हेंच मुळीं त्यास मोठें वैषम्य लागलें आणि त्यानें त्यास "तुह्मांला पत्र लिहिलं असलं चिंतोपंतांनीं, तर तुम्ही काय वाटेल तें करून वाटेल तिथून रकमा आणा. आम्हाला काय सांगतां ? तुम्हीच त्यांच्या काळजीचे. आम्ही कोणीच नाहीं. आणि तुम्हाला आमच्या भानगडींत पडून घोंटाळा घालण्याची हौसच ! पण मी तसा घोंटाळा घालूं देईन ही कल्पनासुद्धां मनांत आणूं नका. विनाकारण त्रास नको, ह्मणून चार दिवस मी तुमच्याशीं नीट तऱ्हेनं वागलों, पण मी तुमच्या भुलथापांवर आणखी गोड बोलण्यावर फसलों असं वाटत असलं, तर ती भ्रांति सोडा. तुम्ही काय किंमतीचे माणूस आहां हें मी जाणून आहें. पुनः इथें आलांत तर खबरदार !" अशीं दुरुत्तरें केलीं. त्या वेळीं गुंडोपंत तेथें गेला, तो खरोखर सद्धेतूनेंच गेला. परंतु रंगोपंताच्या मनांत तसें कोठून येणार ? आणि यदाकदाचित् आलें तरी तो तसें धरून थोडाच चालणार ! आतां त्यास बहिणीचा जोर, आणि बहिणीचें व गुंडोपंताचें ह्मणजे अगदीं विळ्याइतकें उजू ! तेव्हां आजपर्यंत जें काय सगळें घडलें त्याचें पुरें उट्टें काढण्याला ही संधि फार उत्तम आहे असें त्यानें पाहिलें आणि गुंडोपंतास हवें तसें टाकून बोलण्याचा सपाटा चालविला. गुंडोपंताशीं आजपर्यंतचें त्याचें वर्तन थोडेंसें गोडीगुलाबीचें होण्यास लागलें होतें, आणि मधें मधें तर त्यांचें मेतकूटच जमलें होतें हें वाचकांस ठाऊक असेलच. परंतु एकमेकांस फसगतींत पाडूं पाहणाऱ्या दोघांची गोडीगुलाबी ती कोण्या प्रकारची असावयाची ? तींतून निसटून जाण्याचा दोघांचाही अंतर्यामीं डाव असणारच. त्यांत मग ज्याला जसा प्रसंग येईल तसें त्यानें साधावयाचें. रंगोपंतास वाटलें कीं, आपलें आधीं साधलें तसें त्यानें आपलें वर्तन बदललें. असा प्रकार झाला असतां आणि रंगोपंत फारच टाकून बोलूं लागला असतां कांहीं वेळ गुंडोपंत गप्प बसला. परंतु जेव्हां रंगोपंत आतां फाजील चेपीत चालला असें त्यानें पाहिलें, तेव्हां त्यानेंही तारस्वर काढून रंगोपंतावर तोंड सोडलें. मग काय विचारतां ? एकसारखें कडाक्याचें भांडण सुरू झालें आणि तितक्यांत सरस्वतीबाई तेथें आल्या. गुंडोपंताचा आवाज कानीं पडतांच ती ताडकन् उडी मारून उठली आणि त्यास पहातांच तिच्या सर्वांगाची लाही लाही होऊन गेली. आणि ती एकदम त्याच्या अंगावर येऊन "मेल्या, तूं इथून उठून चालता होतोस का नाहीं ? मेल्यानं माझ्या घरादाराचं वाटोळं आरंभिलं आहे" असें त्याच्या अंगावर खेंकसली. गुंडोपंत तें ऐकून दचकलाच. आजपर्यंत तिचें त्याच्याविषयीं मन नीट नसे हें त्यास ठाऊक नव्हतें असें नाहीं. परंतु इतक्या अमर्यादपणें—अगदीं बाजारच्या माळणीप्रमाणें—अंगावर येऊन मेल्या वगैरे ती म्हणेल असें

त्यास वाटलें नाहीं. ज्याच्यामुळें आपणास आपले सगळे दागिने गुलाबचंद मारवाड्याच्या घरीं गहाण ठेवण्याची बुद्धि झाली, त्या सगळ्याचें कारण हा असें मनांत येऊन आणि दागिने गेले त्याच्याबद्दल अतिशय त्वेष येऊन तिच्याही तोंडून ते तसे उद्गार निघाले. तिचें भानच नाहींसें झालें. आपला सगळा सत्यनाश होण्यास कारण हा, असें तिच्या मनानें पक्कें घेतलें आणि ती त्याला अद्वातद्वा बोलूं लागली. तिच्या तोंडाला आणि शब्दांना सीमा राहिली नाहीं. गुंडोपंत कांहीं वेळ अगदीं चकित होऊन स्वस्थ बसला. त्याची जीभ शब्दोच्चार करीना, मन शब्द सुचवीना आणि तेथून निघून जावें तर पाय हलेना. परंतु ही स्थिति फार वेळ चालली नाहीं. त्याची ती आश्चर्यचकितता थोड्या वेळानें दूर झाली. त्या मूर्ख स्त्रीच्या बोलण्याचें क्षणमात्र त्याला हंसूं आलें, आणि मग जेव्हां तें बोलणें फारच अमर्याद झालेलें त्याला दिसलें, तेव्हां मर्मभेदक असा आवाज काढून व तिटकारा येण्याजोगे हातवारे करून तो अत्यंत सन्मानदर्शक अशा प्रकारानें ह्मणतो, " बाईसाहेब, मीं तर तुमच्या इच्छेप्रमाणें यथास्थित व्हावं म्हणून आपला गळा गोवून घेऊन तुमच्या यजमानांचंन् तुमचं कल्याण केलं. ज्यांचा कांहीं सुद्धां अपराध नाहीं अशा पोरांना दीनवाण्यासारखं भटकायला लाविलं पण तुह्मांला तेवढ्यानं कुठें तृप्ति ! तुह्मी आपल्या हातानंच आपलं वाटोळं करून घेतां आहां. तुह्मी या घरांत आल्या दिवसापासून तर सगळं वाटोळं व्हायचा पाया आरंभला. आतां तिकडलं वाटोळं करून नवऱ्याला तुरुंगांत जाण्याची पाळी आणून इथें आलांत. इथें तर काय ! हे तुमचे बंधू आज किती दिवस तरी अगदीं वाटोळं गरगरीत करीत बसले आहेत. थोड्याच दिवसांत तुमच्या हातांत भिक्षापात्र येतं आहे. झोळी करण्यापुरता फडका तरी घरांत राह्यला म्हणजे मिळविलीत बरं.—माझ्या अंगांत कुठली एवढी शक्ति तुमचं वाटोळं करण्याची ! "

गुंडोपंताचें हें सर्व बोलणें इतक्या शांतपणाचें होतें आणि इतकें मर्मभेदक होतें कीं, सरस्वतीबाई रागानें अगदीं लाल होऊन तिचे हातपाय लटलट कांपूं लागले. ओंठ थरथरूं लागले. आणि " रंग्या तूं पुरुष आहेस का कोण, हें बोलणं ऐकूण घेतो आहेस मुकाट्यानं तें ? " असे शब्द कसे तरी बाहेर पडले. रंगोपंत आतां उठणार तोंच तारवाला येऊन त्यानें त्यास एक तार दिली. ती पाहिली तों आंत, " गुंडोपंताबरोबर ५००० रुपये देऊन त्यास पहिल्या गाडीनं पाठवून द्यावं " असा मजकूर होता.

---

# प्रकरण ५३ वें.

## डोळे उघडले !

तार आली तेव्हांच ती कोठून व कशाविषयीं असावी त्याबद्दल सगळ्यांचे तर्क झाले होते. मात्र कोणी कोणाजवळ त्याबद्दल उद्गार काढले नाहींत. ज्याचें त्याचें चित्त आपला तर्क खरा कीं खोटा हें पहाण्याकडेच लागलें होतें. मजकूर वाचतांक्षणींच सरस्वतीबाईचें चित्त दोन विकारांनीं द्विधा झालें. एक तर तिला अतोनात भय वाटलें आणि आपल्या रंगूस न बोलावितां गुंडोपंतास बोलाविलें याबद्दल संताप आला. पांच हजार रुपयांची रक्कम काय, तेव्हांच जमवून रंगू जाईल असें तिला वाटलें. आणि ताबडतोब तिनें, " एवढी थोरली रक्कम तुझ्या मुर्दाडाच्या हातीं देऊन पाठविण्याचा माझा अडला आहे खेटर ! " असें म्हणून अतिशय तिरस्कार व पूर्ण द्वेष भरलेल्या दृष्टीनें गुंडोपंताकडे पाहिलें. " त्यांचा असेल तुझ्यावर विश्वास; पण माझा नाहीं. तूं आतां माझ्या घरांतून चालता हो. पुनः पाऊल घातलेंस तर खबरदार ! " असें आणखी म्हणून तिनें त्यास घालविण्यासाठीं गड्यास बोलाविलें. येथपर्यंत स्थिति आली, तेव्हां आतां आपली येथें उभें राहण्याची मुळींच शोभा नाहीं, असें वाटून गुंडोपंतानें आपला पाय काढण्यास आरंभ केला. परंतु जातां जातां त्याच्या त्या स्वभावाप्रमाणें त्यानें न भूतो न भविष्यति अशा शिव्या आणि "आपल्या हयातींत मी तुला व तुझ्या पोराला दारोदार भिक्षा मागतांना पाहीन. माझं कांहीं झालं, तरी पण आतां तुमची मी गय करणार नाहीं. तिकडे नवरा आतां तुरुंगांत पडणारच, पण माझ्याजवळचे काय कागद आहेत ते देऊन हें सारं वरदार त्या पोरांना मिळवून देईन हीच माझी प्रतिज्ञा ! " अशा तऱ्हेचे शाप व धमक्या दिल्याखेरीज त्यानें आपलें पाऊल बाहेर ठेविलें नाहीं.

हा सर्व प्रकार चालला असतां रंगोबादादा एक अक्षरसुद्धां बोलले नाहींत. त्यांचें सर्व लक्ष्य दुसऱ्या कांहीं विचारांत गढून गेलेलें दिसत होतें. हातांतल्या त्या तारेकडे शून्य दृष्टीनें ते पहात होते. पांच हजार रुपये आतांच्या आतां कोणाकडून कसे मिळतात याची त्यांस पंचाईत पडली असावी असें दिसलें. गेल्या पांच चार दिवसांत त्यांनीं आपल्याला अशी अशी रक्कम लागणार आहे, ती द्याल ना म्हणून बऱ्याच ठिकाणीं विचारून ठेविलें होतें, व तितक्या ठिकाणीं ती तेव्हांच आपल्यास देऊं, अशीं आश्वासनें मिळालीं होतीं. परंतु तीं आश्वासनें आज या क्षणीं आपल्यास सत्यत्वानें अनुभवास येतील काय, अशी त्यांस शंका !

आली असावी. त्या आश्वासनांचा प्रत्यक्ष प्रत्यय येण्याची वेळ इतक्या लवकर येईल असें पक्कें वाटून तीं देणारांनीं दिलीं होतीं काय, असा संशय त्यांस आला असावा काय ? असेल, आला असेल, आणि ह्मणूनच त्यांस क्वचित् असें गोंधळल्याप्रमाणें झालें असावें. किंवा कदाचित् असेंही असेल, कीं शेवटली पांच हजारांची रक्कम, ज्या रकमेच्या पाठविण्यानें सरस्वतीबाईंनीं आपल्या दागिन्यांचें वाटोळें करून घेतलें, ती रक्कम अजून अनामतच आहे अशी सरस्वतीबाईंची समजूत होण्याजोगें जें भाषण आपण केलें, तें अंगाशीं येणार असेंही त्यांस वाटून कदाचित् मनाला गोंधळाची स्थिति आली असेल. कसेंही असो. गुंडोपंत इतक्या निरर्गलपणें आपल्या बहिणीला बोलत असतां त्यांत आपण पडून त्याचें तोंड बंद करावें अशी बुद्धि त्यास झाली नाहीं.

गुंडोपंतानें जातां जातां दिलेल्या शापांनीं व धमक्यांनीं आलेला त्वेष व संताप किंचित्मात्र ओसरल्यावर सरूबाईंचें चित्त प्रस्तुताकडे वळलें. आणि त्या रंगोपंतास म्हणतात, " काय बाई नवल आहे, इतका हा दुष्ट, चांडाळ, लुच्चा असं ठाऊक असतां आणखी पुनः त्याच्याचबरोबर रुपये पाठवून देण्याविषयीं तार येते ! तिकडला स्वभावच भारी भोळसर. अंमळ कोणी तोंडदेखलं बोललं, कीं तो अगदीं अगदीं चांगला वाटूं लागतो. हा आमच्या घरचं अन्न खाऊन पोसलेला मांग पहा ! कशा शिव्यान् शाप देऊन गेला. अन् ह्मणे याच्याबरोबर पांच हजार रुपये देऊन त्याला पाठवा. त्याच्या हातीं पांच हजार रुपये जातांच हा कोणीकडच्या कोणीकडे फरारी होणार नाहीं ह्मणून कशावरून ? तें कांहीं नाहीं. तूं आतांच्या आतां कुठून तरी रक्कम आणून आजच्या रात्रीच्या गाडींत जा. इथें मी आहेंच, आतां घरं तिकडं काय आहे काय नाहीं तें तरी कांहीं त्याहायचं होतं ? माणसाला काळजी लागते कीं नाहीं ! जा आतां. काय करायचं मग ? तरी मी नेहमीं कानीकपाळीं ओरडत असे, कीं तुह्मी आपलं काम बरंन् आपण बरे असे रहा. नसत्या भानगडींत कोणाच्या पडूं नका. पण आतां काय ? जें झालं तें कांहीं माघारी येत नाहीं. हं आटप. तूं आजच्या आज जा. अगदीं स्वस्थ बसूं नको. "

सरस्वतीबाईंचें हें बोलणें चालले असतां रंगोपंतदादा आपल्या ठिकाणावर आले व " हो, हा मी चाललोंच पांच हजार काय जाऊन आणायचे इतकंच, ' असें ह्मणून तेथून उठले. आणि ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून आश्वासन दिलें होतें, त्यांच्या त्यांच्याकडे जाऊन त्या आश्वासनाप्रमाणें करण्याविषयीं विनंति केली, परंतु उपयोग कांहीं झाला नाहीं. कोणी ह्मणाले " तुह्मांला इतक्या लवकर रकमेची निकड आहे हें आह्मांला मुळींच ठाऊक नाहीं, नाहीं तर तजवीज केली असती. पण आज या घटकेस रक्कम कठून येते ! " कोणी बहाणा केला, " आमची तितकीच रक्कम काल यायची होती म्हणून आह्मीं होय ह्मटलं, परंतु ती कांहीं आली नाहीं. " कोणी थाप ठेवून दिली, " मजजवळ सकाळीं एक हुंडी आली होती, पण ती मीं मुंबईस रवाना केली. नाहीं तर रक्कम तुह्मांला पाहिजे तितकीच बरोबर होती. सहजच तुमचं काम झालं

असतें. " एवंच, कोणीही "ही घ्या रक्कम" असें म्हणून रक्कम पुढें करणारा निघाला नाहीं. पारशी मित्रानें तर अशी लोणकडी ठेवून दिली कीं, "मी तुह्मांला दोन तासांत रक्कम आणून देतों." आणि तो जो गेला तो संध्याकाळपर्यंत रंगोपंतानें सात खेपा घातल्या तरी त्याला भेटला नाहीं !

शेवटल्या खेपेस रंगोपंत जाऊन त्यांच्या घरीं दोन तास बसला, तरी ठिकाण नाहीं. आतां मात्र रंगोपंताची फार त्रेधा उडाली. एका गृहस्थानें पांचशें रुपये त्यास दिले तेवढेच काय ते त्याच्या हातीं आले, परंतु पांच हजार कोणीकडे आणि पांचशें कोणीकडे ! ज्यांच्याकडे घेणें होतें, त्यांची ही अशी व्यवस्था झाल्यानंतर मग अर्थातच ज्यांच्याकडे पत आहे असें त्यास वाटत होतें त्यांचेकडे त्यांनीं मोर्चा फिरविला. परंतु कांहीं उपयोग होण्याची आशा कोठें दिसेना. कोणी साफ नाहीं म्हणून सांगितलें, कोणी अन्योक्तीनें सांगितलें, आणि कित्येकांनीं कांहीं गहाण असल्यास द्या म्हणजे कोठून तरी आणून देतों असें सांगितलें. परंतु गहाण काय द्या ? सरस्वतीबाईजवळ कांहीं नव्हतें आणि यांच्याहीजवळ घरेंदारें व जमिनी यांखेरीज कांहीं नव्हतें. आणि घरेंदारें गहाण टाकून रक्कम मिळणें, काय घटक्या अर्ध्याघटकेचें काम आहे ? बिचाऱ्याच्या डोळ्यावरलें पटल दूर झाल्याप्रमाणें झालें. एकदम " आतां काय करूं ? " असें वाटून तोंड उतरलें. सरस्वतीबाईला आतां सांगावयाचें काय असें मनांत आलें आणि तिला तोंड दाखवूं नयेसें वाटलें. परंतु तसें कोठें चालतें ? तिच्याकडे जाऊन खरी स्थिति सांगणें तर अगदीं अशक्य. तेव्हां अर्थातच असल्या माणसांस अगदीं साहजिक अशी जी युक्ति—खोटें बोलणें—तिचा आश्रय करण्याचें त्याच्या मनांत आलें. निम्मे रक्कम पाठविली. निम्मी रक्कम उद्यां खास हातीं येईल ती घेऊन जाऊं असें सांगण्याचा त्यानें बेत केला व तो घरीं परत आला. सरस्वतीबाई अगदीं चातकाप्रमाणें वाट पहातच होती. तो येतांच 'रात्रीच्या गाडीनें जातोसना ? रक्कम मिळालीना ?' असे प्रश्न तिनें केले, यानेंही सगळी आपल्याला पाहिजे तितकी रक्कम मिळाली नाहीं, पण निम्मी म्हणजे अडीच हजारांची हुंडी अगदीं आपल्या हातांनीं रजिस्टर करून पाठविली. उद्यां निम्मी खास हातीं येणार आहे. ती येतांच निघून जाऊं " अशी त्यानें बात झोंकून दिली. ती इतक्या शिताफीनें त्यानें झोंकून देण्याचा यत्न केला कीं, सरस्वतीबाईला संशय सुद्धां आला नाहीं. निम्मी तरी गेली एवढें ऐकूनच तिला किंचित् समाधान झालें. रंगोबांनीं एकंदर लोकांच्या दानतीवर वगैरे अशी कडक टीका चालविली:—" पुनः कोणास एक कपर्दिकही देऊं नये असें ह्मटलें व आपण ह्मणूनच अडीच हजार तरी इतक्या थोडक्या अवकाशांत तयार केले. इतर कोणी असता तर त्याला दाद दिली नसती कोणी. माझी गोष्टच निराळी. माझ्याकडे त्यांना वारंवार यावें लागतें. एकदां रक्कम दिली नाहीं, ह्मणजे पुनः मी आपल्या जोड्याजवळ तरी त्यांना उभें करीन का ? शिवाय माझ्या पतीचा त्यांना बाजारांत किती उपयोग होतो !......" इत्यादि इत्यादि प्रकारांनीं आत्मस्तुति त्यानें इतकी चालविली कीं, सरस्वतीबाईच्या मनास त्याच्या बोलण्याबद्दल संशय घेण्यास उसंतच मिळाली नाहीं. आत्मस्तुतीची परमावधि

झाल्यानंतर त्यानें गुंडोपंताच्या नीचपणाची गोष्ट काढून त्यानें दोन तीन ठिकाणीं आजच्या आज जाऊन आमच्याच रकमा आह्मांला न मिळण्याविषयीं कांहीं तरी खटपटी केल्याचें तिला सांगितलें. त्यामुळें तर तिच्या मनांत त्याच्याबद्दलच्या संशयाखेरीज दुसऱ्या कोणाचा विचार शिरकूंच शकला नाहीं. तिची जीभही त्याच्या बोलण्यास दुजोरा देऊं लागली व सरते शेवटीं पुनः चिंतोपंताच्या भोळसरपणावर येऊन दोघांनींही त्यास पक्का गाढव ठरवून टाकिलें. नंतर त्याच्यावर काय संकट आलें असेल त्या विषयीं तर्कवितर्क करण्यांत व त्यांचें सविस्तर पत्र कधीं येईल याविषयीं बोलण्यांत बराच वेळ घालवून दोघेंही झोंपीं गेलीं.

रंगोपंतदादा दुसरे दिवशीं सकाळींच उठून काल नाहीं तर आतां आपल्यास रक्कम घेऊन जातां यावें, पुनः कांहीं तरी थाप मारून दिवस घालविण्याचा प्रसंग येऊं नये, म्हणून रकमा मागण्याच्या उद्योगास गेले. पारशी मित्राच्या घरीं जातांच तो गांवीं गेल्याचा निरोप त्याच्या घरच्या मंडळींनीं कळविला ! एक प्रकरण आटपलें. पुढें दुसऱ्या पांच चार ठिकाणीं आदले दिवसाप्रमाणेंच प्रत्यय आला, तेव्हां आतां काय करणार, अशी पंचाईत येऊन पडली. कित्येकांनीं " इतक्या लवकर तुझी रक्कम मागायला याल असं वाटलं असतं, तर आपल्याकडून घेतलीच नसती, आतां ती आह्मीं गुंतवून टाकली. कांहीं गहाण ठेवण्यास असलं, तर आणा. तें कोणाकडे ठेवून रक्कम मिळविण्याचा यत्न करूं. " अशा अर्थीं कांहीं उद्दामपणाचीं व कांहीं थट्टेचीं उत्तरें दिलीं. रंगोपंताची रकमेबद्दल अगदीं निराशा झाली. शेवटीं आदले दिवसाप्रमाणेंच थाप ठेवून देऊन सरस्वतीबाईचें तोंड बंद करण्याखेरीज मार्ग नाहीं, असें त्यांचे मनांत आलें. आदले दिवशीं तसें करण्यांत जी त्यास सिद्धी आली, तिनें आजही तशीच मिळविण्यास अर्थातच त्यास उत्तेजनच आलें. सध्याची वेळ मारून नेण्याच्या पलीकडे त्या मूर्खाची दृष्टि विशेषशी गेली नाहीं. बिचाऱ्या चिंतोपंतावर प्रसंग काय आला आहे, आणि आपल्या या अशा दिरंगाईनें त्यांचें तिकडे काय होईल याच्या विचाराकडे त्याचें मन एकदोन वेळां गेलें, मुळींच गेलें नाहीं असें नाहीं, मात्र उद्यां रक्कम खास जमवूं असा विचार मनांत आणून त्यानें एक दोन दिवसांनीं काय अधिक उणें होणार अशी मनाची समजूत घालून आपल्या प्रस्तुताकडे मात्र दृष्टि दिली. आतांच जर रक्कम मिळत नाहीं म्हणून सांगितलें तर सरस्वतीबाई आपले वाभाडे काढील हें त्यास दिसतच होतें. आणि तसें होऊं नये म्हणून त्यानें पुनः आदले दिवसाप्रमाणेंच थाप मारून रक्कम तयार आहे असें सांगण्याचें ठरविलें. रक्कम तयार असें सांगितलें कीं, अर्थातच आपल्यास जावें लागणार, आणि तें त्यास टाळणें भाग होतें; तेव्हां त्यानें असा विचार केला कीं, थापेवर दुसरी थाप चढवून द्यावी. आणि तो विचार कायम करून आणि दोन्ही थापा कशा सजवाव्या याचा विचार करीत तो जरा लवकरच घरीं आला. जणूं काय रात्रीच्या गाडीनें जावयाचें तेव्हां आतां लवकर घरीं येऊन बांधाबांधी करण्याचाच त्याचा विचार होता.

घरांत पाऊल टाकतांच अगदीं जीव खालीं पडल्याप्रमाणें आवाज काढून व हुश् हुश् करीत आणि एकंदरींत फार फार श्रम झाल्याचा आव आणून तो

सरस्वतीबाईस म्हणतो, " एकदांची झाली बोवा रक्कम पुरी. आतां रात्रीं निघायचं. "

" हो हो निघालंच पाहिजे ! " सरस्वतीबाईही संतुष्ट आवाजानें म्हणते: " या वेळीं तूं होतास म्हणून सगळं हें नीट होऊन तूं स्वतः जातो आहेस, नाहीं तर कोणी होतं का काळजीचं ? आपल्या नात्यागोत्याचं माणूस असलं म्हणजे हें असं असतं. नाहीं तर तो मेला...."

" जाऊं द्या कीं ताई ! त्याचं कशाला आतां नांव काढून आपल्या मनाला त्रास करून घेतां ? त्यानं मला फार फार त्रास देण्याचा विडा उचलल्यासारखा दिसतो बोआ. बरं लेका पाहून घेईन. पण ताई, मी न जातां ही रक्कम देऊन दुसऱ्या अगदीं माझ्या विश्वासांतल्या, अगदीं माझ्याप्रमाणं जाऊन सगळा उपयोग होईल अशा माणसाला पाठविलं तर काय होईल ? "

" छे. छे. छे. छे. तुझ्याखेरीज नको बाबा कोणी जायला. तुला जायला काय झालं ? "

" झालं, मला काय व्हायचं आहे ? पण त्यांतलं असं आहे. मी जर इथून गेलों, आणखी पुनः आणखी कांहीं रकमेची तिथें आह्मांला गरज लागली, तर कसं करणार ? इथें तुह्माला तार केली म्हणून काय तुह्माला ठिकठिकाणीं जाऊन लोकांशीं माथाकूट करून रक्कम उभी करतां येणार आहे ? त्यांत आणखी ह्या लेकाचा चावटपणा चाललेला आहे. चिंतोपंतदादांबद्दल ठिकठिकाणीं जाऊन जी नालस्ती करतो आहे ती अगदीं कमालीची. मी इथें नसलों, ह्मणजे मग काय ? त्याला अगदीं मोकळं सुटल्याप्रमाणंच होणार आहे. आणखी मी असलों तर त्याच्यावर तितका दाब राहील, वचक राहील. जिथल्या तिथें मी त्याचं नाक ठेचीन. बरं तिकडे गेलों, तर हें सगळं इकडे राहील, आणखी माझा तिकडे तसा कांहीं उपयोग होणार नाहीं. तोच मी जो स्नेही ह्मणतों, त्याला पाठविलं तर तो संस्थानांत वागलेला आहे. त्याला कोणाशीं कसं बोलावं, काय करावं, कोणत्या प्रसंगीं काय युक्ति करावी हें सगळं माहीत आहे. तेव्हां त्याचा फार उपयोग होणार आहे. शिवाय मी त्याच्यावर अनेक उपकार केले असल्यामुळें तो अगदीं माझ्याप्रमाणं जाऊन काम करील. विश्वासू नंबर एकचा आहे. त्याला पाठविलं तर तो जायला तयार आहे. पण तुह्मांला विचारल्याखेरीज कसं करावं म्हणून त्याला नुसतं विचारून ठेवलं. मी गेलों, तर कांहीं विशेष होणार नाहीं. कांहीं रकमांची जरूरी लागली तर ती मात्र पाठवायची पंचाईत पडेल. पहा, तुमची हरकत नसली, तर त्याला आतांच्या आतां रवाना करून देऊन येतों. इतक्या उपर मींच जावं असं तुमचं म्हणणं असलं तर मी तयारच आहें. "

सरस्वतीबाईला त्याचें तें सर्व बोलणें आणि त्यानें स्वतः जाऊं नये याबद्दल पुढें आणलेलीं कारणें अगदीं खरीं वाटलीं. तथापि आपलं माणूस जाणें आणि परकें जाणें यांत फार अंतर आहे, असें तिच्या मनानें घेतलें होतें, तें कांहीं दूर होईना. आणि त्याप्रमाणें तिनें बोलूनही दाखविलें: " तूं म्हणतोस ती अडचण खरी, पण आपलं माणूस जाणं ती गोष्ट निराळी, आणखी कोणी दुसरं अगदीं तुझ्या स्नेहांतलं असलं तरी

त्यानं जाणं ही गोष्ट निराळी. त्यांना तिथें कसा त्या तिन्हाइताचा विश्वास वाटावा ?"

"पण ताई, मी त्याच्याबद्दल अगदीं खात्रीचं असं पत्र देईनना ? त्याची नको तुम्हांला काळजी. बरं तो गेल्यावर त्यांना नाहीं पसंत पडला, तर मी जाईनच. पण तोंपर्यंत इकडे आणखी कांहीं रकमांची तयारी करून ठेवूं. हो, कसा प्रसंग आहेन् कसा नाहीं ? किती रक्कम लागणारन् किती नाहीं ? मला तर वाटतं मनुष्य चांगला विश्वासू आहे. द्यावा पाठवून."

पुनः सरस्वतीबाईनें विचार केला. आणि नाहीं होय म्हणत अर्धवट रुकार दिल्यासारखें ती कांहीं बोलली. त्याबरोबर पडत्या फळाची आज्ञा मिळाल्याप्रमाणें रंगोबादादा ताबडतोब उठले व झटकून बाहेर गेले ते रात्रीं बरोबर एक दीड वाजेपर्यंत आले नाहींत. सरस्वतीबाईस आपण उगीच रुकार दिला असें वाटून ती चिंताव्यग्र होऊन बसली होती. शेवटीं रंगोबा आल्याची चाहूल लागतांच तिनें त्यास, "काय, गेला का तो रक्कम घेऊन ?" असें अतिशय उत्कंठेनें विचारलें. रंगोपंतानें पट्कन् "हो ! मी त्याला नीट गाडींत बसवून गाडी सुरू झाल्यावर आलों" म्हणून उत्तर दिलें.

स्त्रियांचे अंगीं अगदीं नैसर्गिक अशी जी शंकावृत्ति तिच्यामुळें म्हणा, किंवा रंगोबाच्या उत्तर देण्यांत कांहीं घोंटाळण्याची प्रवृत्ति दिसली म्हणून म्हणा, पण सरस्वतीबाईचें मन संशयित झालें. अमुक एक संशय आला असें तिचें तिलाच खात्रीनें सांगतां आलें नसतें, परंतु ती त्यास अधिकाधिकच प्रश्न विचारूं लागली. "तो गृहस्थ कोण ? त्याचं नांव काय ? तो कुठल्या संस्थानांत होता ?"

रंगोपंतांनीं भरकन् "तो माझा फार चांगला स्नेही आहे. विठ्ठलपंत कवठेकर त्याचं नांव. तो गडदापूर संस्थानांत नौकर होता," अशीं उत्तरें अंमळ त्रासिकपणानें दिलीं आणि "आज दोन दिवसांच्या दगदगीनं आणखी आजच्या या जागरणानं माझं डोकं दुखायला लागलं आहे. आतां जाऊन निजतों मग सकाळीं काय तें बोलूं," असें पुढें म्हणून तो तेथून आपल्या खोलींत चालता झाला. सरस्वतीबाईस तें त्या वेळीं खरें वाटलें, परंतु मग तो गेल्यानंतर तिला किती वेळ तरी झोंप आली नाहीं, तेव्हां कांहीं कांहीं चमत्कारिक विचार तिच्या मनांत येऊं लागले. या विचारांनीं तिला अगदीं पहांटेपर्यंत झोंप आली नाहीं. आणि पहांटे झोंप लागली तींत कांहीं भयंकर स्वप्नें—आपल्या नवऱ्याविषयीं, आपल्या चेंड्याविषयीं, आणखी आपल्या एकंदर स्थितीविषयीं तिला पडलीं. तिला शेवटीं तिचा सासरा दिसला आणि तो संतापानें कांहीं बोलतो आहे, तों त्या स्वप्नांतच ती दचकून जागी झाली. आणि उजाडलें होतें, चांगला फटफटीत प्रकाश पडला होता, तरी तिला आपण पाहिलें तें सारें स्वप्न, खरें कांहीं नव्हे, असें वाटण्यास किती तरी उशीर लागला. आपण पाहिलें तें केवळ स्वप्नच असें पक्केपणीं तिला वाटून चुकल्यानंतर ती उठली आणि तिनें रंगोपंतास बोलावून आणिलें व पुनः "तो गेला गृहस्थ तो चांगला विश्वासू आहेना ? रुपये घेऊन कुठें पळून जाणार नाहींना ? वाटेंत कुठें उगीच मुक्काम करणार नाहींना ? वेळेवर पोंचेलना ?"

असे व अशाच प्रकारचे आणखी कित्येक प्रश्न तिनें त्याला विचारले. ते प्रश्न ऐकून त्यानें " काय हे तुमचे संशय ! " असें म्हणणाऱ्या दृष्टीनें तिजकडे पाहून व मोठ्यानें हंसून " अगदीं विश्वासू आहे, कुठें पळून जाणार नाहीं, कुठें गमणार नाहीं, अगदीं वेळेवर पोंचेल अगदीं सगळं कांहीं यथास्थित होईल " असें निक्षून सांगितलें.

तो दिवस कसा तरी गेला. रंगोपंत घरीं नव्हताच. तो त्या दिवशींही रकमेच्या जमवाजमवीसाठींच धडपडत होता. आणि सरस्वतीबाईही तिच्या मनाला कांहीं एक अपरिच्छेद्य अशी अस्वस्थता उत्पन्न होऊन माडीवरून खालीं, खालून माडीवर, या खोलींतून त्या खोलींत, त्या खोलींतून या खोलींत, अंगणांतून माजघरांत, तेथून परसांत व परसांतून पुनः माजघरांत व तेथून पुनः अंगणांत खेपा घालीत होती. तिला एका जागीं बसवेना. एक काम करवेना. तिच्या जिवाचा कलिंदा जो तिचा चेंड्या व बाळ्या त्याच्या बोलण्याखेळण्याचें व लाडिकपणाचेंही तिला कौतुक वाटेना ! तिच्या त्या स्वप्नांत असें कांहीं तिनें पाहिलें किंवा ऐकलें काय, कीं त्याच्यायोगानें तिच्या मनाची अशी दुरवस्था व्हावी ! असेल ! नाहीं कोणीं ह्मणावें ? तेंही शक्य आहे.

दुसरे दिवशीं सकाळीं पुनः एक तार आली. रंगोपंतानें ती वाचून पाहून तिला सांगितलें, कांहीं नाहीं, माणूस काल पोंचावयाचा तो कां पोंचला नाहीं म्हणून विचारलें आहे. बरोबरच आहे. त्यांची तार आल्या दिवशीं कांहीं आपला माणूस गेला नाहीं. दुसरे दिवशीं गेला. उद्यां पोंचेल. इतकें बोलून त्यानें तार खिशांत घातली व तो बाहेर गेला.

परंतु तो तारेंतला मजकूर सांगतांना त्याच्या चर्येवर कांहीं तरी खऱ्याहून निराळाच प्रकार तो सांगत असावा असें दिसलें. निदान सरस्वतीबाईस संशय आला. परंतु तो तिनें आपल्या मनांतच ठेविला. दुपारीं जेवणाचे वेळीं तिच्यानें पुनः तारेंत काय आहे, तें विचारल्यावांचून राहवेना. तिनें विचारलेंच आणि त्यानें उत्तरही पण तसेंच दिलें पण तो उत्तर देतांना कांहीं तरी लपवून ठेवीत आहे असें तिला पुनः वाटल्याखेरीज राहिलें नाहीं. तथापि ती कांहीं बोलली नाहीं.

तिसरे दिवशीं पुनः तार आली, तेव्हां तिचें चित्त फारच अस्वस्थ होऊन तिनें त्यास काय आहे म्हणून विचारलें. त्यानें कांहीं नाहीं आणखी दोन हजारांची रक्कम पाठविण्याविषयीं लिहिलें आहे म्हणून सांगितलें आणि ती रक्कम घेऊन येण्यास जातों ह्मणून सांगितलें आणि तिसरे प्रहरीं परत येऊन रक्कम रजिस्टर करून पाठविलीही असें आश्वासिलें व त्याबरोबरच आजच्या टपालानें खुशालीचें पत्रही पण आलें आहे असें सांगितलें. परंतु कांहीं केल्या तिची शंका दूर होईना, आणि शंका कां येते याचें कारणही पण लक्ष्यांत येईना.

पण दुसरे दिवशीं एक चमत्कार घडून ती शंका फारच दृढ झाली.

---

# प्रकरण ५४ वें.

## संशयाची निवृत्ति.

रंगोपंतदादा बाहेर कांहीं कामासाठीं गेले होते. सरस्वतीबाई आपल्या चिंताग्रस्त मनांत नानाप्रकारचे तर्क व आपल्या पतिराजावर काय संकट आलें आहे, काय नाहीं, याबद्दल कल्पना विकल्पना करीत आणि आपल्या एकंदर स्थितीसंबंधानेंही मधून मधून विचार करीत अगदीं अस्वस्थपणें सगळ्या घरभर घिरट्या घालीत होती. पुष्कळ वेळां आपल्यावर आलेल्या संकटाचें पूर्ण स्वरूप दिसून आलें नाहीं, तरी मनाची साक्ष अशी पटत असते, कीं कांहीं तरी भयंकर होणार. त्याप्रमाणेंच त्या वेळीं सरस्वतीबाईच्या मनाची स्थिति झालेली होती. तिला रंगोपंताच्या एकंदर वर्तनाबद्दल शंका येऊं लागली होती; परंतु अमुकच कृत्यामुळें अमुकच शंका आली, असें तिचें तिलाही सांगतां आलें नसतें. अशा मनाच्या विलक्षण स्थितींत असतां तिचा भाचा आमच्या वाचकांच्या फार जुन्या ओळखीचा भास्कर कोठून बाहेरून आला. मनुष्याच्या मनाची स्थिति विलक्षण झालेली असली, ह्मणजे आपण अमुकच करावें आणि तें अशा कारणासाठीं करावें असें जाणूनबुजून वाटत नाहीं. भास्कर कांहीं आजच पहिल्यानें असा बाहेरून आला असें नाहीं. तो असा केव्हां तरी बाहेर जाऊन केव्हां तरी परत आल्याचे प्रसंग अनेक वेळां झालेले; परंतु त्या वेळीं सरस्वतीबाईनें कांहीं तरी बोलावयाचें म्हणून ती जरा त्रासलेल्या अशा आवाजानें त्यास ह्मणते, "कायरे पोरा, एवढ्या सकाळींच कुठेंरे गेला होतास? आणखी इतका वेळ काय करीत होतास?"

पोरानें चट्कन् उत्तर दिलें, "काकांनीं पाठविलं होतं कामाला तिकडे गेलों होतों."

"काकांनीं तुला पाठविलं होतं! गुलामा आपलं ल्याहायचं पुसायचं टाकून वाटेल तेव्हां वाटेल तसा जातोस, आणखी काकांनीं सांगितल्याची सबब मला सांगतोस का? बोल, कुठें गेला होतास तीं? ह्मणजे काका घरीं येतांच विचारतें त्यांनीं तुला पाठविलं होतं का तें? बोल."

"हो. हो. खुशाल विचारिनास. त्यांनीं मला विठ्ठलपंत कवठेकरांकडे एक चिठ्ठी देऊन पाठविलं होतं. आणखी त्याचं हें उत्तरसुद्धां मीं आणलं आहे."

तें नांव ऐकण्याबरोबर सरस्वतीबाई एक क्षणभर स्तब्ध राहिली. आपण आतां ऐकलेलें नांव याच्यापूर्वीं ऐकलेलें आहे तेंच असें तिला एकदम वाटलें. आणि ती त्यास एकदम ह्मणाली, "कारट्या, ते तर चार दिवस झाले गांवीं गेले, आणखी तूं ह्मणतोस त्यांच्याकडे काकांची चिठ्ठी देऊन उत्तर आणलं? एवढा थोरला गधडा झालास, तुला खोटं बोलायला

लाज नाहीं वाटत ? आतां तूं कांहीं.... आण पाहूं कुठें आहे तें त्यांचं उत्तर ? आण इकडे. काका आले कीं तुला आज अगदीं......."

"काकांनीं मला सांगितलं आहे कीं, तें उत्तर दुसऱ्या कोणाजवळ देऊं नको."

"बरं बरं. मेल्या तुझ्या नशिबींच नाहीं चांगल्या तऱ्हेनं राहून आपलं कल्याण करून घ्यायचं, त्याला तूं काय करशील ? तुला आतां चौपदरी देऊन घरांतून हांकूनच दिलं पाहिजे. तुझ्याबरोबरीचे पोरगे—आतां दोन दोन परीक्षांपर्यंत आले, तरी तुला कांहीं नाहीं. खोटं बोलावं, दुवक्त जेवावं आणखी गांवभर भटक्या माराव्या. आज तूं चांगला सांपडला आहेस. काकांना येऊं दे ह्मणजे तुझ्या पाठीचीं सालडीं निघे पर्यंत तुझा......"

"पण आत्याबाई, मीं असं केलं तरी काय ? मीं सांगितलं यांत अगदीं एक अक्षरसुद्धां खोटं नाहीं."

"खोटं नाहीं ? तूं विठ्ठलपंत कवठेकराकडे गेला होतास म्हणतोस तें खरंना ?"

"हो. हो. अगदीं अगदीं खरं. मला काकांनीं त्यांना द्यायला म्हणून सकाळींच चिठ्ठी दिली, आणखी मी ती घेऊन त्यांच्याकडे जाऊन त्यांचं उत्तर घेऊन आलों."

"कोणरे विठ्ठलपंत हे ? जे तिकडे खूपखाबादेला जाणार होते ते ?" "हो. हो. ते काकांकडे येतात आणखी कुठल्या संस्थानांत होते वाटतं तिथल्या खूप आपण यंव केलं त्यंव केलं अशा गप्पा सांगत असतात ते, तेच विठ्ठलपंत" असें भास्करानें उत्तर दिलें.

तें भास्कराचें बोलणें ऐकून सरस्वतीबाईच्या मनाची काय स्थिति झाली असेल, ती तिची तिलाच ठाऊक. ती अतिशय संतप्त दृष्टीनें त्या आपल्या भाच्याकडे पहात उभी राहिली. आणि पुनः त्याला विचारते, "काय म्हणतोस ? ते इथें आहेत, आणखी त्यांना देण्यासाठीं तुला काकांनीं चिठ्ठी दिली होती, ती त्यांना देऊन त्यांचं उत्तर आणलंस ? त्यांच्याचपासून आणलंस ?"

"हो. हो. काकांनीं मुळीं सांगितलंच होतं, कीं त्यांच्याजवळ चिठ्ठी दे. दुसऱ्या कोणाजवळ देऊन येऊं नको. ते घराच वेळ उठले नव्हते, तेव्हां मी तिथें बसून राहिलों. मग चिठ्ठी पाहून आंत गेले. किती वेळ तरी बाहेर आले नाहींत. शेवटीं एकदां बाहेर आले आणखी मला जबाब दिला, तेव्हां तो घेऊन मी इकडे आलों."

तें उत्तर ऐकतांच सरस्वतीबाईचें पित्त आणखी खवळलें. आपल्यास रंगोपंतानें केवळ बात ठोकून दिली काय ? त्यानें कोणीच पाठविलें नाहीं काय ? रकमा पाठविल्या तेंही अर्थातच आतां खोटें असलें पाहिजे. मनुष्यच जर गेला नाहीं तर रकमा तरी गेल्या कशा ह्मणव्या ? परंतु तितक्यांत तिला वाटे, कीं हा द्वाड पोरगा साऱ्या मुलुखाचा लबाड, हाच कांहीं तरी बहाणा करीत नसेल म्हणून कशावरून ? रंगोपंत अशा वेळीं असली लबाडी करावयाचा नाहीं. कांहीं तरी चूक आहे. याप्रमाणें ती आपल्या मनास आळीपाळीनें शंकांच्या स्वाधीन करी व आपणच त्यांची निवृत्ति करी. एकदां तिला वाटे, कीं पोरगा जरी पहिल्यापासून लुच्चा, तरी पण या वेळीं त्याला असली लबाडी

करण्याचें कांहीं कारण नाहीं. दुसऱ्या पक्षीं वाटे, कीं रंगोपंत आपल्याशीं तरी अशी लबाडी करणार नाहीं आणि बारीक-सारीक गोष्टींत केली, तरी अशा संकटाच्या वेळीं मुळींच करणार नाहीं. तेव्हां या पोराच्याच बोलण्यांत कांहीं तरी लबाडी असली पाहिजे, अशी तिच्या जिवाची नुसती तळमळ झाली. कांहीं केल्या तिला मनाचें समाधान करून त्याला स्वस्थता आणणें शक्य होईना. तिचें अंतःस्थ मन तर तिला पक्कें असें सांगे, कीं नवऱ्याला रक्कम न पोहोंचल्यामुळेंच त्याच्या पुनः पुनः तारा येत असाव्या. अशा तऱ्हेनें ती आपल्या मनांतल्या मनांत तडफडत असतां आणखी एक तार आली. या वेळीं रंगोपंत घरीं नव्हता. अर्थातच तिनें त्या भास्कराकडून ती येववून फोडविली. त्यानें फोडून वाचून दाखविली. तींत " मीं चार तारा पाठविल्या. त्यांचं उत्तरही नाहीं, रक्कमही नाहीं आणि कोणी आलंही नाहीं, याचा अर्थ काय ? " म्हणून विचारलें होतें ! तें ऐकतांक्षणींच संशयाची निवृत्ति झाली. रंगोपंतानें आपल्याशीं पुरी लबाडी केली. त्याला रक्कम मिळाली नाहीं, त्यानें कोणी माणूस पाठविला नाहीं, आणि ही सर्व हकीकत आपल्यापासून लपविण्यासाठीं कांहीं तरी बाता झोंकून दिल्या. पण आतां अशा प्रसंगीं करावयाचें काय ? अशा विवंचनेंत ती पडली. या अशा भयंकर स्थितींतही आपल्या विश्वासाच्या रंगोपंतानें अशी आपल्याशीं लबाडी करावी, याला ह्मणावें तरी काय ? हेंच तिला समजेना. आणि आतां पुढें तरी काय ? आपण कांहीं करून रुपये वगैरे पाठवावे तर तें शक्य नाहीं. कारण आपल्याजवळ आतां रक्कम आणण्यास कांहींच नाहीं. एक दागिना नाहीं, कीं चार तोळे सोनें नाहीं.

तिचा एकसारखी तडफड चालली होती. आणि तशा स्थितींत ती असतां रंगोपंतदादा बाहेरून नेहमींच्या ऐटीप्रमाणें आले. आपल्या पश्चात् काय काय गोष्टी घडल्या त्याचें बिचाऱ्यास स्वप्न सुद्धां नव्हतें. तो येण्याबरोबर सरस्वतीबाईनें एकदम त्याच्या अंगावर ओरडून त्यास ह्मटलें, " भेल्या, तूं माझा भाऊ मोठा काळजीचा म्हणून सगळं हें तुझ्या स्वाधीन केलंत होतं ? आणखी तूं हें असं करून आमचा गळा कापलास ! "

आपलें कारस्थान कांहीं तरी बाहेर पडलें अशी एकदम शंका येऊन मधेंच रंगोपंत तिला बेफिकिरीनें, किंबहुना उद्धटपणें म्हणतो, " काय झालं काय मग ? कुठें बिघडलं ? "

" तूं आपला विश्वासू स्नेही पाठवितोस म्हणून मला सांगितलंसना ? "

" हो. आणखी त्याप्रमाणं पाठविलाही. त्याचं आतां काय आलं आहे ? "

" हा बघ, हा बघ. याच्याबरोबर आजच सकाळीं त्याला चिठ्ठी पाठविलीसना ? "

" चिठ्ठी ? त्याला ? " रंगोपंत अगदीं चपापून जाऊन ह्मणाला व ती पुढें कांहीं बोलणार तोंच आणखी ह्मणतो, " हें पोर वेंधळं आहे, चिठ्ठी त्याच्या भावाला दिली होती, आणखी तींत विचारलं होतं, कीं विठ्ठलपंत गेला त्याचं पत्रबित्र कांहीं आलं का ? "

" त्याच्या भावाला पत्र दिलं होतंस का ? आणखी ही तार आली आहे ती ? " असें म्हणून तिनें त्याच्या तोंडावर तारेचा कागद जोरानें मारला.

तो त्यानें घेऊन त्याच्यावरून नजर फिरविली व आपलें सगळें भांडवल फुटलें असें त्यास दिसून आलें. त्याचा चेहरा खर्रकन् उतरला; परंतु बुडता माणूस गवताची काडी जरी दिसली तरी तिला धरून आपण तरूं, असें समजून जशी तडफड करतो, त्याप्रमाणेंच त्यानें केलें आणि आधींच उतरलेलें तोंड अधिक वाईट करून म्हणतो:

" अरेरे घात झाला ! विठ्ठलपंतानें घात केला. रक्कम घेऊन येथून.... "

" पुरे. पुरे. मेल्या नष्टा ? तूंच सर्वस्वी आमचा घात केलास. आजपर्यंत किती रुपये तुझ्याकडे पाठविले ? आणखी कसे पाठविले याची कांहीं तरी...... "

" मग पाठविले तर झालं काय ? मला पाठविलेत का तुह्मांला इस्टेट पाहिजे ह्मणून पाठविलेत ? मी काय करूं ? मीं ते चांगलं व्याजाचं उत्पन्न व्हावं म्हणून गुंतविले आहेत. त्यांत आणखी हा अगदीं विश्वासाचा माणूस पाठविला त्यानं घात केला..."

" पुरे. पुरे. आतां आणखी माझ्या अंगाचा विनाकारण संताप करूं नकोस. घरचे घरचेच असतात ते असा घात करतात. मेल्या, तूं मला सांगितलंस, कीं रक्कम देऊन त्याला रवाना केलं म्हणून. आणखी तो तर इथें मरतो आहे. छे. छे. तिकडे काय अडचण झाली असेल आणखी काय नाहीं, याचा कांहींसुद्धां नेम सांगवत नाहीं. खोटं सांगून मला फसवायचं तरी नव्हतंस. "

" फसविलं काय त्यांत तुला ? मीं खरोखरीच त्याला रुपये देऊन पाठविला. पण तो मध्येंच फरारी झाला त्याला मी तरी काय करूं ? कांहीं माझा उपाय आहे ? विश्वासाचा असून त्यानं घात केला. "

" पुनः ह्मणतेना बोलूं नकोस म्हणून ! माझ्या दृष्टीसमोरसुद्धां आतां येऊं नकोस. चालता हो, चालता ! "

" हो चालता तर आतां होईन. पण माझ्या चालत्या होण्यानं काय होणार आहे ? "

" काय होणार आहे ? काय होणार आहे ? दिमाख करून आणखी बोलतोस निलाजऱ्या ? "

" हें पहा, आतां तूं विनाकारण संतापली आहेस तेव्हां मी बोलत नाहीं इतकेंच पण..."

" पण नाहीं, कांहीं नाहीं. तूं माझा सर्वस्वी घात केलास. अरे तूं विश्वासाचा......"

" तेंच तेंच पुनः पुनः बोलण्यांत अर्थ काय ! एकदां जें तेंच दहादां. "

" अर्थ काय ? आणखी मेल्या चांडाळा, अर्थ काय म्हणून मलाच विचारतोस ? "

" शिव्या दे, काय पाहिजे तें कर. तुझ्या तोंडीं कोणीं लागावं ? पण मीं केलें तें अगदीं.. ."

" तूं केलंस, तूं आमचा घात केलास. आह्मांला सर्वस्वी बुडविलंस. आमचा सत्यानाश केलास. आमचं वाटोळं केलंस. आम्हीं तुझ्या भरंवशावर काय काय करून रुपये पाठविले."

" आणखी मीं ते उत्पन्न वाढण्याकडे लाविले. वावगं काय झालं ? "

" रुपये कसे पाठविले, कुठून आणले तें आमचं आम्हांला ठाऊक. "

" आणखी मलाही ठाऊक. कोणाचं कर्ज म्हणून काढून तें बुडवून. कोणाचीं कामें करतों म्हणून त्यांच्यापासून खाऊन. कोणाच्या ठेवी बुडवून. कोणाचे गळे कापून. कोणावर नसतीं खेंगटीं उपस्थित करून त्यांना धाकदपटशा दाखवून, आणखी..."

रंगोपंताच्या दर दर शब्दाला सरस्वतीबाईच्या अंगाचा नुसता संतापच नव्हे, तर अगदीं तिळपापड उडत होता. तिला आजपर्यंत कधीं कल्पनासुद्धां नव्हती, कीं आपला रंगोपंत अशा तऱ्हेनें वागेल, अशीं उत्तरें देईल, किंवा आपला असा उपमर्द करील. आपला हा भाऊ असा आपला घात करील आणि घात करून वर अशा तऱ्हेचीं दुरुत्तरें देईल, हें स्वप्नांत सुद्धां आलें नाहीं आणि तो आपला रंगोबा अशा प्रकारचीं विलक्षण उत्तरें देईल, हें तर तिच्या कल्पनेच्यासुद्धां बाहेर होतें; परंतु आतां ती आपल्या स्वतःच्या कानांनीं तें सर्व ऐकत होती. स्वतःच्या डोळ्यांनीं पहात होती. तिला आतां दुसरें कांहीं दिसत नव्हतें. सगळीकडे एक विश्वासघात मात्र दिसत होता. ती त्याच्या अंगावर शेवटीं उसळून म्हणते:

" तूं ? तूंच का हे असले शब्द बोलतो आहेस हे ? तूंच का ? अरे तूंच का बोलतो आहेस? "

" हो हो. मीच. तीनतीनदां तूं मला विचारलंस रुपये कसे आले, कसे पाठविले म्हणून, तेव्हां एकदां मागपासून, अगदीं तुझ्या सासऱ्यापासून रुपये कसे आले तें सांगितलं. आणखी तुम्हीं कसे मिळविलेत हे, सगळं तुमच्या हातीं कसं आलं, तेंही पण सांगतों पाहिजे तर. सांगूं का ? सांगायला पाहिजेच असलं तर सांगतों. "

" सांग.. सांग. मेल्या, चांडाळा, दुष्टा, नष्टा सांग, काय सांगायचं असेल तें सांग. "

" नुसते दुसऱ्याचे विश्वासघात करूनच नाहीं पैसे आले, तर स्वतःच्या सासूबद्दल, स्वतःच्या दिरांबद्दल वाटेल तें......काय ? सांगूं कीं काय आणखी ? तें जसं तुम्ही केलंत आणखी चैन भोगलीत, तसा तुमचाही कोणी विश्वासघात करून पैसे उपटले, तर त्यांत तुम्हांला एवढं वाईट वाटायला काय झालं ? त्यांत वाईट वाटण्याजोगं आहे काय ? अं ? त्यांत वाईट वाटण्याजोगं काय आहे ? "

" अरे, तूं हें काय बोलतो आहेस ? आणखी कोणाला बोलतो आहेस ? कांहीं तुला आहे का शुद्धि ! "

" हो. अगदीं चांगली शुद्धि आहे. आणखी शुद्धींत असून तुला मी हीं उत्तरं देतों आहें, कीं तुमच्या केलेल्या कर्मांचीच तुम्हांला फळं भोगावीं लागताहेत. "

तो जें बोलत होता, तें अक्षरशः खरें असलें, तरी पण तें रंगोपंतासारख्याच्या तोंडून यावें, यांत कांहीं एक विशेष प्रकारची डागणी होती. आज रंगोपंत चार सहा दिवस रकमा जुळविण्यासाठीं खटाटोप करीत होता आणि त्या सगळ्या खटाटोपांत त्याला अगदीं यश आलें नाहीं. जेमतेम हजारांची रक्कम उभारली गेली असेल नसेल. यामुळें तोही अगदीं त्रासला होता; सतावला होता. त्यांत एका माणसानें आज सकाळीं खास रकम देतों असें म्हटलें असून आज हा मागायला गेला असतां, तुझें मी कांहीं देणें नाहीं, कधीं कांहीं घेतलें नाहीं, पुनः माझ्या घरांत

पाऊल ठेवशील तर खबरदार, असें सांगितलें. दोघांची अतिशय हमरीतुमरी झाली. मारामारीचा प्रसंग आला. त्या गृहस्थानें त्यास गचांडी देण्यापर्यंत मजल आली आणि शेवटीं याला, " फिर्याद करीन, पाहून घेईन. तुरुंगांत पोहोंचवीन " असें म्हणून धाकदपटशा दाखविण्यापलीकडे कांहीं मार्ग न दिसून तेवढ्याच मार्गाचा अवलंब करीत, स्वारींनीं त्याच्या घराच्या बाहेरच्या मार्गाचा अवलंब केला, स्वारी घरीं आली. घरीं येतात तों हा विलक्षण भडिमार कानीं पडला. त्याबरोबर मग काय ? त्याचाही जिभेवर ताबा नाहींसा झाला आणि त्यानेंही भडिमारास भडिमार ठेवून दिला.

सरस्वतीबाईच्या संतापाचा अगदीं कळस झाला आणि तो इतका, कीं त्या शेवटल्या त्याच्या भाषणासरशी ती धाड्कन् निचेष्ट पडली. तिची चेतना नाहींशी झाली. त्याबरोबर जिकडे तिकडे धांवाधांव सुरू झाली. रंगोपंतास आपल्या बोलण्याचा किंचित् पश्चात्ताप झाला. त्यानें तिला शुद्धीवर आणण्याकरितां अतोनात खटपट केली, पण ती अगदीं व्यर्थ गेली. ती तशीच दांतखिळी बसून पडून राहिली होती.

इकडे चिंतोपंत तारा करून दमला. रंगोपंत उत्तर पाठवितो काय ? त्यानें एकाही तारेचें उत्तर पाठविलें नाहीं. शेवटीं, " करावं तसं भोगावं. मी तरी काय करूं ? रकमा जर हातीं येत नाहींत तर माझा तरी काय उपाय ? मी आपली होती नव्हती तेवढी खटपट करून चुकलों. आतां काय त्याचं होणार असेल तें होईल. देवाच्या मनांतून जर या वेळीं त्याला सुटणूक मिळूंच नये असं असलं तर आपण तरी धडपडून काय होणार ? " असला वेदांत त्यानें आपल्या मनास शिकविला आणि आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. चिंतोपंतानें गुंडोपंताच्या नांवानेंही तारा पाठविल्या, परंतु त्या त्यास पोंचल्या नाहींत असें दिसलें, कारण त्याच्याकडून उत्तर गेलें नाहीं.

शेवटीं त्यानें आपल्या धाकट्या भावास तार केली.

---

# प्रकरण ५५ वें.

## " पाण्यापेक्षां रक्त अधिक घट्ट असतें "

अशी एक इंग्रजी भाषेत म्हण आहे. या म्हणीचा अर्थ इतकाच आहे, कीं इतर मंडळींनीं किती जरी प्रेमभाव दाखविला, तरी जीं माणसें आपल्या हाडामांसारक्ताशीं बांधलेलीं असतात, तींच संकटकालीं अधिक उपयोगी पडतात.

कांहीं काळपर्यंत केवळ लोभक्रोधमत्सरादि विकारांच्या स्वाधीन होऊन आपण कितीही त्यांचा द्वेष केला, किंवा त्यांस दूर सारलें, तरी अखेरीस व आपल्यावर संकट आलें असतां त्यांची आपणांस मदत व्हावी, त्यांनीं आपल्याजवळ येऊन आपलें साहाय्य करावें अशी आपल्यास इच्छा होते आणि ज्यांचें आपल्यावर फार प्रेम अशी आपली समजूत, व ज्यांच्यावर आपला श्रीमंतीमुळें हक्क पोहोंचतो, अशा मंडळींनीं आपणास सोडलें असें अनुभवास आलें ह्मणजे तर ही इच्छा फारच प्रबळ होते.

जे कित्येक आधीं मदमत्सरादि विकारांच्या वश होऊन आपल्या बंधुवर्गाच्या नाशाला कारण होतात किंवा त्यांचा द्वेष करून त्यांस आपल्यापासून दूर घालवितात, त्यांना अंतकाळीं अगर संकटकाळीं पश्चात्ताप होतो, आणि आतां आपल्या त्या बंधुवर्गास जवळ करावें अशी इच्छा होते. परंतु आधीं मूर्खपणानें आपण त्यास कोणत्या रीतीनें वागविलें आणि आतां त्यांना कोणत्या तोंडानें आपल्या मदतीस येण्याविषयीं विनवावें असें होऊन केवळ पश्चात्तापाच्या लज्जेनें त्यांचे हातून तसें विनवणें होत नाहीं. अशी मात्र उत्कट इच्छा होत असते, कीं आपलें मत त्यांना कळून त्यांनीं आपला अभिमान एकीकडे सारून, आपलें अत्यंत क्रूरपणाचें व दुष्टपणाचें वर्तन विसरून आपल्याकडे यावें.

याच वर्गांत कित्येक असेही असतात, कीं त्यांच्या स्वतःवर विलक्षण संकट आलें कीं, मग ते आपली सगळी लाज वगैरे गुंडाळून ठेवून आपण होऊनच आपल्या, पूर्वीं अवमान करून, द्वेष करून, सर्वथा नाश करण्यापर्यंत मजल नेऊनही अगदीं तुच्छ केलेल्या, नात्याच्या मंडळीस आपल्या मदतीस येण्याची विनवणी करण्यास जातात, त्यास अणुमात्र लज्जा वाटत नाहीं. ही मंडळी केवळ कार्यसाधु व तत्कालनम्र अशी असतात. आतां या वेळीं दुसरें कोणी आपलें दर्शनसुद्धां घेऊं इच्छित नाहीं. मग आपल्याला मदत करण्याची गोष्ट कशाला ? असें झालें, ह्मणजे मग त्यांस आपल्या त्या बांधवांचें स्मरण होतें आणि त्याबरोबर मग आपलें नाक मुठींत धरून ते त्या बांधवांकडे येतात. ते मागचें सर्व विसरतात आणि तुह्मीही विसरा, असें त्या बांधवांस विनवितात. ज्याप्रमाणें त्या वेळपर्यंत त्यांच्या मनांत दयाप्रेमादि विकारांचा नायनाट होतो, त्याचप्रमाणें आतां लज्जेचा विचार अजीबाद नाहींसा होतो.

चिंतोपंत या दुसऱ्या वर्गापैकीं होत, म्हणा, अगर त्यास यावेळीं खरोखरीच मागील कृत्यांबद्दल पश्चात्ताप झाला होता असें म्हणा, पण एवढी गोष्ट खरी कीं, चिंतोपंतावर आलेल्या या संकटांत आतां रंगोपंताकडून जेव्हां पत्रांचीं व तारांचीं उत्तरें सुद्धां जाईनात तेव्हां इतर कोणाचें स्मरण न होतां त्यांस आपल्या भावाचें, आईचें वगैरे स्मरण झालें ! त्यांस आजपर्यंत आपण किती पाजीपणानें वागविलें, त्यांच्या अन्नावर आपण काय काय किटाळें आणलीं, याची जणूं काय त्याला अगदीं आठवणच नाहींशी झाली. आपण इतकें जरी केलें, तरी या वेळीं त्यांना जर तार केली, तर खात्रीनें त्याचा उपयोग होईल असें त्याच्या मनाला वाटलें, आणि त्यानें त्याप्रमाणें त्यांस तार केली. पहिल्या तारेंत एवढेंच होतें कीं, " रंगोपंत यास भेटून माझ्या पत्रांचीं व तारांचीं उत्तरं कां नाहींत ? रकमा पाहिजेत त्यांचं काय

झालं ? सगळी मंडळी खुशाल आहेत कीं नाहींत हें कळवावं. मागलं विसरून यावेळीं मदतीस यावं. " तारेच्या उत्तरासाठीं येथूनच रुपये भरले होते.

राधाबाई व तिचा मुलगा यांस आजपर्यंत अगदीं कांहींच कळलें नव्हतें असें नाहीं. गुंडोपंताचें दुबाजवी वर्तन तर आतां अधिकच दुबाजवी झालें होतें. तो आपण होऊन येऊन यांनीं कोणी न विचारतां तिकडल्या बातम्या इकडे सांगत असे. दहापांच वर्षांची तरी शिक्षा होईल अशा प्रकारचा प्रसंग चिंतोपंतांवर आला आहे; आणि यदाकदाचित् पैसे भरून सुटावयाचा यत्न होईल, तर भरण्यास पैसेही नाहींसे झाले आहेत. शंभरसुद्धां रुपये एकदम गोळा होऊन जाण्याची मारामार झाली आहे, वगैरे गोष्टी तो येऊन सांगे. राधाबाई किंवा तिचीं मुलें कधींसुद्धां त्या गुंडोपंतास अशा बाबतींत विचारीत नसत. मुलगा तर उलट गुंडोतानें घरींसुद्धां येऊं नये असा आपला अभिप्राय अगदीं स्पष्ट शब्दांनींच नाहीं, परंतु इतर पुष्कळ मार्गांनीं दाखवीत असे. विशेषतः त्या दिवसापासून (ज्या दिवशीं गुंडोपंतानें दुष्टपणानें त्याच्या कोमल मनाचें विदारण केलें त्या दिवसापासून) गुंडोपंताशीं भाषण करण्याचेंसुद्धां त्या पोराच्या जिवावर येई. परंतु मौज ही कीं, त्या दिवसापासूनच गुंडोपंतास त्याच्याबद्दल एकप्रकारचें प्रेम उत्पन्न झालें. त्या दिवसापर्यंत तो त्यास एकीकडे भेटे. त्या दिवसानंतर थोडेच दिवसांत तो हळूच घरांत येऊं लागला. पहिले दिवशीं राधाबाईच्या दृष्टीस पडण्याबरोबर त्यानें तिला साष्टांग नमस्कार घातला. झाल्या गोष्टीबद्दल मजवर राग करूं नये, असें तिला विनविलें. राधाबाई प्रथम कांहीं बोलली नाहीं. परंतु पुढें त्याचा लोचटपणा एकसारखा अव्याहत चालू झाल्यामुळें कधीं तरी बोले. तिनें आजपर्यंत त्याला कधींही चिंतोपंताच्या कामकाजाच्या किंवा कोणत्याही बाबतींत प्रश्न विचारले नाहींत, परंतु यानें आपण होऊनच कोणी न विचारतां सगळ्या भाकडकथा व जनापवाद सांगत बसावें. पांच चार वेळां तिनें त्यास मला त्या गोष्टी ऐकण्याला सुद्धां नकोत असें स्पष्ट सांगितलें, परंतु तो ऐकेना. वारंवार तेंच तेंच बोलावयाचा. त्याला घरांतून गचांड्या मारून घालवावयाचा तर नाहीं ? साधेल तितक्या वेळां ती त्याला भेटण्याचें टाळी. आणखी काय करील ?

गुंडोपंतानें आजपर्यंत झालेल्या हकीकती सांगितल्या असल्यामुळें अर्थातच ही तार कशाबद्दल असेल यांचें गूढ त्यांस पडलें नाहीं. परंतु आपल्याकडे तार आली याबद्दल मात्र अति आश्चर्य वाटलें. चिंतोपंत कधीं आपल्याला असें लिहिल हें त्यांच्या स्वप्नांतसुद्धां येणें शक्य नाहीं. आणि अचानक तें झालें तेव्हां त्यांस अत्यंत आश्चर्य वाटेल यांत नवल काय ? या प्रसंगीं मदत आपल्याकडून होण्याचा संभव काय, हेंच त्यांस समजेना. पैशाची मदत होणें केवळ अशक्य, कारण त्यानेंच आपल्यास दारिद्र्यांत लोटून दिलेलें. सरस्वतीबाईकडे जाऊन तिच्याकडून कांहीं गोष्टीचा खुलासा काढावा तर तें अशक्यापलीकडे अगदीं अशक्य. अशा स्थितींत त्या तारेचें उत्तर काय लिहिणार आणि कसें लिहिणार ? सर्व मंडळी कुशल आहेत असें लिहिण्यापलीकडे कांहीं सुद्धां लिहिणें त्यांस शक्य नव्हतें. लिहिणार

काय ? आपल्यास अधिक कांहीं लिहिणें शक्य नसलें, तरी पण अशी अशी तार आली आहे, तर आतां तरी तुझी तावडतोब कांहीं उत्तर त्याश असें सरस्वतीबाईकडे कळविल्याखेरीज राहूं नये. मग तिला कांहीं करावयाचें असेल तर करील, असें राधाबाईच्या मनानें घेतलें. परंतु तें तिच्या कानावर घालावयाचें कसें ? स्वत: जाऊन सांगणें शक्य नाहीं. मुलाला पाठविणें तसेंच अशक्य. मंडळी कुशल आहेत एवढें उत्तर तर तावडतोब त्याहावयाचें ठरलें, आणि तें पाठविलेंही. परंतु तेवढें उत्तर पाठविल्यानें काय होणार होतें ? मंडळी विचारांत पडली होती.

तार आल्यानंतर तिसरे चवथे दिवशीं पत्र आलें. तें पत्र लांबलचक होतें. त्यांत आपल्यावर फार कठिण प्रसंग आला आहे. घरीं तारा, पत्रें पाठविलीं, माणसांस बोलाविलें, तर एकाही पत्राचें किंवा तारेचें उत्तर नाहीं. कोणी आलें नाहीं, रकमा मागितल्या त्याही कांहीं आल्या नाहींत. तर मागल्या सर्व गोष्टी विसरून व मला क्षमा करून घरीं प्रकार काय आहे तो कळवावा. रंगोपंत येणार नाहीं हें मला दिसलेंच होतें. रकमाही आल्या नाहींत. नाहीं तरी हरकत नाहीं. परंतु मला माणसांचें पाठबळ पाहिजे आहे. तें जर मिळेल तर यावेळीं मला जीवदान दिल्याप्रमाणें होणार आहे अशाच अर्थाचा मजकूर असून कोणी तरी चांगला वकील घेऊन येण्याविषयीं विनविलें होतें. रकमा नाहीं, तर हरकत नाहीं त्यांची कशी तरी इकडे तजवीज केली जाईल. हा त्या पत्रांतील मजकुराचा सारांश होता. तें वाचल्याबरोबर त्या मायलेकरांचे मनांत काय विचार आले किंवा त्यांनीं काय करण्याचें योजिलें वगैरे कांहीं सांगण्यापूर्वीं आत थोडीशी चिंतोपंताकडील हकीकत सांगणें जरूर आहे. आजपर्यंत जी हकीकत वाचकांस कळली आहे, ती केवळ त्याच्या तारापत्रें वगैरे आलीं त्यावरून आणि त्यानें आपल्या बायकोस एकदम रवाना करून दिलें त्यावरून अनुमानानें कळली आहे. परंतु आतां त्या हकीकतीचें खरें स्वरूप वाचकांस नीटपणें सांगण्याचा विचार आहे.

चिंतोपंत त्या संस्थानांत आल्यापासून हा दाक्षिणी माणूस संस्थानचें वाटोळें करण्यासाठींच आला आहे, असें ज्यास त्यास वाटून जो तो त्याचा द्वेष करूं लागला. परंतु साहेबांच्या दिमतीनें आलेल्या माणसाचा कितीही जरी कोणी द्वेष केला, तरी त्याला काय किंमत आहे ! एजंटसाहेबांचा लोभ त्याच्यावर फार, एजंटसाहेबांची वाटेल तेव्हां भेट घेऊन वाटेल तितका वेळ बोलत बसतांना मंडळींनीं त्याला पाहिलेलें, असें असल्यामुळें अर्थातच हजारों मंडळींच्या मनांत त्याच्याबद्दल द्वेष असला, तरी तो जेथल्या तेथेंच दाबून ठेवणें त्यांस भाग होतें; इतकेंच नव्हे, तर त्याला दादासाहेब, रावसाहेब, बापुसाहेब असें म्हणून जो तो त्याची हांजीहांजीच करीत असे. बडे बडे सरदार, दरकदार, लोक, परंतु याच्या घरीं यावयाचे, याला भेटावयाचे, याला नजरनजराणे करावयाचे.कारण काय? तर एजंटसाहेबांच्या दिमतीनें आलेला आणि त्यांच्या गळ्यांतला अगदीं ताईत असा हा आहे अशी ज्याची त्याची खात्री. ज्यानें यावें त्यानें आपलें काम करून देण्याबद्दल याचे आर्जव करावें आणि एजंटसाहेबही लहानसहान कामांत याच्या ह्मणण्याप्रमाणें करावयाचे, यामुळें

याचा बडेजाव फार वाढला. प्रत्यक्ष दिवाणाला मान नाहीं इतका मान चिंतोपंताला. दिवाणाचा दरारा नाहीं, इतका चिंतोपंताचा. चिंतोपंतांनीं शब्द टाकला आणि तें काम झालें नाहीं असें नाहींच. चिंतोपंतानें कांहीं मागितलें आणि तें मिळालें नाहीं असें कधींच झालें नाहीं. वाटेल तो जिन्नस, चिंतोपंतानें वाटेल त्यावेळीं वाटेल त्याच्या घरीं मागण्यास पाठवावें, जिन्नस हजर. वाटेल तितक्या रकमा त्यांनीं मागितल्या तरी त्या त्यास मिळावयाच्या. त्यांबद्दल एक बोटभर चिठ्ठीसुद्धां कोणीं मागितली नाहीं. अशी स्थिति कित्येक दिवसपर्यंत चालली होती; परंतु अखेरीस त्या स्थितीच्या अखेरीलाही प्रारंभ झाल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं तसतशी दरबारची मंडळीही जरा आपली वागणूक बदलूं लागली. बाबू महाशयांचें व चिंतोपंतदादांचें भांडण झाल्या दिवसापासून तर तो एक त्यांस मोठाच शत्रु उत्पन्न झाला. त्यानें सगळ्या राजधानीभर गुप्तपणें हिंडून याच्या एकूण एक कृत्यांबद्दल हकीकती गोळा केल्या. साहेबांचा त्यांच्यावर मुळींसुद्धां विश्वास नाहीं असें ज्याच्या त्याच्या मनांत भरवून दिलें आणि एकदम एक पांचपन्नास अर्ज जर याच्या विरुद्ध पाठविले, तर आतां हां हां म्हणतां त्याची गठडी वळून जाईल. हा दक्षिणी माकड इथें आला आहे, याला जर लवकरच घालवून देण्याची खटपट केली नाहीं, तर तो संस्थानची राखरांगोळी केल्याखेरीज राहणार नाहीं. ही दक्षणची मंडळी जिथें जिथें म्हणून जाते तिथें तिथें सगळा निकालच करून टाकते. हल्लीं साहेबांची मर्जी त्याच्यावर खप्पा झाली आहे. तेव्हां झालें तर आतांच कांहीं होणार आहे. मी तें सगळें जुळवून आणतों. असें म्हणून ज्याच्या त्याच्या मनांत त्यानें एकेक अर्ज तयार करून पाठवून देण्याविषयीं भरवून दिलें. इतकेंच करून तो थांबला नाहीं; तर नुसतीं निनांवीं पत्रें शेंकडोंशें लिहवून त्यांत चिंतोपंताची वाटेल त्या प्रकारची नालस्ती केलेली, अशीं टपालांतून पाठवून दिलीं. ती नालस्ती अशी तशी नाहीं, तर साहेबाला स्वतःही फार संताप येईल असा कांहीं पत्रांत मजकूर असे. तो असाः—" साहेब चिंतोपंताला आपण जवळ करतां एवढ्यावरच तो लोकांस नानाप्रकारच्या गप्पा सांगून आपल्या नांवानें पैसे खातो. परवां अमक्या माणसाचें काम आपले हातून अनुकूल करवून देण्याच्या मिषानें त्यानें पांच हजार रुपये खाल्ले. ते पैसे आपल्यासाठीं म्हणून त्यानें घेतले ! आपण असे पैसे खाल्ले हें कोणीही मनुष्याला कधीं खरें वाटणार नाहीं, परंतु त्याच्या सांगण्यामुळें उगीच आपल्या नांवाची नाचक्की होते ती होऊं नये. अशा दीडदमडीच्या माणसानें असें सांगत फिरावें हें आपल्याला किती वाईटपणा आणणारें आहे ! आजपर्यंत आपण मिळविलेलें सगळें मोठें नांव यामुळें अगदीं नाहींसें होऊन जाणार आहे. "

हा दिलेला मासला कांहींच नाहीं. याच्याहीपेक्षां आणखी कित्येक पत्रें—निरनिराळ्या भाषांत—वरींचशीं उर्दूंत, कांहीं मोडक्यातोडक्या इंग्रजींत, कांहीं हिंदींत, मिळून एकसारखा वर्षाव चालला होता. अशा या स्थितीमुळें साहेबांचें मन खरोखरीच फार कलुषित झालें. शिवाय एकदोन पत्रांत अगदीं साहेबांस किंवा चिंतोपंतास मात्र ठाऊक असाव्या अशा गोष्टींचा उल्लेख केलेला पाहून साहेबांस त्या सर्व पत्रांतील मजकराबद्दल फार संशय आला.

परंतु फार दिवसांचा लोभ असला, म्हणजे मनुष्यावर एकदम हत्यार धरवत नाहीं म्हणून म्हणा, किंवा त्याच्यावर हत्यार उपसल्यास कदाचित् अगदीं अनपेक्षित अशा कांहीं गोष्टी बाहेर येतील असें वाटून म्हणा, पण साहेबांनीं तीं सर्व पत्रें एका बाजूस सारून ठेविलीं होतीं. तिकडे कांहीं लक्ष द्यावयाचें नाहीं, असा बेत केला होता. पण बाबू महाशयांनीं अगदीं पक्का विडा उचलला असल्यामुळें ते नुसत्या बुलिस्नीकसाहेबांकडेच पत्रें व अर्ज पाठवून थांबले नाहींत. छे ! छे ! तसें कसें होईल ? त्यांनीं वरिष्ठ अधिकारी मंडळीकडेही तोच क्रम चालविला होता. प्रथम प्रथम अशा अर्जांचा व पत्रांचा कांहींसुद्धां उपयोग होणार नाहीं हें त्यांस ठाऊकच होतें. परंतु सहा सहा महिनेपर्यंत एकसारखा पत्रांचा व तक्रारींचा वर्षाव झाल्यानंतर मग काय विचारतां ? वरून स्नीकसाहेबांस विचारणी झाली. स्नीकसाहेबांनीं आपलेकडून प्रथमतः त्यांत कांहीं अर्थ नाहीं असें गुळमुळीत उत्तर दिलें. परंतु पुढें पुनः चौकशी करण्याविषयीं लिहून आलें. तेव्हां त्यांनीं चिंतोपंतास बोलावून नेऊन खरी स्थिति काय होती त्याचें दिग्दर्शन केलें. परंतु आपण जर साहेबाला हरएक कामांत उपयोगी पडतों तर साहेब आपल्यावर कांहीं येऊं देणार नाहीं, अशी खात्री वाटून तो साहेबांस हंसत हंसत ह्मणतो, " साहेब, आपण आहांत तोंपर्यंत मला मुळींच स्वतःबद्दल काळजी नाहीं, " एवढेंच बोलून तो थांबता तर ठीक होतें. परंतु पुढें म्हणतो, " आपली आपल्याला काळजी आहेच कीं नाहीं ! "

तें वाक्य त्याच्या तोंडून बाहेर पडतांच सर्व मन्वंतर फिरलें. लागलीच दुसरेच दिवशीं त्याच्यावर दहापांच तऱ्हेचे खटले करण्याचें ठरून गुप्त वारंट काढून ठेविलें, कीं तो पळूंच लागला तर पकडावा. त्यास ती बातमी लागली, त्यानें आपल्या कुटुंबास पाठवून दिलें आणि केव्हां किटाळ येतें त्याची मार्गप्रतीक्षा करीत बसला.

---

# प्रकरण ५६ वें.

## चढत्या काळीं काठ्या आणि पडत्या काळीं मिठ्या.

चिंतोपंतास आतां असें झालें, कीं आपलें असें या जगांत कोणी सुद्धां नाहीं, प्रथमतः रंगोपंतानें केवळ नाइलाजास्तव तारेचें उत्तर पाठविलें नाहीं. दुसरे दिवशीं पाठवूं असा त्यानें मनांत बेत केला. दुसरे दिवशींही पाठविण्याला सवड झाली नाहीं तेव्हां स्वारींनीं मनाचें समाधान करून घेतलें, कीं उद्यां खास पाठविण्याला हर-

कत नाहीं. तिसरेही दिवशीं तीच अवस्था झाली. तेव्हां हलकेच त्यास असें वाटलें, कीं आतांपर्यंत आपण खटपट करून जेव्हां साध्य झालें नाहीं, तेव्हां आतां जें होईल तें होवो. धडपड तरी कशाला करा ? त्यांत सरस्वतीबाईचा आणि त्याचा खटका उडाला तेव्हां तर कांहीं विचारूंच नका. जाऊं द्या काय होईल तें होईल ? रकमा जुळविण्याला आपण कांहीं खटपट कमी नाहीं केली. आणखी धडपड करून तरी यश येईलच असें तरी कशावरून म्हणावें ! आम्हीं तरी मध्यरात्रीं जाऊन रकमा मागितल्या, तर लोकांनीं द्याव्या कुठल्या, त्यांनीं ज्या आमच्याकडून रकमा नेल्या, त्या कांहीं घरांत पेटींत घालून ठेवण्यासाठीं नेल्या नाहींत; धंद्यासंबंधानें लागल्या म्हणून नेल्या. तेव्हां आयत्या वेळींच--किंबहुना अवेळींच--आपण मागायला गेल्यावर त्या नाहीं यावयाच्या. त्यांत काय मोठेंसें आहे ? एक दोन दिवस असलें समाधान झाल्यावर मन जरा निर्ढावलें आणि त्यास असें वाटलें, कीं हातीं असल्या तरी देखील काय म्हणून पाठवाव्या त्या वायां जाणार. आपल्या ऐकिवाप्रमाणें जर साहेबच त्यांच्यावर उलटला असला, तर किती पैसे खर्च केले तरी काय व्हावयाचें आहे ? तो आतां कांहीं ठणकावल्याखेरीज सोडीत नाहीं. तेव्हां आपण आतां पैसे न पाठविले, ह्मणजे तितकी बचत होईल व काय शिक्षा व्हायची असेल ती झाल्यावर ती भोगून सुटून आल्यावर त्याची त्यालाच उपयोगी पडेल ! तेव्हां आज त्याच्या हिताची गोष्ट करावयाची ह्मणजे त्याला रकमा न पाठविणें हीच होय. सुटून आला आणि मग घरांत कांहीं सुद्धां नाहीं, सगळें 'ऊर्ध्वाय दिशे ब्रह्मणे नमः' झालें आहे, तर त्या सुटून येण्याचा उपयोग काय ? त्यापेक्षां आज आपल्या हातीं रक्कम न येऊन आपण पाठवीत नाहीं तेंच चांगलें.

वनस्पतीशास्त्री वनस्पतींचें बीजारोपण, उद्गम, संवर्धन, विकास, पुष्पधारण, फलप्राप्ति इत्यादि अनेक स्थितिपरंपरेचें फारच सूक्ष्म तऱ्हेनें अवलोकन करीत असतात आणि एकीपासून दुसरी स्थिति कशी परिणत होते हें पहात असतात. त्याचप्रमाणें इतर शास्त्रांतही अध्ययन करण्याच्या विषयांचें असें निरीक्षण केलें जातें. मानसशास्त्री भिन्नभिन्न व्यक्तींच्या विचारपरंपरांचें जर असेंच अध्ययन करतील, तर त्यांचा विषयही त्यांस कांहीं कमी मनोरम वाटणार नाहीं. मूळचा एखादा साधा विचार मनांत येतो त्यास प्रथमतः वाईट किंवा चांगलें असें कसलेंच वळण नसतें. परंतु पुढें कांहीं कांहीं विशेष स्थिति उत्पन्न होऊन त्या स्थितीमुळें त्या विचारास चांगलें किंवा वाईट असें स्वरूप येतें. असें स्वरूप आलें, एकदां वळण एका बाजूचें मिळालें, ह्मणजे मग अशाच गोष्टी होत जातात कीं, त्याच वळणावर तो विचार एकसारखा बळावत जाऊन त्यास एक किंवा दुसऱ्या प्रकारानें परिपक्वता येऊन बसते. रंगोपंताच्या विचारवृद्धीच्या ज्या निरनिराळ्या अवस्था अगदीं अनुक्रमानें वर दिल्या आहेत, त्यांवरून त्यांच्या विचारांस कोणत्या बाजूचें वळण मिळालें होतें हें सहज समजणार आहे. एवढ्याकरितां त्याच्याबद्दल आतां अधिक विवरण करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. चिंतोपंताचें खरें हित साधावयाचें, त्याची खरी कळकळ बाळगावयाची, तर आज त्याला रकमा पाठविणें रास्तच नव्हे, अशी त्याची समजूत झाली. तेथेंच तो

थांबला नाहीं. छे ! चिंतोपंताचें हित पाहावयाचें तरी कां ? सरस्वतीबाईचा आपला संबंध, तिची काळजी करणारें आपल्याखेरीज दुसरें कोणी नाहीं म्हणून. तेव्हां रकमा पाठविण्यांत तात्पर्य नाहीं. सरस्वतीबाईला अन्नाला मोताद येईल, आणि तो सुटायचा नाहीं तो नाहींच. त्यापेक्षां आपण स्वस्थ बसावें तें चांगलें. झालें. चाललें त्याचें मन भडकत. दोन दिवस झाले, त्याच्या मनांतील विचारांस आणखीही पुढें जाण्याची प्रवृत्ति झाली. चिंतोपंताला रुपये पाठविण्यांत तात्पर्य काय ? व्यर्थच जाणार कीं नाहीं ? आणि न पाठविले, येथेंच जमविले तरी काय ? तो जर सुटून परत आला, तर आम्ही काय करणार ? जोंपर्यंत तो तिकडे पैसे मिळवून इकडे पाठवीत होता, तोंपर्यंत अर्थातच आपली त्याला जरूर. पण तो जर त्यांतून सुटला, तर त्याला कशाला आपल्यासारख्या व्यवस्था पहाणाराची जरूर, मुळींच नाहीं. त्याला पुनः कुठें कांहीं नोकरी—सरकारी किंवा संस्थानी—मिळणें शक्य नाहीं. मग तो अर्थातच सगळें पहाणार आणि आपल्यास गच्छ गच्छ करणार. तेव्हां आपण आपलें काय बरें करून घ्यायचें तें आतांच कां नाहीं करून घेतलें ? त्वरित सावध व्हावें तें चांगलें. एकदां त्याच्या तडाक्यांत गेल्यावर आपलें सगळें संपलें. त्यानें तरी लबाडीनेंच सर्व पैसा मिळविलेला. त्याच्या बापाचा तरी पैसा तसाच आलेला. आणि तो सुद्धां या चिंत्यानें अगदीं निखालस डांबिसपणा करून उपटलेला. तेव्हां आपण त्यांतला कांहीं भाग लाटून तळीराम गार करून घेतला, तर त्यांत परमेश्वराच्या घरीं कांहीं आपल्याला दंड होणार नाहीं. अपापाचा माल गपापा गेल्याखेरीज काय उपयोग ? तो आल्यावर आतां आपलें आजपर्यंतचें काम पाहून आपल्याला कांहीं बाक्षिशी थोडीच देणार आहे ! मुळींच नाहीं. फार झालें तर पंक्तिबारागिर बनवील आणि आमच्यावर मोठे उपकार केल्याचें जन्माचें गाणें गात राहील त्यापेक्षां आपण आपल्या हिताची गोष्ट स्वतःच करावी. बहिणीला तर या बाबतींत विचारण्याचा अधिकारच पोहोंचत नाहीं. तिला काय, ती माझ्याजवळ राहिली तरी तिला कांहीं कमी नाहीं. न राहिली तर तिची मर्जी चिंतोपंतदादा आणि ती काय करावयाचें असेल तें करतील. आपल्या हातांत काय आहे हें आपण आपलें गुंडाळून उचलतां येईल तितकें उचलावें हा रस्ता सगळ्यांत उत्तम. आणि आजच्या स्थितीला आपल्याला तेंच फार सोपें आहे. ठरलें.

चिंतोपंतानें स्वतः पैसे वाईटच मार्गानें मिळविलेले, त्याच्या बापाची मत्ता तीही कांहीं मोठ्या राजमान्य मार्गानें मिळविलेली नव्हे, तेव्हां आपण त्या मत्तेच्या कांहीं भागाचा अपहार केला, तर काय हरकत आहे, असा पोक्त विचार करून रंगोपंतानें इकडून आपलें बरें व चिंतोपंताचा नाश करण्याचें ठरविलें. सरस्वतीबाईला बिचारीला यांतलें कांहीं कळेना. आणि ती रंगोपंतास कांहीं बोलण्याला गेली, तर तो आतां नुसत्या गुरकावणीच्या गोष्टी सांगूं लागला. एका तीनचार दिवसांत, किंबहुना आठा दिवसांत इतका फरक पडला ! तिनें कांहीं विचारलें, तरी कांहीं तिला सरळ उत्तर म्हणून मिळावयाचेंच नाहीं. नवऱ्याचा कांहीं निरोप, पत्र किंवा कांहीं आलें, तरी तिला कांहीं कळण्याला मार्ग नाहींसा झाला. कोणाकडे काय

येणें आणि काय नाहीं याची तिला रतिभर सुद्धां माहिती नाहीं. यामुळें ती बायको जात्या जहांबाज असूनही तिला या वेळीं कांहीं करतां येईना. लिहितां वाचतां येण्याच्या नांवानें आंवळ्याएवढें. अशा स्थितींत तिचा आतांपर्यंतचा सगळा कावेबाजपणा, धूर्तपणा, दुष्टपणा, सर्व कांहीं केवळ निर्भेल झाल्याप्रमाणें झालें. करणार काय ? तिचा जीव चडफडे फार. रंगोपंत कांहींना कांहीं तरी लबाड्या करतो आहे, असें तर तिला खास वाटलें; परंतु त्या लबाड्या केवळ नाइलाजामुळें हातीं रकमा न आल्यामुळें त्याला कराव्याशा वाटल्या, असें तिला अद्यापि वाटत होतें. पुढें त्याची उद्दामपणाचीं व मर्मभेदक बोलणीं सुरू झालीं व थोडींबहुत दुसरींच लक्षणें दिसूं लागलीं, तेव्हां तिलाही त्याचा राग येऊं लागला. तिनें त्याच्या भावास,नरसोपंतास त्याच्याबद्दल पत्र लिहिलें. पण इकडे नवऱ्याबद्दल काय करावें हें तिला कांहीं सुचेना. आपल्यास या अशा वेळीं कोण उपयोगी पडेल ? गुंडोपंत. गुंडोपंताखेरीज दुसरा कोणी तिला दिसेना. आणि त्याला बोलावून आणून मुठींत नाक धरून, " मी रंगोपंतासंबंधानं अगदीं चुकलें. तुह्मांला विनाकारण त्रास दिला. तुह्मी पुनः येऊन पहिल्याप्रमाणं मला मदत करा " म्हणून विनवणी म्हणजे केवढी लाजिरवाणी गोष्ट ! पण सध्यांचा प्रसंगच तसा होता, कीं ती तितकी गोष्ट केल्याखेरीज आतां दुसरा उपाय नाहीं. गुंडोपंताखेरीज दुसरा कोणी उपयोगी पडणारा माणूस नाहींच. त्याला आतां बोलावून आणून विनवण्या करावयाच्या ? त्याखेरीज गत्यंतर काय ? रंगोपंताच्या उर्मट उत्तरांनीं आणि वागणुकीनें तिला असें पक्कें वाटूं लागलें कीं, आपला नवरा खुशाल तिकडे तुरुंगांत पडावा, आणि आयताच सगळा कारभार आपल्या हातांत यावा असा त्याचा पक्का हेतु. साप बिळांत शिरेपर्यंत त्याला कांहीं धरतां वगैरे आलें तर येतें. एकदां तो बिळांत घुसून बसला ह्मणजे मग त्याच्या बळापुढें कोणाचें काय चालतें ? त्याला तेथून हुसकावून काढून ठेंचावयाचें ह्मणजे केवढें कठिण काम ! आणि येथें तर तिनें आपण होऊन सापास घरांत आणलेलें. आतां त्यास बाहेर काढणें सोपें नव्हे. परंतु त्याला बाहेर काढण्यापेक्षां किती तरी अधिक महत्त्वाचें काम तिच्यापुढें होतें. सरस्वतीबाईला आपलें मन कामापुरतें तरी नम्र करणें फार जड गेलें. परंतु गत्यंतर नाहीं, असें पहातांच तिनें तें तसें करण्याचा निश्चय केला. भास्कराची पायधरणी करून तिनें त्यास मुकाट्यानें गुंडोपंतास बोलावून आणण्यास सांगितलें. भास्करभाऊ ह्मणजे काय ? परंतु त्याला लालुच वगैरे दाखवितां तेवढें काम अगदीं मुकाट्यानें रंगोपंतास न कळवितां करण्याचें त्यानें कबूल केलें. रंगोपंताची साधारणतः चार वाजल्यावर बाहेर जाण्याची वेळ असे. त्या बेतास गुंडोपंतास निरोप पोहोंचवून आणण्याचें त्यानें कबूल केलें आणि त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं त्यानें त्याला बोलावून आणिलें.

आपल्यास असें बोलावणें येईल हें गुंडोपंताच्या स्वप्नांत सुद्धां आलें नव्हतें. कसें येणार ? तो आतां आपण त्या अनाथ पक्षाचाच स्वीकार करून त्यांचें तरी बरें करावयाचें आणि सरस्वतीबाई, रंगोपंत व अर्थात् चिंतोपंत यांचा पाडाव करावयाचा या खटाटोपांत होता. सरस्वतीबाईकडूनच खास आपल्यास बोलावणें

आलें आहे अशी अनेक प्रश्नांनीं त्यानें आपली खात्री करून घेतांच, कांहीं वेळ तो हें बोलावणें कां आलें असावें, असा विचार करीत स्तब्ध बसला व शेवटीं कांहीं एक निदान आपल्या मनांत पक्कें करून त्यानें जाण्याचा बेत केला व तो सरस्वतीबाईकडे आला.

सरस्वतीबाईनें त्याला पहातांच, आपल्या कपाळावरच्या आंठ्या दूर सारल्या, आपला आवाज जितका म्हणून सौम्य करणें तिला शक्य होतें, तितका केला आणि त्याला म्हणतेः

" तुह्मी जुने कारभारी. आम्ही बोलून चालून तुह्मांला मुलांसारखींच. तेव्हां कांहीं तरी आमच्या मनांत येऊन जरी बोललों. असलों, तरी फार वेळ कांहीं मनांत ठेवूं नये. परवां मी बोललें आणखी त्या दिवसापासून माझं माझच मन मला फार खातं आहे. आतां आपल्याला पुनः कोणत्या तोंडानं बोलावून आणून काय बोलावं तें समजेना. बोलावणं पाठविलं तरी आपण याल कीं नाहीं कोण जाणे ? पण आज केला मनाचा धडा आणखी ह्मटलं बोलावून तर आणावं. आपल्याकडून झाल्या गोष्टी विसरून जाण्याला सांगावं म्हणून बोलावून आणलं. "

गुंडोपंत काय कमी वस्ताद ! त्यानें वाऱ्याची दिशा कोणती तें तेव्हांच ताडलें आणि तो उत्तरला, " तसं बोललांत तरी तुम्हीच मुखत्यार. बोलावून आणलंत तरी तुम्हीच मुखत्यार. आम्ही रागावून बसून कसं चालणार ! आणखी चालवावं असं आमच्या मनांतही नाहीं. "

" इतकं असलं म्हणजे आणखी काय पाहिजे ? " सरस्वतीबाई उत्सुकपणें म्हणाली.

" आमचं तसंच आहे. जवळ या म्हणालांत आलों, दूर सारलंत दूर चाललों." गुंडोपंत उत्तरले.

" आम्ही केवढ्याशा होतों तेव्हांपासून तुम्ही मामंजीजवळ होतां. "

" तुम्ही या घरांत आला सुद्धां नव्हता त्याच्या आधींपासून मी त्यांचं अन्न खातों आहें. "

" हो खरंच. मग आमच्या बोलण्याचा राग धरून बसायचं ह्मटलं तरी तुमच्यानं होणार नाहीं. "

" नाहींच होणार. म्हणून तर आलों, इतका आपण परवां अपमान केलात तरी. "

" पण तें आतां विसरायचं म्हणून सांगितलंना ? अगदीं विसरायचं. मी हात जोडून सांगतें. "

" नको. नको. हात जोडायला नकोत. आणखी जोडले तरी मी तितका वडीलच आहें. पण कां बोलावणं पाठविलं होतं ? कांहीं काम असल, कांहीं अडचण असली तर मी सगळं कांहीं विसरून सांगाल तें करायला तयार आहें. पंतांनीं काय रकमा वगैरे मागितल्या होत्या त्या गेल्या का ? तिकडलं काय झालं ? "

" तिकडचं कांहीं समजत नाहीं. रंगू धड बोलत नाहीं. मला कांहीं सांगत नाहीं. आज तीन दिवसांत तिकडची बातमी कांहींसुद्धां मला नाहीं. ह्मणजे पहा आतां...तेव्हां ह्मटलं आतां त्याच्यावर केवळ विश्वसून उपयोग नाहीं. कोणी तरी दुसरा..."

" काय सांगाल तें करायला मी तयार आहें. पण पैसेच जर नसले तर मी तरी काय करणार ? " गुंडोपंत चोर दृष्टीनें तिच्याकडे पहात ह्मणतो.

सरस्वतीबाईनें उसासा टाकला. पण ती लागलीच ह्मणते, " पैसा आहे. असं समजा..."

" नुसतं आहे असं समजून काय उपयोग ? आज त्यांची स्थिति अशी आहे कीं, पैसा पुष्कळ पेरला तरच सुटका. "

" हो, पण कोणी तरी जाऊन तिथें खटपट केली पाहिजेना ? "

" मी जायला तयार आहें. राधाबाई आपल्या मुलाला पाठवायला तयार आहेत......."

राधाबाईचें आणि तिच्या मुलाचें नांव कानीं पडतांच सरस्वतीबाईची चर्या एकदम फार विलक्षण झाली आणि तिच्या ओंठावर कांहीं तरी विलक्षण शब्द आलेले दिसले. परंतु ते तिनें अगदीं आपलें होतें नव्हतें तेवढें बल खर्च करून आंतल्या आंत दाबून टाकण्याचा प्रयत्न केला. आणि जणूं काय कांहीं ऐकलें नाहीं असें दाखवून ती त्यास पुढें ह्मणते, " तुह्मी जाऊन तिकडे धीर देऊन मला तार करा. मी पैशाची वाटेल तशी तजवीज करीन. "

" नुसत्या पैशाच्या तजविजीवर फार अवलंबून आहे खरं, पण दुसऱ्याही पुष्कळ गोष्टी आहेत. "

" त्या मला समजत नाहींत. बायकांचा अशा वेळीं कांहीं उपयोग नाहीं म्हणून तर तुह्माला बोलावून आणलं. "

" मग पण मीं सांगितलंना ? मी जायला तयार आहें म्हणून. मीच काय ? पण तुमचा दीर त्या..."

आतां सरस्वतीबाईच्यानें राहवेना. मूळ स्वभाव उसळला आणि ती एकदम ह्मणते: " त्याचा संबंध काय ? "

" भावाचा. त्यांचा दोघांचा बाप एक, हाच संबंध. दुसरा काय संबंध असायचा ? "

" गुंडोपंत, मीं तुह्मांला बोलावून आणलं, तें कांहीं तरी बोलण्यासाठीं नाहीं," सरस्वतीबाई संतापून ह्मणते.

" मीही पण कांहीं तरी बोलत नाहीं. खरं तेंच बोलतों आहें. त्यांना तारा आल्या. पत्रं आलीं."

" त्यांना ? त्यांना तारा आल्या ? त्यांना पत्रें आलीं तीं काय म्हणून ? आणखी कोणीं पाठविलीं ? " सरस्वतीबाईच्या संतापाला पारावार नाहींसा झाला. ती त्या संतापांत उठून उभी राहून वटारल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे पाहूं लागली. गुंडोपंतास तो देखावा पाहून फार मौज वाटली असावी असें दिसलें. त्याच्या मुखावर गमतीचा नूर आला. तो हलकेंच आणि अगदीं शांत असा आवाज काढून पुढें म्हणतो:

" काय ह्मणून ?—तें चिंतोपंतांचें चिंतोपंतांना ठाऊक. आणि कोणीं पाठविलीं, तें तुह्मांला सांगायला नकोच. " सरस्वतीबाई कांहीं वेळ अगदीं सचिंत बसली. तें पाहून गुंडोपंत पुढें म्हणतो:

" त्यांत तुम्हांला संतापायचं काय कारण ? वास्तविक आजपर्यंत त्यांच्याशीं अशा तऱ्हेनें वागून आज त्यांना पत्रंन् तारा केल्या तर, त्यांनीं रागवायचं का तुम्ही ? तीं माणसं रागावलीं नाहींतच; पण उलट......"

" पण उलट त्यांना आनंद झाला. अहो व्हायचाच ! आमचं वाईट झालं कीं त्यांना आनंद व्हायचाच. "

" छे. छे. त्यांना आनंद झाला नाहीं इतकंच नाहीं, पण चिंतोपंतावर संकट आलं आहे, तर आपण......"

"गुंडोपंत, गुंडोपंत, ही वेळ कोणती ? मीं मुठींत नाक धरून तुम्हांला शरण आल्याप्रमाणं केलं आणखी तुम्ही..."

" मीं काय केलं ? मी तुम्हांला कांहीं तरी सांगतों आहें असं का तुम्हांला वाटतं आहे ? मुळींच नाहीं. मी सांगतों तें..."

" काय सांगतां काय ? माझी अशा प्रसंगांत सुद्धां...मी दीन झालेली पाहून म्हणे तुमचा दीर......"

" हो. हो. तुमचा दीर आपल्या त्या वकील स्नेह्याला घेऊन आपल्या खर्चानं चिंतोपंताची काय स्थिति आहे ती पहायला त्यांच्या बोलावण्यावरून, त्यांचं पत्र आल्यावरून जातो आहे. तीं मुलं, ती साध्वी किती उत्तम आहे याची आजपर्यंत मला कल्पना सुद्धां नव्हती. काल—काल मला ती पक्केपणीं कळली. "

सरस्वतीबाईला तें कांहीं सुद्धां खरें वाटलें नाहीं, कीं खरें वाटून आश्चर्यानें ती स्तब्ध झाली, कांहींच सांगतां येत नाहीं. पण ती स्तब्ध राहिली हें खचित. लागलीच तिच्या मनांत कांहीं तरी विचार आला, आणि ती एकदम ह्मणते: " एकूण त्यांना असं वाटलं वाटतं, कीं या वेळीं तरी आपण जवळ जाऊन काय असेल नसेल तें उपटावं. "

" सरस्वतीबाई, सरस्वतीबाई, हें काय हें बोलतां ? तुह्मी ह्मणतां तसा प्रकार बिलकुल नाहीं. तुमची स्थिति काय आहे हें त्यांना पक्केपणीं ठाऊक आहे. केवळ चिंतोपंतदादांचं पत्र आलं म्हणूनच ते जाणार. या वेळीं पैशाची नाहीं तर खटपटीची तरी मदत आपण करावी एवढ्याच हेतूनं तुमच्या दिराला तुमची सासू पाठविणार. आणखी तुमच्या मनांत हे असे विचार येतात; तेव्हां आतां काय म्हणावं ? "

" हो. हो. माझं मन अतिशय वाईट आणखी त्यांचं चांगलं. घरांतून आह्मीं घालवून दिलं तरी सुद्धां इतका अजून लोभ ! ह्मणजे मन चांगलंच ह्मणायचं ! काय चमत्कार आहे तरी ! बरं पण तुह्मी जातां का नाहीं ? "

"हो. हो. मी जातों तर. मला त्यांनींच चला ह्मणून ह्मटलं आहे. " हें वाक्य गुंडोपंतानें अशा कांहीं विलक्षणपणानें उच्चारलें कीं, सरस्वतीबाईला याबद्दल संतापच आला. परंतु ही वेळ आपण या माणसावर जहाल जाण्याची नव्हे, आपलें काम साधावयाचें आहे, असें मनांत आणून ती स्वस्थ बसली. आणखी असल्याच प्रकारचें बोलणें होऊन कांहीं वेळानें गुंडोपंत तेथून चालता झाला.

आपला दीर या वेळीं तिकडे जाणार आणि गुंडोपंत त्याच्याविषयीं इतक्या आदरानें बोलतो हें पाहून सरूबाईच्या अंगाचा अगदीं तिळपापड उडाला. तिला असें वाटलें कीं, गुंडोपंत त्यांच्या बाजूस जर खरोखर गेला, आणि आपला नवराही या वेळीं वळला, तर पुन्हां ही मंडळी घरांत शिरतील आणि सारें कांहीं हस्तगत करून घेतील. हाच विचार तिच्या मनांत आतां अधिपत्य करूं लागला. नवऱ्यावर आलेल्या संकटाचें तिला कांहींच वाटेना. आपले दागिने गेले, आपला पुष्कळ जमीनजुमला व्हावा, व्यापार वाढावा म्हणून आपल्या नवऱ्यानें अनेक मार्गांनीं मिळविलेला पैसा पुष्कळ वेळां त्यांच्या मर्जीविरुद्ध इकडे या रंग्याकडे पाठविला. परंतु तोही नष्ट झाला. जें काय नवऱ्यानें वर मिळविलें तेवढें कांहीं सुद्धां हातीं राहिलें नाहीं.

सगळें गेलें. आणि आतां नवराही तुरुंगांत पडला, तर आपल्या पोराला कांहीं सुद्धां रहाणार नाहीं. आपल्या पोराला कांहीं न रहातां सगळें कांहीं दीर आणि सासू खाऊन बसतील ही सगळी भीति पडली. आपल्या पोराचें जाईल हा विचार मनांत येतांच तिला असें वाटलें कीं, काय करावें आणि काय नाहीं. नवरा कैदेंत पडण्याचें सुद्धां तिला इतकें वाईट वाटलेंसें दिसेना. छे ! तिचें सर्व लक्ष आतां त्या पोरावर. त्याला कांहीं रहाणार नाहीं. आपल्या मूर्खपणानें दागिने गेले, रंगोपंताच्या विश्वासघातानें किती तरी पैसा गेला, आणि आतां वडिलोर्जित इस्टेट जी इतक्या मिनतवारीनें मिळविली, तीसुद्धां ज्यांच्या बशांतून काढली त्यांच्या बशांत जाऊं पहाते ! हा नुसता विचार तिला इतका भयंकर वाटला कीं तिच्या अंगावर शहारे आले !

तिचें सर्वांग थरारलें. ती कावरीबावरी झाली. आणि आतां काय करूं आणि काय नाहीं असें तिला होऊन गेलेंसें दिसलें. तिचे डोळे किती तरी विलक्षण दिसूं लागले. सगळें जग आपल्यास फसविण्याला पहात आहे असें वाटून जशी एखाद्याची मुद्रा संशयमय होते त्याप्रमाणें तिची मुद्रा दिसूं लागली. किंवा सगळें जग आपल्यास खाऊन टाकण्याच्या विचारांत आहे, तर आपणही त्याला खाऊं असें वाटून जो क्रूरपणा, कावरेबावरेपणा येतो तो तिच्या एकंदर हालचालींत व पहाण्यांत दिसूं लागला. ती अशा प्रकारची बाई होती कीं, द्रव्यलोभ हें अगदीं आदिदैवत ती नवऱ्यास मानी, कारण त्याला वाटेल तसें वांकवून त्याच्याकडून द्रव्य मिळवावें. आतां त्याच्या हातून तें होईलसें दिसेना, अर्थात् त्याच्यापेक्षां आहे तें द्रव्य संभाळण्यांतच विशेष. आणि आतां आपल्या पोराला त्या द्रव्याखेरीज दुसरें कांहीं नाहीं तेव्हां तर तें संभाळण्यांतच अतिशय मोठा विशेष आहे. पैसा खर्चून तरी नवरा सुटेल कशावरून ? नाहींच सुटावयाचा. मग द्रव्य खर्च करण्यांत अर्थ काय ? हा विचार तिच्या डोक्यांत घोळूं लागला. आणि आतां आपल्या दिरास आपल्या नवऱ्यानें बोलाविलें याचा तर तिला अतोनात संताप आला. " त्याला पत्रं लिहिण्याची, त्याला हकीकत कळविण्याची जरूर काय ? मीं मेलें होतें कीं काय ? येऊन जाऊन संकटाच्या वेळीं आम्हीच उपयोगी पडलों, असेंच त्यांनीं जन्मपर्यंत गाणं गात बसावें. एवढाच उपयोग कीं नाहीं ! आतां तो गेला म्हणजे अर्थातच कांहीं तरी त्यांचा यांचा बरेपणा होणार. आणि बरेपणा झाला म्हणजे पहिल्या सगळ्या गोष्टींवर विरजण पडणार. आपण तें कसें सहन करावें ? नयेच करूं आणि नाहींच करणार ! " हे विचार तिच्या मनांत घोळूं लागले. तिच्या मनानें आतां असें घेतलें कीं, त्यांनीं जाऊं नये असें कांहीं तरी करावें. पण काय करावें ? काय केलें तर त्यांच्या जाण्यांत विघात होणार ?

नवऱ्याला जिकडून मदत होईल तें करण्याविषयीं जिची उत्सुकता असावयाची, तिची उत्सुकता आतां त्याला मदत करणारी मंडळी न जाईल असें कसें करावें इकडे लागली. कुविचार जितक्या लवकर सुचतात तितक्या लवकर सुविचार सुचत नाहींत. आणि त्याचप्रमाणें हेंही पण खरें कीं, कुविचार सुचल्याबरोबर जितक्या लवकर अंमलांत येतात तितक्या

लवकर सुविचार अंमलांतही येत नाहींत. कां ?

त्या रात्रीं सरस्वतीबाईस कांहीं सुचेना. झोंप येईना. आपला दीर आपल्या त्या वकील स्नेह्यास घेऊन जाऊं देतां उपयोगी नाहीं, याखेरीज तिच्या मनांत त्या उभ्या रात्रीं दुसरा कांहीं विचार नाहीं. आणि ती आपली इच्छा अंमलांत आणण्यासाठीं तिला विलक्षण विचार व युक्त्या सुचल्या. शेवटीं सकाळच्या सुमारास तिला एक विचार पसंत पडला. पण तो कोणता आणि काय हें आतांच सांगत नाहीं.

---

# प्रकरण ५७ वें.

## स्लीकसाहेबांचें खरें स्वरूप.

ज्याप्रमाणें त्या रात्रीं सरस्वतीबाई झोंप न येतां अशी वर सांगितलेल्या विचारांत आपल्या अंथरुणावर तळमळत पडलेली होती, त्याचप्रमाणें त्याच रात्रीं तिचा पति आपल्यावर आलेल्या संकटांतून सुटून जाण्यास आतां काय करावें या विचारानें तळमळत होता. तो अंथरुणावर सुद्धां पडलेला नव्हता. अंथरुणावर पडून राहण्याइतकीसुद्धां स्वस्थता त्याच्या जिवास नव्हती. पैसा मुबलक असला तर या वेळीं आपण खचित या सगळ्या लचांडांतून सुटूं अशी त्याची खात्री होती. परंतु गांवांत एक माणूससुद्धां त्याचें बरें चिंतिणारा नव्हता. मग पैसा देतो कोण ? कोणीसुद्धां देईना. एकदोघांच्या मनांत आलें कीं पैसा द्यावा. पण हा परत करील म्हणून कशावरून ? आजपर्यंत कधीं कोणापासून घेतलेल्या रकमा परत केलेल्या त्याला माहीतच नव्हत्या ! आणि पैसा जर नाहीं, तर संस्थानांतून कामें जुळणें निवळ अशक्यच. मग आतां या संधीस काय करावें ?

जवळपासच्या संस्थानांतून त्याच्या ओळखीचे गृहस्थ पुष्कळ होते, आणि त्यांच्याकडून रकमा मिळणें अगदीं दुर्घटही नव्हतें. परंतु केवळ पत्रोपत्रीं अशीं कामें थोडींच होतात ! मनुष्य प्रत्यक्ष जाऊन, बोलून रकमा मिळण्यासारखीं ठिकाणें होतीं इतकेंच. पण प्रत्यक्ष जाणार कसें ? त्याला पक्कें ठाऊक होतें कीं आपल्यास वाटेल त्या वेळीं पकडण्याचें वारंट निघालेलें आहे. कांहीं बाबतींत पुरावा मिळविण्याचें गुप्त काम चालू असल्यामुळें तें वारंट अंमलांत आणलेलें नव्हतें. पण संस्थानच्या बाहेर पाऊल घालण्याची त्याची प्राज्ञा नव्हती; इतकेंच नव्हे, तर त्याच्यावर पोलिसची सक्त नजर असून त्याचा जावक व आवक पत्रव्यवहारही मध्यें फुटल्याखेरीज जात व येत नसे, अशी त्याची समजूत होती.

त्या रात्रीं त्याला दोन उपाय सुचले. पहिला हा कीं, आपण पुनः एकदां पुलिसीकसाहेबांस जाऊन भेटावें आणि सपशेल नमस्कार घालून त्यांचे पाय धरावे. असें केल्यानें त्यांस आपली दया येऊन कदाचित् आपल्यास संकटांतून मुक्त करतील. हा उपाय एक आणि दुसरा, साहेबांचें मन दूषित होण्याला कारण बाबु महाशय, त्याचीही पण मर्जी पुनः सुप्रसन्न करून घ्यावी, म्हणजे तो इतक्या आवेशानें आपला छळ करण्यास उद्युक्त होणार नाहीं. गरीब बिचारा ! त्याला आतां वाटेल त्या गोष्टीची आशा वाटूं लागली !

साहेब आपल्याला अजून अगदीं सोडून देणार नाहींं; मागल्या गोष्टींची, आपल्या वडिलांची आठवण देऊं, आपणही कोणत्या प्रकारानें आतांपर्यंत वागत आलों त्याबद्दल वर्णन करूं, म्हणजे कांहीं तरी उपयोग होईल अशी त्याला फार आशा वाटली. त्याखेरीज आतां आशा करण्यास कांहीं जागा नव्हती. करतो काय बिचारा ! त्याच्या मनानें पक्कें घेतलें, कीं जर साहेबांच्या पायांवर लोटांगण घातलें, तरच कांहीं सुटण्याचा मार्ग आहे, नाहीं तर नाहीं.

साहेबांची भेटण्याची वगैरे वेळ, त्यांची तब्यत खुष असण्याची वेळ हीं त्यास पक्कीं ठाऊक होतीं. तेव्हां तशी वेळ योजून तो दुसरे दिवशीं त्यांचेकडे गेला. काळ फिरला म्हणजे सर्व फिरतात. साहेबांनीं कधींच हुकूम सोडलेला होता, कीं चिंतोपंत पुनः आला, तर त्याला बंगल्यांत आपल्याकडे येऊं देऊं नये. त्याप्रमाणें अर्थातच त्याला मज्जाव झाला. परंतु चिंतोपंत कसला वस्ताद ! त्यानें कांहीं काकुलतीस येऊन व कांहीं रुपेरी कुलूप लावून हवालदाराचें तोंड बंद केलें. पहिल्यानें ज्या गुर्मीनें तो बोलत होता, त्या गुर्मीचा अंशसुद्धां आतां राहिला नाहीं. आतां फक्त " मी तरी काय करूं ? आम्हाला हुकूम झाला तो पाळणं जरूर आहे, " असें तो गुळमुळत बोलला. नंतर, " पहा बुआ, आम्ही काय तुमचे दुस्मान नाहीं, तर आपली नुकसानी व्हावी असं आम्ही करूं. पण आम्हीं हुकूम पाळला नाहीं तर आमच्यावर जबाबदारी यायची. साहेब म्हणायचा, ' हवालदार, तूंच लुच्चा. तूंच कांहीं तरी बक्षिशी घेऊन याला आंत येऊं दिलंस. ' तेव्हां कसं करणार ? "

" अरे, तुम्हांला हजारों युक्त्या आहेत, हवालदार ! तुम्ही मनांत आणाल तें वाटेल तेव्हां करून टाकाल. पहा मी तुमचे उपकार विसरणार नाहीं. "

" उपकार कसले दादासाहेब त्यांत ? आतां साहेबांच्या पुढें गेलांत म्हणजे हवालदार दारावर होता म्हणून तरी सांगूं नका. मला विचारलं तर मग मी नव्हतों म्हणूनच सांगेन. मी गेलों होतों हाफिसाकडे. दारावर कोण होतं का नव्हतं मला कांहीं ठाऊक नाहीं. तुम्ही तसंच सांगा. कोणी न्व्हतं, अन् घुसलों म्हणावं आंत. "

ठरलें. हवालदाराच्या सांगीप्रमाणें ठरून चिंतोपंतदादांची स्वारी आंत घुसली. या वेळीं साहेब कोठें असावयाचे तें त्यांना पक्कें ठाऊक होतेंच, ते सरळ त्या त्यांच्या खोलीकडे गेले आणि त्यांनीं ठकठक केलें. साहेबांना कोण आहे त्याचा अर्थातच कांहींसुद्धां संशय नव्हता. यामुळें त्यांनीं आंतून बसल्या जागेवरूनच " कम इन " असें उत्तर दिलें. आणि

चिंतोपंतदादांची स्वारी द्वार लोटून आंत गेली.

चिंतोपंतदादांचें पाऊल आंत पडलें आणि साहेबांची दृष्टि त्यांच्याकडे गेली मात्र, तावडतोब साहेब अतिशय संतापानें उठले व ओरडले, “ यू व्हायपर, सो यू हॅव म्यानेज्ड् टु......” पुढचे शब्द पुरतेपणीं बाहेरसुद्धां पडले नाहींत तोंच एक लांबट टांग टाकून झांप घातल्याप्रमाणें बुलिस्नीकसाहेबांनीं त्याच्या अंगावर चाल केली. परंतु तो फार वस्ताद. त्यानें एकदम लोटांगण घालून त्यांचे पाय धरण्यास हात पुढें केले व तोंडानें, “ साहेब, आपण या वेळीं मायबाप आहां.

My father not my father, sire. You are now father and mother. Release me from this horrible perdition brought on me. Sire, father not forsake his child. Our child made dirty we don't cut our thigh. Sire, cut throat if you want but release from this bottomless perdition. Sire, Sire, Sire. How many time I, Sire, cry by losing your favour, Sire.........”

पण ही वेळ इतर वेळांपैकीं नव्हती. साहेब दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं अगदीं पोट धरधरून हंसले असत. परंतु या वेळीं संतापानें चढलेल्या भुंवया रतिभर सुद्धां खालीं आल्या नाहींत. यानें लोटांगण घालून हात पुढें करून डोकें पायाच्या जवळ नेलें न नेलें, तों साहेबांनें जी बुटाची ठोकर मारली. त्यासरशीं तो तसाच पडून रहावयाचा, पण त्याच्या पगडीनें त्याला बचावलें. ती बिचारी किंचित् आंत दबून दहा हातांवर जाऊन पडली. परंतु तेवढ्यानें चिंतोपंतदादा उमजले नाहींत. त्यांना वाटलें, कीं आपण हें सोसून तसेच पडलों तर साहेबांस दया येईल. म्हणून तो आणखी म्हणतो, “ साहेब, Sire, I your slave, bound slave. Kick me, stroke me, make me rub my nose. I do this thousand time but no खटला साहेब. You are the master of survey. Sire, my lord and ocean of mercy. Don't push me at distance. I am your son like your Babalog. Surely I am your bound and tied slave” स्नीकसाहेबांनीं आणखी एक ठोकर मारली आणि “ तुला पाहिजे तें हें. हेंच तुला योग्य. चल चल, नीच, हवालदार, कोणीं याला आंत येऊं दिलं ? कोणीं आंत सोडला ? ” असें म्हणत म्हणत चवताळून शिपायांस हांका मारल्या. आणि शिपाई येतांच त्याच्या अंगावर धांवून, मार याला गचांडी आणि दे घालवून म्हणून हुकूम फर्माविला. मग काय ? हुकूम फर्माविण्याचाच अवकाश. हवालदारांनीं चिंतोपंताच्या मानगुटाळा हात घातला—तोच हात कीं, ज्या हातानें थोडे दिवसांपूर्वींपर्यंत त्यानें त्यास अगदीं लवून सलाम केला होता, आणि पोस्ताच्या व चिरीमिरीच्या आशेनें हजारों वेळां त्यांच्या पुढें पसरला होता.

एवढ्यावरून सुद्धां पण तो गरजू गाढव समजला नाहीं. त्याला असें वाटलें, कीं आपण आणखी गयावया केल्या ह्मणजे कांहीं तरी दयामाया येईल.

परंतु तशी दयामाया येणाऱ्या कचिंतांपैकीं स्नीकसाहेब नव्हते. त्यांना, “आपल्याळाही स्वतःची काळजी आहेच” असें उत्तर या आचरटानें दिलें,

त्या वेळेपासून त्यांचें पित्त खवळलें आणि असला भयंकर प्राणी ठेवून उपयोगीच नाहीं, असें पक्केपणीं त्यांस वाटूं लागलें. मग काय ? त्यास धुळीला पोहोंचविण्याचा त्यांनीं निश्चयच केला होता. आणि ज्याप्रमाणें एखाद्या हिंस्र पशूला कधीं कधीं आपण मारलेल्या किंवा धरून मरणप्राय केलेल्या शिकारीकडे पाहून पाहून मौज वाटते व तो त्याला ठार मारण्यापूर्वीं त्याचे हाल हाल करतो, त्याप्रमाणेंच या वेळीं स्नीकसाहेब आणि त्यांचा तो बळी चिंतोपंत यांची स्थिति झाली होती. स्नीकसाहेबांच्या अंगीं या वेळीं नखशिखांत द्वेष व तिट्कारा हीं भरलेलीं दिसलीं आणि हा तर केवळ अगदीं दीन होऊन पडला होता. परंतु त्याच्या त्या दीनपणाचा कांहीं सुद्धां त्यांच्या मनावर परिणाम झाला नाहीं. तुला फांशीं देणें शक्य असतें, तर मीं तें मोठ्या आनंदानें केलें असतें, असें ह्मणून त्यांनीं आपल्या हातानें त्याच्या मानेस हात घालून त्याच्या अंगरख्याच्या मानेला धरून खस्कन् उठविलें आणि दाराबाहेर लोटून देऊन याला कंपाउंडाबाहेर हांकून द्या म्हणून हवालदारास सक्त ताकीद दिली, आणि धाड्कन् आपल्या खोलीचें दार लोटलें.

त्या वेळीं चिंतोपंताच्या मनाची व शरीराचीही काय स्थिति झाली असेल बरें ! शरीराची तर इतकी स्थिति झाली होती, कीं तिकडून स्नीकसाहेबांचे बाबालोग आले, त्यांना फार मौज वाटून ते त्याच्या पाठीस लागले. आणि त्याच्याजवळ जाऊन तूं आतांशा फळफळावळ पाठवीत नाहींस, तर तुला देतों एक बक्षीस ह्मणून मास्टर स्नीक यांनीं त्याच्या नाकावर एक चापटी हाणली. परंतु तितक्यांत कांहीं आशा उत्पन्न होऊन कीं काय कोण जाणे, तो आचरट चिंतोपंत थांबून त्याला म्हणतो, ' I beg you tell your grandest father that I am to be released and I shall bring plumcake and pudding and fruit. Go tell grand father—very grand and red with anger, usual ocean of mercy but to-day not a drop shown me. You tell your mother and she tell father. " परंतु हवालदारानें त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं. दाराबाहेर नेऊन घालविलें.

शेवटीं आपला हा उपाय अगदीं व्यर्थ झाला अं ? साहेबांनीं आपल्याला इतकें दूर लोटलें ? लोटतील असें वाटलें नाहीं, पण कोणी तरी फार विलक्षण कान फुंकले आहेत त्यांचे. आणखी या लोकांची मर्जी मिळविण्याकरितां वाटेल तीं, ते सांगतील तीं मीं अनान्वित कृत्यें केलीं ! यांनीं मला पाहिजे तसल्या कामाला लाविलें. आणखी तोच आज लाथ मारून शिपायाकडून गचांड्या देत घालवितो आहे ! बेहत्तर आहे मीं कांहीं तरी करून पोट भरलें असतें ! येथें आलों नसतों, तर कशाला हा लोभ उत्पन्न झाला असता ? पण नाहीं. मला तिकडल्या तिकडे काय कमी होतें ? पण बायकोनें आपल्या मनांत हा लोभ उपजविला. आणि आतां अवदसा येथून निघून जाऊन नुसतें पत्र सुद्धां पाठविना. तारा गेल्या तर त्यांचीं उत्तरें नाहींत. आणि ज्यांच्या मी सर्वस्वी अब्रूवर उठून ज्यांना पुरतें नागविलें, त्यांची तार येते कीं मदतीला येतों ह्मणून !

या वेळीं मात्र चिंतोपंतास फार फार पश्चात्ताप झाला.

परंतु आतां त्या पश्चात्तापाचा काय उपयोग ?

त्याच दिवशीं संध्याकाळीं त्यास धरलें आणि तुरुंगांत पोलिसचे ताब्यांत ठेविलें.

---

# प्रकरण ५८ वें.

## चिंतोपंताचें मन.

संस्कृतांत एक जुनी ह्मण आहे कीं, 'ज्याच्या हातून परमावधीचीं पापें घडतात त्यास या जन्मांत आणि याच लोकांत आपल्या पापाचीं फळें भोगावीं लागतात.' या ह्मणीचा पुरा अनुभव चिंतोपंतास आला. ज्या बुलिस्नीकसाहेबांच्या जोरावर आपण आजपर्यंत इतकीं विलक्षण कृत्यें केलीं, त्यांनीं आपल्यास सोडलें इतकेंच नव्हे, तर आपल्याला आतां सर्वथा ते अगदीं नष्ट करून टाकणार, हें त्यास अगदीं उघड उघड दिसलें. संस्थानांत पोलिटिकल एजंटांचें वजन ह्मणजे सार्वभौम राजाच्या वजनापेक्षां विशेष. त्यांचा दरारा त्याहूनही अधिक. तेव्हां त्यांचें पाठबळ असणाऱ्यांना तें नाहींसें झालें, म्हणजे त्यांचे हाल कुत्रासुद्धां खाणार नाहीं अशी त्यांची स्थिति होते. या गोष्टींचा चिंतोपंतास चांगला अनुभव आला. आणि आपण या भानगडींत न पडतां स्वस्थ आपल्या घरीं आहे तेवढेंच खात बसलों असतों, तर किती चांगलें झालें असतें असें त्यास वाटलें. इतकेंच नव्हे तर त्यास आतां पश्चात्ताप करण्यास तुरुंगांत मुबलक वेळ मिळाल्यामुळें व त्याचें मन आतां दुसऱ्याचें अकल्याण कशा कशा युक्त्यांनीं करावें याच्या बेतांत गुंतून राहणें केवळ अशक्य झाल्यामुळें आपल्या सद्यः व पूर्व स्थितीकडे वळविण्यास रिकामें होतें. आजपर्यंत आपण केलें काय, या विचाराकडेही अर्थातच त्याची प्रवृत्ति वळली. प्रथमचे सुमारें चार आठ दिवस आतां यांतून सुटतों कसा याबद्दल विचार करण्यांत त्याचा बराच वेळ गेला; परंतु तेवढ्या एकाच गोष्टीबद्दल विचार करण्यानें काय होतें ? तो विचार किती दिवस चालणार ? आपल्या दिवसांत त्यानें कोणाचेंही बरें मन करून घेतलें नाहीं इतकेंच नव्हे, तर ज्याच्या त्याच्या मनांत उलटा तिरस्काराच उत्पन्न केला होता, तर अशा प्रसंगीं कोण त्याच्या उपयोगी पडणार ! त्याच्यावरील आरोप अजून पुरतेपणीं तयारही झाले नव्हते, तोंच त्याला तुरुंगांत त्रास होऊं लागला. जामिनावर खुलें करण्याविषयीं किंवा

मॅजिस्ट्रेटापुढें खटला उभा करण्याविषयीं अर्ज करावयाचा, तर तेवढा अर्ज करण्यालासुद्धां त्यास सवलत मिळाली नाहीं. त्याचें म्हणणें कोणी विचारील किंवा भेटूं देईल, तर कीं नाहीं सर्व गोष्टी ! त्याच्या मदतीस म्हणून जी मंडळी आली होती—त्याचा भाऊ व तो वकील—त्यांचीसुद्धां गांठ पडूं दिली नाहीं. वकिलानें अर्ज केला, पण त्याचें उत्तर कोठें आहे ? तीं कांहीं ब्रिटिश कोर्टें नव्हेत, तर तेथें व्यवस्था असेल व सर्व काम कायदेशीर पद्धतीनें होईल ! कोठें दाद लागत नाहीं, तेव्हां अर्थातच स्नीकसाहेबांकडे अर्ज केला, परंतु संस्थानच्या अंतर्व्यवस्थेंत हात घालतां येत नाहीं असें उत्तर आलें. कित्येक दिवसपर्यंत अनेक हेलपाटे घातले, अनेकांचे आर्जव केले तेव्हां एकदांची कैदीची, त्याच्या भावाची व वकिलाची गांठ पडली. वकिलाला काय विचारणें तें पुरतेपणीं विचारण्याइतकासुद्धां अवकाश मिळाला नाहीं आणि आरोप कोणते व काय पुराव्यावर ठेविले होते त्याची मुळींच दाद नाहीं. शिवाय मॅजिस्ट्रेटांपुढें खटला सुनावणीस आल्यावर आपलें वकीलपत्र कबूल करतात कीं नाहीं याची शंका होतीच. भावास पहातांच चिंतोपंताच्या डोळ्यांस चट्कन् पाणी आलें, आणि खरोखर त्यास आपल्या मागल्या वर्तनाबद्दल फार वाईट वाटलें. परंतु त्या वेळीं आपले मनांत काय आलें तें बोलून दाखविण्याचें धैर्य होईना. सर्व काय वकिलाचें बोलणें व्हावयाचें तें झालें, वकीलपत्रावर सही घेतली आणि वकील व भाऊ बाहेर निघून गेले तेव्हां मात्र एकदम चिंतोपंत डोळे मिटून अश्रु गाळूं लागला. त्या भावाला पाहिल्या वेळेपासून त्याला एकसारखें मागलें सर्व कांहीं आठवलें आणि आपण या स्थितीला येऊन पोहोंचलों, याला आपलींच अत्यंत दुष्ट कृत्यें कारण झालीं आहेत, असें त्याच्या मनास वाटूं लागलें इतकें सगळें करून आपण काय साधलें ? हा प्रश्न त्याच्या मनांत उभा राहिला आणि त्याचें उत्तर, ‘ कांहीं नाहीं ! सर्वांचा द्वेष मात्र मिळविला, दुर्लौकिक संपादिला, नीचपणा पदरीं घेतला. ’ आणि आतां त्या सगळ्याचें प्रायश्चित्त आपल्याला भोगावें लागत आहे असें त्याच्या मनांत अनेकवार आलें. पण काय उपयोग ? आतां तें तितकें भोगल्याखेरीज गत्यंतर थोडेंच होतें ? पैसा पुष्कळ मिळविला असें त्याच्या मनांत आलें; परंतु लागलीच वाटलें, पण त्याचा तरी काय उपयोग ? तो आपला आयत्या वेळीं उपयोगीं पडला काय ? उपयोगीं पडण्याला तो राहिला आहे तरी काय ? बायकोनें येथून जाते वेळीं पांच हजार रुपये आणि सुमारें दहा हजारांचे दागिने इतक्यांचें कसें वाटोळें केलें, तेंही त्यास आठवलें. आणि मनास काय वाटलें ? बायको तिकडे जाण्याबरोबर पैसे पाठविणार होती. परंतु ते सारे पैसे कोठें आले ? कां आले नाहींत याचें कारण अंशतः त्याला वकिलाच्या बोलण्यावरून समजलें होतें. आणि त्यामुळें त्यास वाटूं लागलें कीं, आपण आपल्या बायकोच्या नादीं लागून पैशाच्या हांवेनें मात्र हा सर्व घोंटाळा करून घेतला. ती जर आपल्या पाठीमागें लागली नसती, हीं सर्व कृत्यें करण्याला तिनें प्रवृत्त केलें नसतें, तर हीं कृत्यें आपल्या हातून झालीं नसतीं. आपली अशी स्थिति होण्याला केवळ कारण ती अवदसा. ती राक्षसी. याखेरीज कोणी दुसरें नाहीं. आपण स्वतः इतके वाईट नाहीं. स्वतःची इतकी नीच वृत्ति नाहीं. मनुष्य चांगल्या

स्थितींत असला म्हणजे यशाचा समग्र भाग आपल्याकडे घेतो. त्यांत त्याला प्रौढी वाटते. परंतु दुःखस्थितींत गेला म्हणजे तसें होण्याच्या अपयशांत आपला वांटयाचा हक्क मुळींसुद्धां कधीं सांगत नाहीं. दुसऱ्याजवळ कधीं सांगत नाहींच, पण आपल्या मनाशीं सुद्धां तसें बोलत नाहीं. तसा उगीच विचार आला, तरी तो दूर सारून आपल्या स्वतःस मोकळें करूं पहातो. चिंतोपंत आतां तेंच करूं लागला. आपल्या दुर्वर्तनाला, आपल्या हातून घडलेल्या अनन्वित पातकांला कारण ती अवद्सा. तिनें आपल्या अब्रूचें वाटोळें केलें. तिचें पुनः नांव नको. दर्शन नको. आपण आपल्या सावत्र आईला, आपल्या लहान भावंडांना अत्यंत नीचपणानें घराबाहेर घालविलें, त्यांना सुस्थितींत राहण्याची व्यवस्था असून त्यांची बेअब्रु होईल असा घाट घालून त्यांचे हालहाल केले आणि आज तोच भाऊ, त्याच आईचा मुलगा आपल्या मदतीसाठीं आला आहे ! झालें ! त्याच्या मनानें ठरविलें कीं, आपल्या झाल्या गोष्टींच्या प्रायश्चित्तासाठीं म्हणून कांहीं तरी करावें. पण काय ? आपलीं सगळीं कारस्थानें कीं ज्या कारस्थानांनीं आपण एवढी त्यांची बदनामी आणि एवढे त्यांचे हाल आपण केले,—तीं त्यांना सांगून टाकून आपल्याच्यानें होईल तितकें करून झाल्या गोष्टीवर सारवण घालावें ! करावें तरी काय ! परंतु असें करणें त्याला अगदीं अशक्य वाटलें. त्याचें मन तयार होईना. आपल्यावरच्या या लचांडाचा काय निकाल होतो तो पाहून मग काय तें करावें, म्हणून त्यानें तो विचार दूरच सारला. आणि तसाच आपल्या अस्वस्थ मनाला स्वस्थपणा आणण्यासाठीं धडपड करीत राहिला.

वकील व गुंडोपंत व त्याचा भाऊ—विशेषतः गुंडोपंत—आल्याकारणानें वकिलास माहिती मिळण्याला व कोणत्या बाबतींत कसें वागावें याची मदत चांगली झाली. गुंडोपंत मोठा लटपट्या. त्यानें अनेकांच्या गांठीभेटी घेतल्या आणि अनेक प्रकार केले, कीं कोणाची तरी मदत त्या वेळीं आपल्या यजमानास मिळावी. परंतु व्यर्थ. सगळा गांव त्याच्यावर उठलेला. कोणी कांहीं दाद देतो ? मुळीं कोणी थाऱ्याससुद्धां उभें राहूं देईना. गांवांत किती दिवसांपासून अशी वदंता पसरलेलीच होती कीं, राज्य खालसा व्हावें या हेतूनें हा येथें आला होता. आणि त्याच हेतूनें तो सर्व कांहीं कारभार करीत होता. तेव्हां त्याच्यावर ही तोहोमत आली असतां राज्यांतले लोक काय मदत करणार ? बाबू महाशयांचा तर अगदीं महोत्सव चालला होता. हें सर्व घडवून आणण्याला कारण आपण म्हणून तो जिकडे तिकडे सांगत फिरत होता; आणि आपल्या तिकडील वर्तमानपत्रांत, त्यानें यासंबंधाचे लेख लिहून त्याच्या नालस्तीस सुरुवातही केली होती ! शिवाय जितक्या लोकांकडून म्हणून त्याचें अहित होण्यास मदत होईल तितक्या लोकांची उठावणी करण्याचा खटाटोप एकसारखा सुरू होताच. असा एकंदर प्रकार असल्यामुळें वकिलास पूर्णपणें कळून आलें कीं, आपल्याला या कामीं मुळींसुद्धां यश येणें संभवनीय नाहीं. तथापि तो आला होता त्याप्रमाणें जितकी खटपट होईल तितकी करणें आपलें कर्तव्य जाणून त्यानें कायावाचामनें प्रयत्न चालविला.

परंतु तें स्थळ असें होतें कीं, तेथें कायद्याचें ज्ञान किंवा वकिलीचें चातुर्य हीं अगदीं कांहीं सुद्धां उपयोगी नाहींत.

अशा स्थळीं तो काय करणार ? कित्येक दिवस झाले, कैदीस मॅजिस्ट्रेटापुढें सुद्धां उभें केलें नाहीं. तसें करण्याबद्दल दहा पांच अर्ज झाले. तेव्हां एक दिवस उगीच सोंग केलें आणि पुराव्यासाठीं मुदत मागून घेतली. जामिनावर सोडण्याविषयीं अर्ज केला. सोडतां येत नाहीं म्हणून उत्तर दिलें. मॅजिस्ट्रेट मुसलमान गृहस्थ आणि संस्थानी खाक्या. जामीन घेण्याविषयींचे अनेक मुद्दे वकिलांनीं पुढें आणले, त्यावर ' जादा बोलण्यांत अर्थ नाहीं, आह्माला जामीन कबूल नाहीं, ' म्हणून उत्तर आलें. आरोप काय आहेत ते तरी पूर्णपणें कळूं द्यावे म्हणून विचारलें, तर अजून आरोप तयार नाहींत म्हणून उत्तर दिलें आणि सगळयाच्या शेवटीं, ' तुमचा संबंध काय ? तुमचें वकीलपत्रच आह्मी मानीत नाहीं, ' असें उत्तर आलें. इतका वेळ बोलूं दिलें आणि आतां असें कां झटलें, तर आह्मीं उगीच मेहरबानीनें बोलूं दिलें, पण आतां बोलूं देतां येत नाहीं म्हणून फर्माविलें. हा फार्स झाला. वकिलांनीं तिकडे स्नीकसाहेबांकडे अर्ज केला, तर संस्थानास इतर ठिकाणच्या वकिलास काम चालवूं देणें अगर न देणें याबद्दल पूर्ण अधिकार आहे; सबब आह्मी हात घालूं इच्छीत नाहीं असें चोख उत्तर आलें. आणि पलीकडे तारा केल्या तरी तेंच. तेव्हां बिचारा निराश झाला आणि आतां येथें रहावें कीं नाहीं याचाच विचार त्यास पडला. शेवटीं मुदत नक्की किती घेतली होती तेंही त्यास कळूं देईनात. आणि त्याला गुंडोपंतानें आणलेल्या बातमीवरून असें कळलें कीं, आठचार दिवसांत त्याचा निकाल व्हावा असा स्नीकसाहेबांकडून गुप्त दपटशा संस्थानाला आला आहे. तें खरें असलें तर इतके राहिलों तसे आणखी राहूं असा त्यांनीं बेत केला. परंतु उपयोग झाला नाहीं. जें व्हावयाचें तें झालेंच !

# प्रकरण ५१ वें.

## कृतकर्माचीं फळें.

मग मात्र चिंतोपंतास वाटलें, कीं आपण जीं अनन्वित कृत्यें केलीं, त्यांचीं फळें पुढच्या जन्मीं भोगविण्यापर्यंत परमेश्वरानें वाट पाहिली नाहीं, आपणास याच जन्मीं भोगविण्याची पाळी आणली आहे. आपण आपल्या आईच्या—सावत्र का होईना परंतु आईच्या—नांवाला कलंक लावण्यास चुकलों नाहीं. बापाच्या मृत्यूच्या वेळीं एक शपथ वाहून आचरण अगदींच पाजीपणाचें केलें. त्यापेक्षां जें काय आपल्यास भोगण्याचें परमेश्वरानें भाग पाडलें आहे, तें सर्व आपण मुकाट्यानें भोगलेंच पाहिजे.

त्याच्यावर अनेक आरोप होते, त्यांपैकीं तीन त्याजवर पक्केपणें लागू होऊन प्रत्येकीं अडीच वर्षेप्रमाणें साडेसात वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा त्याला झाली. ती भोगण्यासाठीं कोर्टांतून नेतांना त्यास काय वाटलें असेल आणि दुसरे दिवशीं त्याचा भाऊ त्यास भेटण्यास गेला असतां काय बोलावें असें त्याच्या मनांत आलें असेल तें कल्पनातीतच होय. त्याच्या तोंडून कांहीं स्पष्टपणें अक्षरें निघालीं नाहींत. परंतु त्यानें आपल्या हातांनीं आपलें तोंड झांकलें आणि आतां, " माझ्या पश्चात् तूंच मालक, मी सर्व कांहीं तुझ्या नांवानं करून देतों. झाल्या गोष्टी तुम्ही सारीजणं विसरा. तुझ्या आईला हात जोडून विनंति सांग कीं, आतां मागलं सगळं विसरून माझ्या बायकोचा आणि पोराचा परामर्ष घ्या. मीं नीचपणा केला, परंतु तुह्मी त्याबद्दल सूड उगवूं नका. आणखी काय सांगूं ? त्या रंग्यानं आणखी त्या मूर्खेनं सगळ्या घरादाराचं वाटोळं केलंच आहे. परंतु काय राहिलं असेल त्याची तरी जतन तुह्मी करा. मी आलों तर तुकडाभर खाईन. तुह्मी मला घालाल. नाहीं असं नाहीं. पण त्या पोराला, आणखी त्याच्याकरितां तिलाही पण अंतर देऊं नका. तुह्मी जातां तों तुमच्या पाठोपाठ तुमच्या नांवाचे कागदपत्र करून पाठवितों. एक कागद लिहून पाठवायचा तिथें काय ? " इतकें कसें तरी करून बोलून त्यानें आपल्या भावास तेथून लावून दिलें आणि नंतर वकिलास आपली इच्छा काय ती कळवून तुम्ही आतां काय ते करा म्हणून विनवून सांगितलें व आपण सर्व इस्टेटीवरला हक्क सोडला, व ती आपल्या भावास दिली, अशा अर्थाच्या कागदाचा मसुदा तयार करून मागितला. वकीलसाहेबांनीं तो तयार करून जेलरच्यामार्फत त्याचेकडे पाठविला. तो त्यानें चिंतोपंताकडे नेला. चिंतोपंतानें तो वाचून पाहिला, आणि मग मात्र त्या लोभ्याचें मन पुनः जरा विरमलें. काय ? आपण होऊन आपला हक्क सोडून द्यावयाचा ? तो काय म्हणून ? या स्थितींत आलों म्हणून ? या स्थितींत आलों म्हणून तर इस्टेटीची जास्त काळजी घेतली पाहिजे. त्या वेळीं तसें म्हटलें म्हणून काय झालें ? आतां कांहीं तसा विचार करून उपयोग नाहीं. उगीच कांहीं तरी मनांत येऊन आपण त्या वेळीं बोललों, पण तें एका अर्थीं बरें झालें. त्यांना किती तरी बरें वाटलें असेल ! आतां सही करून कागद पाठविणें आपल्या हातचें आहे. मला शिक्षा व्हावी आणि मग तरी मीं त्यांच्या ताब्यांत सगळें कांहीं द्यावें असेंच त्यांच्या मनांत नसेल म्हणून तरी कशावरून ? नाहीं तरी इतके आपण त्यांच्या अब्रूवर उठलों असून त्यांनीं येथें येण्याचें केलें असतें कसें ? शक्यच नाहीं. तेव्हां तेंच ! अगदीं हटकून तेंच ! आपण सहीच करून एव्हां पाठवूं नये म्हणजे झालें. असा विचार करून त्यांनीं तो कागद आपल्याजवळ तसाच ठेवण्याची मेहरबानी करावी, मी आजच सही करीत नाहीं, पुढें करीन, मला विचार करावयाचा आहे, असें जेलरास विनवून सांगितलें. आणि आजपर्यंत झालेल्या सर्व पातकांचें क्षालन म्हणून बिचारा जें कांहीं सत्कार्य करणार होता, जें केलें असतां त्याला खरोखर सुख झालें असतें, तें त्यानें दूर लोटलें. त्याच्या मनाच्या नैसर्गिक दुष्टपणापुढें त्याचा काय इलाज ? त्यानें अखेरीस सुखा फार नाडलें.

इकडे सरस्वतीबाईचा जीव धाकधूक करीत होता. क्षणोक्षणीं तिला असें वाटत होतें कीं, कांहीं तरी चांगली खबर येईल आणि मग आपण पेढे वांटूं. परंतु एवढी तिच्या मनाची अंतःस्थ खात्री होतीच कीं आपल्याला आतां आनंदाची खबर इतक्या पुरतीच यावयाची कीं, शिक्षा कमी झाली असें ऐकावयाचें दुसरें कांहीं नाहीं. ही एक नवऱ्याची काळजी आणि दिवसानुदिवस रंगोपंताचा शिरजोर-पणा, वाढत चालला होता त्याचा दुःसह-पणा या दोन गोष्टींनीं ती अगदीं सता-वून गेली होती. काय करूं आणि काय नाहीं असें तिला होऊन गेलें होतें. ज्या-प्रमाणें आतां एवींतेवीं नवरा तुरुंगांत जाणारच, त्याला सोडविण्याची खटपट व्यर्थ होणारच, असें तिला वाटून ती पैसे पाठवून व्यर्थ जातील या भीतीनें पैसे पाठवूंच नयेत या विचाराला येऊन पोहोंचली होती, त्याप्रमाणेंच आतां तो गुलामाचा तुरुंगांत जाणारच, तेव्हां आपली जी काय भर करावयाची ती आतां करून घ्यावी, भीडभाड धरूं नये, आणि या अवदसेला थांग—पत्ता मुळींच लागूं देऊं नये, असा रंगोपंतांनीं बेत केला. आणि या आपल्या बेताच्या पार पाडण्याला जितकी ह्मणून अवश्य तितकी शिक्षा चिंतोपंताला होते कीं नाहीं हें समजण्याकडे त्याचे अंतर्बाह्य डोळे लागून राहिले होते. आपल्यांस एकंदर व्यापारटापार समजावा, कोणाला काय दिलें आहे, कोणाकडून काय येणें आहे वगैरे सर्व गोष्टी समजाव्या, ह्मणून सर-स्वतीबाईचा प्रयत्न चालू होता. आणि प्रत्येक वेळीं तिनें कांहीं विचारलें ह्मणजे त्यानें म्हणावें, "तुला कशाला त्याची उठाठेव ? आह्मी आहोंत धनंतर तुझी सगळी व्यवस्था करायला. एक पैची सुद्धां अफरातफर होणार नाहीं. तूं काळजी करतेस कसली न् चौकशी कसली ? तुला का याची काळजी पडूं द्यायची मी अगदीं उभा जय्यत असतांना ? वा !"

प्रथम प्रथम असें बोलणें झालें; पण जेव्हां तिचा त्या बाबतींत माहिती विचारण्याचा दुराग्रहच दिसला, तेव्हां त्यानें उलट खाली आणि तो उर्मट-पणानें तिला उत्तरें देऊं लागला. "तुझा या बाबतींत अगदीं संबंध नाहीं. मुका-ट्यानं आतां बसून दोन वेळां माझ्या पंक्तीला जेवीत जा ह्मणजे सगळं यथास्थित होईल. उगीच नसत्या खटा-टोपी करून जसं दागिन्यांचं तिकडे वाटोळं करून टाकलंस, तसं इथं तरी कांहीं नको व्हायला. ' स्त्रीबुद्धिः प्रल-यं गता ' ह्मणतातना ? " आधींच सर-स्वतीबाईचें डोकें भणाणून जाऊन तिच्या मनांत नानाप्रकारचे विचार येऊं लागले होते. ते विचार नानाप्रकारचे ह्मटले तरी त्यांचा कल एकाच प्रकारचा होता. जें तिच्या मनांत येत होतें तें एकच. आणि तें हें कीं, आपल्या पैशाला गुळाच्या ढेपीप्रमाणें हे डोंगळे साऱ्या बाजूनें चिकट-ण्याच्या बेतांत आहेत, तेव्हां आपण त्यांना दूर ठेविलें पाहिजे. नंबर एकचा डोंगळा ह्मणजे रंगोपंत. या रंगोपंताच्या हातांत पैसा लागलाच होता. त्याच्या हातून तो सोडवून त्याला दूर लोटलें पाहिजे. त्यानंतर दुसरे डोंगळे आपले बीर वगैरे. ते आतां कांहीं तरी आशेनेंच आपल्या नवऱ्याकडे गेलेले आहेत. त्याच-प्रमाणें त्यांना पुढें करणारा गुंडोपंत. इत-क्या सगळ्यांच्या तोंडून हें सर्व काढून आपण आपल्या हातांत घेऊन बसावें ही कायती तिची इच्छा. परंतु हें व्हावें कसें ?

अर्थातच कांहीं तरी युक्ति करून त्यांना दूर सारलें पाहिजे.

मन एकदां भडकलें म्हणजे मग त्यांत काय विचार येतात आणि काय नाहीं? त्यांतून सरस्वतीबाईसारख्या स्वार्थाखेरीज दुसरें कांहीं सुद्धां न सुचणाऱ्या स्त्रीच्या मनांत तर काय विचार येतील आणि काय विचारांनीं काय होईल याचा नेमच नाहीं. तेव्हां अधिक वर्णन कशाला पाहिजे? आपला हेतु साधण्यासाठीं तिचें डोकें फारच चिंतातुर झालें होतें. असा एकंदर प्रकार होता. रंगोपंताला कसें तरी करून दूर सारलें पाहिजे या विचाराखेरीज तिच्या डोक्यांत दुसरा विचार नाहींसा झाला होता.

इतक्यांत नवऱ्याकडे गेलेली मंडळी आली असें तिला कळलें आणि ती काय झालें तें समजण्याविषयीं अगदीं आतुर झाली होती. ती जितकी आतुर होती, तितकाच आतुर दुसरा एक इसम होता. तो इसम गुंडोपंत होय. गुंडोपंत जितका पहिल्याप्रथम पैशाच्या लोभानें सरस्वतीबाईच्या बाजूचा व तिच्या सासूच्या आणि दिराच्या उलट बाजूचा होता, तितकाच आतां तिच्या अगदीं उलट झाला होता. आतां सरस्वतीबाईला जिकडून वाईट वाटेल, जिकडून तिची फजिती होईल, तिकडून त्याला आनंद होत असे. अर्थातच झालेली शिक्षा आपण जाऊन सरस्वतीबाईस कळवावी, आणि आपणच तिला तिच्या नवऱ्यानें सगळें कांहीं त्यांना दिलें अशी बातमी सांगून तिची काय मजा होते, तिचा काय थयमान होतो तो पहावा, असें मनांत वारंवार येऊन तो अतोनात उत्कंठ झाला होता. त्याप्रमाणें तो सवड सांपडतांच तिच्याकडे धांवत गेलाही आणि वेडेंवांकडें तोंड करून त्यानें तिला शिक्षेचा मजकूर सांगितला. अर्थातच साडेसात वर्षें हे शब्द ऐकतांच ती एकदम धाड्कन् खालीं पडली. नवऱ्याला शिक्षा होणार, ती झाल्याखेरीज रहात नाहीं हें जरी तिला पक्कें कळून चुकलें होतें, तरी पण प्रत्यक्ष ऐकल्याबरोबर अर्थातच तिच्या त्या कठोर मनालासुद्धां धक्का बसला. गुंडोपंतास अजून त्याच्याहीपेक्षां धक्का बसणाऱ्या गोष्टी तिला सांगावयाच्या होत्या. तेव्हां तिला त्या ऐकून ध्यानांत घेण्याच्या स्थितीला आणणें अगदीं अवश्य वाटलें हें उघडच आहे, आणि ' वहिनीसाहेब, बाईसाहेब,' करून " उठाहो, अशा अगदीं धीर सोडूं नका. तुम्हीं धीर सोडलात, तर मग बाकीच्या मंडळींनीं काय करावें ? तुमच्यावर तर आतां आमचा सगळा धीर." असें बोलून त्यानें बऱ्याच खटाटोपानें त्या बाईला भानावर आणली. आणि ती थोडीशी शुद्धीवर येतांच तिला हळूच तो म्हणतो:

" वहिनीसाहेब, आतां तुम्ही अगदीं काळजी करूं नका. धाकटे यजमान तुम्हाला आणखी बाळासाहेबांना मुळींच अंतर देणार नाहींत. त्यांच्याबद्दल माझी पक्की खात्री. "

' धाकटे यजमान ' हे शब्द त्यानें मुद्दामच योजिले यांत शंका नाहीं. त्याला ठाऊक कीं, त्या शब्दांचा परिणाम अतिशय जालीम मात्रेपेक्षांही फार विलक्षण होणार, आणि तो झालाही. ते शब्द कानीं पडतांक्षणींच ती तडफडून उठली आणखी,

" धाकटे यजमान ? कोण धाकटे यजमान ? " असें किंचाळली.

नंतर पुढें गुंडोपंतास मधें शब्द टाकण्याचा अवसरसुद्धां न देतां

ह्मणते, " मला आणखी बाळासाहेबांना अंतर देणार नाहींत इतके ढुङ्डाचार्य थाकटे यजमान तरी कोण ? "

" कोण म्हणजे ? आतां दुसरे कोण ? तुमचे भावजी. त्यांच्याखेरीज मी यजमान कोणाला ह्मणणार ? "

हे शब्द अशा वक्रार्थानें व वक्रदृष्टीनें त्यानें उच्चारले कीं, त्या चंडिकेचा सर्व शोक दूर होऊन ती संतापानें लाल झाली. आपल्या समजुतीप्रमाणें मौज होते आहे असं पहातांच त्यालाही हुरूप आला आणि तो पुनः तशाच अर्थपूर्ण शब्दांनीं व ध्वनीनें ह्मणतो, " अहो, आतां त्यांनाच जवळ करून रहावं लागणार तुह्मांला. दादासाहेबांनीं त्यांची खरी योग्यता जाणून त्यांच्या नांवचं बक्षीसपत्र करून दिलं सुद्धां. आणखी मुलाला अंतर देऊं नका. त्यांनीं सांगितल्यावर आणखी कागद लिहून दिल्यावर मग आतां काय राहिलं ? आणखी दुसरं असं कीं, तो तुमचा दीर लहान खरा, पण फार त्याची मोठी योग्यता हें मी तुम्हांला सांगायला पाहिजे असं नाहीं. त्याच्या स्वाधीन यांनीं सगळी कांहीं चीजवस्त करण्याचा कागद करून दिला, हें फार चांगलं झालं असं तुम्हांला सुद्धां खचित वाटेल. अगदीं त्यांत शंका नको. समजलांत ? मला तर खरोखर फार चांगलं झालं असं वाटलं. आणखी रंगोपंतापेक्षां ... "

परंतु तिनें त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं. ' चल चल, मेल्या चालता हो. दुःखावर डागण्या देऊन माझा जीव घेऊं नकोस-चालता हो. नाहीं तर तुझ्या पायापाशीं ... ' पुढें तिच्यानें बोलवेनासुद्धां. तोंडाला फेंस आला. डोळे अगदीं पांढरे फटक पडले. आणि ती एकदम बेशुद्ध पडली. इतक्यांत तेथें रंगोपंत आला. त्यानें गुंडोपंतास पाहतांच, आणि आतां चिंतोपंताची भीति बाळगण्यास आपणास मुळींच कारण नाहीं हें मनांत येतांच त्यानें त्याजवर समशेर उपसली. त्यास हांकून दिलें म्हटलें तरी शोभेल.

सरस्वतीबाई संतापातिरेकानें बेशुद्ध पडली होती ती किती वेळानें तरी शुद्धीवर आली. आणि एकसारखा विचार करून करून तिनें कांहीं मनांत बेत केला. हाच किंवा अशाच प्रकारचा बेत तिनें अनेक वेळां मनांत आणला होता. परंतु त्या बेताप्रमाणें करावें कीं नाहीं, करावें कीं नाहीं, याबद्दल तिच्या मनांत भवति न भवति एकसारखी बरेच दिवस चालली होती. आज ती भवति न भवति अगदीं पुरी झाली. आतां अधिक विचार करून त्यांत अर्थ नाहीं, आपल्या मनाप्रमाणें जर करावयाचें, जर सगळें व्हावयाला पाहिजे असेल, तर तें आपण मनांत योजलेला बेतच कायम करून आणखी पार पाडून उरकलें पाहिजे. झालें ! बेत ठरला. तो बेत ठरल्या वेळेपासून तिचा एकंदर नूर बदलला. ती भयभीत दिसूं लागली; जणूं काय, आपल्या मनांतले विचार कोणी पहातें आहे काय, कोणी जाणील काय, असेंच तिला वाटत असावें असा प्रकार झाला. दुसरे दिवशीं आपण होऊन, आज मी एकटी गहूं दळावयाला बसणार, असें तिनें घरांतल्या बाईस सांगितलें. तें ऐकतांच अर्थातच त्या बाईस फार आश्चर्य वाटलें. आजपर्यंत कधीं न घडलेली गोष्ट ! तेव्हां तिला आश्चर्य वाटेल यांत नवल काय ? सरस्वतीबाई नुसतें म्हणाली इतकेंच नव्हे, तर त्याप्रमाणें तिनें केलेंही. ती आपण जात्यापाशीं बसून तिनें दळण दळलें—गहूं दळले. दळतेवेळीं—आपण

दळतों हें कोणास दिसूं नये म्हणून—तिनें खोलींत आंतून कडी लावून घेतली होती. पुष्कळ वेळ दळण झाल्यावर तिनें आपणच ती कणीक भरली आणि ती अगदीं एका बाजूस ठेविली. त्या कणकीला कोणी हात सुद्धां लावूं नका म्हणून ज्याला त्याला बजाविलें. नको म्हणून सांगितलें असतां मनुष्यास अर्थातच जास्त जिज्ञासान् चिकीर्षा उत्पन्न होते स्वयंपाकाच्या बाईस असें वाटलें कीं, आपण जाऊन यजमानीण बाईनें कशी काय कणीक दळली आहे ती पहावी. तिला साहजिक इच्छा झाली. आणि सरस्वतीबाई दुसरीकडे कोठें गेली आहे असें पाहून तिनें जाऊन ती कणीक चापचली. सैंपाकीणबाई याप्रमाणें चापशीत असतांच तेथें बाळ्या आला आणि मला कांहीं तरी खावयाला दे म्हणून मागूं लागला. बाईला काय वाटलें कोण जाणे ! तिनें हसत हंसत त्याला म्हटलें, ‘ कधीं नव्यानें आईनं कणीक दळली आहे त्याची तुम्हांला पानगी करून देतें चला. ’ बाळ्या ‘ ठीक आहे ’ असें म्हणाला, आणि बाईनें त्यांतली एक मूठभर कणीक उचलली.

सरस्वतीबाईस यांतलें कांहींच ठाऊक नाहीं. तिनें गुंडोपंतास बोलावणें पाठविलें होतें. तो कधीं येईल म्हणून ती त्याची वाट पहात होती. गुंडोपंत आला व त्याच्याशीं ती किती तरी मवाळीनें बोलत होती ! तिनें त्यास आपल्या दिरास घेऊन जेवावयाला येण्याचा आग्रह चालविला होता.

पण घरांत काय भयंकर प्रसंग झाला !

---

# प्रकरण ६० वें.

## मिळतात तीं अशीं !

परंतु घरांत काय चाललें आहे त्याची विचारपूस करण्याच्या आधीं आपण सरस्वतीबाईचें व गुंडोपंताचें भाषण चाललें होतें, तें थोडेंसें ऐकूं. आधीं एक दोन दिवसांपूर्वीं गुंडोपंताशीं कोणत्या तऱ्हेनें तिनें भांडण केलें हें वाचकांस माहीत आहेच. परंतु अशा प्रकारें झालेलें भांडण हें पहिलेंच नसल्यामुळे गुंडोपंतास या भांडणाबद्दल विशेष कांहींच वाटलें नाहीं. आजपर्यंत अशीं भांडणें झालीं त्यांतलेंच हें एक, असें साहजिकपणें तो समजत होता आणि त्याला असेंही पण वाटलें होतें कीं, लवकरच आपल्यास सरस्वतीबाईकडून पुनः बोलावणें येईल आणि पुनः ती आपल्याशीं लाडीगोडीनें बोलेल. पुनः ती आपल्यास त्या साखरेसारख्या गोड अशा शब्दांनीं मोह घालण्याचा यत्न करील. परंतु आपण तिला पक्कें जाणून आहों, तिच्या मोहपाशांत कधींही सांपडणार नाहीं. जी गोष्ट एकदां होऊन गेली ती

गेली, यापुढें आतां हिच्या नादीं लागून त्या गरीब पोरांचें नुकसान होऊं द्यावयाचें नाहीं. त्यांना पुनः या घरांत आणून घालीन. आणि हिला फार झालें तर अन्नवस्त्रापुरता दरमहा देऊन घरांतून बाहेर घालवीन. चिंतोपंतास आतां खरी खरी उपरति झाली आहे. तेव्हां तो या सर्व गोष्टींच्या आड येणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यानें कबूल केल्याप्रमाणें सर्व कांहीं सीतारामाच्या नांवानें करून देण्याचा कागद आज येईल, उद्यां येईल, अशी खात्री वाटून तो त्याची वाट पहात बसला होता. पुढें एकंदरींत कसें काय करावयाचें याबद्दलचा सर्व विचार त्यानें आपल्या मनांत करून ठेविला होता. रंगोपंताच्या मूर्खपणामुळें कांहीं व लुच्चेगिरीमुळें कांहीं इस्टेट नष्ट होणाच्या पंथास लागली होती. ती सोडविण्याबद्दल आपण स्वतः खटपट केली असतां खात्रीनें सुटेल अशी त्याला पक्की आशा होती, आणि आपण ती सोडवून सीतारामास त्याच्या योग्य पदवीला बसविलें असतां आजपर्यंत झाल्यागेल्या गोष्टींबद्दल प्रायश्चित्त घेतल्यासारखेंही होईल असें त्याच्या मनानें घेतलें होतें. तेव्हां या सर्व गोष्टी जुळवून आणण्यास सरूबाई व रंगोपंत यांच्या पोटांत शिरल्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता.

हें सर्व मनांत आणून तो सरस्वतीबाईच्या बोलण्याची वाटच पहात होता आणि तें येण्याबरोबर आपला तर्क अगदीं बरोबर झाला अशी फुशारकी वाटून तो तावडतोब तिच्याकडे गेला आणि त्याच्या तर्काप्रमाणें ती त्याच्याशीं अगदीं गोडीगुलाबीनें बोलूं लागली. नुकतें झालेलें सर्व कांहीं विसरा असें तिनें आरंभींच त्यास वारंवार सांगितलें आणि नंतर खालीं दिल्याप्रमाणें संवाद झाला.

सरस्वतीबाईः— रागाच्या भरांत मला कसं तें मुळींच भान रहात नाहीं आणखी मग जें काय मेलं तोंडाला येईल तें मी ओकून टाकतें. काय करावं या स्वभावाला! मी किती तरी विवेक करीत असतें. बरं तर बरं, तुह्मीच आहांत ह्मणून इतकं सगळं होऊन मी बोलावणं पाठविल्याबरोबर आपले आलांत.

गुंडोपंतः— त्यांत कांहीं मनांत आणण्याजोगं नाहीं. मी आपला स्वभाव पक्का ओळखून आहें तेव्हां मला कधींच राग येत नाहीं; आणि राग कोणावर? तुमच्यावर राग करून आमच्या सारख्याचं चालायचं कसं? आतां जा म्हणून घालवून दिलंत तरी घटकाभरानं ' गुंड्या ये ' असं म्हणणार आपणच!

सरस्वतीबाईः— इतकं तुम्हीं मानतां हेंच आम्हाला भूषण आहे. असंच सदोदित मानीत जा ह्मणजे झालं. तुह्मी गेल्यावर मीं सगळ्या गोष्टींचा शांतपणानं नीट विचार केला. त्यांनीं जें केलं तेंच बरोबर केलं. ह्या रंग्यानं—माझा हा नातेवाईक म्हणून मीं याला हें सगळं पाहण्याला आणून ठेविलं-तर त्यानं सगळ्याचा गोंधळ, ब्रह्मघोटाळा करून टाकला आहे. आतां मी बायको माणूस. मला काय त्यांतलं समजतं? पण तो आतां मला शिव्या द्यायला लागून व तुला काय समजतं आहे म्हणून सगळं गिळंकृत करायला पहातो आहे. अशा वेळीं तिकडून जें करणं झालं तें अगदीं बरोबर आहे, असंच वाटायला लागलं आहे. बरं, चला; झाल्या त्या गोष्टी तर परत येत नाहींत? पण पुढं कसं काय करायचं?

गुंडोपंतः— तें सगळं माझ्याकडे सोंपवा. फक्त तुम्ही एकदां त्या मंडळींना

बिनवून स्वतः त्यांना आग्रह करून घरांत बोलवा. तुमच्या सासूबाई ऐकतील. त्या हट्टी नाहींत, किंवा दुराग्रही पण नाहींत, आणखी तुम्ही त्यांच्या विनवण्या केल्यात तर त्या मागलं सर्व कांहीं विसरून जाऊन पुन्हां पूर्वीप्रमाणं इथें सुद्धां येतील.

सरस्वतीबाई:— तेंच तर मला होईल कीं नाहीं असं वाटतं आहे. मीं कितीं जरी जीव तोडून त्यांना सगळ्या गोष्टी सांगितल्या तरी त्या मागलं विसरतील का ? कसं त्यांनीं विसरावं ? झाल्या गोष्टी कांहीं अशा तशा होत्या ! त्या त्यांनीं विसराव्या म्हणूनच मीं एक मनांत बेत केला आहे. तुम्ही म्हणतां, कीं सीताराम भावजी फार चांगले आहेत, तर त्यांच्या चांगुलपणाच्या परीक्षेचीच ही आतां वेळ आहे. मी त्यांना, तुम्हांला आणखी सगळ्यांनाच जेवायला बोलवीन असं म्हणतें आहे. सासूबाई कांहीं यायच्या नाहींत हें उघड दिसतंच आहे. पण भावजी जर आले आणखी जर त्यांनीं मला काय त्यांना सांगायचं आहे तें ऐकून घेतलं, तर अर्धं अधिक काम झालंच म्हणायचं. मला जें काय सांगायचं तें मी त्यांना सांगून टाकीन. आणखी त्यांनीं मग तें आईला सांगितलं म्हणजे शोभेल. मग मी सुद्धां जाऊन मला काय सांगायचं तें सांगेन.

गुंडोपंत:— त्या माणसांबद्दल तुम्हांला शंका नको. पैशाच्या लोभानं नव्हे पण केवळ तुम्ही आतां दुःखांत आहांत, निराधार झालां आहांत, म्हणूनच तुम्ही बोलावतांक्षणींच तीं तुमच्याकडे येतील.

“ दुःखांत ” “ निराधार ” हे शब्द गुंडोपंताच्या तोंडून निघून सरस्वतीबाईच्या कानीं पडतांच तिच्या भुंवया किंचित् आकुंचित झाल्या. कपाळाला एक अर्धी आंठी आली. तिनें किंचिन्मात्र आपलें नाक मुरडलें, खालचा ओंठ हळूच दांतांनीं चावला. जणूं काय ते शब्द ऐकल्याबरोबर आणि विशेषतः “ निराधार ” हा शब्द ऐकण्याबरोबर तिच्या ओंठांशीं कांहीं संतापाचे शब्द आले होते. परंतु ओठ चावून तिनें ते माघारी परतविले. नंतर क्षणमात्र आपलें मन स्थितीवर आणण्यासाठीं प्रयत्न करून व तेवढ्याचवेळेपुरती त्या प्रयत्नास सिद्धि मिळवून ती त्यास म्हणते, “ हो ! अशी माझी स्थिति झाली आहे हें तर उघड दिसतंच आहे. मग त्यांना उद्यां आणण्याचं करतांना ? जेवायला बोलवण्याचं कारण इतकंच कीं, मग बराच वेळ बोलायला सांपडेल. ”

गुंडोपंतास तें सर्व बरें वाटलें. दोघांचा सलोखा होण्यास हाच मार्ग उत्तम असें त्याच्या मनानें घेतलें आणि त्यानें तावडतोब सीतारामास व इतर मुलांस घेऊन जेवावयाला येण्याचें पत्करलें. सीतारामाची आई सर्वांस पाठवील कीं नाहीं याबद्दल त्याला शंका नव्हती असें नाहीं, तथापि आपण तिचें मन खास वळवूं अशी त्याच्या मनास खात्री वाटत होती आणि म्हणून त्यानें सरस्वतीबाईस, “ पुढें आतां तुम्ही अशा तऱ्हेनं वागला तर तुमचं आणखी तुमच्या मुलाचं खरोखरी कल्याण होणार आहे, त्याचं शिकणं फार उत्तम प्रकारानं होईल, कोणत्याही बाबतींत त्याची तुम्हांला काळजी करण्याला नको, ” वगैरे वगैरे प्रकारांनीं पुष्कळ सांगितलें. तिनेंही मुकाट्यानें तें सर्व ऐकून घेतलें. त्याच्या प्रत्येक सांगण्यास मान डोलविली आणि ‘ आतां ठरल्याप्रमाणं उद्यां तुम्ही त्यांना जेवायला घेऊन या. मी त्यांना

आपल्याकडून विनवणी करायची तितकी करून सगळं कांहीं सांगतें. मग पुढें त्यांच्या चित्ताला जें काय वाटेल तें वाटो, '' असें आश्वासन देऊन गुंडोपंतास तिनें जाण्यास सांगितलें. आपल्या मुत्सद्दी-पणास बरीच सिद्धि मिळाली असें मनांत ह्मणत गुंडोपंत थोरल्या दरवाज्याजवळ जातो न जातो तोंच सरस्वतीबाईकडून त्यास पुनः परत येण्याविषयीं आमंत्रण आलें व त्याप्रमाणें तो तिजकडे जातो तोंच '' चुकूं नका बरं '' असें बजावून व '' सगळ्यांनाच जमलं तर निदान सीतारामभावजींना तरी घेऊन याच, '' असें आग्रहपूर्वक सांगण्यांत आलें. नंतर गुंडोपंत एकदांचा गेला.

सरस्वतीबाईनें आपल्या माडीच्या खिड-कींतून त्यास जातांना पाहिलें आणि एकदम तिनें आपलें तोंड फिरवून ती विकट हास्य हंसली. तें तिचें हंसणें कोणीं जर पाहिलें असतें, तर तिला खास वेड लागलें आहे असेंच त्यानें म्हटलें असतें. परंतु खरोखर तसें नव्हतें. तिला वेड लागलें नव्हतें. तिला अत्यानंद झाला होता, आणि त्या भरांत ती त्या प्रकारानें हंसली. पुनः तिच्या मनांत काय आलें कोणास कळे. तिनें गड्यास हांका मारून गुंडोपंत कांहीं अंतरावर गेला असेल त्याला माघारीं बोलावून आण असें सांगितलें. गडी धांवत गेला. सरस्वतीबाईचा निरोप त्यास सांगि-तला. या बाईला आतां खचित् वेड लागलें असें त्यास वाटलें. ' जेव्हां ही त्यांचा द्वेष करीत होती, तेव्हां त्यांचं तोंड सुद्धां पाहायला नको अशी स्थिति होती. आतां त्यांना भेटून त्यांच्या गळ्यांत कधीं मिठी मारीन असं तिला झालेलं दिसतं. पाहूं या बरं काय म्हणते ती,' असा विचार करून गुंडोपंत परत फिरला. आणि तिच्याकडे येऊन म्हणतो, '' मला कशाला परत बोलावलंत ? ''

सरस्वतीबाई:— एवढंच सांगायला बोलावलं, कीं सीतारामभावजींना एकट्यां-नाच आणा. दुसऱ्या कोणाला नको. ते, तुम्ही आणखी मी तिघंजणं बसून काय बोलायचं तें बोलू. रंगू उद्यां आयताच जाणार आहे. जा आतां. इतकंच सांगा-याला मी विसरलें होतें तें सांगण्यासाठीं बोलावलं.

गुंडोपंतानेंही त्याप्रमाणें करण्याचें तिला आश्वासन दिलें, आणि आपल्याशींच हंसत हंसत पुनः तेथून निघून गेला. तो गेल्यानंतर ही पुनः मघाप्रमाणें हंसली. यावेळीं तिच्या मानसिक विचारांचें ज्ञान करून घेणें कोणास शक्य असतें तर त्याला काय काय गोष्टी कळल्या असत्या. परंतु ते विचार पहाण्याकडे गुंतण्याची ही वेळ नव्हे. ते विचार दुसऱ्या कांहीं रूपांत लवकरच वाचकांस समजणार आहेत. सध्या एवढें सांगितलें असतां पुरे, कीं ती बराच वेळपर्यंत आपल्या मनाशीं विचार करीत बसली. तिच्या त्या विचारां-खेरीज तिला या वेळीं दुसरें कांहींही सुचलें नाहीं. आपल्या बाळ्यावांचून एक तासही तिला कधीं करमलें नाहीं. ती आणि तिचा मुलगा यांची केवळ व्याप्तिच होती म्हटलें तरी चालेल. जेथें ती तेथें तिचा मुलगा. परंतु आज किती वेळ तरी तो तिच्या-पासून दूर होता. ती कोणाशीं बोलत बसली असतां त्यानें तिला कधीं स्वस्थ-पणें बोलूंही दिलें नाहीं; आणि कोणा-शींही बोलण्यांत ती गुंतली असतां तो जवळ नसल्यास तिनें त्याला हांक मारून आणलें नाहीं असेंही पण कधीं झालें नाहीं. तिच्या त्या प्रेमातिरेकानें त्या

पोराचें फार नुकसान होत होतें. त्यास अद्यापि शिकणें म्हणजे काय, हें ठाऊकही नव्हतें. कोणी त्याच्या शिकण्याची गोष्ट काढल्यास हिनें त्या गृहस्थास “ मुलगा असा आहे तो केवढा ? आणखी त्याला शाळा व मास्तर ते काय करायचे ? ” असें म्हणून मोडून काढावें. तो नेहमीं तिच्या सान्निध्यांत असल्यामुळें तिच्या तोंडून गडीमाणसांस किंवा इतरांस शिव्या-शापांचा वर्षाव होत असे, तो त्यानें ऐकावा आणि त्याचें अनुकरण करावें व तशा कांहीं शिव्या त्यानें दिल्या ह्मणजे हिनें त्याच्या हुशारीबद्दल खूप स्तुति करावी. त्यानें कोणाची खोडी केली असतां त्याबद्दलही त्याला कधीं रागें न भरतां ज्याची खोडी केली असेल त्यासच उलटच्या शिव्या द्याव्या, असा क्रम चालू असे. यावरून मुलाची एकंदर वर्तणूक व त्याचें शील कोणत्या प्रकारचें झालें असेल हें सहज समजणार आहे. एक गोष्ट मात्र अगदीं खरी होती ती ही कीं, तिचें तिच्या पोरावर अतिशय प्रेम होतें. त्या पोरासाठीं तिनें केव्हांही कांहींही करण्यास मागेंपुढें पाहिलें नसतें. एखाद्या रानटी पशूंतील मादीचें आपल्या बच्च्या-वर जसें प्रेम असतें, त्याहूनही उत्कट असें तिचें प्रेम होतें. कोणतेंही साहस, कोण-ताही गुन्हा, त्या पोराच्या हितासाठीं ह्मणून करण्याचें तिच्या मनांत आल्यास ती मागें म्हणून घ्यावयाची नाहींच. आजपर्यंत जें जें कांहीं तिनें केलें, तें तें सर्व त्या पोराप्रीत्यर्थच केलें. एक आपलें पोर आणि आपण स्वतः, यांखेरीज तिला दुसरें कांहींही कोणीही कधींही दिसलें नाहीं. त्यास व आपणास सुखांत व आनंदांत ठेवण्यास बाकीचें सर्व कांहीं आणि सर्व व्यक्ति केवळ साधनरूप होत; आणि त्या पोरास सुखांत ठेवण्यास आपणही साधनच आहों असें तिच्या मनांत सदोदित वाटत असे. आतां तर असा प्रसंग आला, कीं आपण व आपला तो पोरगा दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाणार. हा नुसता विचार सुद्धां तिच्या मनास अतोनात दुःख देऊं लागला. असें होऊं द्यावें काय ? हा नुसता प्रश्न तिच्या अंतःकरणांत चरे पाडल्याप्रमाणें झोंबूं लागला; आणि तसें होऊं न देण्यासाठीं तिनें आपल्या मनांत जो कांहीं उपाय योजिला होता त्याबद्दलच या वेळीं तिच्या मनांत विचार चाललेले होते. त्या उपायानें आपला इष्ट हेतु सिद्धीस जाणार असें तिला वाटून आनंद झाला होता. आणि आनंदविचारांतच ती होती. इतक्यांत तिचा लाडका धांवत धांवत तिच्याकडे आला. त्यास पाह-ण्याबरोबर आणि तो हंसत हंसत जवळ येऊन तिच्या अंगावर पडण्याबरोबर तिच्या प्रेमाला विलक्षण भरतें आलें. त्या प्रेमावेशांत तिनें कवटाळून त्याचे मटामट मुके घेतले. नंतर दोन्हीं हातांनीं त्याचें तोंड धरून त्यास अम्मळ दूर करून आपल्या प्रेमाश्रुपूर्ण अशा नेत्रांनीं त्या-च्याकडे एकसारखी ती पहात राहिली. जणूं काय त्या पाहण्यानें “ बाळा, तुझ्याकरितां मी काय करणार नाहीं ? कोणती गोष्ट करण्याला मागें घेईन ? तुला दुसऱ्याच्या हातांत कधीं तरी देईन का ?——कधीं कधीं सुद्धां देणार नाहीं. जें काय आहे त्याचा धनी तूंच. त्यांतली एक तनसडीसुद्धां दुसऱ्याच्या हातीं जाऊं देणार नाहीं, ” असेंच ती त्यास म्हणत होती. त्या मुलानें आपलें डोकें तिच्या उरःस्थलाशीं घासलें. त्यानें तर तिच्या प्रेमास अधिकच भरती आली. तिनें

त्याचे असंख्य मुके घेतले. त्यानें, बाल-काला सहज, असे किती तरी प्रेमोद्गार काढले. त्या प्रेमोद्गारानें तिच्या आनंदास पारावार नाहींसा झाला अशा स्थितींत स्वर्गांत घालविल्याप्रमाणें तिचा सुमारें अर्धा तास गेला. इतक्यांत तो तिचा मुलगा घुटमळत घुटमळत " आई, माझ्या पोटांत कसंसंच होतें, " असें म्हणाला.

" बाळा तुला भूक लागली असेल !" असें आईनें उत्तर दिलें.

" भूक कशी लागेल ? आतांच सखूबाईंनीं मला पानग्या करून दिल्या—तूं दळलेल्या कणकेच्या पानग्या करून दिल्या............ "

" मी दळलेल्या कणकेच्या ? " सरस्वतीबाई अतिशय भयंकर चेहरा करून एकदम उद्गारली.

" मीं दळलेल्या कणकेच्या ! " तिनें पुनः तसेंच विचारिलें.

तिचा चेहरा काळा ठिक्कर पडला. डोळे ताठले. ओंठ थरथरां कांपूं लागले आणि——

" मीं दळलेल्या कणकेच्या पानग्या करून दिल्या ? " असा पुनः उद्गार काढीत ती तट्कन् उठून उभी राहिली.

---

# प्रकरण ६१ वें.

## अखेर !

त्या मुलाला तिच्या त्या प्रश्नांचा कांहीं अर्थ समजेना. तें ताठल्यासारखें झालें. आईचा तो चेहरा, ते ताठलेले डोळे, ते विलक्षण हातवारे, आपल्याला दूर करून तट्कन् उठणें आणि वारंवार वारंवार " मीं दळलेल्या कणकेच्या ? " असे उद्गार काढणें—सर्व कांहीं त्यास अतिशय घाबरण्यास कारण झालें. तोही कावराबावरा चेहरा करून तिला म्हणतो, " आई, माझ्या पोटांत आग झाल्यासारखं होत आहे, आणखी, तूं असं कां करतेस ? आई, मला कांहीं तरी......" परंतु त्या मुलाचे ते शब्द तिच्या कानीं पडत होते कीं नाहीं कोण जाणे. ती अगदीं तटस्थपणें जशी एखादी फत्तराची पुतळी असावी तशी उभी राहिली होती. शून्यदृष्टीनें त्या पोराकडे पहात असावी. आणि शून्य कर्णांनीच ऐकत असावी. ही स्थिति क्षणमात्रच झाली असेल. दुसऱ्या क्षणींच तिनें त्याला आपल्याजवळ ओढलें आणि त्याला आपल्या उरःप्रदेशाशीं घट्ट आंवळून धरलें. त्याचे मटामट मुके घेतले. जणूं काय त्याला काय होतें आणि काय नाहीं याचें तिला मुळींच भान नाहींसें झालें. पण हीही स्थिति गेली आणि पुढल्या क्षणीं ती

आपल्या शुद्धीवर आलीसें दिसलें. तितक्यांत चेंडच्या, " अग आई, असं काय करतेस ? माझ्या पोटांत अगदीं आग आग होते आहेस ! मला कांहीं तरी गारसं प्यायला दे " असें म्हणाला. त्याबरोबर ती एकदम चांगलीच शुद्धीवर आल्याप्रमाणें झालें. तिला जणूं काय मध्यंतरीं सर्व गोष्टींची विस्मृति पडल्याप्रमाणें झालें असून आतां सर्व आठवलें. तिचा चेहरा पुनः पूर्वीप्रमाणें कावराबावरा झाला. " आतां काय करूं ! आतां मी आपल्या बाळाला कशी देऊं ? अग बाईग, कसंम चांडाळणी तुला वाटलं नाहीं ?" असें विवळत ओरडत ती घरांत खालीं गेली आणि तिनें त्या स्वयंपाकीणबाईवर ' चांडाळणी, ' ' मांमणी, ' ' अवदसे, ' अशा शब्दांचा अगदीं भडिमार चालविला. काय झालें तें त्या बाईला समजेना. काय करावें तें हिला सुचेना आणि काय करावयाचें आणि काय झालें आहे तें बोलून टाकण्याइतकी तिच्या मनाची स्थितिसुद्धां राहिली नाहीं. तेव्हां तिनें सैरावैरा घरांत हिंडण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. शिव्यांचा वर्षाव चालला असल्यामुळें त्या बाईला कांहीं विचारण्याची छाती होईना. इतक्यांत वरून अतिशय कर्कश अशी पोराची आरोळी आली. " आई, आई, कुठें गेलीस, माझ्या पोटांत आग आग झालीग, आई ! " त्याबरोबर ती बाई वर गेली आणि आपल्या पिलाला कोणी तरी हात लावायाला गेलं असं वाटून एखादी वाघीण जशी चवताळून धांवून आपल्या गुहेकडे जाते, त्याचप्रमाणें सरस्वतीबाईही धांवली. सखुबाईस त्या पोराला काय झालें तें कांहीं समजेना. तो आग आग झाली असें म्हणत होता, एवढ्याचवरून काय तिच्या मनांत आलें असेल तें. परंतु अधिक कांहीं समजेना. सरस्वतीबाईनें ताबडतोब त्याच्या जवळ जवळ जाऊन त्याला उचलून घेतलें, तों त्याचें अंग थरथर कांपतें आहे आणि तो एकसारखा पोटावर हात देऊन आग आग असें करतो आहे. इतक्यांत त्याला सडकून एक रेच झाला तो सर्व रक्तमय होता. त्या रेचाबरोबर त्याची कंबरच खचली. त्याला उभें राहतां येईना. त्यास मांडीवर आडवें घ्यावें लागलें. तोंडानें मात्र त्याचा " पाणी—गार पाणी—अगदीं थंड थंड गार पाणी " असा आक्रोश चालला होता. तो रेच झालेला पाहतांच सरस्वतीबाईचीही कंबर खचली, आणि तिचें तें शिव्या देणारें तोंडही पण खचलें. कांहीं सुद्धां तिच्या तोंडून शब्द बाहेर पडेना.

" अहो, अशा बसलां कां ? कांहीं तरी औषध करा. कांहीं तरी औषध करा. हें काय हें ? रक्ताची सगळी धार लागली आहे. कोणाला तरी डॉक्टराला बोलवायला धाडा, " असें सखूबाईनें मोठा धीर करून म्हटलें. परंतु सरस्वतीबाईच्या तोंडून एक शब्द सुद्धां नाहीं. ती शून्य दृष्टीनें त्या बाईकडे पहात राहिली आणि मुलाला दुसरा रेच झाला तरी त्याला घट्ट धरून बसली होती. तो सुटण्यासाठीं तडफड करीत होता, तरी कांहीं केल्या त्याला सोडीना. त्याचा कोंडमारा होण्याची सुद्धां वेळ आली.

सखूबाईस तिच्या त्या करण्याचा कांहीं अर्थच समजेना. शेवटीं कर्मधर्मसंयोगानें रंगोपंत तेथें आला. त्यास त्या बाईनें सर्व प्रकार सांगितला, आणि तो ऐकतांच त्यानें डॉक्टराला बोलावून आणलें. डॉक्टरांनीं त्या रक्ताकडे पहातांच आणि नाडीला हात लावतांच, " पोराच्या

पोटांत फार जालिम विष गेलं आहे. कुठून गेलं असेल तें पहा. " असें म्हणून असाध्य रोग्याला औषध लिहून देतांना जो एक प्रकारचा " यांत काय अर्थ आहे ? " अशा अर्थाचा डॉक्टरांवैद्यांचा चेहरा होत असतो, तसा चेहरा करून त्यांनीं त्या मुलाला औषध लिहून दिलें आणि जातां जातां पुनः पोराच्या पोटांत कांहीं तरी भयंकर विषार गेला आहे असें ह्मटलें.

विषार गेला आहे असें ह्मणतांच रंगोपंत व ती सखूबाई यांचे चेहरे कसेसेच झाले, व तीं दोघें एकमेकांकडे पाहूं लागलीं. त्याचप्रमाणें इतर मंडळी आतां तेथें जमली होती, तीही पण इकडे तिकडे पाहूं लागली. विषार कोठला आला ? सखुबाई घाबरली. आपण त्याला दोन पानग्या करून दिल्या एवढेंच तिच्या मनांत आलें, आणि पोरानें कांहीं कोठें खाल्लें तर नाहीं असें तिनें मोठ्यानें ह्मटलें. " पोर फार अचपळ, त्यानं कुठें जाऊन काय खाल्लं असेलन् काय नाहीं ! " असें इतर मंडळी आपापसांत कुजबुजली. रंगोपंतांनीं भास्कराला औषध आणण्यास पाठविलें. हें सर्व झालें. पण बिचारी सरस्वतीबाई सर्व कांहीं शून्यदृष्टीनें पहात व शून्यकर्णांनींच ऐकत होती. होय, सरस्वतीबाई आतां ' बिचारी ' या विशेषणाला योग्य अशीच झाली. पूर्वींची ती सरस्वतीबाई आतां नव्हती. ती कांहीं वेळ शुद्धीवर असे. कांहीं वेळ नसे. तिनें आपल्या पोरास मात्र घट्ट धरून ठेविलें होतें. औषध आणल्यानंतर तें त्याला पाजण्याचें सुद्धां इतर मंडळीस कठिण गेलें. ती मध्येंच हंसे, मध्येंच रडे, मध्येंच त्याला मोठ्या प्रेमानें कवटाळी आणि त्याचें चुंबन घेई. नंतर सभोंवतालच्यांस शिव्या देई. त्यांच्या अंगावर सुद्धां धांवे. पुनः एकदम शुद्धीवर आल्याप्रमाणें होऊन " दळलेल्या कणकेच्या पानग्या करून दिल्या ! " असें त्याला मोठ्यानें विचारी. " अरे डॉक्टरला बोलवा. त्याला औषध द्या. त्याला बरा करा. मग मी सगळं सांगतें. धांवा. धांवा " असें ह्मणे. आपणच त्याला कांहीं तरी वेऊन पाजी.

एकंदर प्रकार काय आहे, कोणास कांहीं समजेना. एकट्या सखूबाईस मात्र शंका आली आणि तिनें आंत जाऊन ती कणीक पाहिल्यावरून तिचा तो संशय खराच असें तिचें तिला वाटलें. अशा भाडोत्री स्वयंपाकिणी आपले संशय कधीं मनांतल्यामनांत ठेवावयाच्या नाहींत. परंतु या वेळीं त्या बाईला देखील त्या सरस्वतीबाईची दया आली. ही वेळ बोलावयाची नाहीं असें वाटलें आणि ती खरोखरीच बोलली नाहीं. ती त्या पोराला वांचविण्याकरितां काय उपाय करावे याबद्दल योजना करण्यांत व उपाय सुचला, कीं तो अमलांत आणण्यांत गुंतली. मात्र आपल्यावर कांहीं आल्यास आपण त्यांतून निसटून जाण्यासाठीं ती कणीक ठिकाणच्या ठिकाणीं आहे हें वारंवार पाहण्यास ती विसरली नाहीं.

अनेक उपाय झाले. डॉक्टराच्या औषधाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. रक्तमिश्रित फोंकचे फोंक त्या पोराला झाले. रात्रीची वेळ झाली तसतशी त्याला ग्लानि येऊं लागली, आणि तो अगदीं मलूल होत चालला. तरी त्याच्या तोंडांतून " आई, पाणी ! आई पाणी ! ! " असे शब्द अगदीं कोरड्या पडलेल्या गळ्यांतून क्षीण अशा आवाजानें निघतच होते. मधून मधून " आई, आई, अग आई " असेही शब्द तो आपल्याकडून अगदीं

नेटानें ओरडून उच्चारी. परंतु ते सर्व श्रम केवळ त्याला अधिक अधिक क्षीण करण्यास मात्र कारण झाले. आई त्याच्याजवळ असून नसल्याप्रमाणेंच होती. एका तासांत पाऊण तासपर्यंत तिला काय चाललें आहे याचें भान नसावें अशा प्रकारचें तिचें वर्तन असे. आणि पाव तास ती शुद्धीवर आल्याप्रमाणें होऊन " बाळा, मी दळलेल्या कणकीच्या कारे पानग्या तुला दिल्या ? " असें एकसारखें विचारीत सुटे. असा प्रकार चालतां चालतां मध्यरात्र झाली. आजूबाजूस बसलेली सर्व मंडळी अगदीं पेंगल्याप्रमाणें होऊन दूरदूर झाली. त्या पोराला आतां रेंच होईनासे झाले. ग्लानीनें त्याला पक्कें पछाडलें आणि झोंप लागते असें सर्वांस वाटलें. सरस्वतीबाईही अगदीं मरगळल्याप्रमाणें होऊन त्याच्या शेजारीं पडली. तिला चक्कर आल्याप्रमाणें झालें. तितक्यांत तिला स्वप्नांत कांहीं भयंकर प्रकार पाहिल्याप्रमाणें झालें आणि ती खाड्कन् उठून बसली. तिनें आपल्या पोरास चापसलें. ती चांगली शुद्धीवर आल्याप्रमाणें झाली. तिनें इकडे तिकडे पाहिलें, आणि त्या पोराला झोंप लागलीसें पाहून ती त्याचा हात घट्ट धरून बसली. थोडासा वेळ गेला, इतक्यांत त्या पोरानें एक किंचाळी फोडली, हातपाय झाडले, " आई, त्या कणकीच्या पानग्यांनींच काग असं झालं ?" असें मोठ्यानें विचारलें आणि एकदम सर्व थंडगार पडलें ! हें सर्व इतक्या थोड्या अवकाशांत घडलें, कीं सरस्वतीबाईला शेवट झाला असें कळलेंसुद्धां नाहीं. पुनः पोराला झोंपच लागली आहे असें वाटलें. पण ते शेवटले त्या " कणकीच्या पानग्यांनींच काग असं झालं ? " हे शब्द तिच्या कानांत आणि डोक्यांत एकसारखे घुमत राहिले होते. होतां होतां तिनें हातांत घट्ट धरलेला हात थंडगार व लांकडासारखा ताठ झाला. हालचाल कांहीं नाहीं. श्वास नाहीं. तोंड काळें ठिक्कर पडलें. ओंठ उघडे, डोळे उघडे. सर्व कांहीं भयंकर दिसूं लागलें आणि व्हावयाचें तें शेवटीं झालें असें तिला एकदम वाटून ती " बाळ्या, माझ्या—माझ्याच या हातांनीं रे तुझा प्राण घेतला ! " असें मोठ्यानें अतिशय कर्कशपणानें किंचाळून तिनें दोनही हात जमिनीवर आपटले, आणि तीही निपचित पडली. हात आपटल्याबरोबर सर्व बांगड्या फुटून कांहीं कांचा तिच्या हातांत शिरल्या, तें सुद्धां तिला कांहीं कळलें नाहीं. ती अगदीं बेशुद्ध पडली. तिच्या त्या किंचाळण्यानें माणसें आसपास पेंगून पडलीं होतीं, तीं जागीं झालीं व पहातात तों हा भयंकर प्रकार ! पोरगा तर आतां शुद्धीवर येण्याच्या पलीकडे गेला, हें तेव्हांच सर्वांना दिसलें. परंतु सरस्वतीबाईला ताबडतोब शुद्धीवर आणण्यासाठीं प्रयत्न झाले. बऱ्याच प्रयत्नांनीं ती जागृत झाली. तिच्या अंगची चलनवलन शक्ति पुनः आली, परंतु खरी सरस्वतीबाई पार गेली. जें शुद्धीवर आलें तें केवळ तिचें शरीर. आंतलें ज्ञान व पहिली चेतना गेली. आणि सरस्वतीबाई आपल्या पूर्व स्थितीची छाया मात्र राहिली. " मी दळलेल्या कणकीच्या पानग्या ? " एवढे शब्द मात्र पूर्वींपैकीं तिच्या तोंडीं राहिले. बाकी सर्व शब्द केवळ एकापुढें एक वाटतील तसे ती उच्चारी. त्यांचा अर्थ तिच्या मनांत कधीं उतरत असेल असें वाटण्यास यत्किंचितही जागा नव्हती. पोराला उचलून नेऊन त्याचा दहनविधि वगैरे झाला

परंतु तिला त्यांतलें कांहीं सुद्धां ठाऊक नाहीं. ती मध्येंच मोठमोठयानें रडे. मध्येंच विकट हास्य हंसे. मध्येंच, " बाळ्या, तुला भूक लागली असेल " असें म्हणे. आणि थोडया वेळानें भयंकर चेहरा करून " मी दळलेल्या कणकीच्या पानग्या !" असें विचारी व तट्कन् उठून बसे. नंतर जणूं काय आपला पोरगा आपल्याजवळ आला आहे असा आविर्भाव करून घट्ट पोटाशीं आवळी व मटामट मुके घेई. भर्कन् कोणाला तरी--मग तें माणूस मोठें असो, लहान असो--जवळ ओढी आणि त्याला घट्ट पोटाशीं आवळून धरायला पाही. ती शुद्ध वेडी झाली; आणि तें वेड एक दोन दिवसांतच इतकें माजलें, कीं तिला आतां कोंडून ठेवण्याशिवाय दुसरा मार्ग नाहींसा झाला असें सर्वांना वाटलें. ती वाटेल त्यास बाळ्या म्हणून ओढूं लागली.

बाळ्यास कशामुळें मरण आलें याबद्दल मंडळीस शंका राहिली नाहीं. सरस्वतीबाईनें दळून ठेविलेली कणीक तपासून पहातां आंत कांहीं भयंकर विष असावें असें दिसून आलें आणि दुसरे दिवशीं कोणाकोणास तिनें जेवावयाला बोलाविलें होतें हें सर्व बाहेर आल्यानंतर तर तिच्या हेतूबद्दल कोणासच शंका राहिली नाहीं. अर्थात् पहिल्या सपाट्यास तिच्या दुष्टपणाबद्दल सर्वत्रांस अतिशय संताप आला आणि ज्यानें त्यानें तिला अतोनात शिव्याही दिल्या; परंतु सरस्वतीबाईची स्थिति काय झाली आहे हें प्रत्यक्ष कोणीं पाहिलें म्हणजे पाठीमागली सर्व हकीकत मनांत आली तरी सुद्धां ज्याला त्याला तिची दया येऊं लागली. आपल्या पोराची व बायकोची स्थिति काय झाली हें कळल्यानंतर चिंतोपंताला अतोनात वाईट वाटलें आणि बायकोच्या हातून पोराचा घात झाला व तो घात झाल्यानें पुढें ती अशा भयंकर स्थितीला पावली, असें कळल्यावर तर, त्याला आपल्या व तिच्या दुष्ट कर्मांचीं फळें आपल्याला व तिला परमेश्वरानें याच जन्मांत दिलीं, असें पक्कें वाटून त्यानें आपल्या भावाच्या नांवानें कागद करून देण्याचा आपला विचार कायम केला. त्या भयंकर तुरुंगांतून आपण सुटून पुनः आपल्या इस्टेटीचा उपभोग घेण्यास जाण्याचें नशिबीं येईपर्यंत ती चोरापोरीं जाऊन आपल्यास भिक्षेचीच पाळी येईल. त्यापेक्षां आपल्या भावाला व आईला केवळ लोभानें व अन्यायानें आणि दुष्टपणानें आपण हालअपेष्टांत पाडिलें, बायकोच्या नादीं लागून वाटेल तसलीं कृत्यें केलीं, आपल्या आईच्या अब्रूची सुद्धां चाड न ठेवतां भावंडांच्या--आणि असल्या चांगल्या भावंडांच्या--जन्माविषयीं भयंकर अपवाद लिहून काढून त्यांना आपल्याशीं भांडण्यासाठीं तोंडसुद्धां बाहेर काढतां येऊं नये अशी स्थिति केली, या सर्व कृत्यांबद्दल आतां बायकोच्या हातून पोर मरून ती अगदीं वेडी होईपर्यंत स्थिति येऊन पोंहोंचल्यावर त्यास फार पश्चात्ताप झाला. भावानें संस्थानापर्यंत येऊन मदत केली तेव्हां, आणि बायकोला किती तारा पाठविल्या तरी तिचीं उत्तरें नाहींत असें पाहिलें तेव्हां, त्याला वाईट वाटून व पश्चात्ताप होऊन त्यानें त्या सर्वांबद्दल आतां भरपाई करावयाची असा विचार केला होता, तो जसा अधिक विचारानें उलटला, तसा आतां उलटला नाहीं. बायकोचा दुष्टपणा त्याच्या निदर्शनास फारच चांगल्या प्रकारें आला.--आणखी चांगल्या प्रकारानें तो कसा येणार ? लोकांना विषप्रयोग करून

मारून टाकण्याचा विचार करून तयारी केली, परंतु परमेश्वराच्या मनांत जणूं काय असेंच आलें, कीं इच्या या दुष्टपणाची परमावधि झाली, आतां हिलाच कांहीं तरी शिक्षा द्यावी. त्याप्रमाणें तिनें खणलेल्या खाणींत तिचेंच पोर तिच्याच हातून दडपवून टाकलें. एवढ्यानेंही ती सन्मार्गावर येणार नाहीं असें आणखी वाटूनच काय, त्यानें तिची बुद्धि हिरावून घेतली. अशाकरितां कीं, यापुढें तरी आतां तिच्या हातून कांहीं दुष्टपणाचीं कृत्यें घडूं नयेत. चिंतोपंतास असें सर्व वाटलें आणि त्याचें मन खरोखर पश्चात्तापानें पूर्णपणें भरलें.

---

# प्रकरण ६२ वें.

## फलश्रुति.

मागील प्रकरणांतून चिंतोपंत, सरस्वतीबाई व त्यांचा मुलगा यांची अखेर कसकशी झाली तें वाचकांस निवेदन केलें. चेंडच्या मेला, चिंतोपंत तुरुंगांत पडले, आणि सरस्वतीबाईची तशी गत झाली, हें पाहून रंगोपंतास काय वाटलें ? आनंद झाला कीं वाईट वाटलें ? वाईट वाटलें नाहीं असें माझें ह्मणणें नाहीं. कारण सरस्वतीबाईची ती तशी स्थिति झालेली पाहून त्याला प्रथमतः वाईट वाटलेंच, परंतु अखेरीस त्यास एकंदरींत समाधानच वाटलें. कारण आतां त्याच्या मनानें असें घेतलें, कीं आपली दृष्टि ज्याच्या ज्याच्यावर फिरणार तें तें अगदीं सर्वथा आपलें. आतां त्यावर हक्क सांगणारा कोणी नाहीं. चिंतोपंतानें तुरुंगांतून आपल्या भावाला सर्व दिल्याचें मुळींसुद्धां त्याच्या कानीं आलें नव्हतें आणि तसें जोंपर्यंत नाहीं, तोंपर्यंत ही मंडळी कांहीं उघडपणें ताबा मागावयाला येत नाहीं.येणार कशी ? आजपर्यंत ती कां आली नाहीं, हें त्याला पक्कें ठाऊक होतें. इतकेंच नव्हे, तर एक वेळां ज्या कागदामुळें चिंतोपंतानें, त्यांचीं तोंडें बंद केलीं होतीं, तो कागदच त्याच्या नजरेस पडला होता. तेव्हां त्या कागदाच्या उघडकीस येण्याच्या भीतीनें ही मंडळी कधीं हक्क सांगणार आहेत ! कधींच नाहीं. असें आपल्या मनास सांगून स्वारी खुषींत होती, कीं आपण जें काय मागें गेलें, तें सर्व जिंकलें इतकेंच नव्हे तर आतां सर्व कांहीं आपल्या हातीं आलें. अशी स्थिति झाली असतां स्वारींना झालेल्या गोष्टींचा आनंद झाला असेल कीं दुःख झालें असेल ? रंगोपंत या आत्मतुष्टींत आतां तल्लीन असतां गुंडोपंत एके दिवशीं त्याजकडे आला. गुंडोपंत आतां सर्वतोपरी सीताराम वगैरे मंडळीच्या हितासाठीं झटण्याबद्दलचें व्रत स्वीकारून

बसला होता. ज्यानें प्रथमतः केवळ स्वार्थबुद्धीनें घेऊन नानाप्रकारच्या दुष्ट गोष्टी केल्या; त्यानें आपल्या यजमानणीचा व तिच्या मुलाचा उदात्त स्वभाव पाहून आपले दुष्ट हेतु सोडून दिले. आपला स्वार्थही सोडला. नव्हे, स्वार्थ साधला, कारण सर्व इस्टेटीची झालेली दुर्व्यवस्था नीट मार्गाला लावण्याचें काम त्याच्याकडेच येणार हें आतां त्यास उघड दिसलें. परंतु त्यानें मात्र स्वार्थ साधण्याचा विचार केला नाहीं, आपली यजमानीण व तिचीं मुलें आपणास सोडणार नाहींत हें त्यानें पक्कें जाणलें, तेव्हां त्यास दुष्ट बुद्धि कायम ठेवण्याचें प्रयोजनच राहिलें नाहीं. तो ते दिवशीं रंगोपंताकडे एवढ्याच हेतूनें आला होता, कीं त्याचे पोटांत शिरून इस्टेटीची काय व्यवस्था आहे, काय नाहीं हें काढून घ्यावें. रंगोपंतास जर चिंतोपंतानें आतां काय केलें हें समजलें, तर तो कांहीं दाद लागूं देणार नाहीं हें तो पक्कें जाणून होता. तेव्हां आपण त्याच्याशीं मिलाफ करण्यासच आलों आहों असें भासवून कांहीं साधलें तर पहावें, हा त्यानें हेतु धरला. आधीं इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर गुंडोपंत त्यास ह्मणतो, “ रंगोपंत, गेल्या गतल्या गोष्टी विसरून पुनः आपण एक झालों तर हीच वेळ आहे. चिंतोपंतास कायसें फारच वैराग्य आलें आहे, आणखी तो या प्रसंगीं आपलें मागलें सर्व कृष्णकारस्थान झांकून टाकण्यासाठीं सर्व इस्टेट आपल्या भावास देऊन टाकणार आहे. तसें झालें, ह्मणजे तुह्मी कोणीकडे जाल, तें तुह्मांला दिसतंच आहे. माझें काय, मी पहिल्यानं त्यांच्या पदरींच होतों तसा राहतों म्हटलं, तर आतां मला ठेवून घेतील; पण आपला स्वार्थ साधायाचा, तर हीच वेळ आहे. मी आणखी तुह्मी मिळालों तर त्यांना तेव्हांच पुरे पडून उरूं; पण तुम्ही जर मला ढकलून देऊन एकटेच सगळं गिळंकृत करूं म्हणाल, तर माझ्यासारखा चमत्कारिक माणूस कोणी नाहीं. बोला, मी आतां हा अगदीं शेवटला म्हणून तुमच्याकडे आलों आहें. कसं काय ? जर माझी मदत पाहिजे असेल, तर मला सोडून बरीक कांहीं करतां कामा नये. माझ्यावर अगदीं पुरा विश्वास ठेवला पाहिजे. नाहीं तर तुम्ही म्हणाल, कीं याला मी होय होय म्हणून थापा देईन, आणखी आपल्याला पाहिजे तें झालं कीं झुगारून देईन. पण हें तुम्ही चुकाल. माझी खरी काय ताकद आहे, कर्तबगारी आहे, तें तुम्हांला ठाऊक नाहीं. मी उगीच मामळभट तुम्हाला वाटत असेन, पण खरा कसा आहें तें कळविण्याची पाळी आणूं नका.... ”

गुंडोपंत इतकें बोलून किंचित् थांबला. जणू काय इतकें लांबलचक बोलल्यामुळें त्याला थकवा आला व थोडीशी विश्रांति घ्यावी लागली. तो हें सर्व बोलत असतां त्याचे डोळे एकसारखे त्या रंगोपंताच्या चेहऱ्याकडे लागलेले होते. आपल्या एका एका वाक्याचा व शब्दाचा त्याच्या मनावर काय व कसा परिणाम होतो आहे हें तो पहात होता. रंगोपंताच्या चेहऱ्यावरून या वेळीं त्याच्या मनाची स्थिति द्विधा झाल्याप्रमाणें दिसत होती. जसा एखादा लंबक झोंका दिल्यामुळें इकडे उंच जातो, पुनः खालीं येतो, पुनः उंच जातो, तद्वत् त्याला होऊन गेलें होतें. एकदम त्यास असें वाटे, कीं या लेकाची मदत जर घेतली नाहीं, तर हा काय करील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं आणि घेतली तरी पुढ्यां काय करील

आणि काय नाहीं याचा नेम नाहीं! सापास धरलें तर डसेल, न धरलें तर दंश धरून काय केव्हां करील याचा नेम नाहीं. रंगोपंत लुच्चा नव्हता; आपण फार लुच्चे आणि आपण जें काम करतों तें सर्व अति शिताफीनें करतों असें त्यास वाटे इतकेंच. तो मूर्ख होता. पण तें त्याचें त्यास ठाऊक नव्हतें. या वेळीं आपणही एक खुबी करावी असें त्यास वाटून तो त्यास म्हणतो, " गुंडोपंत, आतां त्यांत काय राहिलं आहे ? तुमच्या हातांत कांहीं नाहीं आणखी माझ्याही हातांत नाहीं. उद्यां ती मंडळी आली म्हणजे मला हुसकावून लावतील तें मी पक्केपणीं जाणून आहें. तेव्हां तुम्ही आणखी मी मिळून तरी काय करणार ? मला हीच काळजी पडली आहे, कीं मी एकदां धडपणीं या त्रासांतून बाहेर पडतों कसा ! जें काय केलं गेलं तें माझं मला ठाऊक ! अहो, चिंतोपंतदादा आतां त्यांना सगळं देऊन टाकील यांत आश्चर्य काय ? आतां त्याला या जगांत दुसरं आपलं असं कोणीच राहिलं नाहीं. अर्थातच तो त्यांना देऊन टाकणार. मग आपलं दोघांचं संगनमत होऊन तरी उपयोग काय ? त्यापेक्षां नीटपणेंच आपण दूर झालं तर वावगं काय ? "

गुंडोपंतानें ताडलें, कीं हा आपल्याकडून मोठी लबाडी करून आपल्याला फसवायला पहातो आहे. परंतु आपण याला आपल्या मनाचा ठाव लागूं देऊं नये हेंच चांगलें. असा विचार करून गुंडोपंत त्यास म्हणतो, " रंगोपंत, हें तुमचं बोलणं अगदीं उगीच माझी परीक्षा पाहण्यासाठीं दिसत आहे. तुमच्या हातीं आणखी माझ्या हातीं कांहीं नाहीं ? सगळं कांहीं आहे. अहो, या पोरांना आणखी त्या बाईला फसवायलाहो किती उशीर ! तुमचं आमचं जुळलं पाहिजे. आपण निदान एवढं तरी करूं कीं, याच्यापुढें आपल्या दोघांवांचून कांहीं चालायचं नाहीं, असें तरी त्यांना भासवूं, इतकं झालं तरी पुरे, आणखी काय पाहिजे ! बोला, होतं आहे ! पण एक गोष्ट लक्षांत ठेवा, कीं तुम्हीं मला एकंदर काय व्यवस्था आहे ती समजावून सांगितली पाहिजे. माझ्यापासून जर कांहीं चोरून ठेवण्याचा यत्न कराल, तर अगदीं सुद्धां माझ्या कामीं पडणार नाहीं. मी लागलीच उलटेन. "

याप्रमाणें दोघांचें आणखी बराच वेळ अशाच प्रकारचें भाषण झालें. परंतु तें सगळें येथें देऊन वाचकांस विनाकारण कंटाळवीत नाहीं. त्या दोघांच्या एकमेकांस ठकविण्याच्या झटापटी चालल्या होत्या. होतां होतां रंगोपंत फसला. त्याच्या मनानें असें घेतलें, कीं गुंडोपंत आपल्यास साहाय्य करणार आणि त्याच्या साह्याबद्दल कांहीं तरी घेणार इतकेंच की नाहीं ? ठीक आहे. असा मनांत विचार करून त्यानें त्यास आपल्या बेतांत सामील करण्याचा विचार केला. काय करणार बिचारा ? दुसरे दिवशीं गुंडोपंत पुनः येऊन त्यानें त्यासंबंधाचें एकंदर बोलणें काढलें, त्यांत कोणाकोणाकडे कसकशा रकमा आहेत, आणि त्या कसकशा निघतील याबद्दल वाटाघाट झाली. कोणत्या व्यापारांत कोणत्या रकमा घातल्या आणि ते व्यापार बुडाल्यामुळें किती नुकसान झालें याचाही शोध निघाला. तेव्हां गुंडोपंतास एकंदरींत असें दिसून आलें कीं, दामोदरपंताच्या मूळ इस्टेटीपैकीं कांहीं फार गेलें असें नाहीं. कांहीं जमिनींचे वसूल वगैरे आणि कांहीं इनामगांव विकत घेतले होते त्यांचे वसूल

आजपर्यंतचे, त्याचप्रमाणें एक दोन सुपीक जमिनी गहाण टाकून काढलेल्या रकमा आणि चिंतोपंताजवळ जागा कर-करून घेऊन सरस्वतीबाईनें खूपखाबादे-कडून पाठविलेल्या रकमा, इतक्यांचाच काय तो व्यापारांत म्हणून फडशा उडा-लेला होता. बाकी बऱ्याच जमिनी शाबूत असून इमानगांवचे वसूलही सालोसाल येण्याजोगे होते. सुमारें ३०।४० हजा-रांचें आजपर्यंत नुकसान झालें होतें. तें जरी अजीबाद गेलें, त्यांतून कांहीं सुद्धां हातीं लागत नाहीं असें धरलें, तरी पुढें कांहीं मरण नव्हतें. दामोदरपंतांनीं इस्टेट कांहीं थोडीथोडकी मिळविलेली नव्हती. थोडेंबहुत देणें होतें तरी सुद्धां मनाला दिक्कत वाटण्याची कांहीं अवश्यकता नव्हती. गुंडोपंतानें याप्रमाणें सर्व इस्टे-टीची सूक्ष्म तऱ्हेनें माहिती मिळविली. आतां अधिक कांहीं कळवून घेण्याचें राहिलें नाहीं असें पक्कें समजलें, तेव्हां त्यानें त्यास हुसकावून देण्याचा विचार मनांत आणला.

चिंतोपंतानें आपण होऊन सर्व इस्टे-टीची मालकी सीतारामास दिल्याचें पत्र आल्यास इतके दिवस झाले, तरी सीता-राम किंवा त्याची आई इस्टेट ताब्यांत घेण्याचा कांहींच उपक्रम करीत नव्हती. किंबहुना त्यांनीं त्यासंबंधाची गोष्ट सुद्धां कधीं काढली नाहीं. गुंडोपंत आपण होऊनच सर्व व्यवस्था करी व त्यांस आज असें केलें, उद्यां तसें केलें, असें येऊन सांगे. परंतु त्यांच्याकडून, 'बरें तर आतां त्या रंगोपंताला हुस-कावून द्या,' असें निघेना. या गोष्टीचें गुंडोपंतास फारच आश्चर्य वाटलें. त्यानें एकदां दोनदां, "आतां लवकर जर त्या रंगोपंताला घालवून व्यवस्था लाविली नाहीं, तर तो काय करील आणि काय नाहीं ! तेव्हां मुकाट्यानं आपण आतां त्याच्या ताब्यांतून सर्व कांहीं कायदेशीर पद्धतीनं आपल्या स्वाधीन करून घ्यावं" असें सुचविलें. परंतु राधाबाईनें 'पाहूं आतां,' 'करूं आतां,' असें उत्तर दिलें. त्यांतलें इंगित काय आहे तें त्याच्या लक्षांत येईना. त्यानें विश्वनाथ-पंतासही विचारलें, परंतु तो धड सांगेना. सीतारामास विचारलें तरी तीच अवस्था. स्पष्ट कोणी बोलेना. तेव्हां हें गौडबंगाल आहे तरी काय ? प्रत्यक्ष सगळी इस्टेट, आतां नुसतें चिंतोपंताचें पत्र बाहेर काढून आपल्या ताब्यांत घ्यावयाची तर तेवढें सुद्धां होईना. त्याबद्दल यांना उतावळी असावयाची, परंतु नुसती उत्सु-कता सुद्धां नाहीं. तेव्हां याचा अर्थ काय ? रंगोपंतास हुसकावून देण्याबद्दल यांना पंचाईत, किंवा करूं कीं नको, असें कां वाटतें ? शेवटीं त्यानें एके दिवशीं विश्व-नाथपंतापुढें सर्व हकीकत मांडली आणि तावडतोब रंगोपंतास हुसकावून देण्याची अवश्यकता काय आहे ती दाखविली. विश्वनाथपंतानें तें सर्व ऐकून घेऊन त्यास म्हटलें, 'गुंडोपंत, त्यांनीं उपक्रम न करण्याला तसेंच कांहीं कारण आहे.' गुंडोपंत तें ऐकून आश्चर्यचकित झाला. काय तसेंच तें कारण असेल तें त्यास तर्कानें सुद्धां जाणतां येईना. त्यानें विश्वनाथपंतास विचारलें, परंतु त्यानें एवढेंच सांगितलें, कीं चिंतोपंतानें जरी तसें पत्र लिहिलें आहे, तरी रंगोपंत कोर्टा-पर्यंत मजल आणल्याखेरीज कांहीं राहणार नाहीं. आणि कोर्टांत जाण्याचा प्रसंग तर आपल्याला मुळींच नको. एवींतेवीं सगळी इस्टेट हातून गेलीच होती, ती आतां तरी नाहीं मिळाली म्हणून काय झालें ?

कोर्टात जाऊन भलतेन् सलते प्रश्न त्यानें विचारले ह्मणजे यांत काय शोभा राहिली? चिंतोपंताचें पत्र दाखविलें, कीं कांहीं केलें, तरी तो सुध्या मतानें जाणरा माणूस नाहीं. मीं त्यांना पुष्कळ सांगितलें, कीं तसें कांहीं त्याला करतां येणार नाहीं म्हणून. नुसता अर्ज करून ताबा आपले-कडे घ्यावयाचा. मी त्यांची समजूत घालतों आहें. तुह्मी त्या माणसाला चार गोष्टी सांगून तो मुकाट्यानें निवाला तर पहा. गुंडोपंतास तें शक्यसें वाटलें नाहीं आणि कोर्टापर्यंत जाण्याची अवश्यकता काय तीही पण समजेना. तथापि त्यानें तसें करण्याचें कबूल केलें आणि चिंतोपंताचें पत्र त्यानें मागून घेतलें. नंतर रंगोपंतास त्यानें बोलावून आणून सांगितलें, "रंगो-पंत, आपला सगळा बेत फसला. चिंतो-पंताचं त्यांना कधींच पत्र आलं आहे. आपण आतां त्यांच्याशीं गोडीगुलाबीनें वागूनच कांहीं झालं तर होणार, नाहीं तर कांहीं तोड दिसत नाहीं. मी तें पत्र पाहिलं. त्यांत त्यानं प्रथमतःच मीं रंगोपंताचं मुखत्यारपत्र रद्द केलं आहे, असं लिहून मग पुढं काय ल्याहायचं तें सगळं लिहिलं आहे. तर आतां कोर्ट-मार्फत त्यांनीं इलाज करण्याच्या पूर्वीच आपण त्यांच्या स्वाधीन सर्व कागदपत्र करावे तें चांगलं असं मला बरं दिसतं. तुह्मांला सगळी आजपर्यंतची माहिती, तेव्हां तुह्मांला मदतीला घेतल्यावांचून कांहीं सुद्धां त्यांना या घोटाळ्यांत सम-जणार नाहीं. मग काय हरकत आहे? त्यांच्या ताब्यांत जाऊन तरी काय उप-योग? त्यांचं मुखत्यारपत्र तुह्मांला देवव-ण्याची खटपट केली तर फार ठीक होणार आहे." रंगोपंतास पक्कें कळून चुकलें होतें, कीं आपल्यापासून सगळें हें जाणार खास. परंतु आपण होऊन देण्याचें त्याच्या जिवावर आलें. अर्थातच काय होईल तें होवो, पण आपण शेवटपर्यंत 'तडफड करून पहावयाची असा त्यानें निश्चय केला. गुंडोपंत त्याच्याशीं बोलत असतां त्याचे मनांत कांहीं विचार आला, आणि तो त्यास ह्मणतो, "चिंतोपंतदादांचं पत्र तरी काय आहे तें पाहूं या. एक-दम इतका त्याला जो पश्चात्ताप झाला. त्या भरांत त्यानं लिहिलं आहे तरी काय तें पाहूं!"

गुंडोपंतानें तें काढून वाचण्यास सुरु-वात केली. तें त्यानें मुकाट्यानें सार्यंत ऐकिलें आणि एकदम तो ह्मणतो, "ठीक आहे. या पत्राच्या जोरावर ते को-र्टांत जात नाहींत. त्याची तुह्मांला काळजी नको."

"तें कां? तुह्मांला असं कशावरून वाटतं? कां नाहीं जाणार?"

"कशावरून? कशावरून हें तुम्ही कां विचारतां? तुह्मी विचारतां हें आश्चर्य आहे."

"कां? आश्चर्य कसलं? मला तर त्यांत कांहीं विशेष वाटत नाहीं," गुंडोपंत मुद्दाम म्हणतो.

"या पत्रांत काय काय गोष्टी आहेत त्या नीट ध्यानांत आणा ह्मणजे तुमचं तुम्हालाच समजेल."

"मीं सगळ्या गोष्टी ध्यानांत आणल्या. पण मला कांहीं हरकत दिसत नाहीं."

"नाहीं दिसत? तुमच्यासारख्या चाणाक्ष माणसाला दिसत नाहीं हें खरंच नव्हे."

"खरोखरीच दिसत नाहीं. आतां आणखी त्यांत काय पाहिजे? सगळं स्पष्ट आहे."

"हो. हो. पण आणखी कित्येक गोष्टी स्पष्ट आहेत त्या आणा ध्यानांत. त्या कोर्टांत आणल्या तर चालतील का त्यांना ? बोला."

"पण त्या खोट्या असंच यांत आहे मग काय ? त्यानं स्वतः लिहिलं आहे ना त्या खोट्या म्हणून ?"

"तर मग एकूण त्यानें खोट्या गोष्टी, खोटे कागद केले असं कोर्टांत वाचून दाखविणार ही मंडळी ! तो नुसता तुरुंगांत पडला आहे तेवढ्यावरच नाहीं भागत ?"

गुंडोपंतानें आपल्या कांहीं लक्षांत आलें नाहीं असा बहाणा केला.

रंगोपंत त्याला त्यावर ह्मणतो, "अहो, त्या खोट्या गोष्टी काय त्या बाहेर आणण्याला सवड सांपडेलना ?"

"आणखी ती सवड तुम्ही घेणार ह्मणतां ? शाबास बोआ तुमची ! मी समजत होतों......"

"तुम्ही कांहीं समजा. पण मी आपला निश्चय कायम ठेवणार. एवीतेवी जाणार तर खास हें उघड आहे. मग चुथडा करून कां नाहीं मग दिलं ! इतके दिवस लपवून लपवून......"

गुंडोपंतास अतोनात संताप आला. आणि तो त्यांस म्हणतो, "मूर्खा, तुला वाटत असेल कीं तूंच मोठा शहाणा. पण तुझी अक्कल कुठपर्यंत ! माझं ऐकत नाहींस, तर तुझी धूळधाणच करून टाकणार. त्या कागदाच्यापेक्षांही वरताण माझ्याजवळ कागद आहे. तो पुढें आणला ह्मणजे तुझी काय स्थिति होईल तें पहा. नाहीं तर मुकाट्यानं मी सांगतों तें ऐक."

"काढ तुझा कागद ! तो कागद तुझ्याजवळ असेल तर काढशील तो केव्हांच......"

असें ह्मणत ह्मणत रंगोपंत हं त हंसत उठला आणि जातां जातां पुढें म्हणतो, "तो कागद तुझ्या त्या आतां वेड लागलेल्या यजमानणीनं कधींच......"

रंगोपंतास त्यानें पुढें बोलूं सुद्धां दिलें नाहीं. गुंडोपंत चटकन् उठला, पण तितक्यांत रंगोपंत तेथून 'यः पलायते स जीवति' असें म्हणून सूं पळाला.

---

# प्रकरण ६३ वें.

## अखेर आलीच !

हा काय म्हणतो याचा त्याला अर्थ समजेना. 'यजमानणीनं कागद केव्हांच......' ह्मणजे काय ? थोडा वेळ गेल्यानंतर त्यांच्या लक्षांत आलें कीं, सरस्वतीबाईनें तो कागद जाळला म्हणून हा आपल्याला सांगत असेल. आणि तें

मनांत येतांच त्यास एकदम हंसूं आलें. सरस्वतीबाईनें नवऱ्याला आग्रह करून किंवा फसवून त्यांच्या पश्चात् तो कागद जाळला असेल खरा, पण तो कागद अस्सल कोठें होता ? तो कागद अस्सल नव्हेच. ज्याप्रमाणें मूळ कागद होता, त्याचप्रमाणें हुबेहुब अक्षर काढून दुसरा एक कागद बनविण्यासाठीं चिंतोपंतानें गुंडोपंताची योजना केली. त्यानें अर्थातच कांहीं तरी विशेष लालूच वाटून तें करण्याचें कबूल केलें, आणि मूळ कागदही त्यास सही व लिहिलेल्या अक्षराची हुबेहुब नक्कल साधावी म्हणून त्यानें मागून घेतला होता तो ( ? ) नव्या यजमानांच्याकडे परत केला. नवे यजमान खुष झाले, परंतु हा दिवसानुदिवस बारीसारीक गोष्टींत तर काय परंतु एकंदरींतच आपला ऐटा मिरवून सगळ्यांना कस्पटासमान लेखूं लागला. शिवाय जेव्हां तेव्हां याचें भय बाळगण्याला कारण होऊं लागलें, तेव्हां सरूबाई व चिंतोपंत यांनीं त्याची मनधरणी कशी चालविली आणि त्याच्यापासून तो कागद काढून घेण्यास कसकशा युक्त्या केल्या वगैरे प्रकार मागें आलेच आहेत. एकदां तो बनावट कागदाबरोबरच अस्सलही दिला असें म्हणे. आणि त्यानें खरोखरीच एक अस्सल म्हणून कागद त्याच्या स्वाधीन केलाही. परंतु लागलीच पुढें असेंही झालें, कीं तो कागद त्याच्या हस्तगत झाला असें त्यांस पूर्णपणें वाटलें तरी सुद्धां त्याची गुर्मी म्हणून कांहीं कमी होईना. तो वाटेल तसल्या गुर्म्या सांगत असे, यामुळें जसें कांहीं तरी एखादें शस्त्र डोक्यावर लोंबत आहे असें त्यांस नेहमीं वाटत असे. तें कोण्या वेळीं डोक्यावर पडेल आणि नाहीं याचा काय नेम ! पुष्कळ वेळां त्यांस वाटे, कीं आपणांस कांहीं तरी रिकामी भीति वाटावी असें मनांत आणून हा कांहीं बोलत असावा. वास्तविक भीति वाटण्यासारखें कांहीं आतां त्याच्याजवळ नसावें. कित्येक अर्धवटांना भूतयोनि नाहीं असें वाटतें, परंतु अमुक ठिकाणीं भूत आहे तें दाखवितों चला असें म्हटलें म्हणजे कोठें जाण्याची तर छाती होत नाहीं. वाटतें कीं, न जागों, आपण नाहीं म्हणतों, पण असलें भूत तर उगीच विषाची परीक्षा नको. त्याचप्रमाणें या दोघां नवराबायकोचें गुंडोपंताविषयीं मत झालें होतें. त्यांनीं एकदां दोनदां त्याच्यापासून अस्सल कागद म्हणून घेतले आणि त्यानेंही दिले, परंतु अजून खरा कागद आपल्याला मिळालाच असें त्यांना वाटेना. शेवटीं निदान त्यांना एवढ्याबद्दल तरी खात्री होती, कीं या गुलामाची ज्या कागदाबद्दल एवढी खटपट चालली होती, तो कागद तरी बाहेर काढणें, किंवा खोटा कागद आपण बनवून दिला असें कोर्टांत सांगणें, इत्यादि गुलामाला स्वतःला नाशकारकच आहे. तेव्हां तो तसल्या गोष्टी बोलणारच नाहीं. असें वाटून त्यांनीं त्यास धुडकावून लावून दिलें, आणि त्यांचें मन त्यांस खातच होतें, कीं आपण याच्या धाकदपटशाला भितों हें बरें नव्हे. अशा स्थितींत गुंडोपंत शेवटीं खाखाबादेहून परत येऊन त्यानें कोणचा उपक्रम केला, व तो उपक्रम करतां करतां आणि राधाबाईकडे वारंवार जातां जातां त्याचें स्वतःचें मन कसें फिरलें, वगैरे गोष्टी आतां वाचकांस नव्यानें सांगावयास नकोत. आतां तर गुंडोपंतास असें वाटलें, कीं आपण आपलें शेवटलें महत्कृत्य करावें. अजूनपर्यंत जी कांहीं त्यास

काचकूच केवळ कांहीं लोभामुळें वाटत होती, ती सर्व आतां गेली, आणि आपल्या जवळचा अस्सल कागद काढण्याचा त्यानें विचार केला. चिंतोपंताच्या सांगीवरून त्यानें बनावट कागद केला, त्या वेळीं मूळ कागद आपल्यास पहावयास पाहिजे, याखेरीज बनावट कागद करतां येणार नाहीं, असें म्हणून त्यानें तो अस्सल कागद मागून घेतला होता व परत देतांना अस्सल म्हणून त्यानें एक बनावट नक्कलच आपल्या नव्या यजमानाजवळ दिली. शिवाय त्यानें यजमानाच्या सांगीप्रमाणें बनावट मृत्युपत्र तयार करून दिलें तें दिलेंच. पुन: एकदां त्यानें धाक दाखविल्यावरून त्या दोघां नवराबायकोनीं त्याची खुशामत करून त्यास आपल्या तावडींत धरलें. तेव्हां पुन: एकदां एक बनावट नक्कल त्यांच्या स्वाधीन त्यानें केली, आणि हेंच तें मूळचें मृत्युपत्र, असें शपथ वाहून सांगितलें. असा त्यानें खेळ चालविला. कित्येकवेळां त्याच्या मनाला त्यांच्या बोलण्याचालण्याचा त्वेष येऊन त्यानें अस्सल या मुलांच्या स्वाधीन करण्याचा विचार मनांत आणला; परंतु ज्याप्रमाणें कृपणास आपल्या द्रव्याची ऊब सुटत नाहीं, तो आज आज उद्यां उद्यां करीत नुसतें मोजीत राहतो, आणि पाहून आनंद पावतो, त्याप्रमाणेंच त्याचें होऊं लागलें. आज रंगोपंतानें जेव्हां हंसत हंसत त्याची टर उडविण्याचा प्रयत्न मांडला, तेव्हां मात्र त्याला संताप आला आणि त्यानें आजच्या आज तें मूळ मृत्युपत्र त्या विश्वनाथपंताच्या स्वाधीन करावें असा निश्चय केला, आणि त्याप्रमाणें तो कागद शोधूं लागला! परंतु आश्चर्याची गोष्ट! त्याच्या त्या दप्तरांत याला तो कागद कांहीं केल्या सांपडेना!

गुंडोपंताच्या मनांत अस्सल कागद विश्वनाथपंताकडे द्यावा आणि आपलें शेवटलें सत्कृत्य करावें असें आलें, तेंच दिवशीं रंगोपंताच्या नव्हे, चिंतोपंताच्या घरीं एक चमत्कार झाला. सरस्वतीबाईचा वेडा दीर नेहमीं नेहमीं त्या आपल्या जुन्या घरीं जात असे हें वाचकांस मागें ठाऊकच आहे. एकंदर स्थितींत कितीही परिवर्त झाले, तरी त्याचें आपलें तें वेड कायम होतेंच.

सरस्वतीबाई वेडी झाल्या दिवसानंतर तो पहिल्यानें गेला, तेव्हां तिनें पूर्वीप्रमाणें त्याला हिडिस फिडिस केलें नाहीं किंवा शिव्या दिल्या नाहींत. उलट ती ज्याला त्याला " बाळ्या, चेंड्या बाळ, मीं दळलेल्या कळकीच्या कारे पानग्या ? " असें बडबडून धरी व कवटाळी. त्यामुळें त्याला मौज वाटे. यामुळें तो वारंवार तिकडे जाई आणि तिच्याजवळ बसे. सरस्वतीबाई इकडे तिकडे वावरे, फेऱ्या घाली, हें हुसक तें हुसक, असें करी आणि त्याला पुन्हा कवटाळी. त्याला त्याची फार गम्मत वाटे आणि तोही तिच्याशीं कांहीं बोलण्याचा प्रयत्न करी. त्याच्या त्या बोबड्या बोलण्यानें तिला आपल्या पोराची आठवण होई कीं काय कोण जाणे! एके दिवशीं तीं दोघें वर सांगितल्याप्रमाणें घरांत इकडे तिकडे करीत असतां तिनें सहज एका लहानशा कोनाड्याच्या वरच्या बाजूस खपरेलाच्या तेथें हात घातला आणि तेथून एक कागद काढला. हा कागद पहातां क्षणींच तिला कांहीं स्मरण झालें कीं काय कोण, जाणे. परंतु तितक्यांत तो कागद पाहून हा वेडा कांहीं बडबडला. त्याबरोबर तिनें त्याला ' बाळ, चेंड्या, ' करून

कवटाळलें आणि त्याचा ती मुका घेऊं लागली. वेड्यानेंही तो कागद पाहतांक्षणींच त्याला कांहीं तरी पूर्वीची आठवण झाली असावी असें वाटलें. तशाच प्रकारचा एक कागद त्यानें कधीं आपल्या दादाजवळ दिला होता म्हणून, कीं कांहीं कागद किंवा चिटोरें सांपडलें, कीं दादाजवळ नेऊन द्यायचें असा आज कित्येक वर्षे त्याचा क्रम असे म्हणून, काय असेल तें असो, तो कागद पहातांच झट्‌कन् तो घेऊन त्यानें धूम ठोकली आणि तो धांवत "आई ! दादा !" करीत थेट सीतारामाकडे आला. त्यानें असे कांहीं तरी कागद आणून दिल्याचा पहिलाच प्रसंग नसल्यामुळें दादानें नेहमींप्रमाणें त्याला केवळ खुष करण्यासाठीं त्याच्या हातून तो कागद घेतला आणि "कुठून आणलास, कोणाचा कामाबिमाचा नाहींना आणलास ?" असें ह्मणून आपल्याजवळ ठेवला, इतक्यांत गुंडोपंत तेथें येण्याला गांठ पडली. त्यानें नुकताच आपल्या त्या कागदाचा शोध करून तो सांपडत नाहीं ह्मणून निराश होऊन त्या अस्सल कागदांतील मजकूर तरी आतां आपण आपल्या तोंडानें सांगावा म्हणून तो आला होता. त्याला वाटलें, चिंतोपंतानें सर्व इस्टेट सीतारामाच्या स्वाधीन केली तरी सुद्धां जेव्हां तो अजून हक्क सांगून ती घेऊं इच्छीत नाहीं असें दिसतें, त्याअर्थी त्याला अजून कांहीं तरी शंका असावी. ती शंका आपण आतां दूर करावी. मूळच्या मृत्युपत्रांत काय मजकूर होता तें नुसतें सांगावें तरी, म्हणजे त्याला आपण आतां इस्टेट आपल्या ताब्यांत घेणें हें केवळ धर्माचें नव्हे, तर आहे असें वाटेल. आपल्या बापाच्या मनांत आपल्याविषयीं किंतू असून आतां भाऊ तुरुंगांत पडला, त्याचा मुलगा मेला, आणि भावजय वेडी झाली म्हणूनच आपण इस्टेट गोळा करतों आहोंत, असें वाटून मन कचरत आहे. आपण खऱ्या मृत्युपत्रांतला खरा मजकूर सांगून दिला म्हणजे तशी कांहीं शंका तरी निदान त्याच्या मनांत राहणार नाहीं, आणि आपण स्पष्टपणें आपला सगळा लोभिष्टपणा व त्यामुळें आपण केलेले प्रकार बोलून दाखविले, ह्मणजे आपल्याही मनाला सत्य बोलल्याचें व योग्यास योग्य तें दिल्याचें समाधान होईल. प्रत्यक्ष कागद केव्हां तरी त्या अवदसेनें कांहीं तरी युक्ति करून आपल्यापासून उपटून नेला, असें त्याचें मन त्यास सांगूं लागलें, आणि तों जों जों तो कागद तिच्या हातीं गेला असावा कसा याबद्दल विचार करूं लागे, तों तों त्याला असें वाटे, कीं तिनें आतां आतांशा आपल्याशीं उद्दामपणाचें जें वर्तन केलें त्याच्या मुळाशीं हा कागदच असावा. असो, आपण तो कागद जरी दिला नाहीं, तरी त्यांत काय आहे तें स्पष्टपणें सांगूं शकूं, असा विचार करून तो वर सांगितल्याप्रमाणें सीतारामाकडे आला; आणि त्याला इत्थंभूत हकीकत सांगण्यास त्यानें आरंभ केला. आतांशा तो सीतारामाविषयीं फार प्रेम आणि भक्ति दाखवी, यामुळें सीतारामही संथपणें त्याचें बोलणें ऐकून घ्यावयाचें म्हणून लक्ष्य लावून बसला. तेव्हां गुंडोपंत त्यास अगदीं मन मोकळें करून ह्मणतो, "थोरल्या यजमानांनीं आपल्या पश्चात् जी व्यवस्था करून ठेविली, ती कांहीं निराळीच. असें मी आजपर्यंत पुष्कळदां तुह्मांला सांगत आलों, आणखी ती काय तें सिद्ध करून

दाखवायला माझ्याजवळ पुरावा आहे असंही पण सुचवलं. पण तें सुचविण्यांत मुळाशीं लोभ होता. आतां तो थोडाबहुत लोभही गेला. आतां माझं मन मी तुझाला अगदीं मोकळं करून सांगतों. पण पुरावा मात्र केव्हां माझ्यापासून नाहींसा झाला आणखी कसा नाहींसा झाला तें कांहीं सांगतां येत नाहीं. थोरल्या यजमानांनीं आपल्या सगळ्या इस्टेटीचे मालक तुम्ही म्हणून लिहून ठेवलं होतं. त्यांची सगळी संपत्ति केवळ त्यांनीं स्वतः मिळविलेली होती. वडिलोपार्जित म्हणायला एक तनसडीसुद्धां नव्हती. तेव्हां त्यांनीं मनांत आणल्याप्रमाणं सगळं कांहीं त्यांना करतां आलं. त्यांनीं मलाच बोलावून माझ्या देखतच माझ्याकडून आपलं मृत्युपत्र लिहविलं. त्यांत थोरल्या सुनेच्या अंगावरचे दागिने सुनेला आणि तीन हजार रुपये रोख चिंतोपंताला व त्याच्या मुलाला दिले. बाकी कशावरही हक्क त्यांचा नाहीं. घरांतील सुतळीचा तोडासुद्धां घेईन म्हटलं तर त्यांचा अधिकार नाहीं. असं स्पष्ट करून ठेवलं होतं. आणखी असं करायचीं कारणं लिहितांना त्याच्या बायकोचा व त्याचा स्वतःचा दुष्ट स्वभाव आपल्यास आवडत नाहीं, त्यांच्यावर विश्वास ठेवून त्यांच्या स्वाधीन सगळा ऐवज केला, तर आपल्या तिसऱ्या बायकोला आणखी तिच्या मुलांना अन्नान्न करायला लावायला सुद्धां कमी करणार नाहींत, असं स्पष्ट लिहिलं होतं. ते वारले तेव्हां त्यांना काय वाटलं कोणाला ठाऊक ? त्यांना कोणीकडून आणखी काय बुद्धि झाली, कीं त्यांनीं त्याला बोलावून आणून त्याच्या स्वाधीनच तें वुईल केलं. नशिबाची गोष्ट. त्यांत मी आणखी तिथें नव्हतों. मी जर असतों, तर तो शेवटला देखावा पाहतांना यजमानसाहेबांना सांगितलं असतं, कीं कांहीं करा, पण तें अस्सल वुईल त्यांच्या स्वाधीन करूं नका. पण होणार गोष्टी त्या झाल्या. मी नव्हतों. त्यांनीं तें वुईल त्यांच्या स्वाधीन काय हेतूनं केलं असेल कोणाला ठाऊक ! का त्यांना शेवटीं अंमळ पश्चात्ताप होऊन आपल्या मुलाबद्दल आपण असं कशाला लिहून ठेवलं असं वाटलं, आणखी त्याच्याच स्वाधीन करून त्याला मोठेपणा दिला ह्मणजे कांहीं तरी ठीक होईल असं वाटलं, कांहीं सांगवत नाहीं. पण झाल्या त्या गोष्टी अशा झाल्या. त्याच्या ताब्यांत जें वुईल पहिल्यानं गेलं तें त्यानं अर्थातच वाचून पाहिलं, आणखी त्याच्या अंगाचा तिळपापड झाला. मला यांनीं कांहीं ठेवलं नाहीं, माझी आणखी माझ्या बायकोची निंदा केली आहे. त्या आणखी तिसऱ्या बायकोच्या पोरट्यांना सगळं देऊन त्यांतल्या थोरल्या पोरानं विलायतेस जाऊन बॅरिस्टर किंवा सिव्हिल सर्वंट होऊन यावं असं लिहिलं आहे, याचा त्याला अतिशय संताप आला. इतका, कीं काय करूं आणखी काय न करूं असं त्याला होऊन गेलं. त्यानं तें वुईल कितीदां तरी वाचलं आणखी तसाच एक दिवस वाचून पहात असतां त्याच्या बायकोनं—त्या सरस्वतीबाईनं—पाहिलं. त्याला तें काय आहे तें आपल्याला सांगितलं पाहिजे म्हणून तिनें अतोनात आग्रह केला. त्यानंतर तिला तें साद्यंत वाचून दाखवलं. आणि मग तिच्या अंगाचा जो तिळपापड उडाला आहे तो सांगतांच येत नाहीं. तिनं नुसता थयमान् करून सोडला. शेवटीं तें वुईल दाबून ठेवून खोटंच एक वुईल करायचं असं ठरवलं. दोघांनीं एकांतांत त्यांतला मजकूर ठर-

विला, आणखी आपल्या हातानं एक मसुदा स्वतः चिंतोपंतानं तयार केला. पण तो लिहावा कोणी ? स्वतः लिहितां उपयोगी नाहीं; कारण आपलं अक्षर तेव्हांच कोणी ओळखील. शिवाय वुईल जरी लिहिलं, तरी पण सही कशी हुबेहुब करतां येणार ? तेव्हां त्यांना मी आठवलों; आणखी मला त्यांनीं नानाप्रकारांनीं बोलावणीं पाठवून आणखी प्रत्यक्ष वुइलांत ज्या गोष्टी नाहींत अशा सुद्धां त्यांनीं मला सांगितल्या. त्या सांगितल्या त्या मोठ्या तिखटमीठ लावून ही गोष्ट खरी, पण तेवढ्यानं मीं भलतंच कांहीं मनांत आणून तुमच्याबद्दल वैर धरलं नसतं, पण त्यांनीं नानाप्रकारचे लोभलुचपती दाखवून कसंही करून दुसरं वुईल करून दे, मी तुला बरोबरीनं वागवीन, बरोबरीनं वांटणी देइन म्हणून आणाशपथा वाहिल्या. दोघांनीं माझ्या अशा विनवण्या केल्या, कीं मला ना म्हणवेचना. पण त्यानं केलेला मसुदा जेव्हां मला वाचून दाखविला, तेव्हां मला—मला या असल्या लोभ्याला सुद्धां अगदीं तिटकारा आला, आणखी मी एकदम ' छे. छे. छे. असलं वुईल मी कांहीं लिहिणार नाहीं ' म्हणून निक्षून सांगितलं. पण ते कुठें माझं ऐकताहेत ? त्यांनीं अगदीं त्या घटकेला मला एक हजार रुपये देऊं केले, नव्हे तावडतोब त्यांनीं एक हजाराची नोट माझ्या स्वाधीन केली. रुपये पाहिले आणखी माझा तिटकारा कोणीकडेच गेला. माझ्या तोंडाला पाणी सुटलं. आणखी मी त्याप्रमाणं बनावट वुईल करून देतों म्हणून सांगितलं; पण त्यांतला कांहीं वाईट भाग होता तो काढून टाकण्याबद्दल आग्रह धरला, तरी तो ऐकेना. त्याचा हेतु निराळाच होता. वाईट भाग घातलाच पाहिजे. ह्मणजे तो भरकोर्टांत वाचला जाऊन त्याच्याबद्दल चर्चा होईल या भीतीनं तुह्मी कोर्टांत भांडायला येणार नाहीं. आणखी सगळं वुइल अगदीं मुकाट्यानं पचेल हा हेतु त्यांनीं मला तेव्हां सांगितला नाहीं, पण पुढें मला कळला. त्यांत लिहिलेल्या गोष्टी इतक्या वाईट होत्या, कीं खरोखरी त्या तितक्या वाईट म्हणूनच तुम्ही कोर्टांत गेलां नाहीं कीं जर गेलां तर छीःथूःच झाली असती. पण तुह्मी देवमाणसं, तुह्मी त्या सगळ्या इस्टेटीवर पाणी सोडलंत. पण भांडायला पुढें आलां नाहींत. त्याचा हेतु साधला. तो आपला हेतु साधील, पण मला धाब्यावर बसवील हें मी पहिल्यापासून जाणूनच होतों. आणखी तेवढ्याकरितां त्यांची कांहीं तरी शेंडी हातांत पाहिजे ह्मणून मींहि पण युक्ति केली. मूळ कागद—मूळ वुईल—माझ्या नजरेसमोर असल्यावांचून नवीन तयार होणार नाहीं असा बहाणा करून तें मागून घेतलं आणखी परत करतांना बनावट वुईल अन् मूळच्या वुइलाची बनावटच नक्कल त्यांच्या स्वाधीन केली. त्याच्या लक्ष्यांत आलं नाहीं. त्यांनीं बनावट वुईल तुमच्या आजाला दाखविलं. आणखी मूळ वुइलाची मी केलेली बनावट नक्कल अस्सल समजून जाळून टाकली कीं काय कोण जाणें ! थोडे दिवससुद्धां जाऊं दिले नाहींत, मला लागलीच त्यांनीं गांवीं लावून दिलं आणखी पुढें मी जेव्हां मला पैसे मिळाले पाहिजेत म्हणून मागणी करूं लागलों, तेव्हां तो मला उडवूं लागला. मीं कांहीं दिवस वाट पाहिली; आणखी वुइलाची—खऱ्या वुइलाची—स्थिति काय होती, ती त्यांना कळवून

सगळं कृष्णकारस्थान बाहेर आणतों, आणखी तुम्हांला जाऊन मिळतों म्हणून धाक घातला. तेव्हां नाहीं होय करतां करतां त्यांनीं मला जवळ बोलाविलं आणखी संस्थानांत जागा देतों, पुष्कळ पैसे मिळवून देतों म्हणून आशा दाखविली. मी गेलों. थोडेच दिवसांत पुनः त्यांनीं मला स्पष्ट सांगितलं, कीं " तूं किती गमजा केल्यास तरी तुझ्या हातून कांहीं व्हायचं नाहीं. आधीं तूं बनावट कागद करून मला दिलास याबद्दल तुला शिक्षा होईल. मग मीं तुझ्याकडून तो करविला म्हणून मला होईल. तूं सुटशील असं स्वप्नांत सुद्धां आणूं नकोस. तुला कदाचित् तसं वाटत असेल म्हणून सांगतों. "

" मी आपल्याकडून त्यांच्या धमकावणीला भितों असं दाखविलं नाहीं. पण भ्यालों यांत नवल नाहीं. त्यांना खूप सांगितलं कीं, ' मी मुळींच भीत नाहीं. मी गेलों तुरुंगांत तर जाईन, पण तुम्हांला सुद्धां नेईन, एवढंच मला समाधान पुरे आहे. ' त्यांना जरी असं म्हटलं, तरी आपल्याच हातानं आपल्याच पायावर धोंडा कोणी कधीं घेईल ? नुसत्या दबकावण्या त्यांना दाखवून पाहिल्या. पण तो, आणखी त्याच्याही पेक्षां ती कसली वस्ताद ! तिनं माझा नुसता छळ आरंभला. शेवटीं मला तें घर सोडून यावं लागलं. पैशाच्या लोभानं तुमच्याशीं आणखी रंगोपंताशीं संधानं जुळलीं तर पाहूं लागलों. पण तीं तरी कुठलीं जुळतात ! तुम्हांला कशाची जरूर नाहीं. त्याला बहिणीचा जोर. त्यानं नुसतंच ' होय होय ' म्हणून तोंडाला पानं पुसलीन्. "

गुंडोपंतानें येथपर्यंत आपली हकीकत सांगून तो जरा थांबला. सीताराम अगदीं स्वस्थपणानें त्याचें बोलणें ऐकून घेत होता. तो थांबल्यानंतर फक्त त्यानें त्यास विचारलें, " काय ? त्या खऱ्या मृत्युपत्रांत मी इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर किंवा सिव्हिल सर्वंट होऊन यावं असं होतं ? " बाकी सगळा मजकूर टाकून त्या मृत्युपत्रांतून एवढीच गोष्ट सीतारामानें विचारली, हें पाहून गुंडोपंतास फार आश्चर्य वाटलें. प्रश्न विचारले तर ते इस्टेटीसंबंधानें आपल्याला काय दिलें, आपल्या बहिणीला काय दिलें वगैरे असावयाचे, ते नसून हा प्रश्न ऐकून तो आश्चर्यानें म्हणतो, " हो पण हेंचसं तुम्ही विचारतां ? त्यांत लिहिलं होतं, कीं तुमची बुद्धि फार चांगली आहे, तेव्हां तुम्हीं विलायतेला जाऊन बॅरिस्टर किंवा सिव्हिल सर्व्हंट होऊन यावं. त्याच्याकरितां खर्च किती होईल आणखी कसा करावा हें सुद्धां त्यांत लिहिलं होतं. "

इतकें बोलतो आहे तों गुंडोपंताची दृष्टि त्या वेड्यानें आणलेल्या कागदावर गेली, आणि तो एकदम आश्चर्यानें चकित होऊन उठून उभा राहून म्हणतो, " अं ? हा कागद इथें कुठून आला ? कसा आला ? "

# प्रकरण ६४ वें.

## खरें व खोटें.

गुंडोपंतानें तो कागद पाहतांच असे उद्गार काढलेले कानीं पडले, तेव्हां सीतारामाचेंही लक्ष्य त्या कागदाकडे गेलें. आतांपर्यंत त्या कागदाकडे त्याचें लक्ष्यही गेलें नव्हतें. वेड्यानें आणून दिलेला कागद, त्याच्याकडे इतकें लक्ष्य कोण देतो ? परंतु गुंडोपंतानें तो कागद उचलून पाहिला आणि एकदम म्हटलें, "हाच हाच तो कागद ! हेंच हेंच तें बुईल. बाचा. हा कागद तुमच्या हातीं लागला असून आजपर्यंत तुम्ही स्वस्थ बसलां ? धन्य धन्य तुमची ! पण हा तुमच्या हातीं कसा लागला ? हा माझ्या दप्तरांतून गेला असेल अशी कल्पनासुद्धां मनांत नव्हती. तो माझ्याजवळ आहेच असें समजून मी आपला अगदीं स्वस्थ होतों. कित्येक वेळां मला तो पुनः वाचावासं वाटे, परंतु मी तो कोणाच्या दृष्टीस पडेल असं वाटून उघडला नाहीं—बाहेर काढला नाहीं. हा गेला कसा ? माझ्या जिवाचा आधार असा हा कागद तुमच्याकडे आला कसा ? माझ्यापासून जाऊन तुमच्याच हातीं यावा ! आणखी तो आजच माझ्या नजरेस पडावा ! हें अतिशय आश्चर्य आहे. वाचा. वाचा. मी सांगतों तें खरं कां खोटं पहा ! मी आतां तुमच्याशीं लबाडी करणार नाहीं. तुमच्या हातीं तो कसाही आला असो; पण तोच कागद तुमच्या वडिलांचं खरं बुईल. मी अगदीं वाटेल तिथें शपथ वाहून सांगेन. तुम्हाला भ्रांति नको ! "

गुंडोपंतानें इतकें आतुरतेनें व निक्षून सांगितल्यानंतर सीतारामानें तो कागद उलगडून पाहिला. तो खरोखरीच गुंडोपंत म्हणतो त्याप्रमाणें तें बुईल होतें. तें सीतारामानें वाचण्यास प्रारंभ केला. आणि वाचतां वाचतां तो मध्यावर आला, तेव्हां त्याच्या डोळ्यांत एकदम अश्रु उभे राहिले ! गुंडोपंतानें जें सांगितलें तें अगदीं अक्षरशः त्यांत होतें. फक्त चिंतोपंतास जें काय ठेविलें होतें, त्याबद्दल गुंडोपंताच्या सांगण्यांत व बुइलांतील रकमेंत फरक दिसला. त्यांत सीतारामाच्या आईची स्तुति केली असून तिला अज्ञान मुलांचीं पालक म्हणून नेमून चिंतोपंतास दिलेल्या रकमेशिवाय व घराशिवाय सर्व कांहीं तिच्या स्वाधीन असावें आणि सीताराम, सखाराम वगैरे मुलें मोठीं होईपर्यंत सर्व बाबतींत ती पूर्ण मुखत्यार असावी असें स्पष्ट म्हटलें होतें. मुलांच्या शिक्षणाची देखरेख कशी करावी आणि कोणीं करावी तेंही लिहिलें होतें. इतकेंच नव्हे तर एका ठिकाणीं शेवटीं असेंही म्हटलें होतें, कीं मुलें चांगलीं शिकलींसवरलीं तर ठीकच. तीं शिकतील, चांगलीं निपजतील, आपल्या आईला दुःख देणार नाहींत याबद्दल संशयही नाहीं, परंतु यदाकदाचित् तीं

तशीं न निपजलीं, तर तीं वयांत येऊन स्वतंत्रपणा इच्छूं लागतांच रुपये ५० प्रमाणें तिला मिळतील इतकी मिळकत तोडून बाकीचें मुलांचे स्वाधीन करावें. त्याचप्रमाणें मुलांचे शिक्षणासंबंधानें लिहितांना असें लिहिलें होतें, कीं माझ्या थोरल्या मुलाचें शिक्षण तितपतच झालें आणि तें तितपत तरी झालें हेंच आश्चर्य करण्याजोगें आहे. परंतु सीतारामाची बुद्धि चांगली दिसते. त्यानें विद्या जितकी करणें असेल तितकी करावी. त्याला विलायतेस पाठवून बॅरिस्टर किंवा सिव्हिल सर्व्हंट करून आणण्याचें माझ्या मनांत आहे. मी जगलों तर त्याप्रमाणें करीनच, परंतु न जगलों, तर त्याच्या आईनें त्यास त्या कामीं अडथळा करूं नये. तो मुलगा कोठेंही गेला, तरी न बिघडतां उत्तम विद्या संपादन करून येईल अशी माझी मनोदेवता सांगते. आम्ही सरकारी नौकरींत दहा रुपयांपासून वाढत जाऊन कष्ट केले तसें करण्याची त्याला जरूरी नाहीं. त्यानें अज्ञानी राहून मीं ठेविलेल्या पैशांत सावकारी करीत बसावें हें माझ्या मनाला बरें वाटत नाहीं. याउपर जशी त्याला बुद्धि होईल तें खरें !

आईची स्तुति जेथें केली होती तो भाग व हा याच्या शिक्षणाचा भाग वाचतां वाचतां त्याच्या डोळ्यांत प्रेमाश्रु आले, आणि वर पहावेन. फेअरब्रेनसाहेबांनीं त्यास, इंग्लंडांत जाण्याविषयींची व्यवस्था करतों असें म्हटलें असतां त्यानें रुकार दिला नाहीं आणि तें कसें तरी टाळलें, परंतु तेव्हांपासून त्याच्या मनांत ती महत्त्वाकांक्षा जागृत होती. केवळ दुसऱ्याच्या पैशावर आपण जाऊं नये आणि त्यांनून त्यांचे उपकार आपल्यास फेडतां येणार नाहींत अशांचे उपकार करून घेऊंही नयेत, अशा किंवा आपण न जातां फेअरब्रेनसाहेबांची तीच मदत आपल्या लहान भावाच्या शिक्षणाच्या वेळीं आपण येथल्या येथें संसार चालविण्याजोगे झाल्यानंतर घ्यावी अशा विचारानें त्यानें फेअरब्रेनसाहेबांनीं ती देऊं केलेली मदत नाकारल्याप्रमाणें केलें होतें. हें वुईल वाचतांच आतां तसें कांहीं करण्याचें कारण उरलें नाहीं. आतां दुसऱ्याचा पैसा आपल्यास घ्यावा लागणार नाहीं, इत्यादि विचार मनांत येऊन त्यास फार आनंद झाला. त्याचें वाचन चाललें असतां त्याच्या चेहऱ्याकडे गुंडोपंताची दृष्टि होती, आणि त्यालाही त्या चेहऱ्यावर क्षणोक्षणीं येणाऱ्या विकारछाया पाहून फार आनंद झाला. कचित् त्याच्या मनांत असेंही आलें असेल, कीं आपण हें मृत्युपत्र संभाळून ठेविलें म्हणूनच बरें झालें.

तें मृत्युपत्र वाचल्यानंतर बराच वेळपर्यंत सीताराम स्वस्थ बसला होता. न जाणों, हें खरें मृत्युपत्र वाचल्यानंतर आणि आपल्या भावानें सर्व इस्टेट आपल्या ताब्यांत मिळावी ह्मणून तें खोटें बनविलेलें मृत्युपत्र ( तें प्रत्यक्ष त्यानें कधीं वाचलें नव्हतें, परंतु त्यांतील सर्व मजकूर त्याला पूर्णपणें माहीत झाला होता. ) यांतील मजकुराचा विरोध साहजिकपणेंच त्याच्या मनांत उभा राहिला, आणि कांहीं खेद, कांहीं आश्चर्य व आतां कांहीं आनंद या तीन विकारांच्या छायांनीं प्रथमतः एका मागून एक व नंतर एकदम त्याच्या चेहऱ्यावर आपला अंमल दाखविला. हा कागद त्या वेड्यानें आतां थोड्या वेळे पूर्वींच आपल्याजवळ आणून दिला आणि तो बहुतकरून त्यानें त्या घरून आणला असें सांगितलें. परंतु त्याला विचारून समजण्याजोगें तो कांहीं सांगेल हें संभ

नीयच नव्हतें. इतक्यांत गुंडोपंतास रंगोपंताचे—त्याची व ह्याची शेवटली भेट गुंडोपंताच्या घरीं झाली तेव्हांचे—कांहीं शब्द आठवले. आणि एकदम त्याला वाटलें,कीं तो कागद आपल्या यजमानणीच्या-सरस्वतीबाईच्या-हातीं लागला असावा किंवा रंगोपंत मागें आपल्याकडे वारंवार येत असे तेव्हां केव्हां तरी त्याच्या हातीं लागला असावा. त्यानें कांहीं तरी गफलत करून तो उपटून नेला असावा आणि आपल्या बहिणीजवळ दिला असावा आणि तिनें तो कोठें तरी ठेविला असावा. कांहीं तरी असें झालें असावें. आपण इतके वस्ताद असे आपल्याला समजतों, पण शेवटीं आपल्याही हातून तो कागद दुसऱ्यानें—बहुतकरून रंगोपंतानें—काढून घेनला हें मनांत येऊन गुंडोपंतास फार वाईट वाटलें असेल यांत नवल काय ? तथापि त्याची वृत्ति आतां अगदीं बदलली होती. कितीही झालें तरी खऱ्याचा जय होतोच होतो असें त्याच्या मनांत वाटूं लागलें होतें. आणि इतका काळ गेला, इतक्या उलाढाली झाल्या, तरी शेवटीं तें खरें मृत्युपत्र ज्याचें त्याच्या हातीं येऊन ज्याची इस्टेट त्यास मिळणार, हें पाहूनच त्यास आनंद झाला. वेडीपासून आणि वेड्यानें तो कागद आणला तेव्हां तो कसा गेला होता आणि आला कसा, हें आतां कळणें शक्यच नव्हतें. रंगोपंतानें मात्र कांहीं दिवसांनीं गुंडोपंताजवळ कबूल केलें, कीं आपण एके दिवशीं त्याच्या पश्चात् येऊन तो कागद नेला आणि आपल्या बहिणीची मर्जी संपादण्यासाठीं तिच्या स्वाधीन केला. तिनें फार आनंदून तो जाळला अशी आपली समजूत होती; परंतु जाळण्याच्या ऐवजीं तो कदाचित् तिनें कोठें ठेविला असेल आणि पुढें वसरली असेल, त्याखेरीज सांपडावा कसा ?

खरें बुईल सांपडल्यानंतर इस्टेटीचा ताबा घेण्यास सीतारामास मुळींच कांहीं अडचण राहिली नव्हती. आणि त्याचे आईस व त्यास आधीं जो संकोच वाटत होता, तो संकोचही आतां वाटण्यास कारण नव्हतें. विश्वानाथपंताच्या मदतीनें कायदेशीर काम व्हावयाचें तें झालें, आणि रंगोपंताच्या मूर्खपणानें सर्व इस्टेटीची जी दुर्व्यवस्था झाली होती ती गुंडोपंताच्या मदतीनें कायदेशीर सुव्यवस्थितपणास लागली. गुंडोपंत आतां इमानें-इतबारें काम पाहूं लागला. राधाबाईंना आपल्या वडिलांचें घर चिंतोपंतानें आणि सरस्वतीबाईनें सोडण्याला लाविलें होतें, त्याच घरांत पुनः राहण्यास जाण्यास आतां अडचण राहिली नाहीं. मूळचें घर त्यांनीं आपल्या थोरल्या मुलाच्या (चिंतोपंताच्या) नांवानें बुइलांत होतें, त्याप्रमाणेंच ठेविलें. वेड्याची अन्नवस्त्राची व्यवस्था बुइलांत केली होती त्याप्रमाणें करून ठेविली. सुमारें एक वर्षाच्या आंत कांहीं तरी सुव्यवस्थितपणा आल्यानंतर फेअरब्रेनसाहेबांच्या हिमतीखालीं राधाबाईनें आपल्या सीतारामास इंग्लंडास पाठविलें. फेअरब्रनसाहेबांस फर्लो घेऊन स्वदेशीं जावें असें वाटत होतें ह्मणून त्यांनीं वर्षाची रजा घेतली, आणि आपल्याबरोबरच सीतारामास इंग्लंडास नेलें. यामुळें आणि त्यांचे वडील आतां खुद्द लंडनमध्येंच बढतीच्या धर्माध्यक्षाच्या पदवीपर्यंत आले असल्याकारणानें त्याची रहाण्यासंवरण्याची व अभ्यासाची व्यवस्था उत्तम प्रकारानें लागली. ज्या वेळीं सीताराम इंग्लंडास जाण्यास निघाला, त्या वेळीं त्याच्या आईस कसें वाटलें असेल हें

वर्णन करून सांगतां येत नाहीं. त्यानें जाऊं नये असेंही तिला एक वेळ वाटे. एक वेळ वाटे, कीं जावें. पुरुषानें नुसतें पदर-मोड करीत स्वस्थ बसून खाऊं नये. सीताराम ह्मणजे तिचा जीव कीं प्राण होता हें सांगावयास नकोच. तो क्षणभर नजरेस पडला नाहीं, तर तिला अगदीं कावऱ्याबावऱ्याप्रमाणें होई, आणि ती लागलीच त्याच्या शोधास लागे. पण आतां तर दोन चार वर्षे तो सातासमुद्रांच्या पलीकडे जाऊन अगदीं परक्या देशांत राहणार ! तेव्हां त्याच्या जाण्याला अनुमोदन देण्याचे वेळीं तिच्या मनांत परस्परविरुद्ध विचारांनीं अगदीं जबरदस्त काहूर केलें. तथापि आपल्या नवऱ्याची इच्छा तिला अगदीं शिरसावंद्य होती, त्याचप्रमाणें सीतारामाची उत्कट इच्छा, साधनांचें अनुकूलत्व आणि फेअर-ब्रेनसाहेबांनीं केलेला आग्रह आणि प्रोत्साहन हीं सर्व एकवटलीं आणि तिच्या मनांतल्या अल्प अनिच्छेशीं झगडलीं. तेव्हां तिची ती केवळ अति-प्रेमानें उत्पन्न झालेली अनिच्छा मागें पडली. तिनें आपलें अनुमोदन दिलें आणि त्याची सर्व तयारी करून दिली. ती ती काय तयारी करणार ? सर्व तयारी फेअरब्रेनसाहेबांनींच करविली. परंतु हिच्या जिवाची उगीच धांदल उडून राहिली. अगदीं जाण्याचा दिवस जवळ येत चालला, तसतसें तें आईचें अंतः-करण विशेषच उचंबळूं लागलें. आणि त्याच समयाला जर सिस्टर च्यारिटी, राधाबाईचा मुलगा इंग्लंडास जाणार असें फेअरब्रेनसाहेबांकडून ऐकून तिच्या भेटीस येऊन तिला फार प्रोत्साहनपर न बोलती, तर पुनः कदाचित् तिचें मन बदलतें. परंतु आतां सीतारामाच्या ऊर्जित दशेस कोणतींही विघ्नें यावयाचीं नव्हतीं; यामुळें तिला तशी बुद्धि झाली नाहीं. शेवटीं निघण्याचा दिवस येऊन ठेपला. तो शेवटला दिवस सीतारामानें अगदीं तिच्या सान्निध्यांत घालविला. तिच्यापासून क्षणभरही तो दूर झाला नाहीं. तिच्या मनांतून त्याला किती तरी गोष्टी सांगाव्या असें आलें. परंतु तो जाणार जाणार या विचारानें तिचें मन अगदीं व्यापृत झाल्याकारणानें व कंठ अगदीं सद्गदित झाल्याकारणानें तिच्या तोंडून एकही शब्द निघेना. ती प्रेमा-श्रूंनीं भरलेल्या नेत्रांनीं फक्त त्याच्या-कडे पहात राहिली. सीतारामाचीही तीच अवस्था झाली. आपल्या लहान भावंडां-विषयीं--बहिणींविषयीं व भावांविषयीं— आईला सांगावें असें वारंवार त्याच्या मनांत आलें, परंतु त्याच्याही तोंडून शब्द निघेना. शेवटीं सर्वांचा निरोप घेऊन तो मुंबईस जाण्यासाठीं निघाला. आईच्या पायांवर डोकें ठेविलें, प्रेम व शोक यांनीं उभ्या राहिलेल्या डोळ्यांतील अश्रूंनीं तिच्या पायांवर अल्पशी वृष्टि केली, तेव्हां आईला आपलें मन अगदीं आवरे-नासें होऊन तिला एकदम हुंदका आला. बहिण व भाऊ हीं रडूं लागलीं आणि आईनें अगदीं शेवटीं हुंदका आंवरून त्याला एका वाक्यांतच उपदेश केलाः " विद्येनें किती जरी मोठा झालास, तरी बाकी जसा आज आहेस तसाच माझ्याकडे परत ये, दुसरें काय सांगूं ? "

एवढाच उपदेश, परंतु तो इतका अर्थपूर्ण होता, व इतक्या सद्गदित कंठानें केलेला होता, कीं तो त्याच्या हृदयावर अगदीं अगदीं खोल असा खोदला गेला. तो साऱ्या प्रवासभर नव्हे,

तर तो इंग्लंडांत गेला तेथपासून तों परत येईपर्यंत अगदीं वज्रलेपाप्रमाणें बसला असून त्यास अनेकवार आठवे. ज्या ज्या वेळीं त्यानें कांहीं केलें, त्या त्या वेळीं त्यास त्याच्या आईच्या त्या शब्दांचें स्मरण झालेंच. कधीं ते शब्द त्याच्या स्मरणांतून गेले नाहींत. जावे कसे! इंग्लंडांत असतांना फेअरब्रेन-साहेबांच्या आईनें व बहिणींनीं त्यास परजातीच्या घरचें कधींच स्मरण होऊं नये अशीच त्याची व्यवस्था ठेविली होती. फेअरब्रेनसाहेब होते तोंपर्यंत त्यांनीं त्याच्या शिक्षणाची सर्व व्यवस्था उत्तम प्रकारानें लावून दिली. शिक्षणाचें काम करणाऱ्या मंडळ्यांपैकीं ज्या मंडळी-जवळ राहून त्यानें स्वतः शिक्षण केलें व सिद्धि मिळविली, त्याच मंडळींत त्याचीही सोय करून दिली आणि शिवाय बॅरिस्टरीच्याही टर्म्स त्यानें भराव्या अशी तजवीज करून दिली. इंग्लंडांत असतांना त्यांतून लंडनमध्यें असतांना तरुण मनुष्यास जे कांहीं मोह उत्पन्न होण्याचा संभव असतो, त्या मोहांत पडूं नये अशाबद्दल खबरदाऱ्या घेऊन कसें वागावें याचें चांगलेंच शिक्षण फेअरब्रेन-साहेबांनीं त्यास स्वतः दिलें. सारांश, त्यांनीं आपली वर्षाची रजा त्याची उत्तम व्यवस्था लावण्याकडेच खर्च केली. कोणत्याही गोष्टींत त्यास अडचण पडूं नये असें केलें. आणि त्यामुळें आईच्या सांगीप्रमाणेंच खरोखरीच तो जसा गेला तसा परत आला असें म्हणण्याला हरकत पडणार नाहीं असें केलें. फेअरब्रेनचें घराणें इंग्लंडांत मध्यम प्रतीच्या घराण्यांपैकीं होतें. हीं मध्यम प्रतीचीं घराणीं म्हणजे इंग्लंडचा मोठा अभिमान होय. इंग्लंडांत जें काय उत्तम असतें—नीतीनें, बुद्धीनें, श्रमानें, सर्व तऱ्हेनें उत्तम असतें—तें या मध्यम प्रतीच्याच लोकांत, आणि त्या-मुळेंच इंग्लंडचें नांव आज सर्व जगभर विख्यात झालें आहे. अशा घराण्यांत राहाण्यास सांपडल्यानें तरुण पुरुष कधींही बिघडण्याचा संभव नसतो; इतकेंच नव्हे, तर उत्तम होऊन येतो. असें असल्यामुळें आणि फेअरब्रेनचें घराणें त्यांतही उत्कृष्ट असल्यामुळें, व सीताराम जात्या फारच सच्छील असल्यामुळें तो खरोखर गेला तसा परत आला. फरक काय तो इत-काच कीं, गेला तेव्हां तो साधा गेला, व आला तेव्हां ब्यारिस्टर—ॲट—लॉ व आय्. सी. एस्. हीं अक्षरें आपल्या नांवापुढें लावून आला! पुढें तो फेअरब्रेनसाहे-बांच्याच हाताखालीं मोठ्या हुद्याच्या जागीं आला. एक भाऊ अशा तऱ्हेनें विद्वान् झाल्यावर व पदवीस चढल्यावर दुसऱ्या भावास तशीच महत्वाकांक्षा उत्पन्न होईल यांत आश्चर्य काय? तोही त्याची वेळ आली तेव्हां अगदीं थोरल्या भावा-प्रमाणेंच परीक्षा देऊन येण्यासाठीं गेला आहे.

राधाबाईस आतां मागल्या आठवणी-खेरीज दुःखशोकास कांहीं कारण राहिलें नाहीं. मुली चांगल्या सुस्थळीं पडल्या. मुलगे विद्वान् व आज्ञाधारक, मोठे मातृ-भक्त असे निपजले. वेड लागलेल्या सर-स्वतीबाईला पूर्वींच—इस्टेटीची मुखत्यारी तिच्याकडे आली तेव्हांच—राधाबाईनें आपल्याजवळ आणून ठेविलें होतें आणि प्रत्यक्ष सख्ख्या बहिणीचीही कधीं कोणी काळजी घेणार नाहीं अशी तिची काळजी घेऊन तिला सुखांत ठेविलें. आतां तिला कांहीं समजतच नव्हतें आणि तो वेडाही तसाच. परंतु त्या दोघांचें फार चांगलें जुळे. तो जवळ असावा असें. सरस्वती-

बाईला वाटे; इतकेंच नव्हे, तर तो आपला चेंडच्याच 'असें तिला वाटून ती त्याला कवटाळी. तेवढें खेरीजकरून बाकी त्यासही तिच्या संगतींत रहावेंसें वाटे. त्या दोघांची एकमेकांशीं चाललेली बड-बड ऐकून सर्वांस मोठी मौज वाटे. सरस्वतीबाई हा लोक सोडून जाईपर्यंत शुद्धीवर आली नाहीं ! ही एक परमेश्वरानें तिजवर दयाच केली म्हणावयाची. कारण ती जर नीट झाली असती, तर झाल्या प्रकारानें तिला किती दुःख झालें असतें याचें प्रमाणच नव्हतें.

आमच्या या कथानकांतील इतर पात्रांच्या भावी स्थितीसंबंधानें व आणखी कांहीं गोष्टींसंबंधानें आतां खुलासा करणें तो पुढच्या--अर्थात् शेवटल्या प्रकरणावर सोपवितों.

---

# प्रकरण ६५ वें.

## शेवटलें !

मागील प्रकरणांत आमच्या या कथानकांतील कित्येक मुख्य पात्रांची पुढली हकीकत सांगितली. आज बाकी राहिलेल्या पात्रांची हकीकत वाचकांस कळविणें जरूर. त्याखेरीज त्यांचें समाधान होणें नाहीं. राधाबाई व तिचीं मुलें आपल्या घरांत राहिलीं आणि त्यांची फारच उत्तम स्थिति झाली हें मागें आलेंच.

खूपखाबाद संस्थान व इतर अनेक संस्थानें यांच्या एजंटीवरून बुलिस्नीकसाहेबांची दुसरीकडे मोठ्या बढतीवर बदली झाली; आणि त्यांस सात आठ अक्षरांची एक पदवी मिळून पुढें त्यांचे पेन्शन घेण्याचे दिवस भरल्यावर स्वारी इंग्लंडास परत गेली. ते गेल्यावर ते ज्या शायरमध्यें रहात होते, त्यांतील एका निवडणुकीचा अधिकार असलेल्या भागातर्फे पार्लमेंटमध्यें येण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. तो एकदां विफल झाला; परंतु दुसऱ्या खेपेस सफल होऊन ते पार्लमेंटांत शिरले. ते हिंदुस्थानच्या संबंधानें मोठें माहीतगार म्हणून कॉन्सर्वेटिव पत्रें त्यांची पाठ थोपटीत असतात व ते अर्थातच, हिंदुस्थानचे लोक अगदीं लुच्चे, लबाड, हरामखोर, त्यांचे अंगीं कोणत्याही प्रकारची योग्यता अद्यापि आलेली नाहीं, असें प्रतिपादन करीत असतात. केव्हां केव्हां तिकडील वर्तमानपत्रांतून व मासिकपुस्तकांतून त्यांचे लेखही येत असतात. त्याचप्रमाणें त्यांचे स्नेही मि. स्कार्प्यं एडिटर हेही त्यांची हिंदुस्थानांत फार फार स्तुति करीत असतात. त्यांनीं तिकडे ' ऊं ' केलें, कीं स्कार्प्यंसाहेबांनीं इकडे ' टूं ' करून त्यांच्या आत्यंतिक ज्ञानाची योग्यता आपल्या पत्रांत कॉलम दोन कॉलम खर्च करून गाइलीच म्हणून समजावें.

इकडे खूपखाबादेबद्दल अनेक प्रकारचे अनिष्ट रिपोर्ट बुलिस्नीकसाहेबांनीं जातां जातां केले होतेच, त्यांत पुढें खुद्द नबाबाच्या आणि त्याच्या प्यार मंडळीच्या दुष्टपणाच्या व मूर्खपणाच्या आचरणानें भर पडली. त्याचप्रमाणें स्नीकसाहेबांच्या पाठीमागून त्या जागीं एक न्यायप्रिय व फार कडक असे साहेब आले. खूपखाबादेच्या प्रजाजनांचे हाल पाहून व मागले कागद पाहून त्यांनीं थोरल्या सरकारांत सणसणीत रिपोर्ट केला. तेव्हां नबाबांबद्दल पोलिटिकल चौकशी होऊन त्यांस गादीवरून दूर करण्यांत आलें व तें संस्थानच खालसा करण्याचा विचार सरकारांत चालला होता. परंतु कर्नल स्ट्रेटजस्टिस ( बुलिस्नीकसाहेबांचे मागून आलेले गृहस्थ ) यांनीं हा अविचार व अन्याय होणार आहे, तसें कांहीं करतां कामा नये, ह्मणून पूर्वीच्या नबाबाच्या मुलालाच गादीवर बसविलें. आणि तेथें आतां व्यवस्था बहुतेक त्यांच्याच तंत्रानें चालली असल्यामुळें बरी आहे. लोक फार सुखी आहेत.

बुलिस्नीकसाहेबांचे हेडक्लार्क बाबू महाशय यांची गठडी केव्हांच वळून त्यांची चाकरी गेली होती. तथापि संस्थानांत डोकें खुपसण्याचा त्यांनीं यत्न चालविला होता. आणि चिंतोपंतावर चांगलेंच शेकून त्यास तुरुंगांत पडावें लागलें, तेव्हां तर त्यांना फारच समाधान झालें. ते नबाबी राज्याच्या तरफदारीचा मजकूर आपल्या देशी वर्तमानपत्रांस पाठवीत तेवढ्यावर त्यांचें समाधान झालें नाहीं. पुढें त्यांनीं असा विचार केला, कीं संस्थानांतच नबाबसाहेबांचा आश्रय मिळवून आपण एक सणसणीत हिंदी व उर्दू पत्र काढावें. त्यासंबंधीं परवानगी वगैरे मिळविण्याच्या आणि प्रेस आणण्याच्या खटाटोपांत ते होते. परंतु तितक्यांत नबाबाच्याच उचलबांगडीची वेळ आली; तेव्हां त्यांनाही आपलें पोट, आपली दाढी व आपलें चंबूगबाळें आटपून जावें लागलें. तिकडे गेल्यानंतर त्यांनीं आपला मनोदय पूर्ण केला व हल्लीं ते एक वर्तमानपत्र चालवीत असतात.

जुना दरबार मोडून नवा दरबार झाला. नबाब गादीवर बसला, त्या वेळीं पुष्कळ कैदी सोडले, त्यांत चिंतोपंत सुटले. ते आपल्या घरीं येऊन थोडे दिवस राहिले. आपल्या बायकोची वेडाची स्थिति पाहून व मागला एकंदर प्रकार पाहून त्यांस अतोनात वाईट वाटलें. त्यांना कोणी आपल्या बायकोस घेऊन आपण नरसोबाच्या वाडीस जाऊन रहावें ह्मणजे तीं बरी होईल असें सुचविलें. परंतु आतां त्यांना त्या बायकोचें दर्शनही घेऊं नये असें वाटूं लागलें असल्यामुळें त्यांच्या डोक्यांत तें येईना. त्याचप्रमाणें आपल्या आईच्या व भावांच्या संगतींत रहावें हेंही पण त्यांस सुखावह होईना. तेव्हां सहज वांई वगैरे स्थळें पहाण्यास जाण्याच्या निमित्तानें ते गेले, आणि जातां जातां एका तीर्थाच्या ठिकाणीं त्यांस परमेश्वरभक्तीची गोडी लागली. पुढें त्यांस गाणगापुरास जाऊन सेवा करीत राहण्याची इच्छा होऊन ते तेथें जाऊन राहिले आहेत. हल्लीं भाऊ त्यांना लागेल तसे पैसे पाठवितो. ते तेथील भक्तमंडळीचे पुढारी बनले आहेत. त्यांचा मागचा इतिहास ते कोणास सांगत नाहींत, परंतु तो हलके हलके पुष्कळांच्या कानीं गेला असून जो तो आपआपसांत त्याबद्दल कुजबुजतो, पण आतांच्या त्यांच्या वृत्तीचा व मागल्या वृत्तीचा विरोध मनांत

आणून व उच्चार करून आश्चर्य करीत रहातो; तथापि आतांच्या त्यांच्या वृत्तीमुळें मागल्या सगळ्या त्यांच्या कृत्यांवर वगैरे पांघरूण पडलें असून ते मोठे भगवद्भक्त म्हणून त्यांची ख्याति झाली आहे.

रंगोपंतदादांच्या अंगीं शहाणपणा होता असें त्यांचें त्यांस वाटत होतें, परंतु त्या शहाणपणाचा त्यांना कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यांनीं आपल्या बायकोच्या व पोरांच्या अंगावर काय चार दागिने करून घातले असतील तेवढेच. बाकी इतक्या पैशाच्या उलाढाली करून त्यांनीं आपलें घरही भरलेंसें दिसलें नाहीं. त्यांनीं आपल्या नांवानें कर्जाऊ दिलेल्या रकमा आपणच उपटण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण तो कांहीं साधला नाहीं. कित्येकांनीं त्यांचे हातावर तुरी दिल्या व कित्येकांनीं त्या रकमा ज्यांच्या त्यांस देऊं असें सांगितलें. त्याला तूं कोण म्हणून विचारलें. पारशाच्या संगतीनें केलेल्या व्यापारांत जबरदस्त ठोकर बसून उलट अंगावर भलतेंच कांहीं कड्याळ आलें. त्या पारशानें यांच्या खोट्या सह्या करून प्रॉमिसरी नोटा दुसऱ्यास दिल्या होत्या, त्याचे पैसे यांच्या अंगावर शेकले. त्याचप्रमाणें असलाच कांहीं खोटा कागद केल्यावरून खटला होण्याची वेळ आली होती. परंतु बायकोच्या अंगावरला फुटक्या गुंजेसुद्धां दागिना आणि भावांकडून बरीच मोठी रक्कम आणली ती मिळून भर घालून तें कड्याळ जेमतेम दूर सारलें; व त्या पारशी साथीदाराच्या कर्तबगारीनें आणखी कित्येक रकमा अंगावर येत होत्या, त्या टाळाव्या म्हणून त्यास अज्ञातवास करावा लागला. ते आतां नुकतेच कोठें हैद्राबादेस एका नबाबाच्या घरीं कारकून आहेत अशाबद्दल पत्र आलें आहे. मग खरें खोटें कोणास ठाऊक !

भास्करभाऊंची वृत्ति पहिल्याप्रमाणेंच खोडसाळ. ती तशीच कायम राहून व अभ्यासाला लवकरच फांटा मिळून त्यांनीं उनाडक्यांत दिवस काढण्यास आरंभ केला. डोकें वाढवून शर्ट घालून उपरण्याचा बोळा कांखेंत मारून विडी ओढीत रस्त्यावरून हिंडतांना ते दिसूं लागले. ती हकीकत बापास कळून त्यानें त्याला सुधारण्यासाठीं आपल्याजवळ नेलें. तेव्हां तेथें घरांतच चोरी करून स्वारी कोणीकडे निघून गेली. पुढें पैसे संपले तेव्हां राजश्री परत आले. वडिलांनीं त्यांना जवळ केलें नाहीं, परंतु आईनें चोरून त्यांचा चरितार्थ त्यांच्या मनाप्रमाणें चालेल, असें नेहमीं सुरू ठेविलें ! अखेरीस तीही रहाणी त्यांस न आवडून त्यांनीं आपल्या कांहीं जुन्या मित्रांना जमवून एक नाटककंपनी काढण्याचा विचार चालविला. सीतारामानें उदार अंतःकरणानें त्यास आपल्याजवळ येऊन राहण्याविषयीं सांगितलें; परंतु त्याला त्याबद्दल यांनीं शिव्यांनीं पूर्ण भरलेलें असें पत्र लिहिलें. होतां होतां असा विलक्षण प्रसंग आला, कीं भास्करभाऊंची कंपनी सीताराम ज्या गांवीं मॅजिस्ट्रेट होता त्याच गांवीं आली आणि भास्करभाऊंनीं मंडळीपैकीं कोणाचें कांहीं चोरल्यावरून फिर्यादीपर्यंत पाळी येऊन त्याच्याचपुढें फिर्याद आली. असा विलक्षण प्रसंग आला याबद्दल सीतारामाससुद्धां फार वाईट वाटून त्यानें फेअरबेनसाहेबांस सांगून ती केस आपल्या पुढून काढून दुसऱ्याकडे नेवविली. परंतु एक वेळां कैदी या नात्यानें आपल्यास सीतारामापुढें उभें रहावेंच लागलें, याबद्दल तरी भास्करभाऊंस वाईट वाटलें कीं नाहीं

कोण जाणे ! पुढें त्याच्यावर पुरावा न झाल्यामुळें तो सुटला आणि अजून सीतारामास शिव्या देत असतो !

गुंडोपंत तर आतां कुलमुखत्यार झाले आणि ते आतां आपला अधिकार खरोखर फारच उत्तम प्रकारानें व अतिशय सचोटीनें चालवीत असतात.

सीताराम इंग्लंडांतून परत आल्यानंतर त्याचें लग्न झालें. आजमितीस राधाबाईस एक नातू व एक नात झाली आहे. तीं दोघेंही इंग्लंडास जाण्याच्याच गोष्टी आजीजवळ बोलत असतात. आणि सिस्टर च्यारिटी नेहमीं भेटण्यास येते तेव्हां ती त्या मुलीस मी घेऊन जाऊन मोठी डॉक्टरीण बनवून आणीन म्हणून म्हणत असते. राधाबाईच्या मनांतून अजून तो इस्पितळांतला अनुभव आणि देखावा हीं दूर झालीं नव्हतीं. ह्यामुळें तिला असें वाटे, कीं असें जर झालें तर केवळ वावगेंच होईल असें नाहीं. घरांतलीं कामें करून शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या घरीं जाऊन ज्यांस जी मदत पाहिजे असेल ती देण्याची राधाबाईस फार हौस. यामुळें सर्वांस तिच्याबद्दल प्रेम व पूज्यबुद्धि वाटत आहे व ती गरिबांगुरिबांस तर केवळ माउलीप्रमाणें वाटत असते.

फेअरब्रेनसाहेब पुढें दिवसानुदिवस बढतीच्या जागा मिळवून मोठ्या पदवीला चढले, परंतु 'नेटिव्ह' लोकांविषयीं त्यांची जी प्रेमबुद्धि होती ती फारच अधिक वाढत जाऊन ते आपल्याकडून होईल तितकी खटपट करून इतर साहेब लोकांच्या मनांतील दुजाभाव व नेटिवांविषयीं वाईट मत दूर करीत असतात.

वाईल्डसाहेबांची व त्यांची भेट जेव्हां जेव्हां होते, तेव्हां तेव्हां ते त्यांस सीतारामाचा दाखला देऊन त्यांचें मत बदलण्याचा यत्न करीत. परंतु वाईल्डसाहेब असेंच म्हणत, कीं सीतारामासारखे लोक फार थोडे. ते असें म्हणत खरें; पण त्यांच्या मनांतून त्यांचें मत थोडें तरी बदललें होतें खास. सीतारामाबद्दल तर त्यांचे मनांत फारच आदर उत्पन्न झालेला होता. फेअरब्रेनसाहेब असें म्हणत, कीं आमच्या लोकांचा तुटकपणा व तुसडेपणा जर कांहीं कमी होईल आणि हिंदूंतले चांगले लोक जर दोन पावलें पुढें येतील, तर परस्परांविषयींचें विषम मत दोनही बाजूंनीं सुधारेल. हें साधावें—आपल्या हातून होईल तितकें करून सुधारावें—म्हणून ते आपल्या बंगल्यावर वारंवार पार्ट्या करीत आणि आपल्या पत्नीकडून हिंदुस्त्रियांनाही पार्ट्या करीत. या पार्ट्यांपासून अल्पस्वल्प फायदा दृष्टीस पडूं लागला होता व त्यामुळें त्यांस अधिकच उमेद येत चालली होती.

